

प्रसिध्द राष्ट्रभक्त

# अब्राहाम लिंकन.

रा० मा० भांबुरकर




अमेरिकेंतील

प्रसिद्ध राष्ट्रभक्त

# अब्राहाम लिंकन व गुलामगिरीचा -हास.

॥ समजले आणि वर्तले ॥ तेच भाग्यपुरुष झाले ॥ रामदास.

हें पुस्तक

श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज गायकवाड

यांच्या आश्रयाखालीं

रामराव मार्तंड भांबुरकर

( संगीत गंगालहरी व दीर्घायु कसें व्हावें या पुस्तकांचा कर्ता )

यानें तयार करून

बडोदें येथें

जयविजय छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

शके १८३० इ. स. १९०८.

किंमत ४ रुपये राजेरजवाड्यांसाठीं
— २ — इतरांसाठीं.

श्री.

अर्पणपत्रिका.



**श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज गायकवाड,**
**सेनाखासखेल समशेर बहादूर,**

यांस, त्यांची

देशहितैकबुद्धि, विद्याभिलाष, देशोन्नतीची उत्कटेच्छा

इत्याद्यनेक गुणांस लुब्ध होऊन,

**श्रीमंतांच्या** आश्रयाखालीं लिहिलेला हा लहानसा ग्रंथ

परवानगीनें अर्पण करीत आहे.

श्रीमंताचा नम्र सेवक,

**रामराव मार्तंड भांबुरकर.**

ग्रंथकर्ता

# अभिप्राय.

## रा. रा. रामराव मार्तंड भांबुरकर यांस.

आपण लिहिलेल्या लिंकनचरित्राचा बराचसा भाग मी वाचून पाहिला आहे. स्वदेशाच्या कल्याण करण्याच्या योग्य लालसेनें प्रेरित होऊन ज्यानें आपलें सर्व बुद्धिवैभव व कर्तृत्व-शक्ति देशकल्याणाच्या कामीं लाविली अशा माणसांच्या चरित्रां पासून प्रस्तुत काळीं आपल्या देशबंधूंस बऱ्याच ग्राह्याग्राह्य गोष्टी कळून त्यांच्या प्रयत्नास योग्य दिशा लागण्यासारख्या आहेत. अशीं चरित्रें महाराष्ट्र भाषेंत थोडीं आहेत. हल्लीं आपण लिहिलेलें लिंकनचरित्र चांगलें उतरलें आहे व हृदयंगम झालें आहे. अशीं चरित्रें आपण पुढें लिहीत जाऊन महाराष्ट्र भाषा ग्रंथांत भर घालण्याची उमेद धरावी.

आपल्यास सर्व प्रकारें आपल्या बडोदाधीश महाराजां-कडून व इतर उदारधी गृहस्थांकडून द्रव्यद्वारा व इतर प्रकारानें प्रोत्साहन मिळत जावें असें मी इच्छितों.

आपला
(सही) **भास्कर रामचंद्र आर्ते.**
प्रोफेसर बडोदरा कॉलेज.

बडोदें ता. ९ मे
१९०८.

# प्रस्तावना.

* ॥ थोर महात्मे होउन गेले चरित्र त्यांचें पहा जरा ॥
॥ आपण त्यांच्या समान व्हावें हाच सांपडे बोध खरा ॥
॥ जग हें त्याजितां भवसागरिंच्या वाळवंटिवर तरी जरा ॥
॥ चार पाउलें उमटवुं अपलीं, ठेवुं खुणेचा मार्ग बरा॥१॥

राष्ट्रहिताप्रीत्यर्थ ज्या सत्पुरुषांनीं स्वार्थावर पाणी सोडून आपले देह झिजविले आणि परिणामीं विजयी होऊन राष्ट्रोद्धार केला, ते महात्मे या भूतलावर धन्य होत. असे सज्जन स्वदेशांतले असोत अगर परदेशांतले असोत, त्यांचीं पुण्यश्लोकचरित्रें वाचून व श्रवण करून, स्वदेश व स्वधर्म यांचा अभिमान लोकांत सदैव जागृत ठेवणें, हें प्रत्येक देशभक्ताचें कर्तव्यकर्म होय. अशा चरित्रांच्या वाचनानें प्रत्येकास आणि विशेषेंकरून पुढील पिढीच्या लोकांस चांगलें शिक्षण मिळेल व त्यांच्या वर्तनक्रमांत सुधारणा होत जाईल. ॥ नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥ ( मेघ. ११४ ) या कविकुलगुरू कालिदासाच्या उक्तीला अनुसरून उदयास्ताचा क्रम हा प्रत्येक राष्ट्रास लागू आहेच. त्याप्रमाणें जें राष्ट्र भरभराटींत आहे त्यांतील लोकांनीं अशीं चरित्रें वाचलीं असतां राष्ट्रास विशेष बळकटी आणण्याकडे त्यांची प्रवृत्ति होऊन त्याचा उत्कर्ष वाढत जातो,

* अमेरिकन् कवी “ लॉंगफेलो ” याच्या कवितेचें हें रूपांतर आहे.

आणि ज्या राष्ट्राचा अधःपात झाला असेल त्यांतील लोकांनीं हीं चरित्रें वाचलीं असतां, त्याचें पुनरुज्जीवन होतें. शूर आणि थोर महात्म्यांचे जड देह जरी नाश पावतात तरी त्यांचे अतुल पराक्रम व अनेक संकटें सहन करून त्यांनीं संपादन केलेली सत्कीर्ति भूमंडळावर अजरामर राहतात; या साठीं ज्यांत त्यांचे पराक्रम व सत्किर्ति यांचें वर्णन केलेलें असतें, अशीं चरित्रें वांचून, ऐकून व त्याप्रमाणें आपल्या वर्तनक्रमांत सुधारणाकरून राष्ट्रोन्नतीसाठीं सर्वत्रांनीं अहोरात्र झटावें हें विहित आहे.

उत्तरअमेरिकेंतलि संयुक्त संस्थानांत इ. स. १७८९ पासून इ. स. १९०१ पावेतों २५ अध्यक्ष होऊन गेले व हल्लीं २६ वा अध्यक्ष आहे; या सर्वांचीं नांवें स्मरणार्थ टिपणांत दिलींच आहेत त्यांपैकीं सांप्रत ज्या सत्पुरुषाचें हें चरित्र लिहिलें आहे, तो सोळावा अध्यक्ष होय. अध्यक्ष लिंकन याचें चरित्र **नोहा-ब्रुक्स, ब्राउन, बॅरट,** वगैरे बऱ्याच आंग्लग्रंथकारांनीं इंग्रजी भाषेंत लिहिलें आहे; परंतु महाराष्ट्र भाषेंत त्या पुरुषाचें विस्तृत चरित्र कोणी लिहिलेलें आढळत नाहीं, तें आमचे परमकृपाळू व विद्याभिलाषी श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या परवानगीनें मी यथामति लिहिलें आहे, त्याचा सर्व देश-भक्त वाचकवर्गांनीं कृपाकरून स्वीकार करावा.

या पुस्तकाचीं एकंदर प्रकरणें २७ असून प्रत्येक प्रकर-

णांतील मुख्य मुख्य गोष्टी अनुक्रमणिकेंत दिल्या आहेत; आणि पुस्तक वाचतांना आबालवृद्ध वाचकांस संयुक्तसंस्थानांतील प्रांत, गांवें, शहरें, नद्या, डोंगर वगैरेची चांगली माहिती व्हावी, एतदर्थ प्रारंभीं संयुक्तसंस्थानाचा संपूर्ण नकाशा दिला आहे. पुस्तकांतील स्मरणार्थ टिपणांत संयुक्तसंस्थानांतील निरनिराळीं संस्थानें, त्यांतील प्रदेश व त्यांच्या लोकसंख्या आणि. इ. स. १७८९ पासून इ. स. १९०९ ता. ४ मार्च पावेतोंचे अध्यक्ष ( प्रत्येकाच्या सनासह ) या सर्वांचीं नांवें दिलीं आहेत, आणि शेवटीं उपसंहारांत या सत्पुरुषाच्या चरित्रांतून घेण्यासारख्या गोष्टींचं थोडक्यांत विवेचन केलें आहे. नोहाब्रुक्स, ब्राउन, बॅरॅट वगैरे प्रसिद्ध आंग्लग्रंथकारांनीं केलेल्या इंग्रजी पुस्तकांच्या आधारानें हा ग्रंथ लिहिला असून बऱ्याच ठिकाणीं आपल्या मराठी व संस्कृत ग्रंथांतून अनुसंधानेंहि दिलीं आहेत.

हें पुस्तक कोणत्याही इंग्रजी ग्रंथाचें अक्षरशः भाषांतर नाहीं. इंग्रजीभाषेचें अक्षरशः भाषांतर केल्यानें मराठी भाषेचें सौंदर्य कमी होण्याचा बराच संभव असतो, ह्मणून तसें भाषांतर करण्याचे भरीस न पडतां मुळांतील विचारसरणी व विषयप्रतिपादन कायम ठेवून केवळ मराठी जाणणाऱ्या वाचकांस निर्दोष वाटेल अशीच भाषा घालण्याचा प्रयत्न केला आहे; तो सिद्धीस गेला आहे किंवा नाहीं, हें ठरविण्याचें काम सुज्ञ वाचकांकडे

आहे. इंग्रजी भाषा न जाणणाऱ्या वाचकांस अर्थ स्पष्ट समजण्यासाठीं इंग्रजी शब्दांचा अर्थ त्या शब्दांपुढेंच कंसांत अगर पृष्टाचे खालीं टिपेंत दिला आहे आणि बऱ्याच ठिकाणीं वक्त्यांचीं इंग्रजी भाषणें व त्यांचे उद्‌गार आहेत, त्यांचें विदेशीय स्वरूप होईल तितकें घालवून तें मराठी भाषेस शोभेल व वाचकांस रुचेल असें दाखविलें आहे.

मराठींत गद्यात्मक पुस्तक लिहिण्याचा हा माझा दुसरा प्रयत्न आहे. " दीर्घायू कसें व्हावें " हें माझें प्रथम पुस्तक परम कृपाळू श्रीमंत सरकार महाराजा सयाजीराव गायकवाड यांना पसंत पडल्यामुळें देशहितार्थ हा ग्रंथ लिहिण्यास त्यांनीं मला परवानगी दिली. त्या आज्ञेनुसार जो हा मी ग्रंथ लिहिला त्याचें सर्व श्रेय श्रीमंत सरकार महाराजा साहेबांस आहे.

या राज्याचे महालानिहाय सरसुभे मे. दि. बा. समर्थ साहेब यांनीं कृपा करून अध्यक्ष लिंकनच्या चरित्राशीं माझी प्रथम ओळख केली. युनाइटेड्स्टेटस् कडील राहणार रेव्हरंड ए. ए. पारकर ( बडोदे कँप ) यांहीं स्नेहभावानें लिंकनच्या चरित्राचीं कांहीं इंग्रजी पुस्तकें वाचण्यास मला दिलीं. लोकप्रिय श्री. मे. रा. बा. रावसाहेब संपतराव गायकवाड यांहीं कांहीं पुस्तकें देण्याची व माझे उपरी हुजूर सेक्रेटरी मे. रा. बा. गणेश बळवंत आंबेगांवकर बी. ए. एल्. एल्. बी. यांहीं या

पुस्तकाचे संबंधांत कांहीं सूचना करण्याची कृपा केली, या बद्दल वरील सर्व विद्वज्जनांचा मी अत्यन्त ऋणी आहे. मि. रा. रा. विनायक भास्कर नावर (रिकार्ड कीपर हुजूर सेक्रेटरी कचेरी) यांनीं प्रेसकॉपी तयार करून दिली व अनुसंधानें पाहण्याचे श्रम घेतले, त्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे. तसेंच '**जयविजय**' छापखान्याचे मालकांनींही हें पुस्तक छापून देण्याचे कामीं जी मदत केली त्याबद्दल तेही स्तुतीस पात्र आहेत.

अशा चरित्रांची दिवसानुदिवस जास्त प्रसिद्धि होऊन आमच्या इतिहासभांडारांत त्यांची भर पडावी, सामाजिक ऐक्याची वृद्धि होऊन स्वदेशभक्तीचें स्फुरण उत्तरोत्तर लोकांत विशेष होत जावें, आणि आमचे परमकृपाळु श्रीमंत सरकार महाराजा साहेब चिरायू होऊन त्यांची राज्यसंपदा व सत्कीर्ति आचंद्रार्क राहावी व त्यांहीं ग्रंथकर्त्यांस असेंच वरचेवर उत्तेजन देऊन देशसुधारणा करावी, एवढें त्या जगन्नियंत्या परमेश्वराजवळ मागणें मागून ही प्रस्तावना संपवितों.

मुक्काम बडोदें ता. ११ जून १९०८ मिति ज्येष्ठ शु. १२ गुरुवार शके १८३०

**रामराव मार्तंड भांबुरकर**
चरित्र लेखक.

---

# स्मरणार्थ टिपण.

( संयुक्त संस्थानाची भूगोलविषयक व ऐतिहासिक संक्षिप्त माहिती. )

## अमेरिकेंतलीं संयुक्तसंस्थानें, प्रदेश, त्यांची लोकसंख्या (इ.स. १९०० ची) व अध्यक्षांचीं नांवें खालीं दिलीं आहेत:-

### १ न्युइंग्लड स्टेटस्.

| संस्थानें. | लोकसंख्या. |
|---|---|
| १ मॅसॅचुसेटस्. | २,८०५,३४६ |
| २ मेन्. | ६९४४६६ |
| ३ न्यु हॅम्पशायर. | ४११५८८ |
| ४ व्हरमॉट्. | ३४३६४१ |
| ५ ऱ्होड आयलॅंड्. | ४२८५५६ |
| ६ कॉनेक्टिकट्. | ९०८४२० |

### २ मिड्ल् आट्लांटिक स्टेटस्.

| | |
|---|---|
| ७ न्युयॉर्क. | ७,२६८,८९४ |
| ८ पेन्सिल्वेनिआ. | ६,३०२,११५ |
| ९ न्युजर्सी. | १,८८३,६६९ |
| १० डिलावेर. | १८४७३५ |
| ११ मेरीलॅंड. | १,१८८,०४४ |
| १२ कोलंबिआ( डिस्ट्रिक्ट. ) | २७८७१९ |

| | | |
|---|---|---|
| १३ | व्हर्जीनिआ. | १,८५४,१४८ |
| १४ | वेस्ट व्हर्जीनिआ. | ९५८८०० |

## ३ सदर्न स्टेटस्. ( पूर्व भाग. )

| | | |
|---|---|---|
| १५ | नॉर्थकॅरोलिना. | १,८९३,८१० |
| १६ | सौथ कॅरोलिना | १,३४०,३१६ |
| १७ | जॉर्जिजा. | २२१६३३१ |
| १८ | फ्लॉरिडा. | ५२८५४२ |
| १९ | आल्बामा. | १८२८६९७ |
| २० | मिसिसिपी. | १,५५१,२७० |
| २१ | टेन्नीसी. | २,०२०,६१६ |

## ४ सदर्न स्टेटस्. ( पाश्चिमभाग. )

| | | |
|---|---|---|
| २२ | लुइझिआना | १,३८१,६२५ |
| २३ | टेक्सास्. | ३,०४८,७१० |
| २४ | आरकान्सस्. | ११३१५४६ |
| २५ | ओक्लाहोमा ( देश ) | ३९८३३१ |
| २६ | इन्डिअन् टेरिटरी ( प्रदेश.) | ३९२०६० |

## ५ सेंट्रलस्टेटस्. ( पूर्वभाग. )

| | | |
|---|---|---|
| २७ | ओहिओ. | ४१५७५४५ |
| २८ | इन्डिआना. | २५१६४६२ |
| २९ | इलिनॉइस् | ४८२१५५० |
| ३० | मिचिगॅन. | २४२०९८२ |
| ३१ | व्हिस्कॉन्सिन्. | २०६९०४२ |
| ३२ | केन्टकी. | २१४७१७४ |

### ६ सेंट्रल स्टेटस् ( पश्चिमभाग. )

| | | |
|---|---|---|
| ३३ | मिसौरी. | ३,१०६,६६५ |
| ३४ | आयोवा. | २,२३१,८५३ |
| ३५ | मिन्नेसोटा. | १,७५१,३९४ |
| ३६ | नॉर्थडॅकोटा. | ३१९१४६ |
| ३७ | सौथडॅकोटा. | ४१०५७० |
| ३८ | नेब्रास्का. | १०६६३०० |
| ३९ | कॅन्सास्. | १४७०४९५ |

### ७ सौथ इस्टर्न स्टेटस्.

| | | |
|---|---|---|
| ४० | कॉलेरेडो. | ५३९७०० |
| ४१ | न्युमेक्सिको. ( देश ) | १९५३१० |
| ४२ | आरिझोना ( देश. ) | १२२९३१ |
| ४३ | उटाह. | २७६७४९ |
| ४४ | नेव्हाडा. | ४२३३५ |
| ४५ | कॉलिफोर्निआ. | १४८५०५३ |

### ८ नॉर्थ वेस्टर्न स्टेटस्.

| | | |
|---|---|---|
| ४६ | मॉन्टाना. | २४३३२९ |
| ४७ | निओमिंग. | ९२५३१ |
| ४८ | ऐडेहो. | १६१७७२ |
| ४९ | ओरेगोन्. | ४१३५३६ |
| ५० | वाशिंगटन | ५१८१०३ |

### ९ एलास्का.

| | | |
|---|---|---|
| ५१ | एलास्का. ( प्रदेश ) | ६३५९२ |
| ५२ | हवाई ( प्रदेश. ) | १५४००१ |
| | | ७६,२१२,१६८ |

| अध्यक्षाची नांवें. | | | सन |
|---|---|---|---|
| १ | जॉर्ज वाशिंग्टन. | .... .... | १७८९-१७९७ |
| २ | जॉन् एडॅम्स्. | .... .... | १७९७-१८०१ |
| ३ | थॉमस् जेफरसन्. | .... .... | १८०१-१८०९ |
| ४ | जेम्स मॅडिसन्. | .... .... | १८०९-१८१७ |
| ५ | जेम्स मनरो. | .... .... | १८१७-१८२५ |
| ६ | जॉन् क्विन्सी एडॅम्स्. | .... .... | १८२५-१८२९ |
| ७ | एन्ड्रयु जॅकसन्. | .... .... | १८२९-१८३७ |
| ८ | माराटिन् वॅन ब्युरॅन् | .... .... | १८३७-१८४१ |
| ९ | विल्यम् एच् हॅरिसन | .... ... | १८४१- |
| १० | जॉन टाइलर. | .... .... | १८४१--१८४५ |
| ११ | जेम्स के, पोल्क्. | .... .... | १८४५--१८४९ |
| १२ | झॅचॅरी टेइलर. | .... .... | १८४९--१८५० |
| १३ | मिलर्ड फिल्मोर्. | .... .... | १८५०--१८५३ |
| १४ | फ्रँक्लिन् पिअर्स. | .... .... | १८५३-१८५७ |
| १५ | जेम्स बुशनन् | .... .... | १८५७-१८६१ |
| १६ | **अब्राहाम लिंकन.** | .... .... | १८६१-१८६५ |
| १७ | एन्ड्रयु जॉन्सन्. | .... .... | १८६५-१८६९ |
| १८ | युलिस्सेस एस्. ग्रांट | ... .... | १८६९-१८७७ |
| १९ | रुथर्फर्ड वि. हेइस् | ... .... | १८७७--१८८१ |
| २० | जेम्स ए. गाराफिल्ड. | .... .... | १८८१— |

२१ चेस्टर ए. ऑरथर. .... ... १८८१–१८८५
२२ ग्रोव्हर क्लीव्हलँड. .... .... १८८५--१८८९
२३ बेन्जॉमिन् हॅरिसन् .... .... १८८९--१८९३
२४ ग्रोव्हर क्लीव्हलँड .... .... १८९३--१८९७
२५ विल्यम् मॅक किन्ले .... .... १८९७--१९०१
२६ थिओडर रूझ्वेल्ट ( उपाध्यक्ष ).... १९०१—
० थिओडर रूझ्वेल्ट् १९०९

( जन्म. २७–१०–१८५८; नेमणूक १४–९–१९०१; पुनः निवडणूक ८–११–१९०४; मुदत ४–३–१९०९ पावेतों )

वरील हाकिगत जॉन् बी. मॅक्मास्टर कृत "अमेरिकन् लोकांची राजनीति " या पुस्तकांतून घेतली आहे.

मु. बडोर्दे
ता. ११-६-०८ } **रामराव मार्तंड भांबुरकर.**

———

# अनुक्रमणिका.

प्रकरण; डोग्लस्‌चा मसुदा; त्याची छी:थु; कॅंसास्‌ नेब्रास्कामध्यें पुष्कळ लोक जाऊन राहिले; डोग्लस्‌ याजवर अपशब्दांचा वर्षाव; स्प्रिंगफिल्ड्‌ येथील संमेलन व लिंकन डोग्लस्‌चें वाग्युद्ध; लिंकनचा जयजयकार व डोग्लसचा पराभव; राज्यसत्ता काळ्या किंवा गोऱ्या लोकांसाठीं याबद्दल लिंकनचें मत; पिओरी ऑइल येथील भाषण. सेनेटमध्यें शील्डस्‌ उमेदवार.

## प्रकरण ११ वें. १८९–२११

## कॅंसास्‌संबंधी वाटाघाट; गुलामगिरी व गुलामांचा व्यापार; फ्रिसाइल्‌ पार्टीचा अग्रेसर.

कॅंसास येथें लोकांचा भरणा; कर्मचांडाळ व खंडन करणारे; कृष्णकारस्थानाचे गुत्ते व डॅव्हे ऍचिसन्‌; कर्मचांडाळांचा जुलूम; ऑसाओटोमीच्या मुलाचा खून व गुलामगिरीच्या उच्छेदाविषयीं त्याची प्रतिज्ञा; लिकॉम्प्टन्‌ येथील सभा; पिओरिया येथें लिंकनचें भाषण; गुलामगिरीविषयीं प्राचीन इतिहास; गुलामगिरी बंद केल्याबद्दल इंग्लंदांत कायदा; गुलामगिरीविषयीं अमेरिकेंत राष्ट्रीय सभेचे ठराव; सामा-

लिंकन वियर्यी लोकांचे विचार तरंग; त्याच स्वधर्मासंबंधी विचार; स्वातंत्र्य हाच सत्याचा मार्ग; पापाचा घडा भरला कीं ईश्वरीकोप होतो; भूतदया व स्वदेशप्रीति; गुलामगिरीविषयीं भयंकर ओरड; राज्यनाशास कारण कोणतें ? राज्याचें जूं झुगारून देण्याचा प्रयत्न; बंडास बुशननूची मदत; स्टँटनूची अध्यक्षास सूचना; राजद्रोही मंडळी; सात संस्थानांनीं विभक्त होऊन संयुक्त संस्थानाचा तिरस्कार केला; लिंकनची सहनशीलता व जे. डेविसूचा जुलूम; स्टिफनूचा आपल्या लोकांस उपदेश; बंडाचें ऊग्ररूप व शांतता परिषद्; आपसांतले युद्ध ( सिविलवॉर ) होण्याचा रंग.

विषयीं हकीगत; राजनिष्ठसंस्थानें; लिंकन अध्यक्ष नसून सिवर्ड हाच अध्यक्ष असा लोकांचा भ्रम व त्याचें निरसन.

## प्रकरण १९ वें. ३९१–३८४

## लिंकन व राजद्रोही मंडळी; दोन शोचनीय मृत्यु.

व्हाइट्‌हौस राजवाड्यांत लिंकन याचें स्थानापन्न होणें; बंडखोरांची सभा व नियमाचा मसूदा; राजानें सूर्याप्रमाणें तीव्र अथवा मृदुवृत्ति धारण केली पाहिजे; दोन गुप्त हेर तहासाठीं आले; अध्यक्षाची मौनवृत्ति व टाल्बट् यास सूचना; गुप्तहेराच्या जबाबाचा त्यांनीं केलेला अर्थ; बंडखोरांचा समूह; लेफ्टनंट् अंडरसनचा बंडखोरांस धाक; उभयपक्षाची युद्धाची व्यवस्था; सम्टर् किल्यावर बंडखोरांची पहिली तोफ सुटली; अंडरसन् यानें पुनः जयध्वज उभारला सम्टर् किल्ला बंडखोरांनीं घेतला; उत्तरेकडील; लोकांचा कोपाग्नि; अध्यक्षाचा जाहिरनामा व पाऊण लाख लष्कराची मागणी; त्याची चिंताग्रस्तास्थिति; अध्यक्षास प्रतिकूळ उत्तरें व कित्येकांची मदत; स्वातंत्र्यासाठीं समरांगणांत उड्या घालण्याची लोकांची सिद्धता; देशोन्नतीची स्वाभाविक जागृती ....

व्हर्जिनिया; राष्ट्रीय सभेकडील हकिगतींतील मुद्दे; केंटकीचा तिऱ्हाइतपणाचा बहाणा; डेविसच्या ब- हाण्याची व्याख्या; लष्कराची व पैशाची मागणी मंजूर; युद्धाच्या सिद्धतेबद्दल लोकप्रवृत्ति; इंग्लंद व फ्रान्स् यांनीं बंडखोरांचे हक्क मंजूर ठेविले; बंडखो- रांच्या दोघा वकिलांस अटकेंत ठेविलें; इंग्लंद व संस्थानें यांत कलह होण्याचा रंग व बंडखोरांचा संतोष; वकिलांस कैद केल्याबद्दल मि. सिवर्ड वगैरे मंडळींची मान्यता; अध्यक्षाचें मत व मि. हाले याचें म्हणणें; वकिलांस सोडल्यामुळें इंग्रजांशीं युद्ध प्रसंग टळला; त्याची लोकांत निंदा; युरोपांती- ल राष्ट्रांचें धोरण; आपलें शील कधींच सोडीत नाहींत तेच कुलीन.

## प्रकरण २१ वें. ४११–४५०

## गुलामगिरीचा प्रश्न; राष्ट्रोन्नतीचा रवी उगवला; अजरामर जाहिरनामा.

मॅक्क्लेलन् व फ्रिमॉंट यांच्या नेमणूकी व मिसौरी येथील भयंकर स्थिति; फ्रिमॉंट्रचा जाहिरनामा; अ- ध्यक्षाचें त्याविरुद्ध मत; जे. टॉमसन्चा बंडखोरां- तर्फे जाहिरनामा; जाहिरनाम्यांत फेरफार करण्या-

विषयीं फ्रिमाँट् यास सुचना; फ्रिमाँटच्या मनाची स्थिति व त्यानें बंडखोरास कळविलेला मजकूर; डेविड् हंटर व अध्यक्ष यांचे परस्परविरोधी जाहिरनामे; अध्यक्षाचा मुख्य हेतु; या विषयीं लोक काय बोलतात; बंधविमोचनाविषयीं अध्यक्षानें सभेस केलेली शिफारस व गुलामगिरीचा उच्छेद सर्वानुमतें करण्याचें धोरण; सरहद्दीवरील संस्थानिकांची सभा आणि कोलंबिया येथें गुलामगिरीचा उच्छेद; मुक्त झालेल्या गुलामांस युद्धाचे कामीं लावण्याची योजना; लोकांत असंतोष व अध्यक्षास तगादा; अध्यक्षानें ग्रीले यास पाठविलेलें पत्र; सौथमौन्टन् व ऍंटिएटम् येथील लढाया; बंडखोरांची धांवपळ; ॥ यशः पुण्यैरवाप्यते ॥ गुलामगिरीचा नायनाट व स्वातंत्र्याचा विजय; अध्यक्षाचा जयजयकार ॥ बोले तैसा चाले त्याची वंदावीं पाउलें ॥. आतां पुढें काय करणें उरलें आहे? गुलामगिरीच्या उच्छेदाची कायदेशीर अंमल बजावणी; अजरामर जाहिरनाम्यांतील सुधारलेलीं तत्वें; इंग्रज सरकाराचे विरुद्ध धोरण; त्यांचा सेक्रेटरी जॉन्‌रसेल् याचा खोडसाळपणा; गुलामगिरीचा अस्त आणि विश्वस्वातंत्र्याचे दोन अजरामर जाहिरनामे.

## प्रकरण २२ वें. ४५१-५०१

## लिंकन व मॅक्क्लेलन्; फौजखात्याची कठीण स्थिति.

लष्करी अंमलदार मिळण्याची अडचण; बलाढ्य फौज तयार करण्याचा मॅक्क्लेलन्चा हेतु आणि त्याच्या योजना; स्कॉट् याचा राजीनामा व अध्यक्षाची शिफारस; पश्चिमेकडील स्थिति व लोकांची चर्चा; ग्रांट् यानें बंडखोरांचे किल्ले घेतले; त्यानें बंडखोरांस दिलेलें चोख उत्तर; पी. रिज्ज येथील विजय; शिलोह येथें रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या; बंडखोरांचा पराभव व त्यांची चारी संस्थानें गेलीं; बर्न्साइड व फॅरेगेट् हे विजयी झाले. मॅक्क्लेलन्च्या चेंगटपणामुळें अध्यक्षास त्रास; वॉशिंग्टन् येथें गोळा झालेली मंडळी; युद्धकला शिकण्याची अध्यक्षास हाव; मॅक्क्लेलन्ची अध्यक्षाविषयीं तिरस्कारबुद्धि; अध्यक्षाच्या हुकुमाची अमान्यता; मॅक्क्लेलन्च्या निष्फळ योजना; ॥ न प्राणान्ते प्रकृति विकृतिर्जायते चोत्तमानाम्; ॥ पुत्रशोका सारखें दुःख नाहीं; पोटोमॅकचें सैन्य; अध्यक्षाच्या हुकुमाची पुनः अमान्यता; शत्रूच्या सैन्याची स्थिति; अध्यक्षाचें मॅक्क्लेलन् यास नम्रतेचें पत्र; त्यास लष्क-

क् सैन्यांत भयंकर कत्तल; बंडखोरांची सरशी; तह करणारी मंडळी; वूड व अध्यक्ष यांचा तहासंबंधी पत्रव्यवहार; बर्नसाईड्चा उपहास व सर्व ठिकाणीं द्वैताची प्रवृत्ति; अध्यक्षाचे हूकर यास खुबीदार पत्र; सदरपत्राचा परिणाम; सैन्याची फेरतपासणी आणि टॉड्चें घोड्यावर बसणें; हूकर कडून पोटोमॅकूच्या सैन्याची अव्यवस्था; द्रव्य आणि मनुष्य यांच्या हानीमुळें लोक गांगरून गेले. लष्करांत भरती करण्याचा कायदा व सिद्दी लोकांस लष्करी शिक्षण; एक कोट डॉलर्सच्या नोटा काढल्या; पैशा ऐवजीं पोष्टांचीं तिकिटेंच चालू झालीं; अतिशय महागाई; हा राजद्रोही कां राजनिष्ठ? आणि कठिण प्रसंग; राष्ट्रीय सरकाराचें जूं झुगारून देण्याचा वॉलंडिंगहाम याचा प्रयत्न; त्याचा काराग्रहवास आणि शिक्षा; लोकांत असंतोष व अध्यक्षाचें प्रत्युत्तर; बंडखोरांची दैवगति फिरण्यास प्रारंभ; ग्रांट याचा व्हिक्सूबर्ग् येथें विजय आणि त्याविषयीं योग्य अभिनंदनीय पत्र; हूकरचे जागीं जनरल मीडची नेमणूक; रणभूमीची योजना; सैन्य नेण्याचे मार्ग; सं. संस्थानाचा जनरल ठार झाला; उभयपक्षांची फौज व लढाईचा परिणाम; बंडखोरांच्या लष्क-

## प्रकरण २४ वें.

## राजकीय कामांचे घोटाळे; लिंकन याची अध्यक्षस्थानीं दुसऱ्या वेळीं नेमणूक; त्याचें अखेरचें व्याख्यान.

ग्रांट यास लेफ्टनंट जनरल नेमिलें; लष्करी अंमलदारांच्या वॉशिंग्टन् येथें खेपा; ग्रांट् याचा दरबारांत सन्मान व त्यास मिळालेला हुकूम; त्यास डामडौलापेक्षां युद्धाची किंमत जास्त होती; शर्मन् याची नेमणूक; द्वेषभाव नाहींसा करण्याविषयीं ग्रांट्चें धोरण; बंडखोरांनीं दातीं तृण धरून शरण आलेंच पाहिजे; संयुक्त संस्थानाचा विजय; भूमातेवर शस्त्र उचलणाऱ्या अधमाधमास देहांत प्रायश्चित्तच योग्य; हूड् याचे सैन्याचा पराभव व संयुक्त संस्थानाच्या लोकांचा आनंद; बट्लर हा बाटलींत कोंडला गेला; ब्लॅअरच्या घराची राखरांगोळी; वॉशिंग्टन् शहरावर बंडखोरांची चाल; त्यांना पळ काढावा लागला; लिंकनची पुनः नेमणूक होण्यासंबंधांत दोन तट; गुप्त जाहिरनामा; ग्रांट्च्या नेमणुकीचा प्रश्न; बाल्टिमोर येथील राष्ट्रीयसभा; जॉन्सन् उपाध्यक्ष; लिंकनचें स्वतःच्या नेमणुकीविषयीं म्हणणें; शिकागो येथील राष्ट्रीयसभा व लिंकनचें मत; क्लीव्हलँड येथील सभा; तिन्ही ठिकाणच्या सभेचे उद्देश; संयुक्त संस्थानाचा विजय; आपसांत समजुतीसाठीं दोघा वकिलांची योजना व ग्रीलेचें

## प्रकरण. २५ वें. ५९१—६०४

# व्हाइटहौस राजवाड्यांत अध्यक्ष आणि त्याच्या घरमंडळीचे नित्य व्यवसाय.

धन्य सत्पुरुष कोण ?; लिंकन घराण्याची साधी राहणी; बेकरची निंदा असलेला अर्ज अध्यक्षानें जाळून टाकिला; अनाथ स्त्रियांचें दुःखनिवारण केलें; गाणें, नाटकगृहांत जाणें वगैरे करमणूकीचे प्रकार; अध्यक्षाचा नेहमीचा आहार; त्याचा मुलगा रॉबर्ट्; खोडकर मुलगा टॉड्; उभयतांची साधी राहणी; कित्ता घालून देण्याजोगें वर्तन; 'सोल्जर्स होम' नांवाच्या बंगल्यांत सुखाचे दिवस; अध्यक्षाचे रक्षणार्थ तुरुक्स्वारांची योजना; सेक्रेटरीनें गमतीस्तव टॉड् यास केलेला हुकूम; बायकोच्या आग्रहास्तव अध्यक्ष हा भलाजंगी सोटा हातांत बाळगीत असे; संयुक्तसंस्थानाच्या बचवाविषयीं त्याचे उद्गार; मानपानाकडे त्याचें दुर्लक्ष आणि अर्जदाराविषयीं कळकळ; सदाचरणाचे प्रकार व लोकांस उपदेश.

## प्रकरण २७ वें. ६२१—५३९

## नाटकगृहांत खून; वृत्तांताचा शेवट.

देह त्यागितां कीर्ति मागें उरावी; शर्मन् यानें बंडखोरांस जिंकिलें; चार्लस् टौन हस्तगत झालें; लि याची तहासंबंधी इच्छा; शेरिडन् याचा विजय व ली याच्या सैन्याचा उपासमार; पिट्स्बर्ग हस्तगत झालें; रिचमंड येथें बंडाची ओरड व डेविस् यास कारागृहवास; विझल यानें जयध्वज उभारला व बंडखोरांचा अस्त झाला; अध्यक्षाचा रिचमंड येथें सत्कार; लोक ईश्वराजवळ अध्यक्षाचें अभिष्टचिंतन करूं लागले; मी आज कृत्यकृत्य झालों; अध्यक्ष व ग्रांट यांच्या भेटी; ली सर्वांसहित स्वाधीन झाला; बंडाचा शेवट व सर्वत्र शांतता; सन्मानार्थ तोफा सुटल्या; आनंदप्रदर्शन व विजयोत्सव; लुइझिआना येथील गुलामगिरीच्या उच्छेदाविषयीं दोन शब्द; विलक्षण स्वप्न व दुश्चिन्ह; नाटकगृहांत खेळ पाहण्यास जाण्याची तयारी; मारेकरी जॉनबूथ यानें लिंकन याजवर पिस्तुल झाडून त्याला ठार केलें; सिवर्ड मरतां मरतां वांचला; मारेकऱ्यास


समाप्त.

॥ श्री ॥

प्रसिद्ध राष्ट्रभक्त.

# अब्राहाम लिंकन.

आणि

# गुलामगिरीचा ऱ्हास.

## प्रकरण १ लें.

### लिंकन घराणें.





स. १७७५ पासून १७८३ पावेतों स्वातंत्र्यासाठीं अमेरिकेंत मोठी लढाई झाल्यानंतर जी क्रांति झाली, त्यावेळीं युनाइटेड्स्टेट्स्मध्यें दारिद्र्यानें आपला अंमल पूर्ण बसविला होता. राज्याची सांपत्तिक स्थिति चांगली नव्हती. त्यावेळीं जिकडे तिकडे पैशाची ओरड ऐकूं येऊं लागली; नाणें पाडण्यासाठीं टांकसाळ नव्हती, आणि कॉंग्रेसनें काढलेल्या कागदांच्या नोटांचा भावही अगदीं बसला होता. युद्ध

संपल्यानंतर जरी या लहानशा स्वतंत्र राज्यांत कांहींशी भरभराट दिसूं लागली तरी ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं; कारण देशांतून माल बाहेर जाई त्यापेक्षां परदेशांतून जास्त माल देशांत येई, आणि त्यामुळें देशाची अंतःस्थिति दिवसानुदिवस बिघडत चालली. जीं जुनीं १३ *संस्थानें होतीं त्यांतील खेड्यापाड्यांतील लोक निकृष्टावस्थेंत असल्यानें अगदीं नाउमेद झाले होते; आणि त्यामुळें पश्चिमेकडे पर्यटण करण्याचे विचार त्यांचे मनांत अहोरात्र घोळूं लागले. पश्चिमेकडील देशांतील जमिनी सुपीक होत्या आणि लोकांना उपजीविकेचीं साधनें अनुकूळ होतीं, अशा कारणानें पश्चिमेकडे जो लोकसमूह गेला त्यांतच लिंकनचे पूर्वजही गेले होते; आणि याच लिंकन वराण्यांत ज्याचें आज हें चरित्र लिहिण्यांत येत आहे त्या विख्यात भावी अध्यक्षाचा उदय व्हावयाचा होता.

इंग्लंद देशांत रोमनक्याथोलिक् धर्माची सरशी होती त्यावेळीं इतर धर्मांतील लोकांचा फारच छळ होत होता. त्यावेळीं कित्येक लोकांस देहान्तशिक्षा आणि कित्येक लोकांस हद्दपार करण्याची शिक्षा होत असे. पहिला जेम्स राजा एपिस्कोपेलियन् पंथाचा असल्या-

* तेरा संस्थानें होतीं तीं हीं:—

१ व्हर्जीनिआ २ मेरील्यांड ३ क्यारोलीना ४ दुसरे क्यारोलीना ५ जॉर्जिआ ६ न्यूयॉर्क ७ न्युजर्सी ८ पेन्सिलवॅनिआ ९ डिलावेर १० मॅसॅचुसेट्स् ११ कानिक्टिकट १२ न्युहँपशायर १३ ऱ्होडबेट.

कारणानें व स्वदेशांत आपल्या धर्माचें संरक्षण होणें कठिण असें जाणून कित्येक प्रॉटेस्टंट धर्माचे लोक हालंद देशांत इ. स. १६२० मध्यें जाऊन राहिले. पण तेथें राहिल्यानें आपल्या मुलांबाळांचे अंगांतील नैसर्गिक स्वदेशाभिमान नाहींसा होईल यासाठीं अमेरिके सारख्या एखाद्या देशांत वसाहत करून स्वतंत्रपणें राहण्यास ठीक पडेल असें मनांत आणून कित्येक अमेरिकेंत वसाहत करून राहिले. याच सुमारास म्हणजे इ. स. १६३८ मध्यें लिंकनचे पूर्वज इंग्लंदांतून येऊन त्यांनीं मॅसेचुसेटस् प्रांतांतील हिंगहॅम येथें वसाहत केली. अध्यक्षाचा निपणजा मॉरडेकाय हा पेन्सिल्व्हेनिया येथें जाऊन राहिला. लिंकन घराण्यांतील अलीकडील मंडळी इ. स. १७८२ मध्यें पश्चिमेकडे वसाहत करण्यास गेली, त्यांचीं नावें येणें प्रमाणें:—अब्राहाम लिंकन आणि त्याचीं मुलें, मॉरडेकाय जोशिआ आणि टॉमस. ही मंडळी रॉकिंगहॅम परगण्यातील व्हर्जिनिया गांवाहून मर्सर परगण्यांतील केंटकी गांवीं जाऊन राहिली. त्यावेळीं व्हर्जिनिआ हें एक मोठें संस्थान असून केंटकी हा एक त्याचा भाग होता. या भागांतील अरण्य मोठें घोर व भयानक होतें, आणि त्या अफाट प्रदेशांत जे थोडे बहुत लोक येऊन राहिले होते ते शूर, मेहनती, साहसी, व कित्येक प्रसंगीं मोठे क्रूर असे असून त्या भागांत फिरणाऱ्या रानटी इंदियन लोकांस त्यांचा मोठा दरारा होता. या गोऱ्या लोकांच्या नेहमीं येण्याजाण्यानें इंदियन लोक चिडून गेले होते आणि त्यांनीं ह्या लोकांस घालवून

देण्यासाठीं त्यांच्या वसाहतींवर अचानक आणि भयंकर हल्ले करण्याची संधी फुकट जाऊं दिली नाहीं.

अध्यक्षाचा आजा अब्राहाम लिंकन केंटकी येथें जाऊन राहिल्यावर दुसरे वर्षी एके दिवशीं तो आणि त्याचा मुलगा टॉमस असे उभयतां जमिनींत शेतीच्या कामाकडे गुंतले असतां एका नीच इंडियनानें त्यांना मारण्याच्या दुष्ट हेतूनें झाडींतून बंदुकीचा नेम अब्राहामवर धरून त्याला मारिलें. जवळ थोड्या अंतरावर मॉरडेकाय आणि जोशिया काम करीत होते, त्यांनीं हा प्रकार पहातांच मॉरडेकायनें त्या इंडियनावर बंदुकीचा नेम धरून त्यावर गोळी घातली. गोळी लागतांच तो इंडियन जमिनीवर पडला व बिचारा टॉम मृत्युमुखांतून सुटून झोंपडींत पळून आला लवकरच जोशिया किल्ल्यांतून मदत घेऊन कांहीं मंडळीसह आला. आणि त्यांनीं अब्राहामाच्या व त्या इंडियनाच्या प्रेतास मूठमाती दिली. त्या भयंकर प्रसंगामुळें अब्राहामच्या तिघा मुलांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. मॉरडेकाय यानें त्या ठिकाणीं उभे राहून त्वेषानें प्रतिज्ञा केली कीं—“ आजपासून या भूमीस क्रूर भूमि हें नांव देतों, व इंडियनांचा सूड उगविल्यावांचून मी कधींही स्वस्थ राहणार नाहीं. ” त्या दिवसापासून मॉरडेकाय हा इंडियनांचा कट्टा शत्रू बनला व पुष्कळ इंडियनांस त्यानें डाव साधून यमसदनीं पाठविलें.

या शोचनीय मृत्यूमुळें अब्राहामलिंकनचे विधवेस अतिशय दुःख झालें, आणि मॉरडेकाय, जोशिआ, टॉमस, मेरी आणि नानसी अशा पांच मुलांस संभाळण्याचें काम तिच्या एकटीवर पडलें. या घराण्यावर जीं जीं संकटें कोसळलीं त्यांची जरी खरी माहिती उपलब्ध नाहीं तथापि त्यांची कल्पना करितां येणें संभवनीय आहे. त्यावेळीं स्वतंत्र संस्थानांस दारिद्र्यानें पूर्ण ग्रासून टाकिलें होतें; केंटकीच्या निर्जन प्रदेशांत शाळा तर नव्हत्याच, परंतु लिहितां वाचतां येण्यापुरतीही शिकण्याचीं साधनें नव्हतीं. अशा रानटी व गरीब स्थितींतच अध्यक्षाच्या बापानें साधारण घरदार वगैरे केलें. कांहीं काळानतंर त्याचा मुलगा अब्राहाम यास कोणीं त्याचे बापाचे स्थितीविषयीं विचारलें असतां खालीं लिहिल्याप्रमाणें तो उद्गार काढी. तो ह्मणे " माझा बाप माझे आजाचे मरणसमयीं फक्त सहा वर्षांचा होता आणि तो मोठा झाला तरी अशिक्षितच राहिला. तो उंच व सुरेख बांध्याचा असून बळकट, बंदुक मारण्यांत कुशल, उत्तम शिकारी आणि सुस्वभावाचा होता; परंतु उद्योग व साहस हे गुण त्याच्यांत नव्हते. स्वतः अशिक्षित राहिल्यानें त्याचीं मुलेंबाळें तशींच राहिलीं.

टॉमसालिंकन हा पोरवय असतांनाच आपला चुलता इझाक याजकडे राहिला होता. जंगलांत राहून झाडें कापणें, जमीन दुरुस्त करणें, झोंपड्या बांधणें, आणि चरितार्थापुरतें धान्यधुन्य सांठविणें हे त्यावेळचे व्यवसाय होते; आणि लहानपणीं टॉमसचे बहुतेक

दिवस अशीच मजुरी करण्यांत गेले. टॉमस हा मेहेनती असून कधीं कधीं दुसऱ्याचें काम तोच करून देई. इ. स. १८०६ मध्यें टॉमस लिंकन यानें व्हर्जिनीया येथील नान्सीहँक्स इ-च्याशीं शरीरसंबंध केला. केंटकीमध्यें नोलीनक्रिकनजीक एक झोंपडी बांधली होती. तेथें टॉमस लिंकननें आपल्या तरुण पत्नीस रा-हण्यास नेलें. या झोंपडीच्या आसपासचा प्रदेश डोंगराळ होता आणि ब्ल्युहाल व शायनी असे दोन डोंगर मोठे उंच अ-सून तेथून आसमंतांतील भाग फारच रमणीय दिसत होता.

वर लिहिलेल्या झोंपडींत इ. स. १८०९ च्या फेब्रुवारी महिन्याचे १२ वे तारिखेस युनाईटेड् स्टेटस्‌चा सोळावा अध्यक्ष अब्राहाम लिंकन याचा जन्म झाला.

अब्राहामलिंकनच्या बाळपणांत त्याच्या आईबापांनीं त्या झोंपडींतून आपलें बिऱ्हाड बदलून नजीकच्या दुसऱ्या एका झों-पडींत नेलें; आणि या दोन्ही ठिकाणीं अब्राहाम यानें आपल्या वयाची सात वर्षें काढिलीं. साऱ्हा नांवाची त्याची एक बहीण त्याचे पेक्षां एका वर्षानें वडील होती आणि त्याचे पेक्षां दोन वर्षें वयानें लहान टॉमस नांवाचा त्याला एक भाऊ होता तो ल-हानपणींच वारला. टॉमसलिंकनची बायको मध्यम बांध्याची, श्यामवर्णाची आणि सौम्य दृष्टीची असून तिच्याकडे पाहिलें अ-सतां पाहणारास मोठा आनंद होत असे. ती निश्चयी स्वभावाची

असून तिला वाचण्याचा फार नाद होता. एकदां कोणतेंही पुस्तक वाचण्यासाठीं हातांत घेतलें कीं तें मोठ्या उमेदीनें संपवून त्यांतील गोष्टी ती आपल्या मुलांस सांगत असे, आणि मुलेंही सावधान चित्तानें ऐकत असत. अशा गरीब स्थितींतल्या झोंपडींत ते दिवस काढीत होते. लिंकनच्या बायकोस बंदुकीचा उपयोग करून हरीण, अस्वलें वगैरेचीं शिकार चरितार्थासाठीं करावी लागत असे; ती कोमल अंतःकरणाची होती आणि तिच्या नाजुकपणाकडे पाहिलें असतां हें काम खरोखरीच तिला मोठ्या कष्टानें करावें लागत होतें आणि त्यामुळें ती सदैव उदास व काळजींत असे. देशाची स्थितीच अशी असल्यानें ते मोठ्या काळजींत दिवस कंठीत होते. उभयतां मातापितरांची धर्मावर मोठी श्रद्धा* होती आणि आपल्या मुलांनाही धर्मशिक्षण चांगलें द्यावें असा त्यांचा निश्चय होता. परंतु धर्मशिक्षणार्थ शाळा, वगैरेची सोय चांगली नव्हती. लिंकनच्या बायकोनें आपल्या मुलांस धुळाक्षर, बाराखड्या वगैरे स्वतःशिकाविल्या. ' झाचारिह रिने ' याच्या शाळेंत प्रथम अब्राहामलिंकन यास घातलें. ' रिने ' हा कॅथोलिक धर्माचा असल्यानें प्रॉटेस्टंट धर्माचीं मुलें धर्म शिक्षणाचे वेळीं तेथें हाजर राहत नसत. कॉलेबर्हेझल हा अब्राहाम लिंकनचा दुसरा शिक्षक झाला, व तो तरुण असून मोठा हुषार होता. अब्राहाम हा त्याचे शाळेंत तीन महिने जात होता, व शाळेंत जाणें

---

* धर्मेण हन्यते शत्रुः । यतो धर्मस्ततोजयः ॥ या उक्तीचें तत्व त्यांचें मनांत चांगलें बिंबलें होतें असें दिसतें.

ही एक त्याला मोठी मौज वाटत असे. कॉलेवहॅझल जे जे घडे त्यास शिकवी ते ते तो चांगले लक्षांत ठेवीत असून कधींही विसरला नाहीं. त्या काळांत धर्मोपदेश करण्याचें काम झाडाखालीं अगर मोठाल्या झोंपडींत होत असे. प्रसिद्धपणें व्याख्यान देऊन धर्मोपदेश करण्याचें काम अब्राहाम यास पार्सन एल्किन यानें शिकविलें.

टॉमसलिंकन हा केंटकी येथील आपल्या जुन्या घराला अगदीं कंटाळला होता; कारणः—त्या काळांत जमिनीच्या हक्कासंबंधी मोठा त्रास उत्पन्न झाला होता. 'डानियल बून' नांवाचा मोठा सर्व्हेयर असून त्याचे जवळ पुष्कळ जमीन होती, परंतु तो सुद्धां पुष्कळ हक्कास मुकला. दास्यत्व अथवा गुलामगिरीचा धंदाही त्यावेळीं पुष्कळ चालत असे, आणि टॉमस यास हें कृत्य पसंत नसून शिवाय गुलाम बाळगण्याचें सामर्थ्यही त्यास नव्हतें आणि त्यामुळें तो फार कंटाळला होता; परंतु नवीन घर पाहण्याचें वास्तविक कारण त्याचा काटकसरी स्वभाव हेंच मुख्य होतें. इंदियानामध्यें जमीनी सुपीक असून चरितार्थाचीं उत्तम उत्तम साधनें फार आहेत असें तो ऐकत असे आणि त्यामुळें इंदियाना येथें राहण्यास जावें अशी त्याची फार दिवसांपासून प्रवृत्ति होती. शेवटीं टॉमस यानें केंटकी येथून बिऱ्हाड हलवून पश्चिमेकडे राहण्यास जाण्याचा निश्चय केला.

व्हिस्की नांवाच्या दारूचीं दहा पीपें आणि वीस डालर* रोख, असे घेऊन स्वतःची जमीन व झोंपडी दुसऱ्यास विकून टाकण्याचें टॉमस यानें ठरविलें. दहा पीपें व्हिस्की दारूची किंमत आणि वीस डालर रोख असे सर्व एकत्र केले तर सुमारें तीनशें डालर होतात. त्या काळांत धान्यापासून निघणाऱ्या व्हिस्की नावाचें दारूचा उपयोग नाण्यांचे ऐवजीं होत असे, आणि व्यापाराचे कामांत ती नाण्यांप्रमाणें मानली जात होती. टॉमस यानें मुलांच्या सहाय्यानें एक होडी तयार करविली आणि त्यांत दारूचीं दहा पीपें व कांहीं घरगुती सामान भरून ती होडी ओहिओनदींतून तो एकटाच चालवीत गेला. वाऱ्यानें लाटा समोरासमोर उसळत असल्यानें त्याची होडी पालथी झाली व पुष्कळ नुकसान झालें. सुभाषितांत ह्मटलेंच आहे कीं 'प्रायो गच्छति यत्र भाग्यरहितो तत्रैव यान्त्यापदः' परंतु वेळेवर उत्तम सहाय्य मिळाल्यानें ती होडी किनाऱ्यास लावून तो टॉमस-नफेरी' येथें उतरला आणि तेथें एका बैलाचें गाड्यांत सर्व सामान भरून तो इंदियाना मधील स्पेन्सर परगण्यांत गेला.

इकडे केंटकी येथील ओसाड झोंपड्यांत आई आपल्या मुलांसह कालक्रमण करीत होती. उभयतां मुलें 'कालेबहाजल' च्या शाळेंत जात होतीं, परंतु अब्राहाम हा चरितार्थासाठीं शिकार मारून वेळ काढीत असे. टॉमसलिंकन परत येण्याचे दिवस जवळ येत चालले त्यामुळें त्याच्या बायकोनें आपल्या लहान मुलाचा जेथें उत्तर

---

* एक डालर = सवा दोन रुपये.

विधि झाला होता त्या जागेचें अखेरचें दर्शन घेतलें. टॉमसलिंकन लौक-रच परत आला. सामानाचें मोठें नुकसान झाल्यामुळें तो फार खिन्न झाला होता. थोडें बहुत राहिलेलें सामान त्यानें एका स्नेह्यास सोंपिलें, आणि इंदियाना देश फार सुपीक आहे, तेथें आपलें चांगलें चालेल, अशा आशेनें ती सर्व मंडळी इंदियानाकडे जाण्याचे तयारीस लागली.

इंदियाना कडील मुशाफरी फार लांबची असल्यानें त्यांनीं दोन घोडीं तयार केलीं आणि त्यांवर घरगुती सामान सर्व लादलें आणि जाण्यास निघाले. रात्रौ पाइन नांवाच्या सुवासिक झाडाखालीं ते विश्रांति घेत असत आणि सकाळ होतांच ओहिओनदीकडे जाण्यास निघत असत. ही मुशाफरी केवळ दैवावर भरंवसा ठेऊनच करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. त्यांना रस्त्यांत वारा, पाऊस, यां पासून कांहींएक त्रास झाला नाहीं; आणि रात्रीचा त्यांचा वेळ तर फारच आनंदांत जात असे. अशा रीतीनें एक आठवडा मुशाफरी करून त्यांनीं एके दिवशीं नदीच्या किनाऱ्यावरून आसमंतात् सहज पाहिलें, तेव्हां नदीचे बाजूस निर्जन आणि अफाट जंगल, झरे, यां शिवाय कांहींएक त्यांना दिसलें नाहीं; मात्र परिभ्रमण करणाऱ्या पक्षांचे मंजूळ स्वर त्यांना मधून मधून ऐकूं येत होते.



# प्रकरण २ रें.

## लिंकन याचें कौमार्य.




दियाना हें संयुक्त संस्थानांत 'संस्थान' या नात्यानें दाखल होऊन चुकलें होतें, आणि या संस्थानांत परदेशांतून येणाऱ्या लोकांची भरती पुष्कळ होऊन तिचा प्रसार फार वाढत चालला होता; परंतु लिंकनच्या कुटुंबांतील माणसें या नव्या ठिकाणीं आल्यापासून शेजार पाजाऱ्यांस त्यांचेकडून मुळींच गैरसोय झाली नव्हती. निराश झालेल्या एका स्नेह्याजवळ लिंकननें आपलें सामान सोंपिलें होतें, असें पूर्वी कळविलेंच आहे, तें त्यानें आपलें ताब्यांत घेऊन, हें निराश्रित व दीन झालेलें कुटुंब तसेंच पुढें अरण्यांत चाललें होतें. त्या निर्जन अरण्यांत पुष्कळ गवत उगवलेली अशी टेकडी पाहून ती जागा आपल्या नव्या घरासाठीं त्यानें खास योजून ठेविली.

इंदियानाच्या दक्षिण भागांतल्या जंगलांत हिंवाळ्याचे दिवस कसेतरी काढितां येतील अशा बेताचें त्यानें आपल्यासाठीं आश्रयार्थ एक लहानसें झोंपडें त्या टेंकडीवर तयार केलें. त्याची एक बाजू उघडी होती आणि बाकीच्या बाजू साधारण आच्छादित असून मातीनें सारविल्या होत्या आणि त्यामुळें थंडीवाऱ्यापासून त्यांचें सं-

रक्षण होत होतें. झोंपड्याच्या एका कोंपऱ्यांत विस्तवासाठीं माती-च्या शेगड्या ठेविल्या होत्या आणि त्यांत प्रजासत्ताक राज्याच्या भावी अध्यक्षानें हिंवाळा काढिला.

आतां आपण भावी अध्यक्ष आणि त्यावेळच्या स्थितीसंबंधीं थोडासा विचार करूं. त्यास नुकतेंच आठवें वर्ष लागलें होतें. तो बाढत्या अंगाचा असून फारसा दक्ष नव्हता; त्याचे पाय लांब अ-सून त्याचा पेहेराव एकाद्या सरहद्दीवर राहणाऱ्याप्रमाणें होता. अ-शा घोर जंगलांत त्या दिवसांत कापूस व ताग दुर्मिळ असून को-ठें कोठें मिळाले तर त्यांची किंमत फार पडत असे. कांहीं सूत व कांहीं लोंकर एकत्र करून घरीं तयार केलेल्या कापडास जर रंग-विण्याचें ठरलें तर जंगलीं झाडांच्या मुळांतून निघणाऱ्या रसानें रंगवून त्याचा कपडा तयार करून तो अंगांत घालण्यांत येई. त्या-नें स्वतःच्या समजुतीप्रमाणें ऐन तारुण्याचे भरांत येईपावेतों मोजे कधींही घातले नाहींत. आपल्या आईनें तयार केलेले जोडे तो पायां-त घालीत असे. पायांत हरणाच्या कांतड्याचे जोडे व अंगांत वर लि-हिलेल्या कापडाचा आंगरखा, डोक्यास कांतड्याची टोपी आणि कंब-रेस जनावराचें शेंपूट, याप्रमाणें त्याचे पेहेरावाची पद्धत होती. कंबरेस जनावराचें शेंपूट म्हणजे एक प्रकारचें भूषण तो समजत असे व प्रसंग विशेषीं हातांत धरण्याच्या दंडाऐवजीं त्याचा उपयोग तो करीत असे.

जंगली मनुष्याची एकादी लहानशी तसबीर पाहिली आणि त्या तसबिरीशीं वर लिहिल्याप्रमाणें पेहेराव असलेल्या मुलाची तुलना केली तर फरक इतकाच दिसेल कीं तसबिरींतल्या जंगली मनुष्याचे हातांत बंदुक असते व या मुलाच्या हातांत कारणाशिवाय बंदुक दिसत नसे. घरांतल्या माणसांस मांसाची फारच अवश्यकता असेल व दुसरा कांहीं उपाय नसेल तेव्हांच तो बंदुकीचा उपयोग करी. एके समयीं त्या झोंपड्या नजीक कांहीं जंगली पक्षी बसले होते; त्यांपैकीं एकापक्षावर नेम धरून त्यानें गोळी घातली. गोळी घालून पक्षाचा जीव घेतल्यामुळें त्याला खेद * झाला व चरितार्थासाठीं मांस मिळालें म्हणून समाधान वाटलें.

इंडियानामध्यें लिंकनची मुलेंबाळें येऊन राहिलीं, परंतु देशाची स्थितीच भरभराटीची नसल्यामुळें त्यांना विपन्नावस्थेंत दिवस काढावे लागले. इ० स० १८१२ सालची लढाई नुकतीच संपली होती. अमेरिकेंत व्यापारांचीं मोठमोठालीं बंदरें बंद झाल्यामुळें माल दुसरी कडून येणें व दुसरीकडे जाणेंही बंद पडलें होतें; अशा स्थितीमुळें झालेलें नुकसान प्रत्येक शहरांत, गावांत आणि खेड्यापाड्यांतील लोकांस अद्याप पावेतों भोंगावें लागत होतें. औद्योगिक स्थिति इतकी बिघडली होती कीं बाहेरून येणारा माल फक्त श्रीमंत लोकांखेरीज कोणास घेण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें. गरीब लोक टांच-

* ॥ अहिंसा परमोधर्मः ॥ या तत्वाला अनुसरुन त्याचें वर्तन होतें.

ऱ्याऐवजीं काठ्यांचा आणि बटनाऐवजीं हडकांचे लहान लहान तुकडे करून त्यांचा उपयोग करीत होते. देशास विपन्नावस्था आली असल्यानें गरीब लोक काफीऐवजीं राई नांवाचे धान्याचा आणि चाहाऐवजीं एक प्रकारच्या वाळलेल्या पानांचा उपयोग करीत असत; त्याचप्रमाणें धान्यापासून निघणारी व्हिस्की नांवाची थोडी दारू पाण्यांत मिळवून पिण्याचा साधारण रिवाज होता, आणि चालू नाण्यांऐवजीं लोकांजवळ चीजवस्त वगैरे जी मालमत्ता असेल त्याचा उपयोग होत होता.

पश्चिमे कडील प्रदेश सुपीक असून चरितार्थासाठीं अत्यन्त हितावह ह्मणून वर कळविलेंच आहे. अस्वलें, हरिणें, पक्षी वगैरे त्या जंगलांत पुष्कळ असल्यानें त्यांवर लोकांचें अन्नवस्त्र चालत असें. जाळें आणि बंदुक ह्या दोन वस्तु जवळ असल्या ह्मणजे बहुतकरून उपासमारीची वेळ कोणावरही येत नसे; परंतु अशा स्थितींत दिवस काढणें कठीण त्यांत लहान मुलांस विशेष कठीण आणि बायकांस तर अत्यन्त कठीण असे. दिवसास काय काय केलें त्यासंबंधी पळभर बसून सुख दुःखाच्या दोन गोष्टी सांगण्यास शेजाऱ्यापाजाऱ्यांस बिलकूल वेळ मिळत नसे. या पश्चिम देशांतील नद्यांत वाफेनें चालणाऱ्या होड्या नव्हत्या. इ. स. १८१८ मध्यें 'एरिस सरोवरांत' प्रथम वाफेची होडी चालू झाली. तेथील एखाद्या जंगली रहिवाशास जर पत्र लिहिणें येत असेल तर त्यानें लिहिलेलें पत्र शंभर मैलांवर पोंहोचण्यास कित्येक आठवडे अगर महिने लागत असत. गृहसंबंधी बाबती, परदेशांतील उलाढाली, आणि राष्ट्रीय कामें यासंबंधी फार लांबच्या बातम्या तुरळक ऐकूं येत होत्या

त्यां अशा कीं—'जेम्समेडीसन हा संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष आहे. मिसिसिपी नदीच्या पश्चिम भागांत गुलामगिरीचा धंदा चालत आहे, मिसुरी प्रांतांचा समावेश संयुक्तसंस्थानांत झाल्यानें आणि इतर मोठ्या महत्वाच्या बाबतीमुळें ( त्यावेळीं ) राष्ट्रांत मोठीं चळवळ सुरू झाली आहे.'

अमेरिका देश जरी आज सुधारणेच्या शिखरास जाऊन पोंहचला आहे तरी ज्या वेळची ही हकीकत लिहिण्यांत येत आहे त्यावेळीं लोकस्थिति अगदीं बिघडलेली होती. अमेरिकाखंड हा जरी सुपीक आहे तरी त्यावेळीं जिकडे तिकडे निर्जन अरण्यें होतीं. लोकवस्ती फार थोडी असून पुष्कळ जमिनी लागवड झाल्यावांचून तशाच पडून राहिल्या होत्या. हल्लींप्रमाणें वाफेच्या योगानें चालणाऱ्या कोणत्याही प्रकारच्या गिरण्या तेथें नव्हत्या, मात्र इ. स. १८०० च्या सुमारास राकी पर्वताचे पश्चिम भागांत लांकडी चौकटी तयार करण्याची एक गिरणी निघाली होती. सर्व प्रकारचीं इमारतबांधकामें म्हणजे रस्ते करणें, कुंपण करणें, पूल अगर घरें बांधणें हीं यंत्राच्या साह्यानें होत नसून वसाहतींत उपलब्ध असलेल्या कारागिरांच्या साहाय्यानें होत असत. अशी सर्वत्र स्थिति असल्यानें टॉमसलिंकन याचीं हत्यारें फार जड, ओबडधोबड व केवळ काम चलाऊं अशीं असणें साहजिकच आहे.

इ. स. १८१६ च्या शरद्‌तूंत टॉमस आपल्या कुटुंबांतील लहानसांसह इंदियानाच्या जंगलांत येऊन राहिला; तेथें त्यानें

न मुलगा अबे ( अब्राहामलिंकन ) च्या मदतीनें लांकडाचे तुकडे गोळा करून एक लहानशी इमारत बांधण्याचें ठरविलें. लांकडाचे तुकडे कापून ते एकत्र जोडले जातील अशी ही त्यांनीं तजवीज केली, व तेथील मंडळीच्या साहाय्यानें एक सुरेख लहानशी इमारत एक दोन दिवसांत तयार केली. नंतर आसपासची मंडळी गोळा-करून त्यांनीं एक आनंदाचा दिवस पाहून मेजवानीचा बेत ठर-विला. सामाजिक सुधारणा होण्यासाठीं अशा कांहीं निमित्तानें मंडळी एकत्र जमण्याची तिकडे मोठी उत्तम पद्धत होती.

या इमारतींतील जमिनीचें तळ मजबूत व कठीण होतें, आणि तेथें एक लोंबकळतें दार ठेविलें होतें. पुढें दुसरें लग्न झाल्या-नंतर कांहीं दिवसांनीं टॉमसलिंकननें या घरांत विशेष व चांगल्या सोई केल्या. ऐन तारुण्याच्या दिवसांत जेव्हां हा ( अग्रेसर ) मु-लगा वॉशिंग्टन येथील व्हाइटहौस राजवाड्यांत जाऊन राहिला, त्यावेळीं हिवाळ्यांत सकाळीं आपली आई आपल्यास जागें करण्या-स येई त्यावेळीं तिचीं पावलें वाजत असत त्याची त्याला चांगली आठवण राहिली होती.

पश्चिमेकडील जंगलांत ज्या मुलांना राहण्याची कधींही संवय नाहीं, त्यांना तेथील रुक्षान्न, जंगली वस्तु आणि संसारांत हरहमेश लागणारे पदार्थांचा अभाव, यांची मुळींच कल्पना नसते. या लांकडी इमारतीला दोनी बाजूस भिंती होत्या आणि घराचें आंत त्या भिंतीचे एका कोंपऱ्यांत आईबापांस निजण्यासाठीं

पलंग ठेविला होता. त्या पलंगाला एक पाय नव्हता आणि त्याचे एका बाजूचे टोंकांस चीर पडली असून त्यांत एक लांकडाचा तुकडा पायाऐवजीं ठोकून बसविला होता. ह्या पलंगावर एक चटई आंथरली असून त्यावर झाडाच्या सुकलेल्या पानांनीं भरलेलें एक लेंपडें ठेविलें होतें. मुलांस निजण्यासाठीं दुसऱ्या एका कोंपऱ्यांत एक पलंगडी ठेविली होती, परंतु हिंवाळ्यांतील बर्फ आणि गार वारा यांपासून एकाद्या रात्रीं फार त्रास होऊं लागला कीं, तीं मुलें मुकाट्यानें आईबापांचे पलंगावर ऊब येण्यासाठीं जात असत.

ही सर्व प्रापंचिक तयारी करण्याचे कामीं "अबे" यानें फार श्रम केले. त्याला फरशी, वांकस वगैरे सुतारी हत्यारांची चांगली माहिती होती. अशीं कामें करून त्याचे स्नायू बळकट झाले असून हातांस घट्टेही पडले होते. सागवानी लांकडाचें काम करण्यांत तर त्याचा हातखंडा होता, व तें तो आजन्म विसरला नाहीं. झाडपाला, वनस्पती, मुळ्या आणि जंगलांतील तऱ्हेतऱ्हेच्या वनस्पतींच्या रसाचा उपयोग कोणत्या रोगावर कसा करावा याची त्याला उत्तम माहिती होती.

ह्या " अबेचें " वय लहान असून येवढ्या वयांत त्याला इतकें ज्ञान असणें ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट होय, असें सर्वांस वाटे. त्याकाळचे लोक धर्म भोळे असून ढग, वनस्पती, वगैरेबरते शकून व अपशकून पाहत असत. अज्ञानी लोकांस वाटे कीं,

जंगलांतील लोक विलक्षण व मूढ प्रकृतीचे असून हें निर्जन अरण्य भयंकर असल्या बद्दल त्या लोकांत अनेक दंतकथा चालू होत्या. मोठा अनुभविक मनुष्य असला तरी त्याला या जंगलांतील एकांत वास मोठा भयंकर वाटत असे. सोसाट्याचा वारा, जंगली श्वापदांचें रात्रीचें गुरगुरणें, झऱ्याची खळखळ आणि घोर जंगलांतला एकांत वास एवढे प्रकार ज्यांनीं बाळपणापासून पाहिले आहेत त्यांना त्यांची विस्मृति कधींही होणार नाहीं. लिंकनच्या घराच्या आसपास जें घोर जंगल पसरलें होतें, त्यांतूनच तो आपल्या चरितार्थाच्या आणि वस्त्रप्रावर्णाच्या वगैरे सर्व प्रापंचिक वस्तु उत्पन्न करून घेई, आणि कोणी आजारी पडल्यास औषधोपचाराचीं साधनें याच जंगलांतून त्याला मिळत असत. या जंगलांत त्याला पुष्कळ अवर्णनीय अनुभव मिळाले होते व नानाप्रकारचें विचारही त्याला सुचत असत; तेथें त्याला चांगलें शिक्षण मिळाल्यामुळें त्या निर्जन अरण्यांस शाळेची उपमा दिली असतां कांहीं हरकत नाहीं. तेथें त्याला एखादा विषय योजून त्याचें नेहमीं मनन करण्याची संवय लागली असल्यामुळें इतर मुलें जें काम करीत होतीं त्यापेक्षां चांगलें काम त्याचे हातून झालें नाहीं, कारण तो या जंगलांत कोणताही विचार करण्यांत वेळ घालवीत इकडून तिकडे फिरत असे. ज्या अरण्यांत लिंकन लहानाचा मोठा झाला तेथील शोभा व दंतकथा तो कधींही विसरला नाहीं; घोर व अफाट अरण्यांत निळ्या रंगाच्या आकाशाचें वारंवार होणारें क्षणिक दर्शन आणि त्या कामीं जग-

नियंत्याचा मोठेपणा व त्या विषयीं मनुष्याची अल्पबुद्धि या बाबतींपासून मिळणाऱ्या शिक्षणाचा ठसा त्याचे अंतःकरणावर चांगला उमटला व त्याची त्याला कधींही विस्मृति झाली नाहीं. अब्राहाम-लिंकन हा काबाड कष्ट करून वाढला होता, कारण त्या काळांत सर्व लोक तेथील अफाट अरण्यांत जमिनीची सुधारणा व वसाहत करून लोकवस्ती वाढविण्याचे कामांत गुंतले होते. अब्राहाम यानें त्यावेळीं जीं पुस्तकें उपलब्ध होतीं तीं विकत घेऊन अगर लोकांकडून मागून आणून आपलें ज्ञान वाढविलें. गृहव्यवसाय सुटल्यावर त्यानें कायद्याचें ज्ञान मिळवून लोकांस तो सल्ला मसलत देऊं लागला. एखाद्या अधिकाराची जागा आपणास मिळावी अगर आपला नांव लौकिक वाढावा अशी त्याला मुळींच इच्छा नव्हती. त्याचे अंगीं, व्यवहारज्ञान उत्तम असून त्या देशांतील कायद्याची त्याला संपूर्ण माहिती होती; सर्व गोष्टींत प्रामाणिकपणा, मोठमोठ्या महत्वाच्या आणि साहसाच्या प्रसंगीं व्यक्त होत असलेलें बुद्धिचातुर्य, आपल्या देशबांधवांचे हक्क संरक्षण करण्याचें कामीं खऱ्या पक्षाची कांस धरणें, ह्या गोष्टी त्याचे अंतःकरणांत चांगल्याच वागत असल्यानें तो पुढें मोठ्या योग्यतेस चढला. " मोझीस " हा मोठा भगवद्भक्त असून त्यानें ज्याप्रमाणें आपल्या लोकांस दुष्ट दास्यत्वापासून मुक्त केलें त्याप्रमाणें आपणही काळ्या शिद्धि लोकांस दास्यत्वापासून बंधमुक्त करावें अशी त्याला उत्कटेच्छा उत्पन्न झाली. ही त्याची सदिच्छा पुढें कशी फलद्रुप झाली व या कामीं त्याजवर

कसकशीं संकटें ओढवलीं याबद्दलची हकिकत वाचकांचें लक्षांत पुढें येईलच.

इंदियाना येथें लिंकनची मंडळी वसाहतीस आलीं तेव्हां अब्राहाम यास दहावें वर्ष चालू होतें; आणि याच वर्षांत या लहान मुलांना खालीं लिहिल्याप्रमाणें प्रथमच मोठ्या दुःखाचा धक्का बसल्यामुळें त्यांची मोठी हानि झाली. त्यांच्या आईला काम फार करावें लागत असून थंडीवाऱ्यांत फिरावें लागत असल्यामुळें ती नेहमीं मोठ्या काळजींत असे. ×चिंतेसारखा दुसराव्याधिच नाहीं; इ० स० १८१८ च्या उन्हाळ्याचे दिवसांत त्या प्रांतांत एक प्रकारचा ( मिल्कसिक ) ÷ चमत्कारिक रोग उत्पन्न झाला होता. त्या रोगानें ती आजारी पडली. हा रोग कशानें होतो व त्याची चिकित्सा कशी करावी याची हल्लीं कोणास माहिती असलेली दिसत नाहीं, परंतु यासंबंधीं पश्चिम देशांत पुष्कळ दंतकथा चालू होत्या त्यावरून लिंकन यानें आपल्या वार्धक्यांत त्याला " असाध्य क्षय " असें म्हटलें आहे. या रोगानें पुष्कळ माणसें--गुरेंढोरें प्राणांस मुकलीं. इंदियानाचा दक्षिण भाग आणि केंटकी या दोन्ही देशांवर या रोगामुळें हाहाकार उडाला होता.

मान्सी लिंकन इला या रोगाची भावना झाल्या पासून

× ॥ चिंता समं नास्ति शरीरशोषणं ॥

÷ ( मिल्कसिक = दुधापासून उत्पन्न होणारा व्याधि. )

तिचा नवरा आणि लहान मुलें तिला औषधपाणी वगैरे अहोरात्र करीत असत. भयंकर अरण्यांत डॉक्टर तर मिळणें कठीणच परंतु अमुक एका उपायानें ती या रोगांतून मुक्त होईल असें कोणतेंच साधन त्यांना मिळूं शकलें नाहीं. त्या नंतर शरदतूंत बेटसीस्पॅरो, तिचा नवरा, व पुतण्या डेनिस हंक्स, हीं इंदियाना येथें लिंकन याच्या झोंपड्यानजीक येऊन राहिलीं. डेनिसहॅक्स हा अब्राहाम याचा बाळमित्र होता आणि स्पॅरो ही नान्सीची चुलती असल्यानें अब्राहाम व डेनिस यांचें चुलत भावांचें नातें होतें. उभयतां स्पॅरो ( नवरा बायको ) यांस वरील व्याधीनें ग्रासिलें, आणि त्यांस औषध पाण्यासाठीं ( डेनिस याचेंसहित ) लिंकन यांच्या नव्या घरांत आणिलें. गरीब बिचाऱ्या टॉमस यानें कुटुंबांतल्या माणसांच्या औषधोपचाराचें कामीं ( जरी तो कौडी चुंबक होता तरी पण ) पैसे खर्चण्यांत हात अगदीं सढळ ठेविला होता. अशा स्थितींत अब्राहाम यास, गरीबींत कसे दिवस काढावे लागतात याचा अनुभव आला. + दारिद्य हें एक मोठें औषधच आहे असें त्याला वाटत असे.

प्रथम उभयतां स्पॅरो मृत्युमुखीं पडले आणि त्यांना लिंकन याच्या घरापासून थोड्या अंतरांवर असलेल्या एका लहानशा टेंक-

+ ॥ शार्क्ति करोति संचारे शितोष्णे मर्षयत्यपि ॥
॥ दीपयत्युदरे वन्हि दारिद्यं परमौषधं ॥ १ ॥

डोवर मूठमाती दिली. कांहीं दिवसां नंतर ह्मणजे आक्टोबर महिन्याचे पांचवे तारिखेस, नान्सी मरण पावली; आणि तिलाही त्याच जंगलांत एका वृक्षाचे दाट छायेखालीं मूठमाती दिली. त्या काळांत प्रेतांच्या उत्तर विधीची क्रिया चालविण्यास धर्मगुरू नव्हते. ज्या ठिकाणीं तिला मुठमाती दिली त्या जागेवर त्या दिवशीं रात्रीच काळोख पडून त्या घोर अरण्यांत भ्रमण करणाऱ्या पक्षाचे ध्वनि ऐकूं येई पावेतों अब्राहाम तेथेंच बसला व आपल्या आईचा विरह दुःसह झाल्यमुळें त्याच्या नेत्रांतून ढळढळ अश्रुधारा वाहूं लागल्या. त्याला असें खास वाटलें कीं, माझी आई, माझ्या विश्वासाचें आधिस्थान व माझी धर्मशिक्षक होती. कालें करून त्या जागेवरील प्रथमच्या + खाणा खुणा नाहींशा झाल्या, तरीपण तो हरहमेश ह्मणे कीं:— "मी हल्लीं ज्या स्थितींत आहे अगर पुढें राहीन त्याचें सर्व श्रेय माझ्या स्वर्गवासी मातोश्रीस आहे. कारण कीं, मी तिचा आजन्म ऋणी आहे." या वरून तो परम मातृभक्त

---

+ इंदियाना येथील सौथ बँडचा मि. पी. इ. बॅकर यानीं तेथें एक दगड बसवून त्यावर खालील शिलालेख लिहिला आहे "नान्सीहँक्स ही इ. स. १८१८ चे आक्टोबरचे पांचवे तारखेस मरण पावली. तिचें वय ३५ वर्षाचें होतें. स्वधर्मासाठीं प्राण दिलेल्या तिच्या पुत्राच्या एका स्नेह्यानें हा दगड बसविला."

होता व × माते सारखें दुसरें दैवतच नाहीं हें तो चागलें जाणत होता.

त्या देशांत त्या दिवसांत कोणी मरण पावल्यावर पहिलें वर्षी केव्हांतरी मरणाराचें स्मारक ह्मणून प्रेतसंस्कारा प्रीत्यर्थ धर्मोपदेश करविण्याची पद्धत होती. या पद्धतीस अनुसरून अब्राहामानें धर्मोपदेशाचा एक लेख स्वतः रचून ( ह्या लेखास तो आपलें प्रथमपत्र ह्मणत असे. ) तो केंटकी येथील पार्सन एल्किन नांवाच्या आपल्या धर्मगुरूकडे विनंतिपूर्वक पाठवून दिला. पार्सन एल्किन यास इंदियानामध्यें मुद्दाम येणें ह्मणजे सुमारें शंभर मैलांवर मुशाफरी करावयाची होती. प्रवास जरी लांबचा होता, तरी पार्सन एल्किन यानें अब्राहाम यास उत्तर पाठविलें की 'इंदियानाकडे मला कांहीं लोकांच्या कामासाठीं यावयाचें आहे, त्यावेळीं नान्सीहँक्स लिंकन इच्या स्मारका प्रीत्यर्थ धर्मोपदेश करण्यास मी जरूर येईन.'

वसंत ऋतु नुकताच बसला होता. वृक्षास नवी पालवी फुटून चहुंकडे हिरवीं गार दिसत असल्यानें वनश्री अत्यन्त रमणीय दिसत होती. केंटकी येथील धर्मोपदेशक हे ठरल्या प्रमाणें अब्राहास यांजकडे आले. सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस सूचना

×॥ नान्नोदकसमंदानं, न तिथिर्द्वादशी समा ॥
॥ न गायत्र्याः परोमंत्रो न मातुः पर दैवतं ॥

आल्याप्रमाणें ते रविवारच्या प्रातःकाळच्या शांत वेळीं धर्मोपदेश ऐकण्यांस एकत्र जमले. त्या अरण्यांत राहणारे मुख्य मुख्य लोक आणि कुटुंबांतल्या माणसांसहित सर्व शेतकरी आपापल्या घरच्या गाड्यांत बसून येत होते. ही मंडळी सुमारें दोनशें होती. नान्सी लिंकन इच्या स्मारकासंबंधीं धर्मोपदेश ऐकण्याकडे सर्वत्रांचें एकाग्रचित्त झालें होतें.

कित्येक लोक टेंकडीच्या खालीं झाडाचे छायेंत बसले होते; कित्येक गवतावर व कित्येक इतर ठिकाणीं ज्याला जशी सोय साधेल तसे बसून त्या छोट्याशा मिरवणूकीची वाट पाहत होते. कांहीं वेळानें सर्वांच्या पुढें धर्मोपदेश करणारा गुरु, त्याचे मागें टॉमसलिंकन, अब्राहाम, सान्हा आणि सर्वांच्या मागें डेनिसहॅंक्स,* या क्रमानें मंडळी लिंकन याच्या घरांतून निघून लौकरच तेथें येऊन पोंचली, आणि धर्मोपदेशाच्या भाषणास प्रारंभ झाला. अब्राहामाची आई शांत आणि सहनशील होती; व अशा तिच्या अनेक गुणांचें वर्णन जेव्हां धर्मोपदेशकानें केलें त्या-वेळीं श्रोतृ समाजांतील मंडळीचे नेत्र दुःखाश्रूनें भरून आले होते; आणि जेव्हां त्यानें आईचे पश्चात् मुलांच्या व टॉमसलिंकन याच्या दयार्द्र स्थितीचें वर्णन केलें, तेव्हां सर्वत्र मंडळीनीं पूज्य बुद्धीनें व

* याचे आईबाप नुकतेच मरण पावल्यामुळें तो लिंकनच्या कुटुंबांतल्या माणसांत हिळून मिसळून गेला होता.

एकनिष्ठेनें परमेश्वराची प्रार्थना केली. अब्राहाम यानें शेंवट पावेतों धर्मोपदेश ऐकिला व आपल्या आईच्या संबंधांत त्यानें हें जें धर्मोपदेशाचें काम करविलें, तें खरोखरच महत्वाचें कर्तव्यकर्म त्यानें बजाविलें असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं; आणि वक्त्याच्या मुखांतून जे जे शब्द निघाले ते ते ऐकून तर त्याला असें वाटलें कीं, आपल्या आयुष्याचे शांत आणि आनंदाचे दिवस आजच संपले. यापुढें तो मोठमोठ्या उद्योगांत पडला, त्याच्यावर मोठमोठ्या जबाबदारीचीं कामें पडलीं, परंतु घोर जंगलांतल्या एकांतवासांत आपल्या आईस ज्या ठिकाणीं मूठमाती दिली ती जागा तो आजन्म विसरला नाहीं.

लिंकन याच्या घरचीं सर्व माणसें त्यावेळीं खरोखरच दीन झालेलीं होतीं, आणि टॉमस हा सर्व मुलाबाळांचें केवळ " आश्रयाचें स्थान " झाला होता. चिंध्या सुडकें नेसून गरिबीनें दिवस कंठण्याची वेळ त्याजवर कशी आली याची कल्पना सहज करितां येण्याजोगी होती. सारा्हा हिला १२ वें वर्ष नुकतेंच लागलें असेल नसेल, तो तिच्यावर घरचें सर्व कामकाज पडलें. " अबे " हा तिच्यापेक्षां दोन वर्षांनीं लहान होता व डेनिसहँक्स हा त्याचेपेक्षां दीड वर्षानें लहान असून त्याची कुटुंबांतल्या मुलांतच गणना होत होती. टॉमसलिंकन हा आपल्या दुःखद स्थितीची फारशी पर्वा करीत नव्हता. त्याचा

स्वभाव आनंदी असून त्याची नेहमीं अशी समजूत असे कीं, ' परमेश्वरास सर्वांची काळजी आहे, व तोच मुलांना मदत करील, ' परंतु कोठून—केव्हां व कशी मदत करील याचा त्यानें कधींही विचार केला नाहीं. जंगलांतले पक्षी व हरिणांचें मांस हा त्यांचा सर्वांचा रोजचा आहार असे. सान्हा इच्यापेक्षां तिच्या बापास स्वयंपाकाची माहिती चांगली होती; ह्मणून मुलेंबाळें कधींही उपाशी रहात नसत. दैन्यावस्थेंत एखाद्या मुलाचें पोषण होऊन तो पुढें मोठ्या नांवलौकिकास चढावा हें मोठें आश्चर्य नव्हे काय ?

अब्राहाम यास खाण्यापिण्यापेक्षां पुस्तकांचा नाद फार असे. त्यानें प्रथम पुस्तकें वांचलीं, तीं येणेंप्रमाणें :—स्वतःचें धर्मपुस्तक, इसापनीति व पिल्ग्रीम्स प्रोग्रेस. हीं तिन्हीं पुस्तकें वाचल्यावर त्याला विद्याव्यसनाची अभिरुचि कळली. मी एक मोठा सुदैवी मनुष्य आहे असें त्याला वाटे. त्यानें हीं तिन्हीं पुस्तकें इतकीं चांगलीं मनन केलीं होतीं कीं, वाटेल त्या वेळीं वाटेल त्यास तो त्यांतील वाक्यें ह्मणून दाखवी व त्यांतील चांगलीं अनुसंधानेंही सांगत असे.

त्यानें लौकरच ' विख्यात पुरुषांचीं चरित्रें आणि त्यांच्या अंगचे गुण' या विषयांवरील पुस्तकांचा अभ्यास चालविला, आणि त्याच्या आईनें त्याच्यासाठीं 'हेनरीक्ले' यांचें चरित्र घेऊन ठेविलें होतें, तें तर त्यास अत्यंत प्रिय झालें होतें. रामसे यानें केलेलें

"वाशिंग्टन याचें चरित्र" हें दुसरें एक उत्तम पुस्तक त्याला सांपडलें, नंतर विम्स यानें लिहिलेलें वाशिंग्टनचें चरित्र तो इतक्या आवडीनें व आनंदानें वाचीत असें कीं तें पुस्तक हमेश तो आपल्या खिशांत बाळगी. मेणवाती तो घरींच तयार करीत असे, व रात्रीं सवंद मेणवात जळली ह्मणजे तो पुस्तक मिटून निजावयास जाई. एके दिवशीं रात्रीं वाऱ्याचें मोठें तुफान होऊन त्याचें पुस्तक पावसांत भिजल्यानें अगदीं निरुपयोगी झालें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्य प्रकाश पडल्यावर लिंकननें तें पुस्तक शोधून काढिलें व ह्मणाला " दुर्दैव माझें ! हें पुस्तक मीं दुसऱ्याकडून वाचण्यास आणिलें होतें, आतां त्या इसमास मी काय सांगूं !" इतकें ह्मणून तो जरी निराश झाला होता, तरीपण मोठें धाडस करून त्या पुस्तकाच्या मालकाकडे गेला. मि. क्राफर्ड याचें तें पुस्तक असून अब्राहाम यानें त्याचेकडे अशा स्थितींत परत आणिलेलें पाहून त्यानें रागाचा अविर्भाव आणून ह्मटलें कीं, " कायरे मुला ! याबद्दल तूं आतां काय करण्याचें धारिलें आहेस ? " मुलानें कळविलें कीं, " तुह्मांस न्यायानें जें युक्त दिसेल तें करा. " नंतर त्या उभयतांत असा करार ठरला कीं, अबे यानें या गुन्ह्याबद्दल तीन दिवस धान्याचीं कणसें काढावींत. " आणि अशानें तुमचें पुस्तक पूर्वस्थितींत येऊन त्याचा मोबदला तुह्मांस मिळेल काय ! " असा या शहाण्या व धूर्त मुलानें मालकास प्रश्न केला; आणि जगांत

कशा रितीनें वागावें अशाबद्दल हा शहाणपणाचा पहिला धडा तो शिकला. पुस्तकाच्या मालकानें उत्तर दिलें की "या पुस्तकाचा मला आतां कांहीं उपयोग होणार नाहीं. करितां तूं कराराप्रमाणें धान्याचीं कणसें काढ ह्मणजे या पुस्तकाचा मालक होशील."

अब्राहाम यानें हें पुस्तक प्रथमच अशा रितीनें खरेदी केलें आणि जरी तें जीर्ण स्थितींत होतें तरी त्याचा त्यानें चांगला उपयोग केला. वाशिंग्टनच्या चरित्रांतील कांहीं कांहीं उपदेशपर धडे त्यानें चांगले लक्षांत ठेविले आणि आपल्या घरांत लांकडाच्या फटींत त्या पुस्तकाचीं कांहीं पानें लपवून ठेविलीं होतीं त्यांतील मजकुराचें स्मरण करून तो ह्मणे कीं "स्वतःच देश स्वतंत्र होण्यासाठीं ज्या लढाया व युद्धें झालीं त्यांच्या वर्णनाची मला चांगली आठवण आहे; आणि त्यांत ट्रेंटन व न्यूजर्सी येथील लढायाप्रमाणें तर कोणतीच लढाई झालेली नाहीं. लोक ज्यासाठीं लढले तो विषय खरोखरच इतर साधारण विषयांपेक्षां विशेष महत्वाचा असला पाहिजे."

स्वतंत्र संस्थानांतील पुढाऱ्यांनीं दृढ निश्चयानें मोठमोठालीं संकटें सहन करून हिंमतीचे कोट बांधून घोर रणांगणांत धडाधड उड्या घातल्या याचा वास्तविक काय हेतु असेल त्याचा विचार करण्यास अबेलिंकन यानें आरंभ केला.

जेथें जेथें अब्राहाम लिंकनच्या चरित्राची गोष्ट निघे तेथें

तेथें वर घडलेली हकिकत त्याचें स्मारक ह्मणून प्रथम सांगण्यांत येत असे.

अब्राहाम याचे संबंधी एक गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवण्याजोगीं अशी आहे कीं, त्याला मोठ्यानें वाचण्याची संवय असे आणि यामुळें त्याला असा फायदा झाला कीं, जेव्हां जेव्हां त्याला वाचलेल्या मजकुराचें स्मरण होई त्या त्या वेळीं तो प्रत्यक्ष मोठ्यानें तेच शब्द वाचीत आहे असें त्याला वाटत असे.



# प्रकरण ३ रें.

## " अबे " याची सावत्र आई, त्याचें ग्रंथावलोकन आणि शारीरिक शिक्षण.

इ. स. १८१९ मध्यें टॉमसलिंकन स्वतःच्या मुलांबाळांस आपापली व्यवस्था पाहण्याचें सांगून कैंटकी प्रांतांत गेला. जाते वेळीं तो कोठें आणि कशासाठीं जात आहे याचें कारण मुलांपैकीं कोणींही विचारण्याचे भरीस पडले नव्हते, परंतु कांहीं दिवसानंतर दिजेंबर महिन्यांत एके दिवशीं प्रातःकाळीं त्या जंगलांत बऱ्याच अंतरावर कोणी ओरडत आहे असें त्यांना ऐकू आलें; " चार घोड्याचे गाडींत एक मुशाफर व एक सुंदर तरुणी असें दंपत्य बसून एक अपरिचित मनुष्य गाडी वेगानें हांकीत आहे " असें त्यांनीं बाहेर येऊन पाहिलें असतां त्यांना दिसलें. तो टॉमस् आहे असें जेव्हां त्यांनीं ओळखिलें, तेव्हां खरोखरच मुलांस वाटलें " अरे !

अद्भुत चमत्कार तर नाहींना ! " टॉमस यानें आपल्या मुलां-साठीं सावत्र आई करून आणिली होती. कॅंटकी मध्यें इलिझाबेद-टाऊन येथील सॅलीजॅानस्टन नांवाच्या स्त्रीशीं त्यानें दुसरें लग्न केलें असून तिच्या माहेरचें नांव सॅलीबुश असें होतें. अब्राहामाच्या आईच्या लग्नापूर्वी सॅलीबुश इच्याशीं लग्न करण्याचें टॉमसलिंकनचें बोलणें झालें होतें असें म्हणतात; आणि म्हणून अबेनें तिला पूर्वीं कॅंटकींत पाहिलें होतेंच, परंतु हल्लीं स्वतांची व आपल्या बहिणीची सावत्र आई ह्या नात्यानें आलेली पाहून त्यांना मोठा आनंद झाला.

ही चार घोड्यांची सुरेख गाडी राल्फ् क्रूमनांवाच्या इसमाची असून त्याची बायको व सॅलीजॅानस्टन ह्याचें बहिणीचें नातें होतें. त्या गाडींत टेबल, खुर्च्या बिछाने, चाकू, कांटे वगैरे प्रपंचास लागणाऱ्या सर्व वस्तु भरल्या होत्या; परंतु नान्सी लिंकन ( पहिली बायको ) इला ह्या सर्व वस्तुं शिवाय चालत होतें. कॅंटकी येथील सुखाचें घर सोडून अशा निर्जन अरण्यांतील ओसाड घरांत अशा उधळ्या तरुण स्त्रीस टॉमस घेऊन आला यांत काय जादू असेल तो असो, परंतु टॉमस हा आनंदी स्वभावाचा + होता आणि मुलांस आईचा विरह फारसा वाटूं नये व त्यांचें चां-

+ ( पहा " दीर्घायु कसें व्हावें ? " नियम १८ व ७६२:-आनंदी स्वभाव हा आत्म्याचा सूर्यप्रकाश होय. " )

गलें संगोपन व्हावें अशाच हेतूनें ह्या तरुण स्त्रीस आणिलें असावें अशी कल्पना करितां येते.

इंदियानांतील जंगली स्थिति पाहून लिंकनच्या ह्या तरुण बायकोचा जरी आशाभंग झाला असला तरी पण तो तिनें आपल्या सापत्न मुलाबाळांस कधींच व्यक्त केला नाहीं. घरांतील दररोजचें काम ती मोठ्या आनंदानें करी आणि तिचा सावत्र मुलगा ( अब्राहाम ) या बद्दल तिचे आभार मानीत असे व तो आजन्म ते विसरला नाहीं; सारांश लवकरच ते दोघे आपापसांत हिळून मिळुन स्नेहभावानें वागूं लागले. कांहीं वर्षांनंतर ती ह्या मुलाचे संबंधांत उद्गार काढी कीं:—" तो मला कधींही वांकडा शब्द बोलला नाहीं, व वक्रदृष्टिनें त्यानें कधींही पाहिलें नाहीं; कसलेंही काम मी त्याला सांगितलें तरी तो ते करीत असें " आणि तिच्याबद्दल तोही ह्मणे कीं " ती कुलीन असून प्रेम करणारी व चांगली मायाळू होती, आणि या काळच्या स्त्रियांत अशा चांगल्या स्वभावाची स्त्री क्वचितच. "

लिंकनच्या बायकोनें स्वतांचे बरोबर आपल्या पहिल्या घरचीं ( पहिल्या नवऱ्याचीं ) मुलें आणिलीं होतीं त्यांचीं नांवें येणें प्रमाणें:—जॉन, साऱ्हा आणि मटिल्डा जानस्टन्; हीं पहिलीं मुलें, व हल्लींचीं सापत्न मुलें बहुतेक समवयस्कच होती, आणि लिंकनचें घर या समयी खरोखरच गोकुळा प्रमाणें भरलेलें दिसत

होतें. * अब्राहाम, जॉनजॉनस्टन् आणि डेनिसहंक्स या तिघाना माडीवर निजण्याची सोय केली होती, त्याप्रमाणें ते त्रिवर्ग शिडी-वर चढून माडीवर जात आणि अंथरुणावर निजत असत. धान्याच्या सुकलेल्या सालपटाचें तयार केलेलें पोतें त्यांचे अंथरुणा ऐवजीं होतें आणि तें इतकें संकोचित होतें कीं, जर एकास ह्या अंगावरून त्या अंगावर होणें असेल तर त्या त्रिवर्गांसही तसें करावें लागत असे; परंतु एकंदर मुलांस पांघरण्याची सोय मात्र चांगली होती. आईला वाटलें कीं घरांतील खिडक्यांना जे मलमली सारखे बारीक कापडाचे पडदे लाविले आहेत ते आतां काढून टाकून त्याऐवजीं त्यांस कांचेचीं चांगलीं दारें करवावींत व त्याप्रमाणें मोठमोठालीं दारें बदलून नवीन तऱ्हेचीं दारें तिनें करविलीं.

हरणाच्या कांतड्याची चटई आतां नाहींशी होऊन त्या ऐवजीं आराम आणि विलासासाठीं सुद्धां नवीन व्यवस्था झाली होती; एकंदरींत पाहतां कुटुंबांतील व्यवस्था आतां सुरळीत चालली होती, कदाचित् त्यांच्यांत कांहीं कुटुंबकलह असला तरी त्याचा उल्लेख कोणत्याही इतिहासांत आढळून येत नाहीं. या कुटुंबांत

---

* ॥ न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ॥
॥ गृहं तु गृहिणीहीनं कान्तारमिति मन्यते ॥ १ ॥
या उक्तिप्रमाणें त्या घरास विशेष शोभा येणें हें अगदीं स्वाभाविक होय.

अब्राहाम आणि त्याची सापत्न आई असे उभयतां प्रमुख असून घरचा सर्व कारभार तेच पाहत होते.

सांप्रत तरुण अबे यानें स्वतःच्या करमणुकीस्तव जेम्स-फेनिमोरकृत लेदरस्टॉकिंग टेल्स नांवाचें युनाइटेडस्टेटस्कडील नवें मनोरंजक पुस्तक वाचावयास घेतलें होतें, त्यां पासून त्याला फारच मौज वाटत असून त्यांत तो हमेश निमग्न असे. रेडइंडियनाचे तावडींतून आपला बाप कसा वांचला आणि केंटकीमध्यें आपल्या आजाचा कसा भयंकर घात झाला याची त्याला या पुस्तकांतून चांगली माहिती मिळाली. कूपरच्या कादंबरीचीं बरींच पानें वाचल्यावर त्यांत कांहीं जंगली लोकांचीं चित्रें होतीं तीं पाहण्याकडे तो वळला. “ बर्नसच्या कविता ” या नांवाचें पुस्तक आपल्या शेजाऱ्याकडून त्यानें वांचण्यासाठीं मागून आणिलें; हें पुस्तक लहान अक्षरांचें व बरेंच मोठें असून तें चामड्यानें बांधलेलें होतें, त्यांतून कांहीं भाग तोंडपाठ करण्यांसाठीं त्यानें तें हमेश जवळ ठेविलें. रॉबर्टबर्न पेक्षां शेक्सपियर हा फार चांगला कवी होता असें लिंकनचें मत होतें, आणि ज्या प्रमाणें शेक्सपियरकृत कांहीं वेंचे त्याच्या अगदीं जिव्हाग्रीं होतें त्याचप्रमाणें स्कॉटकृतही कांहीं वेंचे आजन्म त्याच्या जिव्हाग्रीं राहिलें.

लिंकन हा पुस्तक वांचीत असतांना कांहीं स्मरणार्थ हकीकत लिहून ठेविण्यासाठीं जर त्याला कागद न मिळाला तर तो

कोळशानें लागलींच फळीवर लिहून ठेवीत असे, आणि कागद सांपडल्यावर त्यावर शाईनें लिहून नंतर त्याची नक्कल करून तो तोंडपाठ करीत असे. अशा रीतीनें अब्राहामाजवळ पुष्कळ महत्वाच्या हकिकतीचा भरणा झाला होता. मोठमोठे लेखक, विद्वान वगैरे लोक महत्त्वाचा मजकूर लिहून ठेविण्यास एक वही ठेवीत असतात, त्या प्रमाणें अब्राहामानें आपल्या वयाचे दहावें वर्षीं ठेविली होती. या प्रमाणें प्रसिद्ध पुरुषांचे उत्तम उत्तम विचार व लक्षांत ठेविण्याजोग्या हकिकती वहींत टिपून ठेविणें हा एक त्याच शिक्षणक्रमच होता असें ह्मटलें तरी चालेल.

अब्राहाम यास पुस्तकें वाचण्याचा अति नाद असे आणि शेगडीच्या उजेडांत तो वाचनाचा अभ्यास करी; परंतु या ग्रंथ-वाचण्याच्या अति नादानें तो अशक्त किंवा भेकड मुळींच झाला नाहीं. त्या काळांत मल्लविद्या आणि शारीरिक व्यायामाची फारच अवश्यकता असल्यानें अब्राहाम हा या विद्येंत इतका प्रवीण झाला होता कीं, त्याची बरोबरी कोणीच करूं शकत नव्हता. त्याला इतर कारागिराप्रमाणें नाना प्रकारच्या हत्यारांचीही उत्तम माहिती होती. तो दांडगा व तंटेखोर तर नव्हताच, परंतु त्याच्या बरोबरीच्या एखाद्या शेजाऱ्यास त्यानें धारिलें तर त्यास फेंकून देण्याइतकें सामर्थ्य त्याच्या अंगांत होतें आणि ह्मणून लौकरच आबे लिंकन हा 'मोठा मल्ल' अगर 'बलाढ्य योद्धा' या नांवानें प्रसिद्धीस येऊन अशा प्रत्येक कामांत त्याला उत्तम यश मिळूं लागलें.

मुलांना शिकण्यासाठीं आतां शाळेची सोय तेथें हळू हळू होऊं लागली. लिंकनच्या घरापासून सुमारें दीड मैल अंतरावर हेझल डारसी नांवाच्या एका इसमानें नवीन शाळा घातली होती; त्यांत लिंकनच्या घरचीं सर्व मुलें जात असत. अशा चांगल्या शाळेंत सर्वत्रांनीं एकत्र जमून जाण्याची त्या जंगलांतील मुलांस मोठी मौज वाटत असे.

अब्राहाम यानें हल्लींचें वय फुकट न घालवितां शाळेंत जाऊन चांगलें ज्ञान संपादन केलें. शाळेंतला अभ्यास आणि शेतांतलीं कामें करण्यास दिवस लहान आहे असें त्याला वाटूं लागलें तेव्हां तो रात्रीं बराच वेळ पावेतों शेगडी जवळ बसत असे; अशा दिवसांत त्याला काय काय स्वप्नें पडत असतील बरें ! त्याला अद्याप जगाचा अगदींच कमी अनुभव होता आणि या अवाढव्य जगाचे कारभारांत "मी कोणी तरी एक होईन" असें त्याला वाटूं लागलें असेल काय ? असें त्याला वाटणें अगदीं साहजिक होतें. शेतांत काम करीत असतांना आणि नानाप्रकारच्या हत्यारांचा उपयोग करीत असतांना तो शाळेंतील धड्यांचें हरहमेश मनन करीत असे. हेनरी क्ले यास तो लहानपणापासून पूज्य मानीत असून त्याचें प्रशंसनीय चरित्र त्यानें लिहिलें होतें. या राज्यकार्य धुरंधरानें क्लेबद्दल असें म्हटलें आहे, कीं 'अमुत दिवस काढून या संसारयात्रेंतून पार पडण्या इतकें शिक्षण मिळविलें म्हणजे दारि-

ह्यावस्था क्वचितच प्राप्त होईल याचा धडा के पासून चांगला घेतां येतो. " हा दृष्टांत हल्लींच्या पिढीस फार उपयोगी आहे. जशी जशी त्याची विचारशक्ति वाढत गेली तसा तसा तो इतका हुषार होऊं लागला, कीं कोणत्याही गोष्टींचें ज्ञान प्राप्त करून घेण्यास त्याला अगदीं अवकाश लागत नसे. कांहीं दिवसानंतर बीजगणित, सिद्धांत, ल्याटीन भाषा हे विषय त्यानें हातीं धरून तीं पुस्तकें मिळतांच त्या सर्व विषयांचें त्यानें चांगलें अध्ययन केलें.

अबेलिंकन हा प्रामाणिक, मेहनतू आणि उपयोगी पडणार मुलगा आहे अशी शेजारीं पाजारीं व आसपास सर्व ठिकाणीं त्याची कीर्ति पसरली होती. हिवाळ्यांत एके दिवशीं रात्रीच्या वेळीं तो आपल्या सोबत्यासह घरीं लौकर येत असतांना, त्या भागांत राहराऱ्या एका दारुबाज मनुष्याचा घोडा रस्त्याचे बाजूस त्याचे दृष्टीस पडला. त्या घोड्याजवळच हा दारुबाज मनुष्य अतीशय दारूनें धुंद होऊन गुंगून पडला होता; आणि त्यामुळें शेजारच्या घरांतील लोकांनीं एकच हाकाटी चालविली होती. अब्राहाम हा त्या दारुबाजास उचलून शुद्धीवर आणण्याच्या बेतांत होता, इतक्यांत त्याचे सोबत्यानें म्हटलें " अरे, घरीं चल, राहूं दे; तो तसाच पडेना कां? तुला काय त्याचें? " " परंतु अशा रात्रीचे वेळीं जर त्याला येथें पडूं दिलें तर तो हिंवानें मरेल बिचारा " असें अब्राहाम म्हणाला.

अब्राहाम हा दारूचा द्वेष्टा होता पण दयार्द्र अंतःकरणाचा असल्यामुळें त्या दारुबाजास तसेंच पडून मरूं देणें त्याला बरें वाटेना. त्यानें त्याला उचलून आपल्या पाठीवर घेतलें व कांहीं अंतरावर एका घरीं नेऊन रामबाण औषधाचे उपाय करून शुद्धीवर आणिलें, व मरतां मरतां वाचविलें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. दारू पिणें हें मोठें पातक आहे असें तो समजत असे, परंतु दयाळू स्वभाव असल्यानें अशा पातक्यास त्याला प्रसंगीं मदत करावी लागली. त्याला सतरावें वर्ष लागण्यापूर्वीं वॉरिक परगण्यांतील बूनव्हिली नांवाच्या गांवीं फौजदारी अदालत होती तेथें तो दाखल झाला. तेथें एक खुनाचा खटला चालला होता. तो प्रथमच या गावीं आल्यामुळें तें गांव म्हणजे त्याला जंगलाच्या बाहेर एक मोठी सृष्टि आहे असें वाटलें. एके दिवशीं त्या अदालतीच्या जवळचे भागांत तो गेला होता तेथें त्याला कळलें, कीं येथील प्रसिद्ध ब्रेकनारिजीस पैकीं एकाकडे आरोपी तर्फे जबाब देण्याचें काम झालें असून तो आज भाषण करणार आहे; लागलींच तो अदालतींत गेला व साश्चर्य मुद्रेनें त्यानें आरोपी तर्फे जबाबाचें साग्र भाषण ऐकिलें. आजपावेतों त्यानें असे मोठें भाषण कधींच ऐकलें नव्हतें व त्यामुळें त्याला मोठें आश्चर्य वाटलें; सर्व भाषण व वादविवाद संपल्यावर तें काम पंचाकडे गेलें; नंतर तो कायदेपंडित आपल्या ऐटींत अदालतीच्या बाहेर पडला इतक्यांत त्याला एका तरूण, ऊंच, प्रामाणिक आणि विलक्षण प्रकृ-

तीच्या गोऱ्या मनुष्यानें हाटकिलें. या तरुण प्रामाणिक मनुष्यानें मोठ्या उमेदीनें त्या वकिलाच्या हाताशीं हात मिळविला आणि आज अदालतींत आपलें भाषण कसें काय झालें वगैरे प्रश्न विचारिले. हा वकील मोठ्या कुलीन घरण्यापैकीं असून त्याला वरील कृत्य पाहून फार आश्चर्य वाटलें; आणि त्या प्रामाणिक इसमाकडे न्याहाळून पहात पहात युनाइटेडस्टेटस्च्या ह्या ( अब्राहामलिंकन ) भावी अध्यक्षाच्या अंगास खेटून चालता झाला. या तरुण मुलानें ( सामाजिक भेदाभेदांचा नव्हें, परंतु ) सभेंत वक्तृत्व व सभाधीटपणाचा हा प्रथमच धडा घेतला. कालेंकरून वाशिंटनमध्यें जेव्हां अध्यक्षानें बूनाव्हिलीमधील सदर बातीची ब्रेकनारिरीज (पूर्वींचा वकील) यास आठवण दिली, त्यावेळीं तो कायदेपंडीत तर ती ओळख विसरला, परंतु अब्राहाम यास त्याचें विस्मरण झालें नाहीं, आणि हल्लीं जसें त्यानें प्रेम दाखविलें तसें बूनव्हिलीमध्यें दाखविलें असतें तर अब्राहाम यानें त्याचे अत्यन्त आभार मानिले असते.

त्या दिवसापासून अब्राहाम हा जाहीरभाषणें देण्याचा अभ्यास करूं लागला. तो शेजारच्या खेड्यापाड्यांतला एखादा चालू ग्राम्यविषय संभाषणासाठीं योजीत असे, ते विषय म्हणजे, रस्ते, शाळेसंबंधी कर, लांडगे अथवा अस्वलें धरून सरकारास सोंपणारास कायद्याप्रमाणें बक्षिसें, लोकांच्या नात्यागोत्यासंबधी प्रश्न

वगैरे होत. लटके न्याय ( इनसाफ ) करणें, काल्पनिक गुन्हेगार तयार करणें, आणि अशा कामीं स्वतः वकील बनून कायदे-शीर कामें चालविणें, प्रतिवादीस सल्लामसलत देणें, न्यायाधीश बनणें, पंचाचे अध्यक्ष होणें, आणि त्याबद्दल योग्य संभाषण करणें हे व्यवसाय त्यानें आरंभिले होते. या कामीं तो इतक्या उमेदीनें गढून गेला होता, कीं त्याचे बापास या बाबतींत दरम्यान-गिरी करून त्यास मनाई करणें भाग पडलें. तो म्हातारा नेहमीं म्हणत असे कीं 'अबे यानें व्याख्यान देण्यास आरंभ केला कीं त्याचे सभोंवतीं मधमाशाप्रमाणें श्रोतृसमाज जमलाच म्हणा''--

ह्या तरुण पुरुषाचे अंगीं एक मोठा वर्णनीय गुण होता तो असा कीं जेव्हां तो एखादा विषय अभ्यासासाठीं हातांत धरी, तेव्हां त्याचें मूळ काय आहे हें शोधून पाहिल्याखेरीज त्याचें समाधान होत नसे. अशा रीतीनें मूळ शोधून तो तोंडपाठ करण्यासारख्या बाबती वरचेवर टिपून ठेवीत असे. कोणताही अवघड प्रश्न त्याचे पुढें येवो तो त्याचा उलगडा नेहमीं लक्षांत ठेवीत असे. सायंका-ळची वेळ झाली म्हणजे तेथील जंगली तरुण रहिवाशी आळशा-प्रमाणें गप्पागोष्टी बोलत बाहेर हिंडण्यास जात असत, त्यांचे बरो-बर अब्राहाम जात असे आणि त्यांची ग्राम्यबुद्धि आणि शहाणपण पाहून त्याला मोठें कौतुक वाटे. अज्ञानांधकारानें व्यापिलेल्या त्या प्रांतांत अब्राहाम हा एक मोठा विद्वान व प्रतिसूर्यच म्हणविला जात

असे, आणि या मुलाचे हातून मोठमोठालीं कामें होतील असें पुष्कळांनीं भाकित करून ठेविलें होतें.

शेतांतलें कोणतेंही काम तो कधींहीं विसरत नसे. कसलेंही त्रासदायक काम असलें तरी तो चुकवाचुकव करीत नव्हता. सारांश, या तरुण मुलानें सर्व अभ्यास मोठ्या दक्षतेनें केला. लहानपणचा त्याचा सोबती डेनिसहँक्स यानें एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं "वाचन, लेखन, हिशेब व कविता करणें हे त्याचे हमेशचे व्यवसाय होते; आणि अशा जंगली प्रदेशांत परमेश्वरच या भावी अध्यक्षास शिक्षण देत असला पाहिजे अशी कल्पना करिता येते."

अब्राहाम यानें स्वतः लिहिलेलें एक पुस्तक आहे तें पाहिलें असतां असें कळतें, कीं तो सतरा वर्षांचा असतांना त्यानें तें लिहिण्यास प्रारंभ केला आणि त्यांत अंकगणिताचीं उदाहरणें सोडविलेलीं असून त्यावर "अंकगणितांतील उदाहरणांचें पुस्तक" असें लिहिलेलें आहे; त्यांत एक लेख इ. स. १८२६ च्या मार्च महिन्याच्या पहिले तारखेचा असून त्याचे मथाळ्यावर "कटमिती" असें लिहिलेलें आहे. त्यांत कटमितीचे त्यानें खालीं लिहिल्याप्रमाणें भाग केले आहेत "कटमितीची व्याख्या" व ती "मोजण्याचे नियम" आणि "सिद्ध प्रमाणें आणि उदाहरणें" सदरहु बाबती चांगल्या स्पष्ट अक्षरानें लिहिलेल्या आहेत. त्याच लेखांत त्या नंतर 'पैशावरील व्याज"

हा एक लेख असून तें सर्व त्यानें पाहिजे त्या वेळीं पाहण्यासाठीं व्यवस्थेशीर संभाळून ठेविलें होतें. तो जेव्हां अध्यक्ष झाला तेव्हां एके दिवशीं कोणी एकानें त्याला सरकारविरुद्ध होणाऱ्या कारस्थनाबद्दल कांहीं हकीकत कळविली. अशी अपूर्ण आणि वाईट हकीकत ऐकून तो त्याला ह्मणाला " बाबारे मी एक मुद्याची गोष्ट शिकलों आहे; परंतु तूं ती शिकला नाहींस; त्या गोष्टीस ' संपूर्ण ' असें ह्मणतात; " आणि आपला हात जोरानें मेजावर आपटून ' संपूर्ण ' असे शब्द तो बोलला.

यावरून ज्या वेळीं अब्राहाम लिंकन हा आपला वर्तनक्रम शिकला त्याचवेळीं तो संपूर्ण होण्यास शिकला हें आतां आपणास स्पष्ट कळून चुकलें.

हल्लीं त्याचें वय अ.धें १८ वर्षांचें होतें; एक होडी तयार करून त्यांत शेतीचा माल भरून नदींतून घेऊन जावा अशी मोठ्या महत्त्वाची कल्पना त्याचें मनांत उद्भवली. इंडियानाच्या दक्षिण भागांतील औद्योगिक स्थितीसंबंधी त्याला कांहीं वर वर माहिती होती परंतु हल्लीं त्याला त्या संबंधांत विशेष बारकाईनें माहिती करून घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्यानें धारल्याप्रमाणें एक लहानशी होडी तयार करून त्यांत डुकराचें मांस, बागेतला कांहीं माल, आणि व्यापारासाठीं आणखीं कांहीं उपयोगी वस्तु भरून ती होडी नदींतून चालविली आणि एका व्यापारी बंदरांत उभी

करून तेथें सर्व माल उतरविला. या सफरीबद्दल जास्त हकीकत उपलब्ध नाहीं. परंतु एवढी मात्र गोष्ट खरी, कीं प्रसंग पडल्यामुळें त्याच्या अंतःकरणांत द्रव्याचा थोडासा लोभ उत्पन्न झाला होता. तरीपण पैशाची हाव त्याला मुळींच नसून तो कौडीचुंबकही नव्हता. तो इतका काटकसरी होता, कीं ' पैसा हातांतुन सुटण्यापूर्वीं तो त्याच्याकडे दोनवेळ पहात असे. ' होडींतला माल त्यानें विकल्यानंतर एके दिवशीं तो नदीच्या कांठीं सहज हिकडे तिकडे हिंडत असतांना त्याला एक आगबोट नदींतून येतांना दिसली; नदीच्या कांठीं दोन इसम त्या आगबोटीजवळ जाण्यासाठीं एक लहान होडी पहात होते, इतक्यांत त्यांना अब्राहामाची होडी दिसली. भाडे वगैरे ठरविण्याचे भरीस न पडतां त्यानें एकदम त्या होडींत त्यांचें सर्व सामान टाकून त्यांना आगबोटीवर चढविल्यावर त्याच्या हातांत भाड्याबद्दल एक डालर पडलेला पाहातांच त्यांस फार आश्चर्य वाटलें.

पुष्कळ वर्षांनंतर तो एकदां सेक्रेटरी सिवर्ड यास वरील सार्थ हकिकत सांगून ह्मणाला, कीं "ती हकीकत आजमितीस मला क्वचितच खरी वाटते." तुला कदाचित् ती क्षुल्लक वाटत असेल परंतु माझे कारकीर्दींत ती फार महत्त्वाची मी समजतों. पुरा एकही दिवस नाहीं इतक्या थोड्या अवकाशांत माझ्या सारख्या एका गरीब मुलानें एक डालर मिळवावा हें

आज खरोखरच मला संभवनीय दिसत नाहीं. त्यावेळीं या सृष्टीचा अवाढव्य विस्तार आणि सौंदर्य पाहून मी अतीशयच चकित झालों, आणि माझी आशा व श्रद्धा हीं वाढत चाललीं."

अंगांत पुरुषत्व असलें ह्मणजे कोणकोणत्या गोष्टी घडणें संभवनीय असतें हें या भाग्यशाली मुलास आतां चांगलें कळूं लागलें. त्याला प्रामाणिकपणानें जो एक डालर मिळाला होता त्यावरून केलेल्या श्रमाचा योग्य मोबदला खात्रीनें मिळतो अशी त्याची खात्री झाली.

पुढें एक वर्षानें ह्मणजे आपल्या वयाचें १९ वें वर्षी त्यानें जी दुसरी सफर केली ती फारच महत्त्वाची होती. मी. जेन्ट्री हा एक त्याच्या शेजारीं राहणारा गृहस्थ असून त्याचे जवळ पुष्कळ माल होता. अब्राहामासारखा विश्वासुक मनुष्य मिळणें कठीण असें पाहून त्यानें न्यूआर्लिन्स येथें एक होडी मालानें भरून पोंचविण्याचें जबाबदारीचें काम त्यास विश्वासानें सोंपिलें. अब्राहाम यानें दूर प्रवास केलेला नसून त्याला कामाकाजाची अथवा नाविक विद्येची फारशी माहिती नव्हती व मिसिसिपीच्या खालचा प्रदेशही त्याच्या पाहण्यांत नव्हता; तरी पण त्यानें मोठ्या हिमतीनें तें काम कबूल केलें. हें काम पतकरण्यांत पैसे मिळविण्याचाच त्याचा हेतु नव्हता, परंतु नवीन देश पाहण्यांत त्याला मोठा आनंद वाटत असे; आणि जेव्हां अब्राहाम आपला

सोबती एलन यांजबरोबर ओहिओ नदींतून १८०० मैलांची सफर करण्यास निघाला तेव्हां प्रथमची मोहीम आपणास बरीच हितावह होईल असें त्याला वाटलें होतें; अपरिचित महासागरांत प्रवास करणाऱ्या कोलंबसाला अगर प्रथम आगबोट चालविणाऱ्या कोणत्याही इसमास इतकी प्रबल इच्छा झाला नव्हती.

ही सफर या उभयतां तरुणांना मोठी जड वाटत होती, कारण या सृष्टीची अफाट रचना त्यांच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष दिसूं लागली. कांहीं दिवसांनीं ते किनाऱ्यास लागले, सुपीक शेतें त्यांच्या दृष्टीस पडूं लागलीं आणि किनाऱ्यावरील रहिवाशी स्नेहाच्या नात्यानें त्यांच्या मालाबद्दल पूसतपास करूं लागले. एके झाडाखालीं त्यांनीं रातोरात मुकाम केला व तेथें एक शिकार करणारा मुशाफर त्यांच्याशीं त्या प्रांतातल्या गप्पागोष्टी सांगण्यास सोबतीसाठीं होता, त्याजपासून त्यांनीं तेथील उपयुक्त व किरकोळ माहिती सर्व गोळा केली.

अब्राहाम आणि एलन यांच्यावर एक भयंकर प्रसंग गुदरला. होडी किनाऱ्याला दररोज प्रमाणें बांधून ते उभयतां फार थकले होते म्हणून रात्रीं किनाऱ्यावर स्वस्थ निजले होते; इतक्यांत कांहीं खडवड त्यांना ऐकूं आली व त्यामुळें ते जागे झाले. अब्राहाम यानें एकदम उठून उडी मारिली. व मोठ्यानें बोलला "कोण आहे तिकडे"? कांहींएक उत्तर मिळालें नाहीं तेव्हां

त्यानें हातांत हत्यार घेतलें व जिकडून आवाज आला तिकडे तो गेला. लूट करण्याचे हेतूनें सात सिद्दी लोक पुढें सरसावले, पैकीं एकास मोठा धक्का देऊन त्यानें पाण्यांत पाडिलें. बाकी राहिलेल्यांनीं पळ काढिला असतां त्यानें व त्याच्या सोबत्यानें त्याचा पाठलाग केला तेव्हां मोठी मारारारी होऊन शेवटीं ते सिद्दी पळून गेले. या मारामारींत अब्राहामास एके ठिकाणीं जखम होऊन ती खूण त्याचे अंगावर आजन्म राहिली.

मिसिसिपीच्या दक्षिण भागांतल्या मुशाफरींत जातां येतां एकंदर तीन महिने गेले. न्यूआर्लिन्स येथें पोहोंचण्यापूर्वीं त्यांचा सर्व माल खपून त्यांत त्यांना चांगला फायदा झाला. नंतर त्यांनीं माल भरलेली होडी रिकामी झाली म्हणून विकून टाकली, व परत येतांना ते आगबोटींतून घरीं आले. त्यानें या अवाढव्य सृष्टीचा एक लहानसा भाग पाहिला असें म्हटलें असतां चालेल. अब्राहाम यानें गुलामगिरीची स्थिति फार बारीक रीतीनें पाहिली व ती तो कधीही विसरला नाहीं. लोकांस गुलाम म्हणून धरून त्यांचेकडून शेतांत मजूरी करण्याचें व त्याचप्रमाणें नदीच्या कांठावरील मोठमोठाल्या शहरांत भरणाऱ्या सभेंत त्यांचेकडून सर्व मजुरीचें काम घेण्यांत येत असे; आणि विशेष हृदयद्रावक व दुःखद स्थिति अशी होती कीं लोकांना नांदत्या घरांतून व गरीब कुटुंबांतून गुलाम म्हणून धरून नेऊन त्यांच्याकडून आगबोटीवरील वाटेल तें काम घेण्यांत येई. यापुढें प-

रवशतेच्या बंधनांतून मुक्त करणारा या नांवानें जगांत ज्याची प्रसिद्धि होणार आहे, त्यानें बद्ध व निराश झालेल्या इसमांस बंधनांतून कसें सोडवावें त्याचा प्रथम अभ्यास येथें केला.

येथें आपणास हें विसरतां कामा नये, कीं अब्राहामलिंकन हा आपल्या स्वतःच्या बळावर लहानाचा मोठा झाला होता त्याला जी माहिती मिळे ती अगदीं बरोबर व खात्रीलायक असे. त्याला स्वतःच शिक्षण असून त्याच्या स्वतःच्या अंगावरच सर्व भरणपोषणाचा बोजा होता. शारिरिक, मानसिक आणि नैतिक साधनें हीं त्याला चांगलीं अनुकूल होतीं. तो स्वबुद्धिनें चालणारा असून त्याचा स्वभाव अति भिडस्त आणि संशयी असे. निर्जन अरण्यांत तो लहानाचा मोठा झाल्यामुळें आणि जंगलांतल्या स्वाभाविक गोष्टी त्याच्या अगदीं समोर हरहमेश दिसत असल्यानें त्याला एकांत वासांत विचार करीत बसण्याची सवय लागली होती, आणि यांतच तो मोठें सुख व आनंद मानीत होता. + परावलंबनामुळें दैन्य प्राप्त होतें हे तो चांगलें जाणत होता; आणि ह्मणून एक तासभर सुद्धां दुसऱ्यावर अवलंबून राहणें त्याला पसंत नसे. जगनियंत्या प्रभूनेंच अब्रांहामलिंकन यांस त्या जंगलांत चांगलें शिक्षण देऊन तयार केलें होतें असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. त्याच्या शरिरांत परमेश्वर अंश रूपानें वास्तव्य करीत

+ ( पहा " दीर्घायु कसें व्हावें ? " नियम १५ व ६५१ )

होता; आणि ह्मणून परावलंबन दैन्याचा भार नाहींसा करण्यासाठीं हा ईश्वरी अवतारच आहे असें वाटत असें.

इंदियानामध्यें परदेशांतून लोक येण्याचा क्रम सारखा चालूंच होता. अंतरा अंतरावर लोक येऊन वसाहत करीतच होते, त्यामुळें शेजाऱ्यापाजाऱ्यांत सख्यत्वही पुष्कळ होत चाललें. एकमेकांच्या भेटी, ईश्वरप्रार्थना, वगैरे अनेक कारणांनीं परस्पर सौजन्यही वाढत चाललें. आपल्या तरुण नायकाची ( अब्राहाम लिंकन ) हल्लीं उंची सहा फूट चार इंच होती, व हत्यारांचा उपयोग करण्याचें कामीं याचा कोणीच हात धरूं शकत नसून तो हरएक बाबतींत सर्वांत श्रेष्ठ असे.

जरी अब्राहाम याचे अंगीं त्या काळाला अनुसरून गुण होते तरी त्याची प्रामाणिक दृष्टि आणि मायाळू स्वभाव असल्यानें तो दिवसानुदिवस तेथें लोकप्रिय* होत चालला. कोणताही विषय वर्णन करण्याची त्याच्यांत विलक्षण शक्ति होती. त्याची आई कधीं कधीं त्याला वेड्याविद्रुप व हास्यरसाच्या गोष्टी, अथवा सरहद्दीवरील एखादी दंतकथा सांगत असे आणि त्या सर्व त्यानें लक्षांत ठेऊन त्यांवर नाटकें रचून तयार ठेविलीं होतीं. तो मध्यरात्र पावेतों श्रोतृसमाजास गोष्टी सांगत असे व त्याचें शहाणपण, हाजीर जबाब व चर्चा वगैरे ऐकून त्यांना फार

*( ॥ लोके गुरुत्वं विपरीततां वा स्वचेष्टितान्येव नरं नयंति ॥ १ ॥ )

कौतुक वाटे. गरीब बिचारा डेनिस्हँक्स हा अपरात्र झाली म्हणजे कंटाळून त्याला सोडून एकटाच घरीं परत येई.

अब्राहाम हा सरळ स्वभावाचा असून नम्र अंतःकरणाचा होता आणि त्या जंगलांतल्या अनेक प्रकारच्या विद्या त्याला न कळत त्याच्यांत वास्तव्य करूं लागल्या. जंगलांतल्या खऱ्या अनुभविक गोष्टी त्याला चांगल्या माहित झाल्य होत्या. मनुष्याचा वर्तनक्रम कसा असावा याचा तो अभ्यास करीत होता. पुष्कळ वर्षांनंतर आणि याहीपेक्षां अधिक भरभराटीच्या दिवसांत त्यानें ज्या ज्या व्यक्तींचीं सर्व दिशा दाखविणारीं चरित्रें लिहिलीं आहेत तीं जुन्या कैंटकींत आणि दक्षिण इंदियानामध्यें सर्व लोकांसमोर आज तयार आहेत. लिंकनची सर्व मंडळी इंदियाना येथें येऊन राहिली हें वाचकांच्या वाचण्यांत आलें आहेच, त्या वेळीं इंदियाना संस्थानाची स्थिति कशी होती त्याबद्दल प्रसिद्ध इतिहासकार डॉक्टर स्मिथ यानें असें लिहिलें आहे कीं, "इंदियाना हें संस्थान इ. स. १८१६ मध्यें अस्तित्वांत आलें, त्यावेळीं लोकवस्ती सुमारें ६५ हजार होती व परगणेही थोडेच होते. संस्थानाचा मध्य, उत्तर आणि वायव्य भाग हें अगदीं निर्जन अरण्य होतें. इंदियानांपोलीस हल्लीं ज्या जागीं आहे त्या जागीं मी प्रथम गेलों तेव्हां तेथें दाट झाडी असून मोठमोठे रस्ते अगर

पूल वगैरे नव्हते; थकल्या भागल्या प्रवाशास शेरभर अन्न अगर विश्रांतीची जागाही कोठें मिळत नसे. तेथें पुष्कळ वर्षांनंतर न्याय कचेऱ्या स्थापन झाल्या. ह्या कचेऱ्यांची बैठक झोंपड्यांत होत असून पंचलोक झाडांच्या छायेखालीं बसत असत." दिवसानुदिवस सुधारणा कशी होत गेली हें पुढील प्रकरणें वाचलीं असतां कळून येईल.

---



# प्रकरण ४ थें.

## गुलामगिरीची दयार्द्र स्थिति पाहून "अबे" याचें अंतःकरण अतिशय द्रवलें.



श्चिमेकडे इलिनॉइस अथवा तद्देशीय भाषेत ज्याला 'पोक्त मनुष्यांचा मुलूख' असें म्हणतात, तिकडे **टॉमस** लिंकन यानें आपल्या मंडळीसह जाण्याचें ठरविलें. इ. स. १८२९ च्या शरदतूंत **टॉमसहँक्स** हा प्रथम इलिनॉइसमध्यें गेला. त्यानें तेथें ज्या गोष्टी पाहिल्या व ऐकिल्या, त्या बद्दल **टॉमस**लिंकन यास अनुकूळ व उत्तम अभिप्राय लिहून पाठऊन त्यांत त्यानेंही आपल्या मंडळीसह तेथें यावें असें दर्शविलें. **टॉ**मस यास हल्लींची जागा सोडण्याबद्दल फारसें सांगावें लागलें नाहीं, कारण फक्त पोटापुरतें मिळवून खावें, या पलीकडे त्यानें इंदियानामध्यें राहून जास्त कांहीं केलें नाहीं. इलिनॉइस येथील जमिनी अतिशय सुपीक असल्याबद्दल बातमी सर्व जुन्या संस्थानांत पसरल्यामुळें त्याला वाटलें कीं आपलें तेथें चांगलें चालेल; आणि या आशेवर इ० स० १८३०

च्या वसंत ऋतूंत शेतांतला दाणागोठा, डुकरे वगैरे सर्व जेन्ट्री यास विकून आणि इतर प्रापंचिक वस्तूंची बांधाबांध करून तो पश्चिमेकडे जाण्यास निघाला.

टॉमसलिंकनची जी घरमंडळी पर्यटणास निघाली ती खालीं लिहिल्याप्रमाणें:—टॉमसलिंकन आणि त्याची पत्नी सान्हा त्याचा एकुलता एक मुलगा अब्राहाम, त्याच्या हल्लींच्या बायकोचा पहिल्या घरचा मुलगा जॉनजॉनस्टन व मुली मिसेसहॉल व मिसेस-हँक्स आणि त्यांचे नवरे. अब्राहामची बहिण सान्हा हिनें कांहीं वर्षांपूर्वी एरॉन ग्रिग्स्बी याच्याशीं लग्न केलें होतें व ती नुकतीच निवर्तली होती. ह्या आठजणांस माळरानावरून काळ्या चिकण मातीच्या दाट गाळांतून अती कंटाळा येण्यासारखी वाट चालणें भाग पडत होतें. या प्रमाणें दोन आठवडे त्रासदायक मुशाफरी करून मेकॉन कौंटीपैकीं डिकॅटूर नांवाच्या खेड्यांत ठरलेल्या जागीं ते येऊन पोंचले. अब्राहामलिंकन हा या संस्थानांत कायमचा राहिला, कारण त्याला पुढें पुष्कळ स्तुत्य कृत्यें करून सत्कीर्ति मिळवावयाची होती. भविष्यकाळीं आपणास मोठेपणा व चांगले दिवस येतील याची त्याला आज कल्पनाही नव्हती; तेथें तो आपल्या घरमंडळीसाठीं घर बांधण्याच्या उद्योगास लागला. घराचें काम संपूर्ण होऊन त्यांत आपलीं माणसें सुरक्षित ठेविल्यावर टॉमसहँक्स आणि अब्राहामलिंकन यांनीं पंधरा एकर जमिन नांगर-

ण्याचा क्रम आरंभिला; नंतर त्यांनीं जवळच्या जंगलांतून लांकडाचे तुकडे कापून आणून शेताभोंवतीं एक कुंपण तयार केलें. याप्रमाणें इलिनॉईसमध्यें त्यानें हें प्रथमच शेत तयार केलें.

अब्राहाम यास स्वतःच्या कल्याणास्तव स्वतंत्रपणें कांहीं उद्योग करण्याचा हल्लीं चांगला समय होता. ही गोष्ट कांहीं दिवसांपूर्वींच त्याचे मनांत आली होती, परंतु त्यावेळीं त्याला वाटलें कीं " हल्लीं आपण बापाचे आधीन असून त्याची सेवा करीत आहोंत. " या प्रमाणें वयाचीं २१ वर्षें होईपर्यंत त्यानें स्वतंत्रपणें कांहीं एक केलें नाहीं. हल्लीं त्याला नुकतेंच २२ वें वर्ष लागलें होतें, आणि स्वतः मिळवून आणण्याचें त्याचें अंगीं सामर्थ्य आलें असून त्याला त्याबद्दल मोठी उमेद होती. इ० स० १८३० च्या वसंत ऋतूंत त्यानें जीं साधारण कामें केलीं, त्यांत त्याचें शाहणपण, आनंदी स्वभाव, प्रामाणिकपणा वगैरे गूण पाहून दक्षिण इलिनॉईसमधील पुढारी लोकांस मोठा संतोष झाला. हे लोक किफायतीचा सौदा करण्याचे कामीं मोठे धूर्त आणि स्वतः कष्टकरून जें कांहीं थोडें बहुत रोकड मिळेल त्यांत हात राखून खर्च करणारे होते. व्यापाराकडे त्यांचा विशेष कल असून शेतीचीं हत्यारें कशीं उपयोगांत आणावीत यांचेंही त्यांना चांगलें ज्ञान होतें. ह्या लोकांस चोऱ्या करणें दरोडे घालणें ह्यांची कधींच भीति वाटत नसे. ह्या जंगलांत शिकार करण्याचीं साधनें पुष्कळ असत आणि त्यांवर बऱ्याच लोकांचा निर्वाह चालत असे.

अशा स्थितींत अब्राहाम हा आतां बराच मोठा दिसूं लागला. त्या वेळीं परोपकारी-सशक्त- आणि आनंदी असे पुष्कळ लोक होते व त्या सर्वांत अब्राहाम यानें चांगलें नांव मिळविलें. त्यानें तेथील शेतकऱ्यांकडे हंगामी नोकरी पत्करिली होती. इ. स. १८३०-३१ च्या सालीं हिंवाळ्यांत तेथें अतीशय बर्फ पडलें ह्मणून त्याला 'भयंकर बर्फाचा हिंवाळा' असें सर्व ह्मणतात. इलिनॉइसच्या मध्य भागांत हा मोठा लक्षांत ठेविण्यासारखा काळ होता. कांहीं वर्षांपूर्वीं लंदन शहरामध्यें "भयंकर अग्निप्रकोप" * झाला होता त्याचप्रमाणें "भयंकर बर्फाचा हिंवाळा" ही एक मोठी ऐतिहासिक हकिकत तेथें घडली होती. जमिनीवर तीन फूट बर्फ चढे पावेतों एकसारखें बर्फ पडतच होतें, नंतर पावसाचे तुषार पडल्यामुळें तर बर्फ इतकें थिजलें कीं शीतोष्ण मापक यंत्रांत पारा शून्याचे खालीं १२ अंश पावेतों गेला होता. थंडी इतकी पडली होती कीं लोकांस कांहीं एक हालचाल करितां आली नाहीं आणि त्यामुळें ऐतिहासिक दृष्टीनें ह्या हिंवाळ्याची तिकडे मोठी प्रसिद्धी आहे. ह्या हिंवाळ्यांत हरिणांचे कळप व सर्व प्रकारचीं शिकारीं जनावरें व पक्षी यांचा इतका चुराडा उडाला कीं पुनः शिकार मिळणें दुर्मिळ झालें. रस्ते बंद झाल्यामुळें मुलेंबाळें, स्त्रीपुरुष वगैरे सर्व बर्फ तुडवीत वाट मिळेल तिकडे जाऊं लागले व जी शिकार

* इंग्लंदचा इतिहास पहा. इ. स. १६६६

मिळेल त्यावर निर्वाह करूं लागले. ह्या हिंवाळ्यांत शेतीचीं सर्व कामें बंद पडून भयंकर हानि झाली.

ह्या भयंकर हिवाळ्यांत आपल्या तरुण अब्राहामानें, त्या प्रांतांत एक डेन्टन ऑफट नांवाचा मोठा व्यापारी होता त्याची ओळख करून घेतली. 'अब्राहाम आणि हँक्स हे उभयतां तरूण व मोठे होतकरू आहेत' ही बातमी ऑफट, याचे कानावर येतांच त्यानें एक होडी सामानानें भरून न्यूआर्लियन्स येथें घेऊन जाण्याबद्दल त्यांना आपली इच्छा प्रदर्शित केली. त्या दोघांनीं मोठ्या आनंदानें हें काम पत्करिलें व त्या कामाचे मोबदल्यांत 'प्रत्येकांस दररोज जेऊन ५० सेंट्स मिळून कामांत चांगला फायदा झाला तर प्रत्येकास २० डॉलर बक्षीस मिळावयाचे' याप्रमाणें ठराव झाला. इतका मोठा पगार त्यांना कधींच मिळाला नव्हता त्यामुळें त्यांना असें वाटलें कीं यांत आपलें चांगलेच कल्याण होईल. अब्राहाम यानें आपला दूध भाऊ जॉनजॉनस्टन यास बरोबर घेऊन त्याला नावाडी लोकांत दाखल केला; होडी तयार करून ऑफट, अब्राहाम, हँक्स आणि जॉनजॉनस्टन ही मंडळी स्प्रिंगफिल्डमध्यें सँगॉमन येथें जाण्याचें ठरवून निघाली. मध्यंतरीं ती होडी एका धरणाला लागून अडकली परंतु न्यूसालेम गांवच्या लोकांच्या मदतीनें तें विघ्न टळलें. या प्रवासांत त्याला जो अनुभव आला त्यावरून कांहीं दिवसानंतर ' पाण्याच्या डोहांत होड्या सां-

पडल्या ह्मणजे शिडें कशीं उभीं करावींत ' याचा एक सुरेख नमुना तयार करून त्याबद्दल त्यानें वॉशिंगटन येथें सनद मिळविली. राष्ट्रीय राजधानींतल्या सनद मिळविण्याच्या कचेरींत एकादा मनुष्य कचेरी पाहण्यास गेला तर अद्याप त्याला अब्राहामानें केलेली लहान लांकडी होडी, आणि लांकडांचे तुकडे, व गंजाचें सुबक नक्षीदार काम, दाखविण्यांत येत आहे. यावरून अब्राहामलिंकन यानें एक ठिकाणीं म्हटलें आहे कीं " मनुष्य आपल्या मनगटाच्या जोरावर वाटेल त्यावेळीं धारिल तें करूं शकेल. "

आपले उभयतां प्रवासी मोठे धाडसी होते; ते लौकरच न्यूआर्लिन्स येथें सुखरूप येऊन पोहोंचले. या ठिकाणीं गुलामगिरीचा धंदा चालू असून येथें अब्राहामलिंकनची ही दुसरी खेप होती. त्यानें पूर्वीं पाहिला होता त्यापेक्षां हल्लीं कांहींसा जास्त प्रमाणावर हा धंदा चालूं आसलेला त्याच्या पाहण्यांत आला. स्त्रीपुरुषांस चाबुकाचे मार बसून त्यांची खरेदी व विक्री होत असे; कुटुंबांतल्या माणसांची ताडातोड, आईबापांपासून अर्भकांस निर्दयपणानें हिरावून नेणें, आणि तरुण स्त्रियांवर भयंकर जुल्म करून त्यांच्या प्रियकरांपासून ओढून घेऊन जाणें, इत्यादी अनर्थकारक प्रकार त्यावेळीं चालू असलेले पाहण्यांत येत असत. हर ! हर ! परमेश्वरा ! कोण ही शोचनीय स्थिति! खरोखर ही दयार्द्र स्थिति पाहून दगडांस सुद्धां पाझर फुटेल; परंतु गुलाम खरेदी करणारे, विकणारे आणि

त्यांचे मूळ मालक या पैकीं कोणाचें मनास कांहींएक वाटत नसे; व त्यांना पश्चात्तापही होत नसे. आपल्या तरुण पुढाऱ्यास ( अब्राहामास ) हा प्रकार पाहून काय वाटलें असेल याची कल्पना वाचकांनींच करावीं. त्याला अतीशय तिटकारा आला व त्याचें अंगांत स्फुरणही चढलें कांहीं काळानंतर जॉनहँक्स यानें या गुलामगिरीचा भयंकर प्रकार पाहून लिंकन याच्या झालेल्या स्थितीचें वर्णन केलें कीं "अब्राहाम यानें हा प्रकार प्रत्यक्ष पाहिला तेव्हां त्याचें अंतःकरण दुभंग झालें; त्याच्याच्यानें एक शब्दही बोलवेना; तो स्तब्ध राहिला आणि खिन्न झालेला दिसला मी त्याला चांगला ओळखतों आणि ह्मणून खात्रीनें सांगतों कीं, या गुलामगिरीबद्दल त्यानें जे अभिप्राय दिले ते त्याच्या सफरींत दिले आहेत." इ. स. १८३१ च्या मे महिन्यांत त्याच ठिकाणीं आणि त्याचवेळीं त्याचें हृदयांत या विषयाचें पक्के बीजारोपण झालें.

या सफरींत अब्राहामलिंकन हा लुइझीआना येथें गेला होता. तेथील अशी एक दंतकथा सांगतात कीं तेथें त्याला एक वयोवृद्ध सिद्दीण भेटली, ती दैवज्ञ होती आणि पुष्कळ तरुण मंडळींना तिनें भविष्य वर्तवून दिलें होतें. तिनें अब्राहामलिंकनास असें वर्तवून दिलें होतें कीं " तूं अध्यक्ष होऊन सर्व बद्ध झालेल्या सिद्दी लोकांची गुलामगिरीच्या बंधनांतून मुक्तता करशील" अब्राहाम यास हें ऐकून मोठें आश्चर्य वाटलें. त्याचा स्वभाव शकु-

नादी प्रकारावर अति श्रद्धा ठेविण्याचा होता. स्वप्नांतले दृष्टांत व भविष्य कथन यांवर त्याचा लहानपणापासून भरंवसा होता. वर दर्शविलेलें सिद्दीणीनें जें भविष्य त्याला सांगितलें तें त्यानें कोणास कळविलें नाहीं.

न्युअर्लियन्स येथून परत आल्यावर अब्राहाम यानें ऑफटचें प्रेम संपादन केलें. ऑफटचा त्याच्यावर चांगला विश्वास बसला आणि त्यामुळें त्यानें न्युसालेम येथें जें देशी वस्तूंचें एक छोटेंसें दुकान घातलें होतें त्याचें सर्व काम अब्राहाम यास सोंपिलें. त्यानें लौकरच लोकप्रीति चांगली संपादन केली. तेथील लोकांचा साधारण स्वभावच असा असे कीं कोणीही मनुष्य आला तरी त्याचा ते उत्तम गौरव करीत असत. तेथें जे जे लोक वसाहतीस येत असत त्यांचा एकमेकांशीं मुळींच परिचय नसे; कारण ती वेळच तशी फेरफारीची होती. लहान लहान खेडींपाडीं सर्व ओसाड पडलीं होतीं. ज्या ज्या ठिकाणीं वसाहत करणारांचीं घरें बांधलेलीं होतीं त्या त्या सर्व जागा निर्जन झाल्या होत्या. ज्या न्युसालेम गावीं पाण्याच्या धरणाजवळ अब्राहामची होडी लागली होती तें न्युसालेम गांव समूळ नाहींसें होऊन तेथें होतें कीं नव्हतें याची ही भ्रांति पडूं लागण्याजोगी स्थिति झाली होती.

वरील छोट्याशा दुकानाचें काम अब्राहामकडे होतें आणि त्या कामांत व दुसऱ्या कोणांचीं जीं जीं कामें त्यानें पत्करिलीं तीं

तीं सर्व त्यानें फारच दक्षतेनें तडीस नेलीं. प्रामाणिकपणा, सभ्यपणा, गिऱ्हाईकांचें मन आपलेकडे वळेल अशी योजना करणें, चित्ताकर्षकपणा, धैर्य आणि चंचळपणा हे गूण त्याच्यांत चांगलेच व्यक्त होत होते. एके दिवशीं असें घडलें कीं एका गिऱ्हाइकाकडून कांहीं सेंट्स वाजवी किंमतीपेक्षां जास्त घेण्यांत आल्यामुळें बरीच रात्र होई पावेतों त्यानें हिशेब तपासून शिल्लक मोजली व त्याची खात्री झाली तेव्हां रात्रीं तसाच तो त्या गिऱ्हाइकाचे घरीं गेला व जास्त घेतलेले पैसे त्यानें परत केले. त्याचप्रमाणें वजनांत कांहीं फेरफार झाल्यामुळें एका स्त्रीस चहाची भुकटी वाजवी देणें त्यापेक्षां कमी दिली गेली होती, हें जेव्हां मागाहून त्याचे ध्यानांत आलें तेव्हां लागलींच कमी दिली गेली तेवढी चहाची भुकटी घेऊन जाऊन त्यानें त्या स्त्रीस दिली.त्या स्त्रीस खरोखरच यांपैकीं कांहींच माहिती नव्हती व हा प्रामाणिकपणा पाहून तिला फारच कौतुक वाटलें. अब्राहामबद्दल अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत तीं सर्व येथें दिलीं असतां ग्रंथविस्तार होईल. उघडीं पडलेलीं व अगदीं निराश्रित कुटुंबें वांचविल्यानें, तरुण स्त्रियांच्या विटंबना दूर करून त्यांची अब्रू रक्षण केल्यानें, लहान लहान सर्व अर्भकांस जुलुमांतून सोडविल्यानें अब्राहाम लिंकन हा झपाट्यानें कसा उदयास आला त्याचें तपसीलवार वर्णन करण्यास खरोखरच येथें जागा पुरणार नाहीं. तो राहत असलेल्या त्या जंगली लोकांच्या समूहांत निरा-

नादी प्रकारावर अति श्रद्धा ठेविण्याचा होता. स्वप्नांतले दृष्टांत व भविष्य कथन यांवर त्याचा लहानपणापासून भरंवसा होता. वर दर्शविलेलें सिद्दीणीनें जें भविष्य त्याला सांगितलें तें त्यानें कोणास कळविलें नाहीं.

न्युआर्लियन्स येथून परत आल्यावर अब्राहाम यानें ऑफटचें प्रेम संपादन केलें. ऑफटचा त्याच्यावर चांगला विश्वास बसला आणि त्यामुळें त्यानें न्युसालेम येथें जें देशी वस्तूंचें एक छोटेसें दुकान घातलें होतें त्याचें सर्व काम अब्राहाम यास सोंपिलें. त्यानें लौकरच लोकप्रीति चांगली संपादन केली. तेथील लोकांचा साधारण स्वभावच असा असे कीं कोणीही मनुष्य आला तरी त्याचा ते उत्तम गौरव करीत असत. तेथें जे जे लोक वसाहतीस येत असत त्यांचा एकमेकांशीं मुळींच परिचय नसे; कारण ती वेळच तशी फेरफारीची होती. लहान लहान खेडींपाडीं सर्व ओसाड पडलीं होतीं. ज्या ज्या ठिकाणीं वसाहत करणारांचीं घरें बांधलेलीं होतीं त्या त्या सर्व जागा निर्जन झाल्या होत्या. ज्या न्युसालेम गावीं पाण्याच्या धरणाजवळ अब्राहामची होडी लागली होती तें न्युसालेम गांव समूळ नाहींसें होऊन तेथें होतें कीं नव्हतें याची ही भ्रांति पडूं लागण्याजोगी स्थिति झाली होती.

वरील छोट्याशा दुकानाचें काम अब्राहामकडे होतें आणि त्या कामांत व दुसऱ्या कोणांचीं जीं जीं कामें त्यानें पत्करिलीं तीं

तीं सर्व त्यानें फारच दक्षतेनें तडीस नेलीं. प्रामाणिकपणा, सभ्यपणा, गिऱ्हाईकांचें मन आपलेकडे वळेल अशी योजना करणें, चित्ताकर्षकपणा, धैर्य आणि चंचळपणा हे गूण त्याच्यांत चांगलेच व्यक्त होत होते. एके दिवशीं असें घडलें कीं एका गिऱ्हाइकाकडून कांहीं सेंट्स वाजवी किंमतीपेक्षां जास्त घेण्यांत आल्यामुळें बरीच रात्र होई पावेतों त्यानें हिशेब तपासून शिल्लक मोजली व त्याची खात्री झाली तेव्हां रात्रीं तसाच तो त्या गिऱ्हाइकाचे घरीं गेला व जास्त घेतलेले पैसे त्यानें परत केले. त्याचप्रमाणें वजनांत कांहीं फेरफार झाल्यामुळें एका स्त्रीस चहाची भुकटी वाजवी देणें त्यापेक्षां कमी दिली गेली होती, हें जेव्हां मागाहून त्याचे ध्यानांत आलें तेव्हां लागलींच कमी दिली गेली तेवढी चहाची भुकटी घेऊन जाऊन त्यानें त्या स्त्रीस दिली.त्या स्त्रीस खरोखरच यांपैकीं कांहींच माहिती नव्हती व हा प्रामाणिकपणा पाहून तिला फारच कौतुक वाटलें. अब्राहामबद्दल अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत तीं सर्व येथें दिलीं असतां ग्रंथविस्तार होईल. उघडीं पडलेलीं व अगदीं निराश्रित कुटुंबें वांचविल्यानें, तरुण स्त्रियांच्या विटंबना दूर करून त्यांची अब्रू रक्षण केल्यानें, लहान लहान सर्व अर्भकांस जुलमांतून सोडविल्यानें अब्राहाम लिंकन हा झपाट्यानें कसा उदयास आला त्याचें तपसीलवार वर्णन करण्यास खरोखरच येथें जागा पुरणार नाहीं. तो राहत असलेल्या त्या जंगली लोकांच्या समूहांत निरा-

श्रितांचे हक्क अतिशय तुडविले जात असून त्यांचा कोणी वाली नव्हता. तेथील लोक त्यावेळीं सुद्धां लट्ठभारथी* व अगडबंब होते.

अब्राहामलिंकन हा शरिरानें कांहींसा स्थूल होता. न्यूसालेम पासून थोड्या अंतरावर 'क्लेरीग्रोव्ह' नांवाचीं कांहीं शेतें एकत्र मिळून एक मोठा जमाव होता; तेथील मुलें रानवट, धांदलीं, मोठमोठ्या गोष्टी सांगण्याचा तोरा मिरविणारीं, आणि दांडगाई करणारीं अशीं होतीं. ऑफटच्या दुकानांत अब्राहाम यास त्या मुलांनीं पाहिलें व ते आपसांत ह्मणाले कीं "हा तरुण स्त्रियांचा मोठा आवडता दिसतो." अब्राहाम कुस्त्या खेळण्यांत मोठा प्रविण असून त्याची सर्वत्र ख्याति होती. जॅकआर्मस्ट्रॉंग नांवाचा एक लट्ठभारथी त्या मुलांच्या टोळीचा पुढारी होता. या पुढाऱ्यास मुलांनीं कळविलें कीं 'अबे याच्याशीं कुस्ती खेळून त्याला चीत करावें' नंतर परस्परांच्या कुस्त्या होण्यास प्रारंभ झाला, तेव्हां लोकांचा मोठा समुदाय ही गम्मत पाहण्यास तेथें जमला व लोकांची खात्री झाली कीं अब्राहाम हा जॅकशीं टक्कर देण्यास योग्य आहे. कांहीं वेळानें जॅक थकत चालला व हळूं हळूं अब्राहामानें त्याला खालीं पाडून चीत केलें. आपण चीत झालों असें पाहून जॅक यानें पुनःउलट घेतली, परंतु अब्राहामानें हा त्याचा नीचपणा पाहून त्याचा गळा घट्ट धरिला व दोनी पाय धरून त्याला एकाद्या चेंडूप्रमाणें

* (अशिक्षित.)

वर फेंकला व पुनः त्याला एखाद्या लहान मुलाप्रमाणें हातांत धरिला त्या वेळीं त्याचें पाय अब्राहामाच्या डोक्यावर लोंबकळूं लागले. कुस्त्या संपल्यावर जॅक यानें अब्राहामाच्या हाताशीं हात मिळविला व आपल्या मंडळीस मोठ्या आनंदानें कळविलें कीं ' मुलांनो अबे हा कुस्त्या खेळण्यांत मोठा प्रविण आहे तर आपण त्याला आजपासून आपल्या मंडळींत सामील करूं या ' या पुढें ते दोघे जिवलग मित्र झाले व त्यांना एकमेकास एकमेकांवांचून अगदीं चैन पडेनासें झालें.

ह्या सर्वबाबती वरून अब्राहाम यास कुस्त्या खेळणें अगर तंटेबखेडे करणें फार प्रिय होतें असें कोणी मुळींच समजूं नये; तो खरोखरच मोठ्या शांत प्रकृतीचा मनुष्य होता. जॅक यानें कुस्ती खेळतांना त्याला चिडविलें ह्मणून अब्राहाम यांजकडून तसें क्रूर बर्तन झालें. जॅक यास या बद्दल कांहींच वाटलें नसून त्या ऐवजीं त्यांचे परस्परांत अतिसख्यत्व वाढलें. वास्तविक पाहतां अब्राहाम हा कांहीं मोठा योद्धा नव्हता. तो शूर असून कोणालांच भीत नव्हता. तंबाखू ओढणें, धर्माची निंदा करणें, अथवा कोणतेही दुराचरण करणें, जुगार खेळणें यापैकी कोणताच छंद त्याला नव्हता. त्याची गणना शूर पुरुषांत होत असून त्या काळचे मोठ मोठे लोक त्याला पूज्य मानीत असत. त्याच्यावर स्त्रियांचें निष्कपट व खरें प्रेम होतें व त्याची वडील मंडळी त्यास चांगला

सन्मान देत असून त्यांना वाटे कीं अज्ञानतिमिराचा नाश करण्यासाठीं हा मूर्तिमंत भानूच उदयास आला आहे कीं काय ! + प्रामाणिकपणाचा त्याला हुद्दा मिळाला असून सर्व लोक त्याला अखेर पावेतों ' प्रामाणिक अबे ' अशाच नांवानें बोलावीत असत.

कांहीं दिवसा नंतर सर्वानुमतें ' अबे लिंकन ' यास लोकांचे किरकोळ तंटे मिटविण्यास पंच नेमण्यांत आलें होतें, आणि त्या प्रमाणें त्यानें पुष्कळांचीं भांडणें मिटवून समेट करवून दिला. घरांतल्या कटकटी त्याला अगदीं आवडत नसून लोकांच्या कटकटी तो मिटवीत असे. कोणीही त्याचेकडे सल्ला मसलत विचारण्यास आला तर तो त्याला प्रामाणिकपणानें व निष्पक्षपातानें सल्ला देत असे. ऑफटच्या दुकानासभोंवतीं एकादे वेळीं लोक जमून मोठा तंटा चालला कीं, अबे हा मोठ्या वीरश्रीनें तेथें जाऊन अचाट बुद्धि चालवून तंट्याचा समूळ नाश करीत असे. एक पळ सुद्धां तो फुकट घालवीत नव्हता, आणि अभ्यास, वाचन, हा त्याचा अव्याहत क्रम चालूच होता. जॉर्जडीप्रेंटिस नांवाचा एक ग्रंथप्रकाशक ' लुइविली करिअर ' नांवाचें वर्तमानपत्र प्रसिद्ध

---

+ ॥ शर्वरी दीपकश्चन्द्रः प्रभाते दीपको रविः ॥
त्रैलोक्ये दीपको धर्मः सुपुत्रः कुल दीपकः ॥ १ ॥

या कवि उक्तीला अनुसरून " अबे हा कुलदीपकनिघाल्या मुळे सर्व वडील माणसें " आपण मोठे धन्य अहोत " असें ह्मणत असत.

करित असे, त्याचा अबे हा एक वर्गणीदार असून हें वर्तमानपत्र ह्मणजे त्याची एक मोठी करमणूकच होती. त्यांतील प्रत्येक शब्द तो लक्षपूर्वक वाचीत असून कांहीं कांहीं चांगलीं वाक्यें तोंडपाठ करीत असे. त्यांतील वाक्यरचना, भाषाशैली व लेख कोणत्या धोरणावर लिहिले आहेत हें तो फारच बारीक रितीनें पाहत असे. ' किरखाम कृत व्याकरण ' त्यानें चांगलें पाठ केलें होतें व त्याचा दृढाभ्यास करून कांहीं दिवसांनंतर ज्याचे कडून तें पुस्तक आणिलें होतें, तें त्याचे त्यास काळजी पूर्वक परत करून त्याचे त्यानें मोठे आभार मानिले.

---



# प्रकरण ५ वें.

## वक्तृत्व आणि राजकार्यांत प्रवेश.



अद्याप पावेतों अब्राहाम याचा कोणत्याच कचेरींत प्रवेश झालेला नव्हता; मात्र ज्या कचेरींत हरहमेश कारकुनाची निवडणूक करण्याचें काम चालत असें तेथें त्याचें जाणें येणें असे. कोणत्या एखाद्या कचेरींत कारकुनाची जागा मिळण्याविषयीं त्याला मुळींच तृष्णा नव्हती; इ० स० १८३२ च्या वसंतऋतूंत तो अगदीं रिकामा झाला. ऑफट याचें छोटेंसें दुकान अगदींच खालावलें होतें. राजकार्यांत प्रवेश करण्यास हल्लीं अब्राहाम यास मोकळीक असून ही संधिही त्यास चांगली अनुकूल होती. तो जंगलांत लहानाचा मोठा झाला असून हळू हळू त्याला मनुष्यजातीची चांगली परिक्षा होऊं लागली होती; त्याच्या सारखा मनन व वाचनाचा अभ्यास करणारा पुरुष सांपडणें कठीण होतें. समयस्फूर्तीनें भाषण करण्याची त्याला चांगली संवय झाली होती. तो उत्तम गोष्टी सांगणारा असून, सावध, तीक्ष्णबुद्धीचा, समयोचित दंतकथा आणि दृष्टान्त सांगणारा होता. मानवी स्वभावाचा त्यानें इतका दृढाभ्यास केला होता कीं, प्रत्येक मनुष्याच्या स्वभावाशीं

त्याचा स्वभाव मिळत असे आणि त्यामुळें सभेंत भाषण करीत असतांना सभाजनांचीं मनें तो अगदीं तल्लीन करून सोडीत असे. एखाद्या लोहाराच्या दुकानासभोंवतीं रिकामटेंकड्या लोकांचा जमाव असो अथवा चवाठ्यावरील अगर शेतांतील मजूर लोकांचा थवा असो, अब्राहाम हा अंतःस्थिति सुधारण्याविषयीं भाषण करणार आहे एवढें समजलें मात्र पाहिजे, कीं लागलींच सर्व लोक त्याचे सभोंवतीं जमत असत व तो अस्खलित व हृदयद्रावक भाषण करीत असे. त्याचा स्वभाव फार मनमिळाऊ होता, व दुसऱ्यास साहाय्य करण्याचे कामीं तो नेहमीं तत्पर असल्यानें त्याचें सर्वांशीं उत्तम सख्य जुळलें होतें.

ह्या सुमारास अब्राहाम यास एक इतिहासवेत्ता भेटला होता. त्यानें अब्राहामासंबंधी एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं ' एका झोंपाळ्यावर अंथरूण टाकून त्यावर पडून तो एक सारखें लक्षपूर्वक पुस्तक वाचीत असे आणि त्यावेळीं पायानें झोंका घेत असे. त्याला फुरसुद पुष्कळ मिळत असून श्रमलेल्या माणसास तो हात लावूं लागत असे, परंतु त्यानें आपलें पुस्तक कधींही सोडिलें नाहीं. कोठंही गेला तरी पुस्तक आपलें हातांत असावयाचेंच. एखादे वेळीं कांहीं काम नसलें म्हणजे तो झाडाच्या छायेखालीं इकडून तिकडे फिरत असून एकसारखें वाचन चालवीत असे. एके दिवशीं कायद्याचीं दोन जुनीं पुस्तकें त्याला सांपडलीं; पुस्तकें दृष्टीस पड-

तांच तीं घेऊन त्यांतील बहुतेक भाग त्यावेळच्या तरुण मंडळीस लक्षपूर्वक वाचून दाखविला. अशा वाचनाच्या सतत अभ्यासानें त्यानें पुष्कळ उपयुक्त ज्ञान संपादन केलें. माहिती गोळा करण्याचें त्याला जणूं काय एक व्यसनच लागलें होतें. एखादें नवीन पुस्तक आल्याचें त्यानें ऐकिलें पुरे कीं, लागलेंच तें हातांत पडल्याखेरीज त्याला चैनच पडत नसे. हरएक प्रकारच्या वस्तुची माहिती मिळविण्याचे कामीं त्याला कितीही चालावें लागलें अगर कितीही त्रास पडला तरी त्याबद्दल त्याला कांहींच वाटत नसे. ज्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं त्याच्या वाचनाचा अभ्यास पाहिला होता ते त्याची मोठ्या विद्वानांत गणना करीत असत. ' माझ्या सारखा व्युत्पन्न कोणी नाहीं ' असा त्याला मुळींच गर्व नव्हता.

कायदे करणाऱ्या मंडळींत प्रतिनिधि निवडिले जातात, आणि आपणास प्रतिनिधि नेमावें अशाबद्दल मत जाहीर करण्यास अब्राहाम यानें आपल्या स्नेही मंडळीस व गांवकरी लोकांस विनंति केली. अब्राहाम हा हेनरीक्ले याचा अनुयायी होता आणि राजनीति जाणण्याचे कामीं हा व्हिग पक्षाचा आहे असें निर्णयात्मक ठरून चुकलें होतें. त्याचें शूरत्व आणि प्रशंसनीय गुण ह्यांची ज्यांना संपूर्ण माहिती होती व ज्यांचें त्याच्यावर अढळ प्रेम होतें ते लोक त्याच्या लाभांत अभिप्राय देतील अशी त्याची खात्री होती; तथापि द्वेषी इंदियनांचा मोड करण्यासाठीं, निवडणूक होण्यापूर्वी

आपण होऊन खुषीनें नोकरी करणारांस निमंत्रणें झालीं होतीं. ब्लॅकहॉक नांवाचा प्रसिद्ध व प्रमुख योद्धा लढाईच्या तयारीस लागला होता. तो सॅक्स नांवाच्या लोकांचा सर्वमान्य पुढारी असून, इलिनाईसमध्यें मिसिसिपीच्या पूर्व किनाऱ्यावरील रहिवाशांस गेल्या वर्षीं त्यानें अति त्रास दिला होता; नंतर परस्परांत तहनामा झाला त्या आधारानें पूर्व किनाऱ्याकडील सर्व हक्क सोडून ही टोळी मिसिसिपीच्या पश्चिम किनाऱ्याकडे जाऊन राहिली होती, परंतु "गोऱ्या लोकांनीं आमचें मोठें नुकसान केलें" असें प्रतिपादन करून या टोळीनें पूर्व किनाऱ्याकडील शेतांत धान्य लावण्याचा हक्क असल्याबद्दल आग्रह धरिला. पूर्व किनाऱ्याकडील वसाहत करणारांनीं या टोळींतील लोकांशीं निर्लज्जपणाचें वर्तन केलें ही गोष्ट सिद्ध आहे, आणि क्षुल्लक चिडवणूकीवरून व गोऱ्या मनुष्याच्या दीर्घ द्वेषामुळें त्यांना मोठा वाईट परिणाम भोगावा लागला. इ. स. १८३२ च्या मे महिन्यांत या टोळींतील प्रत्येक मनुष्य अगदीं त्रस्त होऊन त्यापैकीं ४० वीरांनीं सर्वानुमतें ब्लॅकहॉक यास पुढारी नेमून संस्थानाच्या उत्तर भागांत रॉकी नदीच्या मुखाजवळ मिसिसिपी ओलांडून वरल्या भागाकडे हळू हळू रस्ता काढला. संस्थानाचे मुख्य अधिकारी बडे साहेब होते, त्यांनीं स्वेच्छेनें लढणाऱ्या दोन हजार वीरांस पाचारण केलें. सर्व देश भयानें ग्रस्त झाला होता.

जे वीर स्वेच्छेनें लढण्यास प्रथम हाजर झाले त्यांत अब्राहाम हा होता. जोखीम अंगावर घेण्याची त्याला मोठी हौस म्हणून, किंवा या लढाईंत नोकरी बजाविल्यानें कांहीं विशेष शोध लागेल या हेतूनें तो गेला असावा असें वाटतें. सँगामन येथील लोकांच्या मंडळींत क्लेरीग्रोव्हची पुष्कळ होतकरु मंडळी होती आणि या मंडळीचा अब्राहाम यानें प्रमुखपणा पत्करून उत्तर दिशेकडे रस्ता काढला; या ठिकाणीं संयुक्त संस्थानाचा हुकूमतदार व सेनापति अटकिन्सन यानें तळ दिला होता; शूलर परगण्यांतल्या रूशविली येथें या मंडळीनें आपल्यांत कामगार वगैरे नेमून सर्व व्यवस्था केली आणि अब्राहाम यांस पसंत करून कप्तान नेमिलें. न्यूसालेम देशांतला किर्कपॅट्रिक नांवाचा एक मोठा व्यापारी युद्धांत विजयी होउन मानसन्मान घेण्यास फार उत्सुक झाला होता. या किर्कपेट्रिकनें कांहीं दिवसांपूर्वी अब्राहामाशीं उद्धटपणाचें वर्तन केलें होतें ह्मणून त्यांचीं मनें शुद्ध नव्हतीं. क्लेरीग्रोव्ह येथील मंडळीनें असा आग्रह धरिला कीं, युद्धास जाण्यासाठीं अब्राहाम यानेंच त्यांचा पुढारीपणा पत्करिला पाहिजे; नंतर सर्वानुमतें असें ठरलें कीं, अब्राहाम यानें पुढारी व्हावें असें ज्यास मंजूर असेल त्यानें त्याचे जवळ रांगेनें उभें राहावें; आणि किर्कपेट्रीक यानें पुढारी व्हावें असें ज्याला मंजूर असेल त्यानें त्याचे रांगेस उभें राहावें. याचा परिणाम असा झाला कीं, अब्राहाम याचे जवळील रांग किर्कपॅट्रीकच्या रांगेपेक्षां तिपटीनें मोठी दिसली, ह्मणून सर्वानुमतें अब्राहाम

यास पसंत करून प्रमुख नेमिलें. ह्या सन्मानामुळें त्याला मोठा आनंद झाला आणि पुढें जेव्हां तो अध्यक्ष झाला तेव्हां त्यानें असे उद्गार काढले कीं, "युद्धाचे कामीं प्रमुखत्व मजकडे आल्यानें जें मला पूर्ण समाधान वाटलें तसें कधींही वाटलें नाहीं. " रॉक-नदी नजीक डिक्सनफेरी येथें सैन्याचा नायब मदतनीस व पाहाणी कामदार रॉबर्ट अंडरसन यानें संयुक्त संस्थानांत नोकरी करण्यासाठीं अब्राहाम याचे सर्व लोक घेतले. संयुक्त संस्थानाच्या सैन्याचे कर्नल, झॅचरीटेलर यास या लहानशा फौजेनें सर्व हकीकत जाहीर केली. कांहीं वर्षांनंतर जेव्हां बंडाची प्रथम तोफ सोडण्यांत आली तेव्हां समर किल्ल्यावर रॉबर्ट अंडरसन याची हुकमत होती. जनरल टेलर यानें लोकप्रीति चांगली संपादन केली, आणि इ. स. १८४८ मध्यें तो इलाख्याचा प्रमुख झाला. ब्लॅकहॉक याच्याशीं चालू असलेली लढाई लौकरच आटोपली व त्यांत चांगलें यश मिळालें.

अब्राहाम याचे संबंधीं दोन मुख्य गोष्टी इतिहासांत वर्णन केल्या आहेत. एके दिवशीं एक बुभुक्षित इंदियन जनरल कॅस पासून चांगल्या वर्तणूकीचा दाखला घेऊन एकटाच छावणींत शिरला. छावणींतले शिपाई ब्लॅकहॉकच्या लोकांनीं नुकताच त्रास दिल्यामुळें अतिशय खवळले असल्यामुळें त्या इंदियनाच्या अंगावर एकदम तुटून पडले आणि त्याला ठार मारिलेंही असतें, इत-

क्यांत अब्राहाम हा गोंधळ पाहून एकदम आवेशानें त्या गर्दीत शिरला व शिपायांच्या बंदुकी आपल्या हातानें फेंकून देऊन मोठ्यानें ओरडून ह्मणाला "मुलांनो! हें दुष्टकृत्य तुह्मीं करूं नका आणि या इंदियनावर गोळी घालूं नका." कांहीं वेळ अब्राहाम हा त्या इंदियनाच्या आणि हल्ला करणाऱ्यांच्या मध्यें अगदीं बेपर्वाईनें उभा राहिला असून कदाचित् या तडाक्यांत अब्राहाम व इंदियन असे उभयतांही भूमीवर पडतील कीं काय ही मोठी शंका होती; परंतु आपल्या कप्तानाचें प्रचंड शोर्य पाहून बंदुकी खालीं करून शिपाई अगदी विषण्ण होऊन चालते झाले बिलग्रीन नांवाच्या अब्राहाम याच्या एका विश्वासूक स्नेह्यानें त्याचेबद्दल एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, "अब्राहाम यास या वेळीं इतका आवेश चढलेला मी कधींही पाहिला नाहीं."

अब्राहाम जेव्हां व्हाइटहौसमध्यें होता तेव्हां त्यानें एक गोष्ट सांगितली कीं, 'या लढाईत एके दिवशीं प्रातःकाळीं मी भयंकर रक्तपात पाहिला तसा कधींही पाहिला नाहीं. रॉक नदी नजीकच्या एका दरींतून मी एके दिवशीं अगदीं पाहटेस सैन्याच्या सामुग्रीची तजवीज करण्यास चाललों होतों. या सैन्यावर शत्रूचा हल्ला येण्याची मोठी भीति होती. सामुग्रीची तजवीज लावून सैन्यासुद्धां मी चाललों होतों तों शत्रूचा तंबू आढळला; तेथील लोक रात्रीं पहारा ठेविण्याचें विसरून जाऊन स्वस्थ निद्रावश झाले होते. या

निद्रावश झालेल्या लोकांची कत्तल उडाली आणि भयंकर रक्तपात पाहण्यांत आला. प्रातःकाळच्या बालरवीचें तेजही लाल आणि त्यांत हा भयंकर रक्तपात, त्यामुळें सर्वत्र लालभडक देखावा दिसत होता." अब्राहाम यानें युद्धाचा प्रसंग हा प्रथमच पाहिला आणि कांहीं वर्षांनंतर त्याला या भयंकर रक्तपाताचें स्मरण झालें ह्मणजे त्याचें अंगावर रोमांच उभे राहत असत.

**जॉन डिक्सन** हा तत्वज्ञानी असून फौजेचा मार्गदर्शक आणि मोठा हितचिंतक होता; **गॅलेना** पासून संस्थानच्या खालच्या भागांत रॉकनदी ओलांडल्यावर जो एक गाडा जाण्यायेण्याचा रस्ता होता तेथें त्यानें एक होडी ठेविली होती. इंदियन लोकांत **डिक्सन** हा 'नाचुसा' ('रुपेरी केंसाचा') या नावानें प्रसिद्ध होता. ह्या इतिहास प्रसिद्ध स्थळीं लेफटेनन्ट कर्नल **झॅचेरीटेलर, ले. डेविस, ले. रॉबर्ट अंडरसन**, आणि अब्राहामलिंकन ही सर्व मंडळी एकत्र जमली होती व तेथेंच '**ली**' परगण्यांत हल्लीं डिक्सन शहर वसलें आहे. त्यावेळीं तें एक लहानसें खेडें असून त्यांतील घरेंही लांकडाच्या तुकड्याचीं होतीं. डीक्सन यानें दोरांच्या सहायानें होड्या जाण्या येण्याची सोय केली होती आणि त्यामुळेंच दोन्ही किनाऱ्यावरील दळणवळण चालू होतें. हल्लीं सागवानी लांकडांनीं तो रस्ता बांधून काढला असून त्यावरून गाड्या वगैरे जाण्यायेण्याचा क्रम चालूं आहे. सर्व गुप्त बातमीदारांच्या तुकड्याचा

मुख्य पुढारी अब्राहामलिंकन यास नेमिलें असून तो आपल्या सूक्ष्म दृष्टीनें इंदियन लोकांच्या सर्व गुप्त खाणाखुणा चांगल्या रीतीनें टिपून ठेवीत असे. रात्रीं छावणींत शेकण्यासाठीं विस्तव पेटवीत असत आणि त्या सभोंवतीं स्वेच्छेनें नोकरी करणारे सर्व शिपाई ईकडून तिकडे भटकत असत; शिवाय कप्तान सांगत असलेल्या गोष्टी ऐकण्यांत त्यांचा बराच वेळ जात असे. इसापनीतीच्या, युद्धाच्या, हास्यरसाच्या, विनोदाच्या, साहसकर्माच्या वगैरे अनेक प्रकारच्या गोष्टींचीं पुस्तकें त्यानें कॅंटकी व इंदियाना येथून आणिलेलीं सर्व त्यांना वाचण्यासाठीं दिलीं होतीं. व्हिस्की नांवाच्या दारूकडे पाहून अब्राहाम याच्या तोंडाला कधींच पाणी सुटलें नाहीं असें ह्मणतात. त्याच्या सोबत्यांनीं त्याला दारू पिण्याचा जेव्हां जेव्हां आग्रह करावा त्या त्या वेळीं त्याचा एकच जबाब असे कीं ' मी कधींही दारू पीत नाहीं, मला आग्रह करूं नका व येवढें तुमचें न ऐकण्याबद्दल रागावूं नका." या छोट्याशा लढाईच्या दरम्यान यादींत नांवें नोंधण्याची मुदत संपली आणि कित्येक थकले भागलेले शिपाई आनंदानें घरीं चालते झाले; परंतु अब्राहाम यानें आपलें नांव खानगी नोकरीच्या नात्यानें नोंधविलें; आणि लेफ्टनन्ट अंडरसन यानें दुसऱ्यावेळीं हाजरीपटांत त्याचें नांव वाढविलें. युद्ध बहुतेक संपल्यामुळें अब्राहाम व त्याचा सोबती जॉन डब्लयु हारीसन असे उभयतां न्युसालेम येथें जाण्यास निघाले.

इ. स. १८४८ सालीं अब्राहाम राष्ट्रीय सभेंत असतांना जनरल लेविस कॅस हा इलाख्याच्या निवडणूकींत उमेदवार होता आणि त्यांत तो प्रमुख निवडला जावा म्हणून त्याच्या स्नेह्यांनीं तो फौजेच्या कामीं फार हुशार असल्याबद्दल अतिस्तुति केली. अब्राहाम याचा स्वभाव विनोदी असे आणि त्याला वरील हकिकत गैरशिस्त दिसल्यामुळें त्यानें सभेच्या अध्यक्षाशीं वादविवाद करीत असतांना खालीं लिहिल्याप्रमाणें कळविलें, "अहो सभाध्यक्ष, मी एक लष्करी योद्धा आहे हें तुम्हांला माहित आहे काय? ब्लॅकहॉकची लढाई चालू असतांना मी लढलों, शिरच्छेद केले, आणि यशस्वीही झालों; स्टीलमनच्या अपजयाचे वेळीं मी नव्हतों, परंतु त्या वेळीं मी जसा नजीक होतों तसा जनरल कॅस हा हलच्या आधीन होऊन चुकला होता. त्याच्या प्रमाणें नंतर लवकरच मीं ती जागा पाहिली. येवढें मात्र खास आहे कीं, मीं माझी तलवार मोडिली नाहीं व मोडण्याचा मला प्रसंगही आला नाहीं; परंतु मीं बंदुकीचा नेम मात्र अगदीं ऐन वेळेवर धरिला होता. जनरल कॅस हा बोरें करवंदें वगैरे वेंचीत माझे पुढें गेला असला तर माझाही असा तर्क आहे कीं त्यांचावर नेम धरून मारण्यांत मी त्याला मागें हटविलें. जिवंत इंदियनांस जर त्यानें लढतांना पाहिलें असेल तर त्यापेक्षां मी जास्त पाहिले आहेत; परंतु मीं ज्या छोट्याशा लढायांत होतों त्यांत जसे मच्छरें अगर डांस चिरडून टाकावेत तसे इंदियनांस

चिरडून त्यांच्या रक्तानें भूमिसस्नान घातलें होतें. माझ्या अंगा-तूनही रक्त वाहत असें तरी पण मला मूर्च्छा आली नाहीं, परंतु भूक मात्र अतिशय लागत होती. अहो अध्यक्ष ! मी आतां शे-वटीं इतकेंच सांगून आटपतों कीं माझे स्नेही प्रजापक्षाला अनुकूल आहेत; त्यांना माझेबद्दल कांहींही वाटो; मी समयाला अनुसरून करारानें चालणारा आहे आणि त्यामुळें इलाख्यांत प्रतिनिधि नेम-ण्याची जी निवडणूक होईल त्यांत ते माझेबद्दल अनुकुल मत देतीलच अशी माझी खात्री आहे. मी प्रतिज्ञेनें सांगतों कीं, जनरल कॅस याचा जसा उपहास केला तसा मी रणशूर योद्धा आहे असें लिहून ते माझा उपहास करणार नाहींत."

ब्लॉकहॉकच्या लढाईंतल्या उभयतां रणशूर योध्यांनीं घरची वाट धरली; परंतु वाटेंत त्यांचा घोडा कोणीं चोरून नेल्यानें त्यांना फार त्रास सोसावा लागला. पाळीपाळीनें ते घोड्यावर ब-सून प्रवास करीत होते, व मध्यंतरीं विसाव्यास्तव उतरतही होते; घोडा चोरीस गेल्यामुळें त्यांना आतां आपल्या पायाच्या तंगड्याच घोड्याऐवजीं मानणें भाग होतें, व ते बिचारे कंटाळून तंगड्या तोडीत सॅगॉमन परगण्यांत कसे तरी येऊन पोंहोंचले. आपला योद्धा वादविवाद करणारा असून त्यास कायद्याच्या सभेंत जागा मिळावी अशी मोठी हांव होती; परंतु आतां फक्त दहा दिवसांची मुदत राहिली होती, नंतर त्यांनीं मोठ्या कडा-

कुटीनें एक होडकें विकत घेतलें व त्यांत बसून इलि-
नॉइस येथें मुक्काम करून तेथून ते न्यूसालेम येथें आले.
निवडणूकीची मुदत येऊन ठेपली आणि अब्राहामच्या लाभांत जा-
स्त मतें पडलीं, तरी पण कायद्याचे सभेंत त्याची निवडणूक झा-
ली नाहीं. न्यूसालेम येथें राष्ट्रीय सभेचे सभासद होण्यास उभ-
यतां उमेदवारांचे लाभांत २०६ मतें पडलीं; अब्राहाम याचे ला-
भांत २०७ मतें पडलीं तेवढीं त्याची प्रसिद्धी होण्यास पुरीं होतीं,
आणि त्यामुळें त्याला मोठें समाधान वाटलें. या निवडणूकींत त्या-
ला कांहीं विशेष मोठी आशा नव्हती व त्यामुळें त्याचे मनाचा
हिरमोडही झाला नाहीं. त्या काळांत लोकांच्या संमति मिळविण्या-
स फारसा पैसा खर्च होत नसे आणि पैसा नव्हता म्हणूनच त्या-
स अपयश आलें असें कांहीं नाहीं.

अब्राहाम जीं जाहिर भाषणें करीत असे त्यांत तो त्या
वेळच्या अधिकारी वर्गाच्या विरुद्ध आपलीं मतें निस्पृहपणें प्रति-
पादन करीत असे. पूर्वींच्या जाहिरनाम्यांत त्यानें प्रजापक्ष ( इं०
व्हिग ) स्वीकारला होता असें प्रसिद्ध झालें होतेंच. त्यानें आपल्या
एका भाषणांत असेंही कळविलें कीं, " राष्ट्रीय पेढीच्या ( नॅशन-
ल बँक ) लाभांत मी आहें, अंतःस्थिति सुधारण्याची पद्धत आणि
संरक्षित व्यापार मला पसंत आहेत, हीं राजकीय तत्वें आहेत आ-
णि यासंबंधीं माझे खरे विचार आहेत. " हीं तत्वें आणि हे त्याचे

विचार त्या वेळच्या अधिकारी वर्गाच्या अगदीं विरुद्ध होते. ॲंड्रयु जॅकसन हा संयुक्तसंस्थानाचा ( युनाइस्टेटडस्चा ) अध्यक्ष होता. त्यानें लोककर्तृक राज्यप्रवर्तक मंडळीस असें जाहीर केलें होतें, कीं जो असें म्हणेल कीं " मी जॅकसनी मनुष्य नाहीं " त्याला चाबुकाचा मार देऊन जसें कुत्र्यास घरांतून हांकून लावतात तसें त्या जागेंतून आणि त्या कचेरींतूनही त्यास हांकून लावावें. " ही जाहिरात आबालवृद्धांस घरोघर समजून चुकली होती. ज्यांना कोणत्याही आप्तवर्गाचा आधार नव्हता आणि जे अगदीं गरिब व तरुण असून अगदीं अनभ्यस्त होते, अशा लोकांसाठीं मात्र विशेष श्रम घ्यावे लागले; परंतु अब्राहाम यानें मात्र हा पंथ स्विकारिला. त्याचे अंगीं शोधक शक्ति असल्यामुळें संस्थानांतल्या मोठमोठ्या नामांकित लोकांची आणि त्याची चांगली ओळख झाली. तो जीं भाषणें करीत असे तीं मुद्देसूद असून, मधून मधून भिन्न भिन्न जातीच्या सविस्तर दंतकथा आणि विनोद यांनीं युक्त अशीं असत. त्याचा शहाणपणा आणि त्याची सदसद्विचारशक्ति याबद्दल लोक त्याला चांगला मान देत असत. ज्यांनीं ज्यांनीं त्याचीं भाषणें लक्षपूर्वक ऐकिलीं होतीं त्यांनीं त्यांनीं तो तर्कशास्त्रांत अतिनिपुण असल्याबद्दल फार खात्री केली आहे. एस. टी. लोगन नांवाचा एक न्यायाधीश होता तो अब्राहाम याच्या बाह्यस्वरूपाचें वर्णन करितांना म्हणाला " तो मोठा उंच, अडाणी आणि आबडधोबड बांध्याचा असून, तरुण दिसत होता; त्याच्या विजारीचीं टों-

कें आणि जोडा याचें मध्यें सहा इंच अंतर होतें परंतु जेव्हां त्याचें भाषण होई तेव्हां मात्र माझें मन अगदीं तल्लीन होत असे." अब्राहामचें बाह्य स्वरूप कितीही विलक्षण असलें तरी तो जेव्हां भाषण करण्यास उभा राही तेव्हां मात्र अगदीं शांत व गंभीर दिसत असे.

प्राचीन काळीं देशाच्या सरहद्दीवरील लोकांत पेहेरावाची टापटीप अगदीं नसे. त्यांच्या चालीरीतिही जंगली असून त्यांच्या परस्परांच्या व्यवहारांत सरळपणा व मोकळेपणा विशेष असे. कांपलेल्या मोठ्या झाडांच्या एका खोडावर चढून भाषण करणें त्या काळांत फार सोपें व सोइस्कर वाटत होतें. त्या खोडाच्या सभोंवतीं सभेंत मत देणारे वगैरे लोक जमत असून भाषण मुद्देसूद मोकळ्या मनाचें आणि साधें होत असे. " प्रतिनिधीच्या निवडणूकींत वक्त्यास उमेदवार होण्याविषयीं मतें कां द्यावींत " हाच मुख्य विषय प्रतिपादन होत होता. भाषण अगदीं ऐन रंगांत आलें असलें तरी ( श्रोत्यांस ) कांहीं प्रश्न विचारणें झाल्यास वक्त्याकडून कांहीं एक आडकाठी नसे. जर ते प्रश्न अप्रासंगिक नसले तर त्यांचीं उत्तरें लिंकन मोठ्या शहाणपणानें व अगदीं मुद्देसूद देत असे. एकदां असें घडलें कीं, अब्राहाम याचें हृदयद्रावक भाषण चालू असतांना, लोकांची अतिशय गर्दी त्याचे सभोंवतीं भाषण ऐकण्यास जमली होती; त्या गर्दीत त्याचा

एक स्नेहीही भाषण ऐकण्यास आला असून त्याच्याशीं एका अडदांड मनुष्यानें उद्धटपणाचें वर्तन केलें; व आतां मारामारीचा प्रसंग येणार इतक्यांत अब्राहाम यानें खोडावरून एकदम खालीं उतरून, त्या गर्दीत वेगानें शिरून, त्या आडदांड मनुष्यास एक भली मोठी गचांडी देऊन, सुमारें दहा फुटांचें अंतरावर फेंकून दिलें व नंतर पुन्हा खोडावर शांतपणें जाऊन भाषणास आरंभ केला; तात्पर्य इतकेंच कीं, अब्राहाम याची ज्या मानानें मानसिकशक्ति तीव्र व सदृढ होती त्याच मानानें शारिरिक शक्तिही अतिबळकट असे, आणि वेळोवेळीं तो तिचा चांगला उपयोग करित होता. अशा गुणी मनुष्याचें त्या प्रांतांतील पुष्कळ लोकांशीं उत्तम सख्य असणें हें अगदीं स्वाभाविक होय.

कायदे करणाऱ्या सभेंत प्रवेश होण्याचे संबंधांत अब्राहाम यास अपयश आलें; लष्करांत स्वेच्छेनें नोकरी करण्याचें कामही आटोपलें आणि ज्यानें त्यास अन्नास लाविलें त्यानें आपल्या कांखा वर केल्या; अशा सर्व प्रतिकूल स्थितींत अब्राहाम यास चरितार्थाचें साधन हुडकणें भाग पडलें. परंतु आतां त्याला उदर निर्वाहाचें कोणतेंच साधन नव्हतें. राजकारभारांत आणि लढाईचे कामांत आज बरेच दिवस तो मग्न असल्यामुळें दररोजची मजुरी करण्यासही अगदीं निरुपायोगी झाला होता. त्या भागांत जिकडे तिकडे पैशाची ओरड होती. हिशेबी कारभारांत केवळ कागदी घोडे

नाचविण्यापलीकडे कांहींएक तत्वमसि प्रकार कोठेंच दिसत नव्हता; पैसे देण्याबद्दल एकानें चिठ्ठी दुसऱ्यास लिहावी व दुसऱ्यानें तिसऱ्यास लिहावी, याप्रमाणें व्यवहार चालला असून वास्तविक पाहतां चिठ्ठींत लिहिल्याप्रमाणें मुदतींत पैसा मिळेल कीं नाहीं याची कोणासच खात्री नव्हती. हेरंडन नांवाच्या उभयतां बंधूची देशी वस्तूंची एक वखार होती. त्या पैकीं एका बंधूचे हिश्शांत अब्राहाम यानें आपला अर्धा भाग ठेविला. कोणत्याही रीतीनें त्याच्या मनाची ओढ हल्लीं व्यापाराकडे होती, परंतु गिऱ्हाइकांची फारशी गर्दी होत नसे, त्यामुळें त्याला अभ्यासाला चांगला वेळ मिळूं लागला; त्याच वखारीचे शेजारीं रेडफर्ड नांवाच्या व्यापाऱ्याची वखार होती आणि त्यापासून क्लेरीग्रोव्हच्या मुलांस फार त्रास होत असे, परंतु हा त्रास कां होत असे, त्याचें कारण कोणास माहीत नव्हतें. या मुलांनीं त्या वखारीच्या खिडक्या मोडून टाकाव्यात आणि इमारतीच्या सभोंवतीं नेहमीं टेहळत राहावें असा क्रम चालू ठेविला. रेडफर्ड हा या मुलांना अगदीं कंटाळला आणि अगदीं नाइलाज होऊन त्यानें जागा बदलली; व शेवटीं रस्त्यानें जाणाऱ्या एका अपरिचित ग्रीने नांवाच्या इसमास दोनशें डालरास ती वखार विकली. हे दोनशें डालर रोकड मिळाले नसून त्या बद्दल ग्रीनेनें तूर्त एक दस्ताऐवज करून दिला. या मोडक्या इमारतींतल्या वस्तूंची यादी करण्याचें काम अब्राहामाकडे आलें आणि आंतील वस्तू पाहून त्याचे तोंडास पाणी सुटलें व दैवावर भरंवसा ठेवून २५०

डालरास त्या सर्व वस्तु विकत घेण्याचें त्यानें ठरविलें. ग्रीने यानें मोठ्या आनंदानें वरील करार कबूल केला; कारण त्याला यांत ५० डॉलरचा नफा होता. अब्राहाम याचे जवळ रोख पैसे नसल्यानें हा सर्व व्यवहार कागदावरच झाला.

त्यानें हें जें धाडस केलें त्यांत त्यानें एक भागीदार ठेविला होता. हे भागीदार गृहस्थ निवळ आळशी चैनी व खुशालचेंडू होते. भागीदाराच्या अशा दुर्वतनामुळें अब्राहाम यानें एकदम त्याचा भाग काढून टाकिला. या व्यापारांत आपल्यास चांगला नफा होईल अशी कल्पना करून तो मनांत मांडे खात होता; परंतु लौकरच यांत त्याला धक्का बसला व त्याचें आशारूपी बळकट किल्ले सर्व एकदम ढांसळून पडले. शेवटीं त्यानें जसजसे गिऱ्हाईक येतील व जसें ज्यांना रुचेल तसें ( सट्यानें अगर फुटकळ ) भावांत कमीज्यास्ती करून सर्व माल विकून टाकिला; व सर्व पसारा आंवरून दुकान बंद केलें. अब्राहाम यास आतां धंदा रोजगार न राहिल्यामुळें पुन्हां तो रिकामा झाला आणि सट्याचे व्यापारांत त्याचें मोठें नुकसान झाल्यामुळें तो कर्जबाजारी होऊन बसला; अशा संकटांत त्यानें उद्गार काढिले कीं, " वखारीनें डोळे झांकले व पुढें आतां कोणतें साधन पहावें, काय करावें हें कांहींएक त्याला सुचेनासें झालें; त्यानें आजपावेतों जीं कायद्याचीं पुस्तकें वाचलीं होतीं तीं उडाणटप्पूप्रमाणें वरवर आणि कोणाची मदत न घेतां

वाचीली होतीं. हल्लीं त्यानें तेथील एका चांगल्या व सुशील वकीलाकडून कायद्यांचीं पुस्तकें वाचण्यासाठीं मागून आणून फार बारीक रितीनें व उत्साहानें वाचण्याचा निश्चय केला आणि त्याप्रमाणें वकील लोकांकडून त्याला पुस्तकेंही मिळालीं. या विषयाची माहिती गोळा करण्यासाठीं त्याला कधीं कधीं न्यूसालेमपासून स्प्रिंगफिल्ड पावेतों १४ मैल चालावें लागत असे.

अब्राहाम यानें कायद्याचें ( नियम व नमुन्यांचें ) एक पुस्तक खरेदी केलें आणि त्यांतून काल्पनिक दस्ताऐवज, मृत्युपत्रें आणि मोठमोठाल्या मिळकती नमूद करून त्यांचीं अर्पणपत्रें, कल्पनेनें लिहून तो आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्या बरोबर करमणूक करित असे. कोणाला कांहीं कायदेशीर सल्लामसलत विचारणें झालें अगर गहाण किंवा खरेदीखतें वगैरे करणें झालें तर पुष्कळ लोक त्याचेकडे येत असत आणि या प्रमाणें त्यानें आपल्या धंद्याला कांहींसें बरें स्वरूप आणिलें. ज्याचें घरीं त्यानें आपलें खाणें, पिणें, निजणें, बसणें वगैरे ठेविलें होतें, त्याला जो दरमहा द्यावा लागत असे त्या मानानेंच अवश्य तेवढी त्यानें आपली फी ( दस्तुरी ) लोकांकडून घेण्याचा क्रम ठेविला होता; त्यामुळें गोरगरीबांस त्याचेकडे जाण्यास जड जात नसे. वक्तृत्व व स्वतःच्या ज्ञानाचा अनुभव वाढविण्यास्तव तो जस्टीस ऑफ धी पीस ( न्यायमूर्ति ) पुढें

लोकांचीं लहान लहान कामें चालविण्यास घेत असे. जन्मास येऊन कांहींतरी विशेष करावें व आयुष्याचा क्रम सुधारावा हें मनांत पक्कें बिंबवून तो कोणत्या रस्त्यानें जावें हें हळू हळू नित्य शोधीत असे. न्याय आणि खरेपणा ज्यांत मुळींच नाहीं अशा कच्चा पायाचीं कामें तो कधींच हातांत घेत नसे, आणि ज्यूरीशीं ( पंचांशीं ) वादविवाद करितांना तो सर्व प्रामाणिक-पणानें सांगत आहे असाच ज्यूरीचा नेहमीं समजत होत होता; त्याची अब्रू वाढत चालली व मोठमोठालीं जबाबदारीचीं कामें करण्यांत तो चांगला तयार होत चालला. मसलतीच्या कामीं, मोठमोठाले तंटे मिटविण्याचे कामीं, त्याचें नांव "लोकामित्र" असें पडलें होतें. ह्या सुमारास ह्मणजे इ. स. १८३३ सालीं मोजणी करण्याचें काम शिकण्याचें त्यानें ठरविलें; आणि इतर बाबतींत जसा तो चांगला निवडला तसाच तो लौकरच एक उत्तम व हुषार मोजणीदार बनला. या कामास लागणारीं त्याचीं हत्यारें मोठीं व साधीं होतीं. त्याचे समकालीन लोक सांगत कीं, त्याची पहिली सांखळी ह्मणजे द्राक्षाचा वेल होता; परंतु त्यानें ज्या जमिनी मापल्या व जे नकाशे तयार केले त्यावरून त्यानें काम किती काळजीनें व लक्षपूर्वक आणि नीटनेटकें केलें होतें त्याची अद्याप पावेतों साक्ष कोणासही पटण्यासारखी आहे. त्यावेळीं जॉनकॉलहोन नांवाचा एक मोजणीदार होता, तो अब्राहाम याचा स्नेही असून त्याच्या फार उपयोगी पडत असे. अब्राहाम हा कॉलहोनचा

मदतनीस ( असिस्टंट ) झाला. आणि प्रसंगोपात् तो स्वतंत्रपणें आपले जबाबदारीवर मोजणीचें काम करीत असे.

इ. स. १८३३ च्या मे महिन्यांत ऍंड्यूजॅकसन अध्यक्ष असतांना अब्राहाम यास न्यूसालेममध्यें पोष्टमास्तरची जागा मिळाली. हें पोस्टऑफीस लहान असून राजकीय पत्रव्यवहारही तेथें फारसा होत नसे, व उत्पन्नाचें मानही बेताचेंच होतें. शेजारच्या सर्व लोकांची त्याचेवर चांगली प्रीति असल्यामुळें व त्याच्यासारखा दुसरा योग्य मनुष्य नसल्यामुळें त्यालाच ही जागा मिळाली होती. दररोजचा पत्रव्यवहार अगदीं कमी असल्यामुळें, सर्वत्रांची इच्छा यालाच पोष्टमास्तर नेमावें अशी होती, व त्याला कामाकाजाची चांगली माहिती असल्यामुळें, दंतकथा अशी सांगतात कीं, तो दररोजची टपाल आपल्या टोपींतच ठेवीत असे. तो कांहीं नेहमीं घरीं राहत नसे. रस्त्यानें हिंडतांना कोणी विचारिलें कीं 'कांहो माझें पत्र आहे कां?' तेव्हां अब्राहाम यानें लागलीच आपली टोपी काढून त्यांत धुंडाळून त्याला उत्तर द्यावें असा क्रम चालला होता. प्रत्येक आठवड्यांत न्यूसालेम येथें वर्तमानपत्रें येत असत, तीं तो आधीं वाचून नंतर ज्याचीं त्यांस देत असे. त्यामुळें त्याचा वाचनक्रम फार वाढला व तो पैशापेक्षां या वाचनाच्या लाभाची किंमत जास्त समजत असे. कालेंकरून न्यूसालेम येथील लोकवस्ती कमी झाली व सर्व लोक दुसऱ्या भागांत राहण्यास गेल्यानें

तेथील पोष्टऑफीस बंद पडलें. पुढें बऱ्याच दिवसांनीं पोष्टखात्याच्या अधिकाऱ्यानें त्या पोष्टऑफिसाकडे कांहीं क्षुल्लक रकमेची सरकारी बाकी काढून रकम पाठविण्याबद्दल मागणी केली. ही रक्कम अगदीं क्षुल्लक म्हणजे १७ डालर व कांहीं सेंट्स् होते. डॉ. ए. जी. हेनरी हा अब्राहाम याचा शेजारी व स्नेही होता. त्यानें जेव्हां पाहिलें कीं अब्राहाम याच्या अशा गरीब स्थितींत सरकाराची बाकी भरण्याचें त्याला सामर्थ्य नाहीं, तेव्हां त्यानें त्याला तेवढी रकम उसनी देण्याचें कबूल केलें. स्नेह्यास विपन्नावस्थेंत मदत करणें हें प्रत्येकाचें कर्तव्यकर्म होय असें डॉ. हेनरी पूर्णपणें समजत होता. " एक पळभर थांबा, मजजवळ किती पैसे निघतात हें पाहूं या." असें अब्राहाम योनें कळविलें; आणि आपल्या निजण्याच्या खोलींत जाऊन एक जुना पायमोजा आणिला आणि त्यांतून जें कांहीं किरकोळ नाणें होतें तें सर्व मेजावर टांकलें, आणि मोजिलें तों सरकारच्या बाकी इतकी रकम निघाली. अनेक वेळां अब्राहाम याजवर मोठमोठीं संकटें आलीं; कधींकधीं तर त्याला पैशाची इतकी जरूर पडे कीं, सरकारी शिलकेंतून थोडे तरी पैसे घेतल्यावांचून गत्यंतरच नसे, परंतु अशा आणीबाणीच्या वेळीं सुद्धां त्यानें सरकारी शिल्लक न वापरतां जपून ठेविली होती ती आज त्याचे संकटकाळीं उपयोगीं पडली.

वखार बंद झाल्यामुळें अब्राहाम याचे डोक्यावर कर्जाचा मोठा बोजा पडला होता आणि त्यामुळें तो फार त्रासला होता; या

कर्जाचा त्याला इतका मोठा बाऊ वाटत होता कीं, या कर्जाला तो 'राष्ट्रीयकर्ज' म्हणत असे, आणि इतर राष्ट्रीय कर्जाप्रमाणें शेवटीं त्याची फेडही झाली. वखारीचें काम चालू असतांना अब्राहाम व बेरी यांनीं पैशासंबंधी जीं खातीं, चिठ्ठ्या, वगैरे लोकांस करून दिल्या होत्या ते बहुतेक लोक आधीरे होते; आणि त्या दिवसांत रोकडीचा व्यवहार कमी असून उधारीचा व्यवहार फार चालत होता. एका आधीऱ्या सावकारानें तर अब्राहाम याचा घोडा खोगीर-लगाम वगैरे सर्व कोर्टाच्या मार्फत जप्त करून विकून टाकिलें. अब्राहाम याचा एक जीवलग मित्र बोलीनग्रीन या नांवाचा होता, तो या विक्रीच्या वेळीं हाजर असलेला पाहून अब्राहाम यानें आपलें तोंड लपविलें. ग्रीन यानें सर्व सामान विकत घेऊन तें अब्राहाम यास देऊन म्हणाला "माझ्या जिवलग मित्रा अबे ! हें सामान तूं घेऊन जा आणि तुला मिळतील तेव्हां याचे पैसे मला दे; कदाचित् पैसे न दिलेस तरी तुझे गेले काय आणि माझे गेले काय एकच" हें पाहून अब्राहाम यास मोठा विस्मय वाटला व बोलिनग्रीन याचें नांव तो आजन्म विसरला नाहीं. लवकरच बोलिनग्रीन हा निवर्तला आणि ज्या जागेंत त्याला मूठमाती दिली होती त्या जागेवर त्याचे गुणानुवाद वर्णन करण्याचें काम अब्राहाम याजकडे आलें. तो जेव्हां त्याचे गुण वर्णन करूं लागला तेव्हां त्याचे मनाची मोठी विलक्षण स्थिति झाली. त्यानें मोठ्यानें बोलण्याचा प्रयत्न केला, परंतु मित्राच्या विरहानें हृदय व नेत्र भरून आ-

त्यामुळें त्याच्याच्यानें बोलवेना. तो भाषण करण्यास उभा राहिला तेव्हां नेत्रांतून अश्रु बिंदू ढळढळ वाहूं लागले व त्याचें दयार्द्र अंत:करण दुभंग झाल्यामुळें तो कांहींएक न बोलतां एकाएकीं खालीं बसला. वक्तृत्व करून जें मित्रप्रेम प्रगट झालें असतें त्यापेक्षां धर्मोपदेश करतांना त्याच्या नेत्रांतून वाहत असलेल्या अश्रु बिंदूनेंच मित्रप्रेम जास्त व्यक्त झालें यांत कांहीं संशय नाहीं. यावरून वाचकांनीं हें विसरतां कामा नये कीं असे* मित्र जगांत फारच थोडे सांपडतात.

---



---

* ॥ तन्मित्रमापदि सुखेच समक्रियं यत् ॥ ( भर्तृ $\frac{२}{६८}$ ).

# प्रकरण ६ वें.

## राजकार्यधुरंधर आणि देशासंबंधीं त्याचे उद्गार.



स. १८३४ मध्यें कायदे करणाऱ्या सभेंत अब्राहाम हा पुनः उमेदवार झाला. युद्धांतून परत आल्यावर त्याला या निवडणुकीच्या संबंधांत कांहीं एक करावयाचें बाकी राहिलें नव्हतें; कारण मागील निवडणुकीच्या वेळीं त्यानें जें केलें तें सर्व चांगलेंच केलें होतें. हल्लींची नेमणूक आगष्ट महिन्यांत झाली, आणि अतिशय वादविवाद होऊन शेवटीं अब्राहाम या निवडणूकींत यशस्वी झाला. पुष्कळ प्रजापक्षीय लोकांनीं, त्याच्याशीं स्नेहसंबंध असल्यानें, त्याच्या लाभांत मतें दिलीं होतीं; आणि त्यालाही या व्हिग ( प्रजापक्षीय ) लोकांच्या संयुक्त आश्रयाची अत्यन्त खात्री होती. जे चौघे उमेदवार यशस्वी झाले त्यांपैकीं प्रत्येकाच्या लाभांत कितीं मतें पडलीं तें खालीं लिहिल्याप्रमाणें—अब्राहामलिंकन १३७६; डॉसन १३७०; कारपेंटर ११७० आणि स्टुअर्ट ११६४. यादींत अब्राहामचें नांव पहिलें आलें होतें हें वरील माहितीवरून उघड होत आहे; त्यानें धारल्याप्रमाणें हें जें त्याला

मोठें यश मिळालें त्यामुळें लोकांनीं अब्राहाम याला हर्षानें फुगविण्याचा प्रयत्न केला, परंतु संपूर्ण समाधान पावलेल्या मनुष्याचा चेहरा जसा टवटवीत दिसावा तसा याचा न दिसतां किंचित् मंद दिसत होता. त्याला नुकतेंच २५ वें वर्ष लागलें असेल नसेल तोंच त्याची शरीरसंपत्ति, शूरत्व आणि प्रसंगावधान हीं सर्व त्याला चांगलीं अनुकूल झालीं असून त्या काळांत कोणताही प्रश्न उपस्थित झाला तरी त्याबद्दल वादविवाद करण्यास त्याला बिलकुल संकोच वाटत नसे; आणि सभोंवतीं वाद करणारांचा समुदाय जमला आहे अशा वेळीं खोडावर उभें राहून त्यांच्याशीं व कायदे करणाऱ्या सभेंत वादविवाद करण्यांत तो फारच प्रवीण झाला होता. त्यानें कायद्याचीं पुस्तकें चांगलींच वाचलीं होतीं आणि कायद्याचीं चांगलीं चांगलीं ठराविक वाक्यें व नमुने त्याला उत्तम अवगत होते. तो ज्या जिल्ह्याचा प्रतिनिधि होता त्याच्या प्रत्येक प्रांतांतली बारीक माहिती त्याला होती; तेथील लोकांच्या रीतीभाती, त्यांच्या सोई, मोठमोठाल्या उमेदी आणि त्यांचीं सुखदुःखें, चांगली स्थिति प्राप्त होण्याचे कामीं त्यांची हाव, या सर्वांची त्याला उत्तम माहिती झाली होती. त्यानें कांहीं पुस्तकें इतक्या बारीक रीतीनें वाचलीं होतीं कीं, त्यांतील सर्व विषय त्याच्या जिव्हाग्रीं होते. हीं पुस्तकें म्हणजे (१) स्वतांचें धर्मपुस्तक, (२) शेक्सपियर, (३) बर्न्स, (४) इसाबनीति व (५) पिलग्रीम्स प्रोग्रेस, हे ग्रंथ होत. तो प्रामाणिक, सत्यवक्ता, दयार्द्र अंतःकर-

णाचा, गम खाणारा, सहनशील, शूर आणि कोंवळ्या मनाचा होता. त्याची लिहिण्याची आणि वाचनाची पद्धति आज कालच्या तरुण मंडळीस खरोखर कित्ता वळविण्याजोगीच आहे. एकाक्षरी शब्दोच्चार योग्य ठिकाणीं करण्याचा त्याला दृढाभ्यास असून विनाकारण आपले विचार पुष्कळ शब्दांनीं प्रदर्शित करणें त्याला आवडत नसे; आणि विषयप्रतिपादनाची त्याची शैली अशी होती कीं, व्याख्यान चालू असतांना त्यांत विषयप्रतिपादन अगदीं सरळ व संक्षिप्त रीतीनें करून तो मुद्याच्या गोष्टीकडे लवकर वळत असे. तो भिडस्त असून शरिरानें ओबडधोबड होता; आणि तो साशंक वृत्तीचा असल्या कारणानें दुसरें कोणी जवळ असणें त्याला पसंत नसून दुसऱ्यानें कांहीं सांगितलें कीं, तें त्याला ग्राह्य आहे असें तो लौकर दाखवीत असे. एखाद्या विषयाचें स्वताला ज्ञान नसून कांहीं लोकांना मिथ्याभिमान दाखविण्याची जशी संवय असते तसा अब्राहाम याचा स्वभाव नसून एखादा विषय जर त्याला अवगत नसला तर तसें स्पष्टपणें कबूल करण्यास त्याला अखेर पावेतों कधींही मुळींच लाज वाटली नाहीं; आणि कोणी कांहीं सुचना केली तर ती तो चांगली ऐकून घेत असे. अब्राहाम याचें सद्गुण खरोखरच सर्वत्रांनीं विशेष लक्षांत ठेविण्याजोगे आहेत.

वंडालिया ही त्या वेळीं इलिनाइसची राजधानी होती. कायदे करणाऱ्या सभेंत जे लोक असत ते अब्राहाम याचे प्रमाणेंच मित्र-

मंडळीनीं आपल्या मतानुसार पसंत केलेले असत. हल्लींच्या राजनीतीला अप्रबोधक राजनीति ह्मणण्याचा प्रघात आहे. अप्रबोधक या शब्दाचा अर्थ गुंतागुंतीचा व पक्षपाती असा होतो. अशी राजनीति भ्रष्ट व आपल्याच पोळीवर तूप ओढणाऱ्या मंडळीस प्रिय असावयाचीच. अब्राहाम याचे वेळीं असली भ्रष्ट व मतलबी राजनीति नव्हती. त्या वेळीं सर्व सभासद एकत्र होऊन कायदे करीत असत आणि त्यांत लोकांच्या अडचणी काय काय आहेत याचा चांगला खल व विचार होत असे; अशी त्या वेळची राजनीति होती. कायदे करणाऱ्या सभेंत अब्राहाम येत असे तेव्हां त्याचा पेहेराव पोकळ थाटमाटाचा नसून अब्रू व लौकिकास शोभेल असा साधा व स्वच्छ असे. त्याची अंगकाठी उंच असल्यामुळें त्या सभेंत इतरापेक्षां ही व्यक्ति मोठी भव्य व चित्ताकर्षक दिसत असे. त्या वेळीं त्याची उंची ६ फूट ४ इंच होती. सभेंचें काम आटोपल्यावर तो आपली खुर्ची एका जागीं कोठेंतरी नेऊन तरुण व मुत्सद्दी मंडळी गोळा करून करमणूकीस्तव अनेक प्रकारच्या गोष्टी सांगत असे; आणि याबद्दल त्याची चिरकाल ख्याति राहिली होती. ह्या त्याच्या पद्धतीमुळें लोकांच्या मनावर चांगला परिणाम होत असे. अब्राहाम हा जंगलांत राहणारा होता; परंतु प्रस्तुत राजकार्याच्या मोठ्या प्रकरणांत मग्न होता, तरीपण सभोंवतीं काय चाललें आहे हें तो चांगलें व सूक्ष्म रीतीनें जाणत होता. कायदे करणाऱ्या मंडळींत तो वादविवाद करण्यास्तव बसत होता खरा,

परंतु त्याचवेळीं दुसरे लोक काय बोलतात तेंही तो ऐकत असे. त्यानें कायद्याचें कांहीं मसुदे काढिले परंतु इतर लोक त्यांबद्दल काय काय बोलतात इकडे त्यांचे बारीक लक्ष असे. सांगणें थोडे परंतु घेणें प्रत्येक बाबतींतून आणि तें संपूर्ण विचार करून ही त्याची नेहमींची पद्धत होती. दिवस हिंवाळ्याचे असून थंडी कडक पडत होती परंतु कोणत्याही सभेस अब्राहाम हाजर नव्हता असें झालें नाहीं.

दुसऱ्या वर्षी कायदे करणाऱ्या सभेंत पुन्हां त्याचें नांव आलें आणि इ. स. १८३४ सालाप्रमाणेंच इतर उमेदवारांपेक्षां याच्या लाभांत जास्त मतें पडून तो पसंत ठरला. मत देणारांकडे अब्राहाम यानें अर्ज केला होता, त्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता. 'ज्यांना सरकारी हक्क लागूं आहेत आणि जे हा बोजा सहन करण्यास मदत करितात त्यांचे साठीं मी या सभेस जातों, त्याचप्रमाणें जे गोरे लोक कर देतात व शस्त्र धरितात, ते (स्त्रिया असोत अगर पुरुष असोत,) त्यांना मत देण्यास हक्क असावा एवढ्यासाठीं मी जातों, आणि माझी निवडणूक होवो अथवा न होवो, परंतु ज्या सरकारी जमिनी विकल्या जातात व त्यांचें जें उत्पन्न येईल तें कित्येक संस्थानांस वांटून देण्यासाठीं मी जातों, म्हणजे इतर संस्थानांबरोबर आपल्याही संस्थानास व्याजी पैसे काढल्याशिवाय आगगाडीचे रस्ते, पाण्याचे नळ वगैरे त्या पैशांतून करितां येतील,

त्यावेळीं लोकांपुढें विचार करण्यासारखे दोन प्रश्न होते:–( १ ) ज्यांचा जन्म संयुक्त संस्थानांत ( युनाइटेड स्टेटस्‌मध्यें ) झाला नसेल त्यांना सुद्धां सभेंत मत देण्याचा हक्क असावा हा पहिला प्रश्न होता, आणि ( २ ) अब्राहाम याच्या ह्मणण्याप्रमाणें सार्वजनिक सुधारणा जी करावयाची ती सार्वजनिक पैशानेंच व्हावी हा दुसरा प्रश्न होता. राजकार्यांत अब्राहाम आणि हेनरीक्ले हे उभयतां सारखेच निष्णात होते. वरील दोन्ही चालू प्रश्नांचा दूरवर विचार करण्याबद्दल अब्राहाम याचा दृढ निश्चय होता. इतकेंच नव्हे, तर त्यानें व्हिग ( प्रजापक्ष ) लोकांच्या प्रमुखाचें अनुकरणच करण्याचें ठरविलें होतें; तरीपण अब्राहाम याचे स्नेह्यांस, त्याचें धारिष्ट आणि कायदे करणाऱ्या सभेंत मानसन्मान मिळविण्यासाठीं त्याची असावी त्यापेक्षां जास्त हिंमत पाहून फारच आश्चर्य वाटत असे.

अब्राहाम यास वादविवाद करण्याची सवय लागल्यामुळें हळूं हळूं त्याची शीघ्रबुद्धि व सुशील वृत्ति वाढत चालली आणि त्या कारणानें लोकांकडून त्याला मानसन्मान जास्त मिळत चालला. जॉर्ज फॉरकर हा प्रजापक्षाचा मुख्य पुढारी असून त्यानें स्वमतास पराङ्मुख होऊन मोठें बक्षिस व नोकरी मिळविली होती, ह्मणून अब्राहाम व जॉर्ज फॉरकर या परस्परांत एकदां मोठी चढाओढ होऊन ‘ आतां द्वंद्व युद्ध होतें कीं काय’असें वाटलें होतें. फॉरकर या सभेस उमेदवार नसून अब्राहाम याच्या विरुद्ध ओ-

रड करण्यासाठींच त्याची नेमणूक झाली होती. स्प्रिंगफिल्ड येथें सभा भरण्याचें ठरलें असून अब्राहाम हा घोड्यावर बसून तेथें गेला होता. घरावर विजेप्रमाणें चमकणारी काठी लाविणें याचें त्या प्रांतांतील लोकांस मोठें कौतुक वाटत असे; त्या प्रमाणें फॉरकर याच्या सुंदर व भव्य इमारतीवर विजेची काठी चमकत असल्याचें अब्राहाम यानें पाहिलें होतें. सभेच्या वादाविवादांत त्यास आपलें बोलणें बंद करणें भाग पडलें आणि त्या नंतर फॉरकर याचें भाषण झालें, व त्यांत न्यूसालेम पासून अब्राहाम याचे संबंधीं घडलेल्या सर्व हकिकतीचा विषय होता. या भाषणांत फॉरकर यानें अब्राहाम याचा पेहेराव, रीतभात, ओबड धोबड शरीर वगैरेबद्दल फार थट्टा केली आणि मोठ्या ऐटीनें त्यास अडाणी ह्मणून त्याचा अतिशय उपहास केला. हें भाषण ऐकून अब्राहाम प्रत्युत्तर देण्यास जेव्हां तयार झाला त्या वेळीं त्याच्या नेत्रांतून अग्नीच्या ठिणग्या पडतील कीं काय असें थोडावेळ दिसलें. त्याचे गाल निस्तेज दिसत होते, परंतु पोटांतल्या रागाचा आवेश त्यानें बाहेर दिसूं दिला नाहीं. जॉर्जफॉरकर याचें जें उध्दटपणाचें भाषण झालें त्याचें प्रत्युत्तर अब्राहाम यानें संक्षिप्त रीतीनें दिलें. तो म्हणाला " राजकार्यांत आणि कारस्थानांत जितका मी कमी आहे तितका वयानें मी कमी नाहीं; परंतु या इसमाप्रमाणें ईश्वरी भ वाढवून अंतःकरणांत पातकाचा संचय करणें, केवळ द्रव्याचे क्षणिक मोहास लुब्ध होऊन दरसाल ३००० डालरची नोकरी

पतकरणें व आपल्या घरावर विजेची काठी चमकविण्यांत संतोष मानून पुष्कळ दिवस वांचणें यापेक्षां अल्पवयांतच मृत्युमुखीं पडणें हें मला बरें वाटतें." तेथें जो श्रोतृसमाज हें भाषण ऐकण्यास जमला होता त्यांतील प्रत्येक व्यक्तीच्या मनावर अब्राहाम यानें दिलेल्या प्रत्युत्तराचा विजेप्रमाणें तात्काळ ठसा उमटला. श्रोतृसमाजांतल्या लोकांस वाटलें कीं, फॉरकर हा मिथ्याभिमानी व पोकळ ऐट मिरविणारा आहे. त्याचें घर सुंदर असून त्यावर परमेश्वरास न आवडणारी विजेची कांठी चमकत आहे तरी त्याला तेथें सुखाची झोंप येत नाहीं, त्यापेक्षां आपलीं लांकडीं घरें मोलमजुरी करून गरिबींत बांधलेलीं फार चांगलीं. पुढें पुष्कळ वर्षांनंतर फॉरकर सभेंत भाषण करण्यास उभा राही त्यावेळीं लोक ह्मणत कीं, "ईश्वरी कोप वाढविणारी विद्युद्यष्टि सुंदर घरावर असल्याखेरीज ज्याला झोंप येत नव्हती तोच हा मनुष्य."

एके दिवशीं खोडावर* कर्नल रिचर्डटेलर नावांचा गृहस्थ अब्राहाम यांस भेटला. हा गृहस्थ स्वाभिमानी व मोठा अक्कडबाज असून त्याच्या गळ्यांत सोन्याची साखळी होती; आणि इस्तरी केलेला सदरा अंगांत असून ( दक्षिण इलिनाइसचे लोकांस

---

* मोठा वृक्ष कांपल्यावर जो लांकडाचा मोठा ठोकळा जमिनींत राहतो तो नीटनेटका कांपून त्यावर उभें राहून भाषण करण्याचा रिवाज त्यावेळीं होता.

अपरिचित असे ) कांहीं दागिने त्याचे अंगावर होते. ' आपल्या देशासाठीं देह झिजवून अहोरात्र श्रम करणारे तेच खरे प्रजासत्ताक लोक होत व प्रजापक्षीय लोक अमीर उमरावांत व पांढर पेशे लोकांत स्वतांची गणना करून आपले अब्रूस कलंक लावून घेतात, ' असा कर्नलटेलर याचा आक्षेप होता. रिचर्डटेलर यानें सोन्याची साखळी, दागिने, वगैरे घातले असून त्याची शोभा लपविण्यासाठीं सर्वांच्या वरून त्यानें एक मोठा झगा घातला होता, परंतु तो झपाट्यानें जाण्यास जसा वळला तसा त्याचा मोठा झगा एकीकडे होऊन आंतील दागदागिने वगैरे अब्राहामच्या दृष्टीस पडले व त्याला मोठें आश्चर्य वाटलें; कारण अब्राहाम याचा पेहेराव अगदीं जुन्या रीतीचा असे. संधि साधून त्यानें रिचर्डच्या छातीवर हात ठेवून म्हटलें " मला असें वाटतें कीं, जसा माझा स्नेही रिचर्डटेलर हा अमीरउमराव आहे तसाच मी सुद्धां आहे. " रिचर्डचें जें हें कृत्य उघडकीस आलें व त्याची मानखंडना झाली त्याबद्दल पुष्कळ दिवसपर्यंत लोक चर्चा करित होते व तो ती ऐकतही होता.

कायदे करणाऱ्या मंडळींत अब्राहाम यास हल्लीं पसंत केला होता; आणि ज्या लोकांसंबंधी साग्र हकीकत या ऐतिहासिक पुस्तकांत आहे असे लोकही त्या कायदे करणाऱ्या मंडळींत कांहीं कमी नव्हते, या पैकीं एडवर्ड डी. बेकर नांवाचा एक सभापंडित असून

कायद्याचे विषयांत तो अब्राहाम याचे प्रमाणें मोठा निपुण होता. ऑरेगन हा सैन्याचा जनरल असून बॉलसब्लफ येथें मारला गेला आणि यानेंच एडवर्ड डी. बेकर यास युनाइटेड स्टेटचे सेनेटर नेमिलें होतें. त्या शिवाय स्टिफनआरनॉल्ड डोग्लस, जॉन जे. हार्डिन, जेम्स शील्डस, वुइलियम, ए. रिचर्डसन, जॉन लोगन आणि जॉन ए. मॅक्क्लेरेन्डन असीं बरचि मंडळी होती. सॅव्हाना परगण्यांतील दोघे सेनेटर्स (राजकार्य सभेचे प्रमुख) आणि सात प्रतिनिधि असे एकंदर नऊ जण होते. या नऊजणांत प्रत्येकाची उंची विशेष असून अब्राहाम हा सर्वांत जास्त उंच होता. तो आपलें मनांत आपणांस पुढारी समजत नसे परंतु तो सर्वांत उंच होता ह्मणून तो स्वतःस ' सॅगामनचा मुख्य ' समजत असे व लोकांतही याच नांवाने प्रसिद्ध होता. ह्या सर्व नऊ प्रतिनिधींची सर्व मिळून एकत्र उंची ५५ फूट असल्यानें त्यांच्या ह्या उंची बद्दल लोकांत प्रसिद्धी असून सर्वांस मोठें आश्चर्य वाटत होतें. ह्या नऊ जणांचे कारकीर्दींत मॅकान परगण्यांतील वन्डालीया ही संस्थानाची राजधानी बदलून सॅंगामन परगण्यांतील स्प्रिंगफिल्ड येथें नेली होती. ह्या स्तुत्य कृत्यांत अब्राहाम यास जें यश मिळालें त्या बद्दल वरील नउ जणांतील त्याच्या सहचरांनीं त्याचें मोठें गौरव केलें.

अमेरिकेंतील मनुष्यास गुलाम ह्मणून धरून नेण्याची पद्धत अति वाढत चालली असून त्या विरूद्ध अब्राहाम होता आणि या

संबंधांत त्याचें नांव प्रथमच त्या सभेंत नोंधण्यांत आलें होतें. त्या वेळचा काळच या पद्धतीला अनुकूल होता आणि मुख्यत्वेंकरून त्या भागांत तर गुलामगिरीची पद्धत फारच वाढली होती. कें-टकी आणि मिसुरी हे दोन्ही देश उद्योग आणि व्यापाराचे कामांत नजीक आलेल्या इलिनाइस व इंदियाना या दोन्ही दे-शाची स्पर्धा करीत होते, आणि तेथें गुलामगिरी पहिल्यापासून चालत असल्यानें इलिनॉईस व इंदियाना या दोन्ही देशांस या सांसर्गिक रोगाची भावना होणें अगदीं साहजिक होतें. ह्या दोन्ही संस्थानांतील कायदे करणाऱ्या सभेचा उद्देश असा होता कीं, ज्या संस्थानांत गुलाम धरून नेण्याची पद्धत चालू होती तेथें या पद्ध-तीस उत्तेजन द्यावें आणि ज्या संस्थानांत गुलामगिरीविरुद्ध चळ-वळ होत होती तेथें मुळींच उत्तेजन द्यावयाचें नाहीं; त्यावेळीं कांहीं धाडशी लोकांनीं ही पद्धत जुलमी, अन्यायाची आणि धर्मा-विरुद्ध असल्याविषयीं उपदेश करण्याचें आरंभिलें होतें. रंग न लावितां इलिनॉइस मध्यें कोणीही प्रवेश करूं नये असा नियम प्रसिद्ध झाला होता आणि जे लोक गुलाम धरून आणितात त्यांना योग्य उत्तेजन देत जावें अशा बद्दल कायद्याची धर्मविरुद्ध कलमें रचण्यांत आलीं. ह्या लज्जास्पद व लांछनास्पद कलमाप्रमाणें वागणाऱ्या लोकांस या जुलमी पद्धतीची पुष्कळ दिवस पावेतों आ-ठवण राहिली. इलिनाइसच्या कायदे करणाऱ्या सभेंत या गुला-मगिरीच्या पद्धतीसंबंधांत कित्येक ठराव पसार झाले. उत्तर प्रां-

तांतल्या गुलामगिरी बुडविणाऱ्या पद्धतीस इलिनाइस येथील लोक प्रतिबंध करतील अशी गुलाम धरून आणणाऱ्या गिऱ्हाइकांची संपूर्ण खात्री करण्याबद्दलच निःसंशय ते ठराव असले पाहिजेत. त्या ठरावांतील कलमांस अब्राहामलिंकन आणि डॉनस्टोन ह्यांनी मोठ्या हिंमतीनें खालीं लिहिल्याप्रमाणें प्रत्युत्तर देऊन, त्या कागदावर आपल्या सह्या केल्या.

ता. ३ मार्च सन १८३७.

" हल्लींच्या बैठकींत मोठ्या सभेच्या दोन्ही शाखेंत लोकांस राहत्या घरांतून गुलाम धरून नेण्यासंबंधांत ठराव पसार झाले आहेत आणि अशा पसार झालेल्या ठरावाच्या विरुद्ध आम्हीं दोघे खालीं सह्या करणार प्रतिज्ञेनें कळवितों कीं:—

" न्याय आणि राजनीति हीं दोन्ही लयास जाऊन अन्याय आणि कृष्णकारस्थानें वाढतील अशा पायावर ही गुलामगिरीची पद्धत चालू केली आहे परंतु ही पद्धत बंद करण्याविषयीं मतें प्रगट झाल्यानें ह्या पासून घडणारे दुष्ट परिणाम कमी न होतां उ ल्ट वाढत्या प्रमाणावर आहेत असें आम्हीं समजतों. "

" संयुक्त संस्थानाच्या सभेस, नियमान्वयें निरनिराळ्या संस्थानांत गुलामगिरींची पद्धत चालू करण्याच्या संबंधांत, हात घालण्याचा अधिकार नाहीं असें आम्हीं समजतों.

" कोलंबिया प्रांतांत गुलामगिरीची पद्धत बंद करण्याचा अधिकार, नियमान्वयें संयुक्त संस्थानच्या सभेस आहे. परंतु त्या प्रांतांतल्या लोकांनीं अर्ज केल्याशिवाय हा अधिकार वापरतां येणार नाहीं असें आह्मीं समजतों.

" सदरील दिलेल्या मतांत आणि पसार झालेल्या ठरावांत अंतर आहे आणि या कारणानेंच आह्मीं सदर ठरावाच्या विरुद्ध हें प्रतिज्ञेनें कळवीत आहोंत. "

( सही ) **डॉनस्टोन**

" **ए, लिंकन.**

वरील प्रतिज्ञालेख सभेंत रुजू होऊन तो स्थानिक वर्तमानपत्रांतून प्रसिद्धकरण्याबद्दल हुकूम सुटला. अब्राहाम याचे कांहीं मित्रे व भोळे स्नेही होते, त्यांना मात्र ही गोष्ट पटली नाहीं; कारण अशानें गुलामगिरीची पद्धत नाहींशी होईल हें त्यांना संभवनीय वाटलें नाहीं. ते म्हणाले कीं, आमच्या हयातींत ही दुष्ट पद्धत या देशांतून नाहींशी होईल असें आह्मांस वाटत नाहीं. हल्लींच्या दिवसांत वर्तमानपत्र वाचणें ह्मणजे सावधान चित्तानें व सरळ रीतीनें लिहिलेला एखादा दस्ताऐवज वाचण्याप्रमाणें आहे, परंतु तो काळ तसा नव्हता. ' अन्याय व कृष्णकारस्थानें वाढतील अशा पायावर ही गुलामगिरीची पद्धत

चालू केली आहे,' असें ह्मणणें त्यावेळीं मोठ्या धाडसाचें व भयंकर कृत्य समजलें जात होतें. याप्रमाणें ह्मणणारांस बंडखोर मंडळी ठरवून त्यांचेवर अनेक प्रकारचे जुलूम होत होते. त्यावेळेस गुलाम बाळगणारे आणि या धंद्यास उत्तेजन देणारे यांना केवळ नरपशु ह्मणण्यास कांहीं एक हरकत नव्हती. कारण त्यांचें वर्तन तसेंच दुःसह होतें. ही जी दुष्ट संस्था पुढें अजीबात बंद होणार होती त्यावर **लिंकन**चा हा पहिलाच टोला होता.

**सँ**गामन परगण्यांतील लोकांस **अ**ब्राहाम आणि पूर्वी कळविलेल्या नऊजणांच्या मंडळींतील समासद यांचीं मतें अतिशय ग्राह्य वाटत होतीं. **अ**ब्राहाम आणि **स्टोन** यांनीं प्रतिज्ञापूर्वक प्रसिद्ध केलेल्या लेखास 'लहर लागली तसें लिहिलें' असें समजून लोकांस त्याचें लौकरच विस्मरण पडलें; आणि संस्थानाची राजधानी **स्प्रिं**गफिल्ड येथें नेण्याचें जें महत्कृत्य घडलें त्यांतच आम्हीं कृतकृत्य झालों असें मानून या मोठेपणांतच बापड्या त्या प्रतिज्ञा लेखास खग्रास ग्रहण लागल्यासारखें झालें होतें. त्या नऊ जणांच्या हातून हें महत्कृत्य घडल्यानें 'विजय असो, विजय असो,' असें ह्मणून सर्व लोक त्यांचे धन्यवाद गाऊं लागले, आणि याबद्दल महोत्सव करून मोठमोठ्या मेजवान्याही झाल्या. इ. स. १८३७ सालीं **अ**ब्राहाम लिंकन यास उद्देशून जीं कुशल आणि विजयसूचक वाक्यें लोकांनीं उच्चारून त्याचे नांवाचा जयघोष केला त्या

पैकीं दोन वाक्यें अशीं होतीं कीं:--अब्राहाम लिंकन यानें शत्रूच्या मोठमोठ्या उमेदीचे किल्ले ढांसळून पाडून स्वतःच्या स्नेह्यांचे सर्व मनोरथ पूर्ण करून त्यांस कृतकृत्य केलें. या भूमंडळावर उदात्तबुद्धीचा आणि कुलदीपक सत्पुरुष असा फक्त एक अब्राहाम लिंकन होय."

इ. स. १८३७ च्या एप्रिल महिन्यांत अब्राहामलिंकन हा संस्थानाची नवीन राजधानी स्प्रिंगफिल्ड येथें गेला आणि तेथें वकिलीचा धंदा करून इलाख्याची निवडणुक होई पावेतों तेथेंच राहिला. राष्ट्रीय कर्जाचें ओझें त्याच्या डोक्यावर होतेंच आणि त्यामुळें जरी तो पंगु झाला होता, तरीपण स्वतःचा बोज व अब्रू राखून तो आपला चरितार्थ चालवीत होता. या धाडशी कृत्यांत यश येईल किंवा कसें याची त्याला शंकाच होती, आणि जरी अनेक कल्पना मनांत घोळतच होत्या तरी पण त्यानें तें पत्करिलें. त्यानें एक घोडा मागून आणिला आणि त्यावरील खोगिराच्या एका बाजूस एका पिशवींत आपलें प्रापंचिक सामान सुमान घालून ती बांधली आणि घोड्यावर बसून गांवांत गेला. एका खांबास घोडा बांधून अब्राहाम यानें आपला कैंटकीचा जुना स्नेही जोशुआस्पीड याची वखार पाहून काढली आणि त्याला खाण्यापिण्याच्या व राहण्याच्या सोईबद्दल माहिती विचारली; त्यानें असें सुचविलें कीं, एक खोली भाड्यानें ठेवून त्यांत सामान सुमान ठेवावें आणि आसपासचीं झाडांचीं पानें वगैरे खाऊन कांहीं दिवस

चालवावें. याप्रमाणें विनोद झाल्यावर स्वीडनें त्यास आपलें घरांत नेऊन त्याचे खाण्यापिण्याची चांगली तजवीज ठेविली व ते दोघे आनंदानें राहिले.

इलिनाईसची राजधानी एका मोठ्या खेडे गांवाप्रमाणें असून तेथील लोकसंख्या १८००० होती; येथेंच सँगामन परगण्यांतील सरकारी काम चालत असून संयुक्त संस्थानाची सदर अदालत येथेंच होती. येथें कायदे करणाऱ्या मंडळीची सभा दरसाल भरत असून त्यापासून या राजधानींतील लोकांस पुष्कळ फायदा होत असे. देश, संस्थान आणि प्रजासत्ताक राज्य या तिन्ही ठिकाणच्या इतिहासांत जे लोक पुढें प्रसिद्धीस आले ते या राजधानींतल्या नागरिक लोकांपैकींच होते. येथील अदालतीची इमारत लांकडाच्या तुकड्यांची असून त्या हद्दींतल्या सर्वच अदालती त्या प्रकारच्याच होत्या. मुख्य ठिकाणीं सर न्यायाधीश बसत असून त्याचे खालचे बाजूस कठड्याचे बाहेर न्यायाधीश आणि नंतर वकील मंडळी याप्रमाणें व्यवस्था होती. अदालतीची बाकीची जागा ठळक ठळक मंडळींनीं भरलेली असे; कारकून, न्यायाधीश वगैरे लोकांस त्या जागेंत जर एखादे दिवशीं गर्दी न झाली तर तो दिवस मोठा उदास वाटत असे; कारण त्यावेळीं लोकांस अदालती ह्या करमणूकीच्या जागा होत्या. ह्या ठिकाणीं शोक आणि आनंदपर्यवसायी गोष्टी, वक्तृत्व, बुद्धिचातूर्य आणि तर्कशास्त्र ह्या

बाबती दिसून येत आणि आसपास राहणाऱ्या लोकांस ह्या विषयीं बरीच माहिती मिळत असे.

न्यायाधीश लोक कामाकाजासाठीं तालुक्यांत फिरत असले म्हणजे वकील लोक घोड्यावर बसून त्यांचे बरोबरच प्रवास करीत असत आणि कामें चालवीत असत. ते आपल्या बरोबर कायद्याचीं पुस्तकें, प्रवासासाठीं अवश्य तें सामान आणि कपडे वगैरे खोगिरांत घालून नेत. ते जंगलांत जरी राहत होते तरीपण त्यांची रीतभात फार साधी व सभ्य असून ते मायाळू आणि आदरातिथ्याचें कामीं मोठे तत्पर असत. न्यायाधीश, साक्षीदार, आणि पंचायतींतले सभासद यांच्या बरोबर पुष्कळ सफरी झाल्यानें व अहोरात्र त्यांच्या सहवासांत राहिल्यानें पाश्चिमात्य लोकांच्या रितीभातीसंबंधी अब्राहाम याचा अनुभव इतका वाढला कीं, तो उत्तर वयांत समयोपस्थितीनें त्यांच्यासंबंधी पुष्कळ गोष्टी सांगत असे. एकदां एका इसमाचीं कोंबडीचीं पिलें चोरीस गेलीं त्यावरून आरोपीस पकडण्यांत येऊन अदालतींत खटला चालत होता; त्या कामीं वकीलास चांगली मदत अब्राहाम यानें केली म्हणून ज्या इसमाचीं कोंबडीचीं पिलें चोरीस गेलीं त्यानें त्याचे फार आभार मानिले.

न्यायाधीशा बरोबर अब्राहाम घोड्यावर बसून मुशाफरी करीत असतांना एके दिवशीं एके ठिकाणीं सर्व मंडळी घोड्या-

वरून खालीं उतरून विश्रांती घेत होते. अब्राहाम मंडळीला सोडून आसपासच्या अलुबुखार नांवाच्या फळाच्या दाट झाडींत सहज फिरत असतां एकाएकीं मोठा वारा सुटून एका झाडावरील पक्ष्याचे घरट्यांतून दोन पिलें खालीं पडलीं. त्या पिलांस अब्राहाम यानें उचलून घेऊन ज्या घरट्यांतून पिलें पडलीं होतीं तें घरटें शोधून काढण्यांत तो मग्न झाला होता. कांहीं वेळानें तें घरटें सांपडलें आणि तीं पिलें त्यानें सुरक्षितपणें इतर पिलांच्या समूहांत नेऊन ठेविलीं. हें अब्राहाम याचें कृत्य एका इसमानें पाहिलें आणि त्यानें त्याच्या दयार्द्र व कोंवळ्या अंतःकरणाबद्दल फार स्तुति केली; नंतर त्या उभयतांची भेट झाल्यावर अब्राहाम त्याला म्हणाला ' तीं पिलें जर घरट्यांत माझें हातून ठेविलीं गेलीं नसतीं तर खरोखरच मला रात्रीं झोंप आली नसती. '

इ. स. १८३७ सालीं अब्राहाम यानें स्प्रिंगफिल्डचा जॉनस्टुअर्ट याच्याशीं वकिलीच्या धंद्यांत भाग ठेविला; याप्रमाणें इ. स. १८४१ पावेतों अव्याहत चालल्यानंतर त्यानें स्टिफनटी. लोगन याचे मदतीनें वकिलीचा धंदा चालविला परंतु हें फार दिवस निभलें नाहीं; इ. स; १८४३ सालीं स्टिफनशीं अब्राहाम याचा व्यवहार बंद पडला. नंतर अब्राहाम आणि वुइलियम हेरंडन या उभयतांनीं वकिलीच्या धंद्यासाठीं एक पेढी स्थापन केली, आणि इ. स. १८६५ पावेतों ( म्हणजे अब्राहाम याचें देहावसान

होईपर्यंत ) या उभयतांचे भाग कायम राहून धंदाही अव्याहत चालला.

अब्राहाम हा वखारींत सचोटीनें काम करीत असल्यामुळें त्याला ' प्रामाणिक, ' असें लोक म्हणतच होते, व तें नांव त्यानें वकिलीचा धंदा चालविला तरी घालविलें नाहीं. तो मोठा प्रामाणिक वकील असून अनीतीचीं कामें कधींच पत्करीत नसे. ' मनुष्याची अनीतीकडे यत्किंचितही प्रवृत्ति झाली कीं, अपजय हा हात जोडून त्याचे समोर उभा राहावयाचाच ' हें तत्त्व अब्राहामाचें मनांत चांगलेंच बिंबलें होतें हें यारूवन उघड आहे. एखाद्या फौजदारी कामांत आरोपी तर्फे हा काम चालवीत असला आणि परिणामीं जर त्या आरोपीस शिक्षा झाली कीं त्याचें अंतःकरण दुभंग होऊन जाऊन त्याला अतिशय दुःख होत असें. एखाद्या कामांत जर कांहीं आड फांटे अगर पांचपेंच दिसले तर बक्षिस अथवा यशाच्या लोभानें तें काम त्यानें पत्करलें असें कधींच घडलें नाहीं आणि सांप्रतच्या काळा-पेक्षां त्या काळांत कायद्याचे पेंचपांचही फार कमी होते. अब्राहाम यानें आपल्यास अनीतीचा डाग कधींही लावून घेतला नाहीं. त्याच्या इतर व्यवसाय बंधूंनीं पेंचपांचाच्या कामांत सामील होण्यास जरी आग्रह केला तरी तो कधींच सामील होत नसे, आणि त्यामुळें त्याचे व्यवसायबंधू कधीं कधीं त्याला एककल्लीही म्हणत असत. त्यावेळीं त्या प्रांतांतले लोक मोठे चतुर व हुशार असत आणि त्यां-

पैकीं कांहीं लोक पुढें चांगलेच उदयास आले. त्यांपैकीं लिमन-ट्रं बूल नांवाचा इसम इलिनॉइस मधून आला असून युनाइटेडस्टेटस्‌चा प्रसिद्ध सिनेटर* होता. ब्रोनिंग हा सिनेटर असून अब्राहाम याच्या राज्यप्रकरणाच्या कारकिर्दींत अंतरव्यवस्थेचा सेक्रेटरी× होता. डब्ल्युं बिसल हा सभेचा प्रतिनिधि व संस्थानाचा गव्हर्नर+ होता. डेव्हिड डेविस हा सिनेटर व चालू काम पाहणारा उपाध्यक्ष असून युनाइटेडस्टेट्‌सच्या वरिष्ट अदालतीचा न्यायाधीश होता. स्टिफन डोग्लस सिनेटर असून इलाख्याचे निवडणूकींत उमेदवार होता. ही मंडळी आपआपल्या ग्रहदशेप्रमाणें पुढें प्रसिद्धीस आली खरी, परंतु त्यांपैकीं सार्वजनिक कामांत पडून यश मिळेल अशी एकासही उमेद नव्हती; परंतु अब्राहामलिंकन विनयसंपन्न असून सार्वजनिक कामांत विशेष लक्ष घालीत असल्यामुळें त्यास या कामीं चांगलें यश संपादन करण्याची मोठी उमेद होती. त्याच्या व्यवसायबंधूंनीं अशा वेळीं त्यास खाड्यांत घालण्याचा प्रयत्न न करितां त्या कामीं उत्तम मदत केली ही लक्षांत ठेविण्यासारखी गोष्ट होय. त्याच्या सभोंवतीं जी मंडळी होती त्यांचा तो मनांत धाक बाळगून त्यांना मानसन्मान देत असे आणि त्यामुळें मान व अन्न यां संबधांत तो त्यांची कधींही बरोबरी करीत नव्हता. इतरांपेक्षां आपण श्रेष्ट असें म्हणवून घेण्याचा त्याचा निश्चय होता

* राज्य सभासद. × दबीर अथवा चिटणीस. + सुभेदार.

खरा, परंतु इतरांस तो अगदीं तोडून टाकीत नव्हता. आपण दीर्घ प्रयत्न करीत असावें, परंतु त्यांत यश अपयश येणें हें केवळ ईश्वरावर अवलंबून आहे, हें तत्व तो कधींही विसरला नाहीं. कालेंकरून तो अध्यक्षही झाला. जर उद्याच्या कामाची उत्तम सिद्धता करून ठेविणें असेल तर आजचीं कामें श्रद्धापुरस्सर चोख करणें इष्ट होय हें त्याचें हृदयांत चांगलें बाणलें होतें.

प्रस्तुत अब्राहामलिंकन याची बोटानें गणना व्हावी अशा मंडळींत अद्याप जरी गणना होत नव्हती, तरीपण त्याची बुद्धि अतिशय विकास पावली होती. उदाहरणार्थ, इ० स० १८३७ सालीं स्प्रिंगफील्ड येथील तरुण मंडळीच्या संमेलनांत व्याख्यान देण्याचें काम अब्राहाम याजकडे आलें. त्यावेळीं त्याचें वय २८ वर्षांचें होतें. व्याख्यानाचा विषय "आपल्या राजकीय संस्थेची शाश्वति" हा असून विषयप्रतिपादनही चांगलें झालें. कोणास कदाचित् कांहीं महत्त्वाकांक्षेचा हा विषय असल्याचें वाटत असेल, परंतु वास्तविक तसा प्रकार नसून त्याचा हा प्रयत्न पायाशुद्ध होता. अब्राहाम याचें अंतःकरणांत कडकडीत देशाभिमानाची ज्योत सदैव जागृत असल्यामुळें आणि तो मोठा विचारवंत असल्यानें त्याचे भाषणाचा तरुण समाजांतील मंडळीच्या मनावर चांगलाच ठसा उमटला. अल्प वयांतच राजकार्यधुरंधर म्हणवून घेणें हें कांहीं लहानसहान काम नव्हे. या राजकार्यधुरंधराचें,

तरुण समाजांत जें भाषण झालें तें त्याचें प्रथमेंचच भाषण होतें आणि राज्यकार्यांत तो किती निपुण होता याची वाचकांस कांहींशी कल्पना येण्यासाठीं वरील भाषणांतील उद्धाराचा सारांश खालीं दिला आहे.

राज्याच्या उलटा पालटी संबंधी आपल्या वाडवडिलांस उद्देशून तो म्हणाला "इतिहासांत त्यांची हकिकत वाचण्यांत येईल आणि जावत्काळ पावेतों धर्मपुस्तकें वाचण्यांत येतील तावत्काळ पावेतों त्यांची चर्चा पुनः पुनः होईल. जरी त्यांचे संबंधीं चर्चा होईल, असें गृहित धरून चाललें तरीपण यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांचे मनावर जसा त्याबद्दल परिणाम झाला तसा हल्लीं होऊं शकणार नाहीं; आणि तेव्हां सुद्धां त्यांच्या पूर्वी ज्या पिढ्या होऊन गेल्या त्यांना जशी त्याच्या प्रसिद्धी विषयीं माहिती होती व त्यांचें हृदय द्रवत होतें तशी स्थिति त्यावेळीं नव्हती. लढाई संपल्यानंतर बहुत करून प्रत्येक प्रौढ मनुष्य त्यापैकीं कांहीं स्थळें अवलोकन केलेला दिसत होता."

"याचा परिणाम असा झाला कीं, त्यावेळीं प्रत्येक कुटुंबांत जणूं काय इतिहासांत लिहिल्याप्रमाणें आपण सर्व प्रत्यक्षच पहात आहों कीं काय असें वाटे. नवरा–बाप–मुलगा–भाऊ वगैरे कोणाचे अवयव विगलित झालेले, तर कोणाचें शरीरावर शस्त्राघा-

ताचे घट्टे पडलेले असे प्रत्यक्ष पुरावे इतिहासांत वर्णन केलेले होते. ज्ञानी अगर अज्ञानी, सुशिक्षित अगर अशिक्षित, कोणीही असो, प्रत्येकास हा इतिहास चांगलाच अवगत असे आणि तो ते नेहमीं वाचीत असत; परंतु हर! हर! ते इतिहास आतां कोठें आहेत? ते कायमचे नाहींसे झाले; आणि आतां ते वाचण्यास कोठून मिळणार? शक्तीचे जणूं काय ते मूर्तिमंत किल्लेच होते आणि अशा मजबूत किल्यांवर शत्रूंचें बळ कांहींएक चालत नव्हतें. तो तोफखानाही आतां कसा मुग्ध आहे! आणि आतां ते सर्व किल्ले कोठें गेले? जे किल्ले बांधण्यास पाण्यासारखा पैसा खर्च केला, जे संपादण्यासाठीं तापट आणि ताज्या रक्ताचें भूमीवर सिंचन झालें, ज्या-किल्ल्यांतून सिंहासारखी गर्जना करून शूर वीर जात होते, ते किल्ले वज्राप्रमाणें त्यांच्या भिंतींसह आज सर्व ढांसळून पडले. शिव! शिव! देशाचा कोण हा भयंयर विध्वंस!"

इ. स. १८३९ अखेर इलिनॉइस येथें कायदे करणाऱ्या मंडळीची एक टोलेजंग सभा भरली आणि त्यांत मोठ्या कडाक्याचा वादविवाद झाला. प्रजासत्ताक लोकांतर्फे वादविवाद करणार स्टिफन डोग्लस, जान कॅलहौन्, जोशिया लँबॉर्न, आणि जेसी टॉमस ही मंडळी होती; आणि प्रजाप्रक्षातर्फे दरबारांत बोलणारे स्टिफन् लोगन्, एडवर्ड बेकर, आरविल् ब्राउनिंग आणि अब्राहाम लिंकन ही मंडळी होती. वरील सर्वत्रांस इलि-

नाइस येथील राजनीति चांगली अवगत असून पुष्कळ वर्षांनंतर ते सर्व उत्तम प्रसिद्धीला आले होते. वादविवाद चालू असतांना एका पक्षांतील मनुष्यानें समोरच्या पक्षांतील लोकांस ' तुमचें मत कायम राहील ही आशाच नको. तुमची संख्याही फार कमीच आहे ' वगैरे ह्मणून हिणविलें. अब्राहाम यानें त्याचें प्रत्युत्तर दिलें कीं ' तुह्मी अशीं भाषणें उच्चारून भित्रे व लुच्चे लोक असतील त्यांना हिणवा, जे निस्पृही आणि शूर आहेत त्यांना असें हिणवून कांहींएक उपयोग होणार नाहीं. जर तुमचें ह्मणणें तसेंच असलें तर तसें होऊं द्या, तेंही खरें असेल. कदाचित् पुष्कळ देशांचें स्वातंत्र्य नष्ट झालेंच आहे, तसें आपल्याही देशाचें होईल; आणि जर देशाचें स्वातंत्र्य नष्ट होईल तर इतकें मात्र मी अभिमानानें सांगून ठेवितों कीं, मी देश सोडून कधींही जाणार नाहीं. '

**मॅारटिन वॉनब्युरेन्** हा त्या वेळीं अध्यक्ष होता आणि जे लोक राज्यप्रकरणाचे विरुद्ध बोलतील त्यांना धमकी देणें, त्यांचा पाठलाग करणें आणि त्यांच्यावर जुलूम करणें, असे प्रकार चालू होते; असे जुलूम त्या वेळीं लोकांस ठाऊक नव्हते. ह्या शोचनीय स्थितीस उद्देशून अब्राहाम ह्मणाला:—' त्यांना अभिवंदन करणें! ही गोष्ट तर कालत्रयीं घडणार नाहीं, आणि मी येथें परमेश्वरास स्मरून अशी शपथ वाहतों कीं, ज्या भूमीवर माझें निस्सीम प्रेम आहे, त्या मातृभूमीचें

स्वातंत्र्य राखणें हें माझें कर्तव्यकर्म आहे; आणि जी माझी जन्मभूमि आहे त्या मातृभूमीशीं मी कालत्रयीं बेइमान होणार नाहीं, आणि तिचा पक्ष सोडणार नाहीं; कसलींही संकटें येवोत, पायांत शृंखला पडोत, फारतर काय, मृत्यु जरी आला तरी पण मी तिचा पक्ष धरून लढण्यास कधींही डगमगणार नाहीं; आणि खऱ्या अंतःकरणपूर्वक आणि दृढनिश्चयानेंच मी हा पक्ष स्विकारिला आहे.'

इ. स. १८४० मध्यें इलाख्याची निवडणून चालू असल्यामुळें देशांत अतिशय चळवळ उत्पन्न झाली होती. मार्टिन् वॉनब्युरेन यास प्रजासत्ताक लोकांतर्फे मुख्य नेमण्यांत आलें आणि जनरल व्हुइलियम हारिसन याची प्रजापक्षाकडून नेमणूक झाली. अब्राहाम हा इलाख्याच्या निवडणुकीचे पक्षाचा होता आणि त्यानें वादविवादांत चांगलें लक्ष घालून आपल्या उमेदवाराकरितां उत्तम भाषणें केलीं आणि लांबच्या प्रवासास निघण्याची सिद्धता केली. हारीसन हा ओहिओ येथें राहिला आणि तेथील पुढारीपणा त्यानें प्रथमच पत्करिला. लोकांचा उत्साह जागृत ठेवण्यासाठीं कित्येक ठिकाणीं कार्योपयोगी माणसें ठेवण्यांत आलीं होतीं. उदाहरणार्थ, बोस्टन् येथील मंडळीनें एक मोठा गोळा तयार केला असून त्या गोळ्यासभोंवतीं एक मोठी लांकडांची चौकट पन्नास फूट घेराची बसवून ती रंगीत कांपडानें मढविली होती. त्यावर दंतकथेंतील कांहीं अक्षरें

लिहिलीं होतीं तीं:–"हा गोळा सतत फिरत असतो." कवाइतीचे वेळीं या गोळ्यास दोरानें बांधून मोठ्या थाटामाटानें शहरच्या सर्व गल्ल्यांतून मिरवित असत. मोहिमेसंबंधी सर्व ठिकाणीं पद्यें ह्मणवीत असून तत्संबंधी झेंडे व पताका उभारणें आणि जेणें करून सार्वजनिक स्फुरण जागृत राहील असे सर्व उपाय सर्व देशभर चालू होते.

हल्लींचा वादविवाद फारच लक्षांत ठेवण्यासारखा होता, आणि अब्राहाम याचें सर्व तनमन ह्या मोठ्या वादविवादांत अगदीं गढून गेलें होतें. स्प्रिंगफिल्ड् येथें एका मोठ्या भव्य दिवाणखान्यांत टोलेजंग सभा भरवून त्यांत अब्राहाम याचा स्नेही एडवर्ड बेकर हा सर्वांतर्फें भाषण करीत होता. त्या दिवाणखान्याचे नजीकच त्यास लागून अब्राहाम लिंकन याची काम करण्यास बसण्याची कचेरी होती. ह्या कचेरीस एक दार असून त्याचे फटींतून अब्राहाम ह्यास खालीं कसें काय भाषण चाललें होतें हें चांगलें ऐकूं येत होतें; इतक्यांत एड्वर्ड बेकर याला प्रजापक्षाविरुद्ध बोलतांना एकाएकीं त्वेष येऊन त्याचें व प्रजापक्षी लोकांचें मोठें वाग्युद्ध झालें, इतकेंच नव्हे तर झोंबाझोंबीचीही वेळ आली होती. प्रजापक्षाकडील लोक मोठ्यानें ओरडून ह्मणाले:–"बेकर यास व्याख्यानपीठावरून खालीं ओढा" व ते ओढण्याच्या बेतांत होते, इतक्यांत अब्राहाम यानें खालीं येऊन सर्वत्रांस उंच हात करून कळविलें कीं "शांत व्हा! शांत व्हा! अशी गर्दी करूं नका, ज्या देशांत आपण सर्व राहतों त्या देशास

आज काळिमा आणावयाची आहे कीं काय ? बेकर यास सर्व कांहीं बोलण्याचा हक्क आहे; सबब त्यास वाटेल तें बोलूं दिलेंच पाहिजे, मी येथें त्याचें संरक्षण करावयास आलों आहे, म्हणून त्याला खालीं ओढण्याची कोणाची पुण्याई आहे तें मी पाहतों " ! अब्राहाम याच्या अचाट शक्तीबद्दल व अन्नूबद्दल सर्वत्रांस चांगली माहिती होती आणि त्यामुळें बेकर यास त्यानंतर कोणीही प्रतिबंध करूं शकलें नाहीं.

---



# प्रकरण ७ वें.

## प्रियतमेचें विरह दुःख आणि बाळबोध जोडपें.



अब्राहामलिंकन जेव्हां न्यूसालेम येथें राहत होता त्यावेळीं त्या गांवच्या एका मिस ऍन. रटलेज् नांवाच्या तरुणीवर त्याचें प्रेम जडलें; या परस्परांत पूर्वी लग्नाचा करार झाला होता किंवा नाहीं हें जरी कळलें नव्हतें तरी येवढें मात्र खास समजलें होतें कीं या तरुण जोडप्यास एकमेकांवाचून एकमेकांस अगदीं चैन पडत नसें. या वेळीं अब्राहाम याजवर नुकतेंच प्रापंचिक ओझें पडलें असून त्याची लग्न करण्यासारखी स्थिति नव्हती, त्याचे जवळ पैसे नव्हते इतकेंच नव्हे तर कर्जाचें मोठें ओझें त्याचे डोक्यावर असून आतां पुढें काय करावयाचें याबद्दल त्याचें मन फार चंचळ झालें होतें; आणि अशा नाउमेद स्थितींत वरील स्त्रीशीं लग्न करण्याच्या करारांत तो बहुधा गुंतला नसावा; नव तारुण्यानें ऍन. रटलेज हिचे सर्व अवयव रसरसले होते खरे परंतु अशा ऐन ज्वानीचे भरांत त्या बिचारीस काळानें ओढून नेलें ही मोठीच दुःखाची गोष्ट होय ॥ यौवनेच मृता भार्या पातकं किमतः परं ॥ या उक्तीप्रमाणें

अब्राहाम हा आपल्या प्रियतमेच्या अकालीं विरहानें इतका प्रणय विव्हळ व दुःखी झाला कीं त्याचें मुख पुनः प्रफुल्लित कधींच झालें नाहीं असें ह्मणतात. ॲन. रटलेज हिला अकालीं व ऐन तारुण्याच्या भरांत मृत्यूनें गांठल्यामुळें मानवी आशा आणि मिथ्याभिमान हे व्यर्थ समजले पाहिजेत अशाबद्दल अब्राहाम लिंकन यास जो बोध झाला होता तो तो आजन्म विसरला नाहीं ॥ अनित्यानि शरीराणि विभवो नैव शाश्वतः ॥ नित्यं सन्निहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥ या उक्तींचें तत्व तो चांगलें समजत होता. मनुष्याचे मनांत मोठमोठ्या आशा उत्पन्न होतात परंतू त्या पूर्ण न झाल्या ह्मणजे आशाभंगाचें भयंकर दुःख त्यास सहन करावें लागतें. मिथ्या गर्वानें या क्षणभंगुर जगांत मनुष्य व्यर्थ प्रौढी मात्र मिरवितो, परंतू काळ हा जवळच टपून बसलेला असतो हें त्याच्या गावींही नसतें; आणि शेवटीं हें शरीर काष्ठलोष्ठवत् मातींत मिळून जाऊन जें जग आपण प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहत असतों तें एका निमिषमात्रांत विजेप्रमाणें नाहींसें होतें ' लक्ष्मीस्तोय तरंगभंगचपलाविद्युच्चलं जीवितम् ' या श्लोकांतील तत्व अब्राहामाचें मनांत चांगलेंच बाणलें होतें आणि वरचेवर याची त्याला आठवण होऊन तो मोठ्या विचारांत गढून जाई.

आनंदी आणि सुशिक्षित तरुण स्त्रियांच्या समूहांत मिसळून संवाद करणें अब्राहाम यास प्रिय वाटत होतें ह्मणून त्यास बायकांतला

राजा ह्मणतां येत नाहीं. जगांत पुढें ज्याला चांगलें नांव काढावयाचें होतें तो तरुण स्त्रियांच्या पाणीदार नेत्रकमलांकडे पाहून मोहित होतांहोतां अगदीं तल्लीन होईल हें संभवनीय नव्हे, आणि त्याप्रमाणें अब्राहाम हा तल्लीन नव्हताच. तो दररोज कष्ट करून दिवस कंठीत होता, आणि रात्रीं बराच वेळ पावेतों त्याचा अभ्यास, वाचन व विचार करणें हें व्यवसाय चालू होते. परंतु त्याच्या ललाटरेषेंत ब्रह्मदेवानें मिस. मेरीटॉड हिचें नांव लिहिलें होतें आणि ह्मणूनच ती इ. स. १८४० मध्यें कैंटकीहून स्प्रिंगफिल्ड येथें ही रॉबर्टटॉडची मुलगी येऊन पोंचली. कैंटकी परगण्यांत लेक्झिंग्टन येथें जॉन टॉड नांवाचा तिचा एक नातेवाइक राहत होता आणि राज्यक्रांतीचे वेळीं यानेंच लेक्झिंग्टन येथें झालेल्या मोठ्या लढाईवरून लेक्झिंग्टन हें नांव कायमचें दिलें होतें. टॉडचें घराणें हें कैंटकी येथील एका चांगल्या अब्रुदार घराण्यापैकीं आणि फार जुनें असून मेरि टॉडही निनियन एडवर्डची मेहुणी होती. निनिएडवर्ड हा स्प्रिंगफिल्ड येथील एक नामांकित गृहस्थ असून त्याचे बायकोस भेटण्यासाठीं मेरिटॉड ही इलिनॉइसच्या राजधानींत आली होती.

स्प्रिंगफिल्ड येथील कांहीं तरुणबांड मंडळी मेरिटॉडच्या मजनीं लागली होती, आणि तिला लग्नासाठीं हेतूनें तिची खुषामत करून ते तिचा स्तुतिवादही करीत. त्या काळच्या तरुण स्त्रिया हल्लींच्या सारख्या नसून राजकीय विषयांत

जास्त लक्ष घालीत असत. अब्राहाम याची त्या वेळीं राजकीय बाबतींत चढती असल्यानें मेरिटॉड हिनें लौकरच त्याच्याशीं ओळख करून घेतली. अब्राहाम आणि मेरिटॉड ह्या उभयतां तरुण जोडप्यानें लग्नाचे करार केले केव्हां, व पुन्हा मोडले केव्हां हें कांहींएक समजलें नव्हतें. लग्नाचा करार ठरल्यानंतर उभयतांची कांहीं गैरसमजूत होऊन अब्राहाम यानें तिला करारांतून मुक्त केलें, परंतु तिनें मात्र मुक्त होण्यास ना सांगितली, त्यामुळें लौकरच तो मोठ्या विषण्णावस्थेंत पडला. नानातऱ्हेचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले आणि घोर चिंतेनें त्याच्यावर इतका अमल बसविला कीं त्याची चित्तवृत्ति अगदींच अस्वस्थ होऊन गेली. अशा दयार्द्र स्थितींत तो असतांना त्याचा स्नेही जोशुआ एफ. स्पीड यानें स्प्रिंगफिल्ड येथील आपला धंदा बंद करून अब्राहाम यास बरोबर घेऊन तो कॅंटकी येथें आला. तेथें स्पीडच्या घरीं तो राहिला तेव्हां त्याला शांतता वाटून प्रकृति चांगली झाल्यामुळें तो स्प्रिंगफिल्ड येथें कांहीं दिवसा नंतर परत आला.

त्यावेळीं जेम्सशल्डि नांवाची एक नामांकित व्यक्ति त्या शहरांत राहत होती. हा तरूण गृहस्थ आयर्लंदांतील टायरोन परगण्यांतून आला होता. त्याचा स्वभाव उतावळा असून त्याचें पित्त सदा खवळलेलें असें. शील्डस हा कडकडीत प्रजासत्ताकपक्षांतला असून मोठा धाडशी होता. स्टेटऑडीटरची जागा मोठी

महत्वाची असून त्या जागेचा पगारही बराच असे; या जागेवर नुकतीच शील्डस् याची नेमणूक झाली होती. सँगामन येथें निघणाऱ्या एका वर्तमानपत्रांत अब्राहाम यानें मोठ्या खुबीचें एक निनांवी पत्र प्रसिद्ध केलें होतें. हें निनांवी पत्र एका हरवलेल्या गलबतांतून आलेलें असावें असें दाखवून त्यांतील मतलब असा होतां कीं 'एका विधवेच्या डोक्यांत राजकीय विषय घोळत असून तिनें प्रजासत्ताक राज्यापासून देशावर कोसळणारीं संकटें आणि भयंकर परिणाम यांचें दिग्दर्शन करून मोठें दुःख प्रदर्शित केलें होतें.' प्रजासत्ताक पक्षाचा मुख्य ऑडिटर तरुण व तापट स्वभावाचा असून शीघ्रकोपी आणि उपहासास योग्यच होता, आणि म्हणूनच या निनांवी पत्रांत त्याला उद्देशून कांहीं मार्मिक निंदेचे पोंवाडे लिहिले होते. शील्डस् हा तें पत्र वाचून रागानें लाल होऊन कावरा बावरा झाला; व गावांत या निनांवी पत्रासंबंधी वल्गना करीत फिरू लागला; आणि ज्यानें हें निनांवी पत्र लिहिलें असेल त्याला ठार मारून सूड उगविल्या शिवाय राहणार नाहीं अशी धमकीही देऊं लागला. ह्या पहिल्या निनांवी पत्राच्या मागोमाग दुसरें एक निनांवी पत्र आलें त्यांत हरवलेल्या गलबतांतल्या विधवेनें शील्डस् यास लग्नासाठीं मागणी केली होती. ह्या दोन्ही निनांवी पत्रांबद्दल त्यावेळीं गावांत पुष्कळ चर्चा चालू असून ती एक गांवगप्पच झाली होती; आणि मिसटॉड व तिची एक तरुण मैत्रिण ह्या उभयतांनीं तर त्यावर कांहीं निंदेचीं गाणीं रचलीं. वर्तमानपत्राच्या चाल-

कानें अब्राहाम याची या संबंधांत खानगी रितीनें सल्ला घेतली. अब्राहाम यानें स्पष्ट कळविलें कीं या कृत्याच्या मुळाशीं मी स्वतः असून त्याबद्दल अखेर पावेतों मी जबाबदार आहें असें स्पष्ट शील्डस् यास सांगावें. हें शील्डस् यास समजतांच त्यानें अब्राहाम यास चोख सांगितलें कीं आपण द्वंद्वयुद्ध करूं आणि त्यांत मी मरेन अगर तुला तरी मारीन. अब्राहाम हा द्वंद्वयुद्ध करण्यास तयार झाला.

त्या प्रदेशांत त्या काळीं द्वंद्वयुद्धाची पद्धत प्रचारांत होती इतकेंच नव्हे तर समाजांत कोणाचे अब्रूस बट्टा लागला अगर अपमान झाला तर तो डाग नाहींसा करण्यासाठीं द्वंद्वयुद्ध करण्याचा प्रघात मोठ्या महत्वाचा समजला जात होता. अब्राहाम यानें द्वंद्वयुद्ध करण्याचें कसें पत्करलें याचें आपणांस आज आश्चर्य वाटतें, परंतु कायद्याच्या विरुद्ध जरी हें वर्तन होतें तरी त्या देशांत ती रूढीच असल्यामुळें उपाय नव्हता; आणि अब्राहाम यास असेंही वाटलें कीं कदाचित् द्वंद्वयुद्ध होणारही नाहीं. शील्डस् हा पोकळ ऐट मारणारा होता हें सर्वांस माहीतच होतें; त्यानें आणि त्याचे स्नेह्यांनीं या होणाऱ्या द्वंद्वयुद्धाबद्दल एक मोठा गप्पा गोंधळच माजविला होता त्यामुळें ही बातमी चहूंकडे लौकर पसरली. डोंगर खणून उंदीर काढण्याप्रमाणें त्याची व्यर्थ खटाटोप होती. अब्राहाम यास द्वंद्वयुद्धाचें आमंत्रण होतें म्हणून त्यानें

कळविलें कीं या युद्धांत उभयतांनीं ही हातांत शस्त्रें धारण करावींत. यासाठीं त्यानें योध्यास उचित अशा विशाळ व भल्या मोठाल्या तरवारी पसंत करून ठेविल्या. त्यानें जर धारिलेंच असतें तर तो आपल्या अचाट बाहुबलानें शील्डस् याचे तुकडे तुकडे करून टाकिता, परंतु युद्धाची वेळच आली नाहीं. अखेर निनांवी पत्रें लिहिण्यांत काय हेतू होता याचा खुलासा समजून घेण्यास शील्डस् तयार झाला असतां अब्राहाम यानें कळविलें कीं ' निनांवी पत्रांतल्या हकिकतीचा सर्व संबंध राजकीय बाबतीशीं असून तुझ्या खानगी वर्तणूकीशीं त्याचा काडी इतका देखील संबंध नाहीं. ' अब्राहाम यास या निरर्थक तंट्यामुळें त्रास मात्र झाला. या पोकळ द्वंद्वयुद्धाचा परिणाम असा झाला कीं तंटे वाढत जाऊन त्यासंबंधी पत्रव्यवहारही मोठ्या निकराचा चालू झाला व पुनः द्वंद्व युद्धाची तयारी होते कीं काय असें वाटूं लागलें; परंतू एरंडाच्या गुऱ्हाळाप्रमाणें त्यापासून कांहीं एक निष्पन्न झालें नाहीं. पुष्कळ वर्षानंतर अब्राहाम जेव्हां प्रजासत्ताक राज्याचा अध्यक्ष झाला तेव्हां सैन्यांतील एका शाखेपैकीं दोघा अंमलदारांच्या भांडणांत एका अमलदारास दोष देण्याची वेळ आली; अपराधी मनुष्यास अब्राहाम यानें जें कळविलें तें वरील तंट्यांतल्या अनुभवावरून कळविलें असावें असें वाटतें. कळविलेला मजकूर येणें प्रमाणें:—

' बापाचा मुलास उपदेश. '

" आधीं कोणत्याही तंट्यांत होतां होईल तों पडूं नको. इतकेंही असून जर पडण्याची वेळच आली तर फार सावधगिरी ठेव, परंतू विरूद्ध पक्ष तुझ्यासंबंधी सावध असणें हें चांगलें, उत्तम मात्र नव्हे, हें तूं विसरतां कामा नये. तूं स्वतः होऊन तंटा उपस्थित करूं नकोस. आपल्या हक्कासाठीं कुत्र्याशीं व्यर्थ भांडण वाढविण्यापेक्षां त्याला रस्ता देणें हें चांगलें. कुत्रा चावला म्हणून त्याला मारून टाकिल्यानें आपली जखम बरी होत नाहीं. "

शील्डस्‌संबंधी हकीकत सध्यां तशीच ठेऊन आपण अब्राहाम लिंकन व मिसटॉड यांच्या लग्नाकडे वळूं. मिसटॉड हिच्या शरिराची कांति लिंबासारखी सतेज असून ती मोठी आनंदी व धूर्त असे. " आमच्या केंटकी येथील लोकांत जें खरें स्फुरण असतें तेंच खरें स्फुरण माझे अंगांत जागृत असून त्या योगानें मी तुझ्या साठीं युद्ध करण्यास सिद्ध आहे " असें तिचा सरदार तिला म्हणाला. आणि " वेळच आली तर हातांत शस्त्र धरून त्या भीमा सारख्या प्रतापी आयरिश मनुष्याबरोबर माझ्यासाठीं तुम्ही युद्ध करावें " अशी संमति तिनें त्याला दिली. पुढें पुष्कळ दिवसानंतर सपटेंबर महिन्यांत शेवटीं पत्रोपत्रीं हें द्वंद्वयुद्ध संपलें. इ० स० १८४० च्या नोवेंबरच्या ४ थ्या तारिखेस या तरुण जोडप्याचें

लग्न झालें. स्टेटहौस (राजमंदीर) नजीक ग्लोबटॅव्हर्न नांवाची प्रसिद्ध खाणावळ होती तेथील रीतभात चांगली असल्यामुळें तेथें या नवीन वधूवरांनीं राहण्यास जागा घेतली. हल्लींच्या विवाहित स्थितींत आपण किती सुखी आहोंत या बद्दल अब्राहाम यानें आपल्या स्नेह्यास एक पत्र लिहिलें होतें त्यांत " राहण्याची जागा आणि भोजनखर्च मिळून फक्त चार डॉलर आम्हांस साप्ताहिक द्यावे लागतात " असें लिहिलें होतें. अशा रितीनें भावी अध्यक्ष आपल्या विवाहित स्थितींत सुखानें अब्रूंत राहून संसार करूं लागला असून त्याची तरुण पत्नी खरोखरच हातखंडी बायको होती. ती मोठी विचारवंत असून प्रपंचाची टापटीप तिनें इतकी सुरेख ठेविली होती कीं आपल्या प्रियकराचे डोक्यांत जी विरक्तीची छाया पडली होती ती तिनें मोठ्या विलक्षण रितीनें अगदीं नाहींशीं केली. ' संतोषान्न सुखंपरं ' हें तत्व उभयतांच्या ही मनांत चांगलेंच बिंबलें असून ' अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणांतिकः " या उक्तीप्रमाणें आमरणांत त्यांचें निष्कपट प्रेम कायम राहिलें. या वधूवरांस तेथील लोक ' बाळबोध जोडपें ' असें म्हणत असत.

इ. स. १८४० मध्यें हारिसन याची निवडणूक झाली आणि त्यामुळें अब्राहाम यास मोठें समाधान वाटलें. या मोहिमेंत

झालेला वाद अतिशय कडाक्याचा होता. प्रजासत्ताक लोकांस शेवटीं दडपून टाकून प्रजापक्षी ( व्हिग ) अतिशय हर्षानें फुगले. ह्याच वादविवादांत प्रजासत्ताक लोकांस ' + लोको फोको ' असें थट्टेनें म्हणण्याचा प्रघात पडला. ह्या बद्दल अशी एक गोष्ट प्रसिद्ध आहे कीं इ० स० १८३४ सालीं प्रजासत्ताक लोकांपैकीं कांहीं मुख्य मुख्य मंडळी न्यूयार्कपैकीं टॅमनीहॉल येथें कांहीं मोठ्या राजकीय कामासाठीं एकत्र जमली होती. त्या दिवसांत ओढून पेटविण्याच्या काड्यांचा नवीन शोध लागून त्यांना ' लोको फोकोच्या काड्या ' असें म्हणत असत. सदरहू मंडळींतील प्रत्येकाजवळ ' लोको फोको ' च्या काड्या होत्या. आणि ज्याचें मत लाभांत पडत असें त्यानें ह्या काड्या खिशांतून काढून पेटवाव्यात असा कांहीं क्रम होता. अशा कांहीं कारणानें प्रजासत्ताक लोकांस ' लोको फोको ' असें म्हणत होते आणि या प्रजासत्ताक लोकांत जेव्हां आपसांतलें युद्ध माजलें तेव्हां सुद्धां अब्राहाम यानें त्यांना ' लोकोफोको ' हेंच नांव दिलें होतें.

ही मोहीम संपल्यानंतर अब्राहाम यानें हिंवाळ्याचे दिवस आपल्या प्रीयपत्नीसह मोठ्या सुखांत काढिले. दक्षिणेंत राजकीय सत्ता वाढत्या प्रमाणावर असल्या बद्दल तो हरहमेष वर्तमानपत्रांतून मजकूर प्रसिद्ध करीतच होता आणि कांहीं दिवसानंतर त्यानें या

---

+ लोकोफोको=घर्षण करून पेटविणारे.

विषयावर अती उत्तम भाषण केलें. याच हिवाळ्यांत वादविवादा-साठीं सभासदांचें संमेलन होत असतें त्यासाठीं त्यानें एक व्याख्यान लिहिलें त्यांत त्यानें असें सिद्ध केलें होतें कीं " या जगांत जें कांहीं आहे त्यांत नवीन असें कांहींच नाहीं. वस्तूंचा नवीन शोध असें जे कित्येक लोक म्हणतात तें अगदीं खोटें, कारण या अवाढव्य सृष्टिरचनेंत कोठेंतरी व केव्हांतरी त्या वस्तूचें अस्तित्व असलेंच पाहिजे. या वरून ' वस्तूचा नवीन शोध ' असें म्हणणें निरर्थक होय हें उघड आहे. " मुद्दाम एखादें कृष्ण कृत्य उपस्थित करण्याच्या हेतूनें हें व्याख्यान लिहिलेलें नसून योग्य वाटलें म्हणून खऱ्या हकिकतीला उद्देशून शांतपणानें लिहिलेलें होतें. तसेंच त्यानें ' मद्यपान निषेध ' या विषयावर व्याख्यान दिलें. या भाषणाची रचना मोठी गंभीर होती. अब्राहाम यानें आमरणान्त मद्य अथवा मद्यार्कांचें सेवन केलें नाहीं इतकेंच नव्हे तर त्याला मद्याचा वासही खपत नव्हता. मद्यापासून होणारे भयंकर परिणाम तो चांगले जाणत होता, म्हणूनच या घातुक व्यसनापासून तो फार दूर राहत असे. त्याचे सभोंवती अट्टल दारुबाज मंडळी जरी होती तरी त्यांचे वर्तणुकीचा अब्राहाम यास यत्किंचितूही संसर्ग लागला नाहीं, कारण त्याचा स्वभाव मोठा दृढनिश्चयी असे. त्याचा निश्चयी स्वभाव पाहून मद्यप्राशनाचे संबंधांत त्याच्या स्नेह्यांनीं त्याला भुरळ घालून त्याचें सत्व पाहिलें पण अब्राहाम यानें निश्चय सोडिला नाहीं. ' निश्चयाचें बळ तुका

ह्मणे तेंचि फळ ॥ या उक्तीला अनुसरून अब्राहाम याचा निश्चयी स्वभाव पाहून पुढें मंडळींनीं त्याला आग्रह करण्याचा नाद सोडून दिला. त्यानें इ. स. १८४२ च्या फेब्रुवारीच्या २२ वे तारिखेस स्प्रिंगफिल्ड येथें एका प्रेस* बिटॉरियन देवळांत समाजांतील मद्यपानाच्या रूढीवर व्याख्यान दिलें तें फारच मनोवेधक असल्यानें येथें थोडक्यांत दिलें आहे.

तो म्हणाला:—मद्यपानाची रूढि समाजांत शिरल्यानें सामाजिक स्थिति कशी आहे याचा आज विचार करावयाचा आहे. कोणत्या काळांत लोक मद्याचा उपयोग करूं लागले याची मी चौकशी केली नाहीं आणि ती चौकशी करणें अत्यावश्यकही नाहीं. या जगांत आपण सर्व राहतों त्यांना सध्यां इतकें जाणणें पुरें आहे कीं ज्या प्रमाणें जग जुनें आहे तसेंच मद्य पिण्याचा रिवाजही जुना आहे, म्हणजे जग आपण जसें फार दिवसापासून पाहत आलों तितक्याच मुदतीपासून मद्यप्राशनाची रूढिही आपण पाहत आलों आहोंत. जेव्हां आपण आपापल्या वयांत येऊन ज्ञानदृष्टीनें डोळे उघडून जगाकडे पाहूं लागलों तेव्हां मद्यप्राशनाचें अस्तित्व आपणांस दिसलें; प्रत्येकजणास तें मान्य आहे असें आपण जाणिलें, प्रत्येकजण त्याचा उपयोग करीत आहे हेंही आपल्या दृष्टोत्पत्तीस आलें आणि लाजून त्याचा कोणी तिरस्कार करीत नाहीं हेंही आपण पाहत आलों

* ख्रिस्ती धर्मांतील एका पंथाचें नांव आहे.

आहेत. साधारणपणें मद्य तान्ह्या मुलासही पाजतात तसें प्राणोत्क्रमणाच्या वेळींही मनुष्यास पाजीत असतात. ज्याला घरदार नाहीं अशा एकाद्या भटकणाऱ्या आगंतुकाच्या चोळवटलेल्या मळकट खिशांत सुद्धां मद्याची बाटली पाहण्यांत येते. वैद्यलोक, ' या रोगावर त्याचा उपयोग करा आणि त्या रोगावर त्याचा दुसरा उपयोग करा ' असें हरहमेश ह्मणून अनेक प्रकारच्या रोगांवर मद्याचा उपयोग करीत आले आहेत. सरकाराकडूनही लष्करांतल्या सोजिरांस व गलबतांतल्या खलाशांस मद्य पुरविण्यांत येत आहे. यंत्रांच्या योगानें-फिरविणें-उचलणें कांपणें-शेतांत काम करणें वगैरे यच्चावत् ठिकाणीं लोकांस या मद्याशिवाय अगदीं चालत नाहीं; त्याचप्रमाणें व्यापाराचे कामीं आणि कोणत्याही उत्तम पदार्थ तयार करण्याचे कामीं याचा चांगला उपयोग होत आहे. ह्या मद्याच्या उपयोगानें जे स्वतःचे सोपस्कर करीत आहेत त्यांना मोठे धाडशी आणि अनुदार समजतात. मद्य तयार करण्यासाठीं लहान आणि मोठे कारखाने सर्व ठिकाणीं निघाले असून लोकांनीं आपली मिळकत विकून पैसे कारखान्यांत लाविले आहेत; मद्यांनीं गाड्या भरून या गांवाहून त्या गांवास जात आहेत व गलबतें या मुलुखांतून त्या मुलुखांत आणि या राष्ट्रांतून त्या राष्ट्रांत जात आहेत. तात्पर्य सर्व लोकांस हें मद्य मान्य असल्यामुळें ते त्याचा उपयोग करीत आहेत."

इ. स. १८४२ च्या जून महिन्यांत मारटिन वॉन ब्युरेन हा नोकरी सोडून घरीं बसल्यानंतर त्याची आणि अब्राहामाची गांठ पडली. प्रजासत्ताकलोकपक्षाच्या माजी अध्यक्षाचा लोक अतिशय तिरस्कार करीत असत आणि या गृहस्थास अब्राहाम यानें प्रथमच पाहिलें होतें. मारटिन-ब्युरेन यास 'छोटा गारुडी' असे त्याचे अनुयायी लोक म्हणत होते. अब्राहाम याचे मताप्रमाणें त्याचा स्वभाव आनंदी व त्याचे वाणींत माधुर्य असल्यामुळें मनुष्यें त्याला वश होत होतीं इतकेंच नव्हे तर झाडावरचे पक्षीसुद्धां त्यास पाहून मोहून जात असत. अब्राहाम यानें त्यास अनेक प्रकारच्या गोष्टी, दंतकथा वगैरे सांगितल्या, आणि त्याचा स्वभाव व सभ्य वर्तन पाहून मारटिन यास मोठा संतोष झाला अशा रितीनें कांहीं दिवस एकत्र राहून ते आपापल्या उद्योगास निघून गेले. या भेटींत त्या उभयतांस जें सुख झालें तें ते कधींही विसरले नाहींत.

राष्ट्रीय सभेला जाण्याचें अब्राहाम याचे मनांत फार दिवसांपासून असून त्याची स्नेही मंडळी आणि प्रजापक्षीय लोक सुद्धां सँगामन प्रांतांतून जाण्यास तयार होते. इ० स० १८३९ पासून इ० स० १८५० पावेतों वेळोवेळीं सभा भरावयाची असून त्यांत कांहीं ठरीव विद्वान मंडळी यावयाची होती. एडवर्ड डी. बेकर याची इ० स० १८४३ सालीं निवडणूक झाली

असून त्यापूर्वी स्टिफन डोग्लस याची निवडणूक झाली होती आणि नंतर अब्राहाम लिंकन याची निवडणूक झाली. राष्ट्रीय सभेसंबंधी ज्या अनेक चळवळी झाल्या त्यांत अब्राहाम याच्या प्रामाणिकपणाची आणि मोठेपणाची प्रसिद्धी असल्यामुळेंच त्याची नेमणूक झाली. तो सर्व प्रांत प्रजापक्षी मंडळींनें भरला होता आणि नेमणूक होणें म्हणजे निवडणूक होण्याप्रमाणेंच होतें. इ० स० १८४२ साली अब्राहाम याचा खरा मित्र जान. जे. हार्डिन् याची निवडणूक झाली होती. परंतु पुढें मेक्सिकनच्या मोठ्या लढायांपैकीं ब्युनाव्हिस्टाच्या लढाईत तो मारला गेला.

— —



# प्रकरण ८ वें.

## राजकार्यधुरंधराचा उदयकाळ आणि सापत्न भावास त्याचें पत्र.



ब्राहाम लिंकन याचे संबंधी असें म्हणतात की तो जन्मःच राज्यनीतींत कुशल होता. राजकार्यांत हा एक भविष्यवादीच असून त्यानें राजकीय बाबतींसंबंधी वर्तविलेलीं बहुतेक भविष्यें खरीं ठरलीं. हेनरीक्ले आणि अब्राहाम लिंकन यांचें अती सख्यत्व असल्यामुळें एकमेकांच्या हृदयांत एकमेकांची मूर्ति जणूं काय प्रत्यक्ष वास्तव्य करीत होती. अशी उभयतांची स्थिति असल्या कारणानें हेनरीक्ले यास जेव्हां इलाख्याच्या निवडणूकींत अपयश आलें आणि त्याचे ऐवजीं टेनिसि येथील जेम्स पोल्क याची निवडणूक झाली तेव्हां अब्राहाम लिंकन याचें मनाचा अगदीं हिरमोड झाला; कारण कीं या मोहिमेंत 'आपण यशस्वी झालों ह्मणजे अमूक अमूक योजना करूं' असें अब्राहाम यानें धारलें होतें त्याप्रमाणें कांहींएक घडलं नाहीं. हेनरीक्ले याचे गळ्यांत अपयशाची माळ पडल्यामुळें प्रजापक्षी ( व्हिग ) लोकांची अगदीं हिंमत खचली आणि ते हताश होऊन लांब जाऊन राहिले. ज्यांनीं ज्यांनीं

हेनरीक्ले याचे लाभांत अभिप्राय दिले होते त्या सर्व लोकांच्या हृदयमंदिरांत त्याची मूर्ति प्रत्यक्ष वास करीत होतीच. हेनरीक्ले याच्या अपजयामुळें अब्राहाम याचे मनाचा ज्या मानानें हिरमोड झाला तेवढा मात्र कोणाच्याही मनाचा झाला नसेल. त्याचा अपजय होईल असें कोणासही वाटलें नाहीं, आणि अगदीं अकस्मात् असा प्रकार घडल्यामुळें सर्वांस दुःसह दुःख झालें. कालेंकरून अब्राहाम यास जेव्हां जेव्हां या अपजयाची आठवण होत गेली तेव्हां तेव्हां त्याला असें वाटावें कीं साऱ्या आयुष्यांत असें दुःख त्याला झालें नसेल.

तरीपण हेनरीक्ले याच्या स्वतःच्याच वर्तणुकीमुळें अब्राहाम याचा दुःखाग्नि कसा शांत होत चालला हें पुढील हकिकतीवरून सहज लक्षांत येईल. इ. स. १८४६ सालीं अब्राहाम यानें ऐकिलें कीं लेक्झिंगटन येथें हेनरीक्ले हा व्याख्यान देणार आहे. "क्ले" याची मूर्ति अब्राहाम याचे हृदयमंदिरांत सदैव वास्तव्य करीत असल्यामुळें ती मूर्ति प्रत्यक्ष पाहून आपले नेत्रांचें पारणें फेडावें असें योजून तो लेक्झिंगटन येथें गेला. 'अमेरिकेंत जे गुलाम गुलामगिरीच्या बंधनांतून मोकळे झाले असतील त्यांनीं आफ्रिकेंत येऊन नवीन वसाहत करावी' या विषयावर क्ले याचें भाषण व्हावयाचें होतें. प्रजासत्ताक राज्यांत वरील विषय त्यावेळीं अतिशय चित्ता-

कर्षक झाला होता. वक्त्याच्या मुखांतून जणूं काय अग्नीच्या ठिणग्याच बाहेर पडत आहेत कीं काय असें वाटत होतें. केंटकी येथें झालेलें सदरहु भाषण लोकांनीं निरुत्साहानें ऐकिलें असें अब्राहाम यानें पाहून त्याला फार वाईट वाटलें. हेनरीक्ले यानें अब्राहाम यास बोलाविल्यावरून मोठ्या दुःखानें तो त्याच्या भेटीस्तव गेला. उभयतांच्या भेटींत प्रतिकुळ संभाषणें झालीं असल्यामुळें अब्राहाम हा दुःखी कष्टी होऊन स्प्रिंगफिल्ड येथें परत गेला. हेनरीक्ले याच्या अशा वर्तनामुळें यापुढें फार सावधगिरीनें जगांत वागलें पाहिजे अशा प्रकारचा एक उपदेशच आपणास मिळाला असें त्यानें मानिलें आणि हा उपदेश तो आजन्म विसरला नाहीं. इ. स. १८४६ सालीं अब्राहाम याची राष्ट्रीय सभेंत नेमणूक झाली असून जे हेतू त्याला साधावयाचे होते त्यापैकीं एक हेतू साधण्याचें काम त्याचे अगदीं आटोक्यांत आलें. प्रजासत्ताक मंडळींत त्याची बरोबरी करणारा पिटरकार्टराइट नांवाचा धर्मोपदेशक असून योजिलेला विषय चांगला प्रतिपादन करण्याचे कामीं त्याची मोठी ख्याति होती. प्रजासत्ताक मंडळींत कार्टराईटच्या लाभांत इतरांपेक्षां पुष्कळ मतें पडतील असें वाटलें होतें. परंतु अब्राहाम याचेच लाभांत जास्त मतें पडल्यामुळें त्यानें विरुद्ध पक्षास थक्क करून सोडिलें. कार्टराइट पेक्षां अब्राहाम याचे लाभांत १६११ मतें जास्त पडलीं होतीं. वास्तविक पाहतां प्रजापक्षी ( व्हिग ) मनुष्याचे लाभांत इतकीं मतें पडणें अगदीं संभवनीय नव्हतें.

वादविवादाच्या सभेंत जेव्हां अब्राहाम यानें आदिस्थान पत्करलें त्यावेळीं समाजांत भाषण करण्यासाठीं त्याचे जवळ पुष्कळ सामुग्री होती. टेक्सस नांवाचें नवीन संस्थान संयुक्त संस्थानास लवकरच जोडण्यांत आलें; परंतु ही गोष्ट अब्राहाम लिंकन आणि प्रजापक्षी लोक यांना पटली नाहीं. लौकरच प्रजासत्ताक मंड-ळीस हें नवीन संस्थान संयुक्त संस्थानांस जोडून देण्यांत चांगलें यश मिळालें; यांत प्रजासत्ताक मंडळीचा इतकाच हेतू होता कीं हें नवीन संस्थान संयुक्त संस्थानास जोडल्यानें गुलामगिरी चालूं असलेल्या एका संस्थानाची त्यांत भर पडेल. गुलामगिरी चालूं असलेल्या संस्थानांच्या बळकटीसाठीं त्यांच्या संरक्षणार्थ कांहींतरी रामबाण उपाय राजकीय दृष्टीनें योजिलाच पाहिजे असें प्रजास-त्ताक लोकांचें म्हणणें होतें. या गुलामगिरीच्या जुलूमानें स्वतंत्र राज्यांतले सर्व दूरदर्शी आणि विचारवंत चांगली चांगली मंडळी अगदीं घाबरून गेली होती. संयुक्त संस्थानाच्या राज्यपद्धतीची दिशा बदलल्याशिवाय ही गुलामगिरीची घातुक पद्धत नष्ट होणार नाहीं असें अब्राहाम यास उघड दिसून आलें म्हणून तो अंतर्यामीं फार अस्वस्थ असून त्याच्या भाषणाचा मुख्य झोंक संयुक्त संस्थानाच्या सत्तेकडे होता.

ज्या राष्ट्रीय सभेंत अब्राहाम याची निवडणूक झाली ती तिसावी सभा असून इ० स० १८४७ च्या डिसेंबर मासचे ६

वे तारिखेस तो सभेंत स्थानापन्न झाला. संस्थानाच्या कायदे करणाऱ्या मंडळींत तो पुष्कळ वेळ सभासद होत असल्यानें त्याला सर्व मंडळी चांगल्या रितीनें ओळखत होतीं. त्यानें इलिनॉइसच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापावेतों लोकांशीं ऐक्य वाढऊन त्यांना आपलेसें केलें; मोठमोठालीं जाहिर भाषणें करून व प्रांतांतल्या मुख्य मुख्य सर्व नामांकित लोकांस वारंवार भेटून त्यांच्याशीं त्यानें उत्तम वळण ठेविलें, आणि सभेंत तो धारील तें करूं शकेल इतका चांगला त्यानें आपला पगडा बसविला. मोठमोठे अवघड प्रश्न कसे सोडवावे याची त्याला चांगलीच माहिती असल्यामुळें त्या संबंधी त्यानें चार चौघांत चांगलें विवेचन केलें, आणि देशाच्या इतिहासाची उत्तम माहिती करून घेऊन त्याचा चांगला अभ्यास केला. संयुक्त संस्थानांत एक नवीन संस्थानाची भर पडल्यामुळें एक मोठी लढाई उत्पन्न होऊं पाहत असून देशावर अगदीं आणीबाणीचे प्रसंग डोकावत आहेत असें त्याला वाटलें. नवीन संस्थानाची भर पडल्यानें सभेंतले आणि सभेच्या बाहेरच्या लोकांचे अभिप्राय चांगले नसून दुर्दैवानें प्रजासत्ताक राज्यावर एक मोठें संकटच ओढवलें आहे असें मोठमोठ्या लोकांस वाटूं लागलें होतें. या सर्व स्थितीची अब्राहाम यास फार बारीक माहिती होती. संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष जेम्सपोल्क असून मेक्सिकोसंबंधी प्रश्नाचा उलगडा तो अध्यक्ष होण्यापूर्वी झाला

नाहीं म्हणून तो फार नाउमेद झाला होता. त्यानें सभेला निरोप पाठविला कीं ' मेक्सिकोशीं लढाई करणें हें न्यायाचें असून ती लढाई अपरिहार्य आहे असें जें मी प्रतिपादन केलें तेंच खरें होय.'

अब्राहाम लिंकन यानें अध्यक्षाची उडालेली धांदल पाहून त्याजकडून खरी हकींकत काय आहे हें काढविण्याच्या हेतूनें स्थानापन्न झाल्यावर कांहीं ठराव त्याजपुढें मांडिले आणि त्या संबंधी त्याला माहिती विचारिली. अब्राहाम यास दुसरीकडे ज्या हकिकती पाठवावयाच्या होत्या त्या, अध्यक्षाकडून ज्या खऱ्या बातम्या निघतील त्यावर अवलंबून होत्या. वरील ठरावांपैकीं प्रथमचे तीन ठराव या खालीं दिले आहेत त्यावरून त्याचें धोरण लक्षांत येईल.

" संयुक्त संस्थानाच्या अध्यक्षास खालील माहिती देण्याविषयीं अत्यन्त नम्रतेनें अर्ज करावा.

(१) निदान इ. स. १८१९ चा तह झाल्यानंतर मेक्सिकोची राज्यक्रांति झाली त्या दरम्यान ज्या भूमीवर आमच्या नगरवासी जनांचा रक्तपात झाला ती भूमि स्पेनच्या हद्दींत होती अगर नव्हती ?

(२) मेक्सिको येथील राज्यक्रांतीमुळें जी हद्द स्पेनकडून बलात्कारानें ठरऊन घेतली त्या हद्दींत ही जमीन आहे किंवा नाहीं. ?

( ३ ) संयुक्त संस्थानांचें सैन्य येऊन पोंचण्याचे पूर्वींच टेक्ससचे नागरिक पळून गेले; त्या दरम्यान आणि टेक्ससच्या क्रांतीपूर्वी लोकांनीं केलेले जे ठराव पुष्कळ दिवस पर्यंत अस्तित्वांत होते त्या ठरावां-पैकीं एकाद्या ठरावांत त्या भूमीचा उल्लेख आहे किंवा नाहीं. ?'

वरील प्रश्नांचीं उत्तरें मिळालीं नसून एकाही प्रश्नाचें उत्तर मिळेल अशी आशाही बहुधा राहिली नव्हती. अध्यक्ष अगर त्याचे स्नेही यांपैकीं कोणीही वरील प्रश्नांचीं उत्तरें देण्याची जबाबदारी अंगावर घेतली असती आणि खऱ्या हकिकती ग्राह्य केल्या असत्या तर पोल्क ( अध्यक्ष ) यास आणि ज्यांनीं लढा-ईस अनुकूल मतें दिलीं होतीं त्यांचे पक्षास हार खावी लागली असती; अशा कारणानें प्रश्नांचीं उत्तरें न देतां त्यांनीं अब्राहाम याचें ' भूमिलिंकन ' असें निंदास्पद टोपण नांव कांहीं दिवस ठेऊन त्यांतच समाधान मानिलें. वरील तिन्ही ठरावांत ' भूमि ' या शब्दाचा विशेष ठिकाणीं उल्लेख असल्या मुळेंच वरील टोपण नांव ठेविलें होतें हें उघड दिसतें. त्या नंतर जानेवारी महिन्यांत जें भाषण झालें तें भारदस्तपणाचें होतें; आणि संयुक्त संस्था-नांस टेक्सस जोडल्यानें मेक्सिकोशीं निष्कारण घोर संग्राम होऊन देशांत रक्तपात करण्याबद्दल अध्यक्षाच्या दुराग्रहाचें कारण

काय या बद्दल कडक रीतीनें उलट तपासणी व्हावी असा त्या भाषणाचा रोख होता.

राष्ट्रीय सभेत " नामांकित " असेच सभासद नेमण्याची पद्धत होती. डानियलवेब्स्टर, लेविस्कॅस, जॉन. ए. डिक्स, टॉमस एच. बेंटन, जॉन. सी. कॉलहौन, जेफरसनडेविस, स्टिफन ऑरनॉल्ड डोग्लस आणि त्याशिवाय राजकार्यांत निपूण असे बरेच लोक *सिनेट मध्यें होते. माजी अध्यक्ष जॉन एडम्स, +कोलफॅक्स, जॉन. जी. पालफ्रे, राबर्ट. सी. विन्थ्राफ, ×अँड्यु-जॉनसन वगैरे मंडळी होती. रॉबर्ट टूंब्स याने दक्षिणेंत गुलाम बाळगिले असून बंकरहिलवर हाजरीपत्रकाप्रमाणें सर्व गुलाम हाजर आहेत किंवा नाहींत हें पाहण्यासाठीं एकत्र जमवावयाचे अशी प्रतिज्ञा केली होती. हावेल कॉब हा बंडखोरांच्या सैन्याचा जनरल झाला होता आणि या शिवाय पुष्कळ नामांकित मंडळी त्या भयंकर तुफानाचे दिवसांत होती. कायदे करणाऱ्या या विख्यात मंडळींत अब्राहाम याचें बुद्धिवैभव विशेष आहे असें सर्व समजत असून कालेंकरून अलेक्झांडर स्टिफन यानें अब्राहाम याचे संबंधी भाषण करितांना खालीं दर्शविल्याप्रमाणें उद्गार काढिले होते.

* राजमंत्री सभा. + कांहीं दिवसानंतर अब्राहाम याच्या मंत्री सभेंत यास सभासद नेमलें होतें. × अब्राहाम याची दुसऱ्या खेपेस निवडणूक झाली तेव्हां यास उपाध्यक्ष नेमलें होतें.

" ज्या समाजांत अब्राहाम भाषण करीत असे त्या समाजांतील लोकांचीं मनें याच्या भाषणामुळें इतकीं तल्लीन होऊन जात कीं सर्वांच्या चित्तवृत्या जणूं काय त्यानें बांधूनच टाकिल्या असाव्यात असें वाटत होतें. त्याचे भाषणाची व विचार करण्याची शैली स्वयंकल्पित असे म्हणजे दुसऱ्याची नकल करणें त्याला मुळींच आवडत नसे. कशाचाही नमूना म्हणून त्याचे जवळ मिळावयाचा नाहीं. तो दृढ निश्चयी मनुष्य असून कार्लाइलकडून खरोखरच याला ' सत्यशील ' अशीच पदवी मिळाली होती. त्याचे जवळ दंतकथेचा मोठा सांठा असून एखादी दंतकथा तो सांगूं लागला ह्मणजे जणूं काय तिचें प्रत्यक्ष चित्रच आपणा समोर रेखाटित आहे कीं काय असें वाटत असें; आणि समाजांत तो एकदां मिसळला ह्मणजे हांसून खेळून सर्वांशीं त्याचीं सारखी वागणूक असे. "

अब्राहाम जरी युवावस्थेंत आला असून हल्लीं तो राष्ट्रीय सभेंत होता तरी लहानपणाच्या कांहीं कांहीं खोडी अद्याप त्याच्यांत दिसत होत्या. अर्वाचीन काळीं नवीन झालेले सभासद ज्या मानानें वादविवादाच्या सभेस जात असत त्या पेक्षां अब्राहाम यानें जास्त वेळां वादविवादाच्या सभेस जाण्याचा क्रम चालू ठेविला होता. त्यानें जीं भाषणें

केलीं त्यांपैकीं कांहीं भाषणें छापून तीं दफ्तर खान्यांत ठेविलीं आहेत तीं वांचून पाहिलीं असतां त्याच्या खोडी दिसून येतील. उदाहरणार्थ-:जनरल लेविसकॅस संबंधी त्यानें भाषणांत दर्शविलें कीं " प्रतिबंधाशिवाय त्यानें कानडावर हल्ला केला आणि पाठलाग झाल्याशिवाय तो बाहेर निघून गेला; " तसेंच टेम्सच्या लढाईचे वेळीं तो स्वखुषीनें नोकरी करणारा असून जनरल हारिसन याचा मदतगार होता आणि तुम्ही ज्या अर्थीं इ. स. १८४० सालीं सांगितलें कीं ' जेव्हां लढाई झाली तेव्हां हारिसन हा दोन मैलांच्या अंतरावर बोरें वेंचित होता, या वरून हें उघड होत आहे कीं कॅस हा जनरल हारिसन यास बोरें वेंचण्याचे कामीं मदत करीत होता. "

मेक्सिको येथें जें युद्ध झालें त्याचे विरुद्ध अब्राहाम याचें मत होतें, आणि ज्यांचेवर लढाईची कोणतेही रीतीची जबाबदारी नसून जे समरांगणांत शूरत्वानें लढले अशा शिपायांना योग्य बक्षिसें देण्याबद्दल तो हमेश आपली संमती देत असे. कांहीं दिवसानंतर जेव्हां डोग्लस आणि अब्राहाम या उभयतांचे राजकीय विषयावर वादविवाद झाले त्या समयीं डोग्लस यानें, आपल्या देशाशीं अब्राहाम यानें द्रोह केल्याबद्दल, त्यास पुष्कळ दोष दिला. अब्राहाम यानें त्यास

उत्तर दिलें कीं :—“ मी एक जुना प्रजापक्षीय होतों व प्रजासत्ताक पक्षांतील लोकांनीं असें प्रतिपाद केलें कीं ‘ अध्यक्षानें मेक्सिकोशीं युद्ध आरंभिलें आहे तें योग्य रीतीनेंच आरंभिलें ’ अशाबद्दल मी मत द्यावें. तेव्हां मला तसें मत देणें बरें वाटलें नाहीं; परंतू त्यानें जेव्हां पैशाची मागणी केली अथवा ‘ जमिनीचीं अधिकारपत्रें द्या किंवा शिपायांस पगार वाटण्यास कांहीं तरी द्या ’ असे ते म्हणाले तेव्हां डोग्लसच्या मताप्रमाणेंच मी ही मत दिलें. ” प्रजापक्षीयांना मेक्सिकन युद्ध पसंत नव्हतें असें असून लोकमत प्रबल असल्यानें युद्धसामुग्री पुरविण्या बद्दल मत देणें त्यास भाग पडलें; व हें त्यांना फार कठीण गेलें ही गोष्ट वास्तविक असून ती आपणास गृहीत धरलीच पाहिजे. हें जरी प्रजापक्षीयांचें म्हणणें खरें होतें तरी अब्राहाम यानें मोठ्या आवेशानें आणि तिरस्कार बुद्धीनें प्रजासत्ताक लोकांचा अध्यक्ष सुद्धां मोठ्याच घोटाळ्यांत पडला असल्याबद्दल कळविलें. अध्यक्ष हें पक्कें समजून होता कीं आपलें म्हणणें खोटें आहे परंतु तें खरें आहे असें सिद्ध करण्यासाठीं त्याच्या धडपडी संबंधी बोलतांना अब्राहाम यानें कळविलें कीं तो कोठें होता हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं; ह्या वरून असें दिसतें कीं अध्यक्षास आपले पक्षाची खात्री नव्हती. चुलींतलीं पेटलेलीं लांकडें झाडलीं म्हणजे त्यांतील ठिणग्या जशा इतस्ततः उडतात त्याप्रमाणें त्याचें

मनाचा अतोनात गोंधळ उडाला असून कोणती बाजू धरली असतां स्वास्थ्य मिळेल हेंहीं त्याला सुचेंल नाहीं.

इ० स० १८४८ सालीं फिलाडेल्फीया येथें प्रजापक्षीय लोकांनीं टेलर याची नेमणूक केल्यानंतर प्रतिनिधींच्या सभेंत जें भाषण झालें त्यावरून टेलरपेक्षां क्ले जास्त लायक आहे असें दिसलें; परंतु वास्तविक रितीनें पाहिलें तर मेक्सिकन युद्धांत ब्युए-नाव्हिस्टा येथें टेलर यानें चांगलें यश संपादन केलें होतें. टे-क्सस आणि मेक्सिकोचे दरम्यान ज्या सरहद्दीबद्दल वाद होता त्या सरहद्दींतील रायोग्रांडे नदी पावेतों युद्धाचा मोर्चा न्यावा अशा बद्दल टेलरचें मत विरुद्ध होतें. टेलर हा अत्यंत उपयोगी मनुष्य असून त्याची नेमणूक यथार्थ झाली असें सभासदांचें आग्रहपूर्वक म्हणणें होतें परंतू क्ले याच्या मित्रांनीं ‘ उपयोगी ’ ‘ उपयोगी ’ हे शब्द तिरस्कार बुद्धीनें वरचेवर बोलून दाख-विले. ज्या प्रजापक्षी सभेनें टेलर याची नेमणूक केली होती त्या सभेस अब्राहाम हा प्रतिनिधि या नात्यानें आला होता. जनरल टेलर यास ‘ ब्युएनाव्हिस्टा येथील रणशूर योद्धा ’ असे त्याचें कौतूक करणारे लोक म्हणत असत, आणि या संबंधांत अब्रा-हाम याचें अनुकूल मत होतें. जनरल टेलर हा रीतीभातीनें अगदीं निर्भीड असून त्याची भाषण करण्याची पद्धत तुटक असे; त्याच्या अनुयायांनीं त्याला ‘ आबडधोबड ’ असें टोपण

नांव दिलें असून याच नांवाची प्रसिद्धि त्या मोहिमेंत चहूंकडे झाली होती. अब्राहाम हा टेलरचा शुभचिंतक असल्यामुळें त्याची निवडणूक होण्याचे संबंधांत अब्राहाम याची बालंबाल खात्री होती.

या हकीकतीवरून उभयपक्षांत द्वैत कसें उत्पन्न होत होतें हें उघड दिसून येतें. न्यूयार्क येथें प्रजासत्ताक पक्षांतून बार्न बर्नर्स हे गुलामगिरीच्या विरूद्ध झाले होते. टायलरच्या पक्षाचे लोक जॉन टायलरच्या तत्वाला अनुसरून चालणारे होते. जॉन टायलर याची जनरल हारिसनच्या जोडीला प्रजापक्षी लोकांकडून उपाध्यक्षाचे जागीं निवडणूक झाली असून हारिसनच्या मरणानंतर तोच अध्यक्ष झाला होता व आपल्याच पक्षांतले कांहीं लोक घेऊन तो त्यानंतर प्रजासत्ताक पक्षांत मिळाला. इ. स. १८४८ सालच्या आगष्ट महिन्यांत न्यूयार्क येथील गुलामगिरीच्या विरूद्ध असलेले प्रजासत्ताक लोक बफेलो येथें एकत्र झाले आणि एक कामदार नेमून 'फ्रीसॉइल' पक्षाची त्यांनीं स्थापना केली. या पक्षाचा असा कडकडीत बाणा होता कीं जेथें गुलामगिरी चालू असेल तेथून काढून न टाकतां त्याच ठिकाणीं मात्र चालू असूं द्यावयाची. ह्या नवीन पक्षाची अशी प्रवृत्ति होती कीं 'जो मुलूख त्यांचे मालकीचा आहे व यापुढें जो मुलूख त्यांचा होईल तो स्वतंत्र

असावा आणि ज्या संस्थानांत गुलामगिरी चालू असेल तेथेंच ती चालूं राहावी परंतु त्याचे बाहेर चालू असतां कामा नये; आणि संयुक्त संस्थानांतील प्रत्येक नागरिकास प्रत्येक विषयासंबंधी ( गुलामगिरीच्या विषयासंबंधीसुद्धां ) आपापले विचारतरंग स्वतंत्रपणें बोलण्याची मोकळीक असावी, गुलामगिरीच्या विरुद्ध जीं वर्तमानपत्रें होतीं तीं नाहींशी करून लोकांवर जुलूम करण्याचा उद्योग गुलाम बाळगणाऱ्या लोकांचा सारखा चालला होता. फ्रिसॉइल पक्षांतले लोक वादविवादांत, ' स्वतंत्र मुलूख– स्वतंत्र उद्योग आणि स्वतंत्र भाषण ' अशी मोठ्यानें गर्जना करीत असत. त्यांनीं मार्टीन वॉनब्युरेन ह्याला अध्यक्ष नेमून चार्लस फ्रान्सिस ॲडेम्स ह्याला उपाध्यक्ष नेमिलें. फ्रिसाइल पक्षांत पुष्कळ नामांकित लोक असून त्यांत कांहीं प्रजासत्ताक पक्षांतून येऊन मिळाले होते, कारण त्यांना संयुक्त संस्थानांत गुलामगिरीस अनुकूळ मत देणें आवडलें नाहीं. ह्या पक्षांत सालमन* पी. चेस, चार्लस् समनर, ×हेनरी, विल्यम क्युलन ब्रायन्ट, जॉन. पी. हाले (न्यूहॅम्पशायरचा सिनेटर) असे पुष्कळ विख्यात लोक होते.

---

* कांहीं दिवसानंतर हा स. संस्थानांच्या वरिष्ठ कोर्टाचा न्यायाधीश झाला. × कांहीं दिवसानंतर मॅसॅचुसेटसचे सेनेटर व नंतर प्रजासत्ताक पक्षाचे उपाध्यक्ष झाले.

अशा स्थितींत प्रजासत्ताक लोकांनीं लेविस कॅस याची अध्यक्षाच्या जागीं नेमणूक केली. ह्या गृहस्थानें टेम्सच्या लढाईत कांहींच पराक्रम गाजविला नाहीं व त्याला त्या युद्धाची आवडही कमीच होती; आणि जेव्हां प्रजापक्षी ( व्हिग ) उमेदवारांस रणशूर या नात्यानें मोठा सन्मान मिळाला आणि त्याचा सर्व लोकांनीं जयजयकार केला त्यावेळीं प्रजासत्ताक लोकांनीं कॅस याच्या गळ्यांत शूरत्वाच्या यशाची माळ पडावी म्हणून जो प्रयत्न केला तो सर्व ॥ मनसाचिंतितं कार्यं दैवमन्यत्तु चिंतयेत् ॥ या न्यायानें फुकट गेला. विल्यम एच. सिवर्ड* हा आपल्या एका भाषणांत टेलरची बाजू राखून म्हणाला " अमेरिकेंत स्वातंत्र्य आणि गुलामगिरी हीं दोन सामाजिक तत्वें परस्पर विरोधी आहेत व स्वातंत्र्याचा पक्ष स्वातंत्र्य असून तें सर्वांस संपूर्ण प्राप्त व्हावें अशा बद्दल अहोरात्र प्रयत्न करीत असतो. "

टेलरच्या तर्फे बोलणारा डानियल वेब्स्टर यानें असें आग्रहपूर्वक कळविलें कीं प्रजापक्षी हेच खरे फ्रिसॉइलर होत. अब्राहाम लिंकन यानें असें निश्चयात्मक कळविलें होतें कीं ' उत्तरेकडचा किंबहुना पश्चिमेकडील फ्रीस्टेटचा मी मनुष्य असून गुलामगिरीच्या प्रसाराच्या अगदीं विरुद्ध माझी प्रवृत्ति आहे ' राष्ट्रीय सभेच्या सभासदांस विश्रांति घेण्यासाठीं आगष्ट महि-

* कांहीं दिवसानंतर संस्थानांचा सेक्रेटरी व सेनेटर नेमिले होते.

न्यापासून सुट्टी असते. त्यामुळें अब्राहाम न्यू इंग्लंडास गेला आणि तेथें टेलरच्या ऐवजीं व्याख्यान देण्याचें काम पत्करलें. मूळ तत्व शोधण्या साठीं सूक्ष्म रितीनें विचार करणें, रस, तर्कशास्त्र या संबंधी त्याचे भाषणावरून चांगला बोध होत असे. प्रजापक्षी प्रमुख मंडळींशीं त्याचा फार जारीनें पत्रव्यवहार चालू असून त्यांत सल्ला मसलत आणि मोहिम सुरूं करणें, यांविषयीं तो त्यांना नेहमीं सुचना करीत असे. ह्या पैकीं कांहीं पत्रें तर अतिशय चित्तवेधक असून अब्राहाम याच्या विचार सरणीचें स्वरूप संपूर्ण रितीनें दाखवीत आहेत. न्युइंग्लड आणि न्युयार्क येथील आपलीं सर्व कामें संपवून तो एकदम इलिनॉईस येथें आला आणि तेथील वादविवादाच्या सभेंत मोठ्या उमेदीनें व उत्साहानें ( इ. स. १८४८ चे नोवेंबर मासांत निवडणूक होई पावेतों ) त्याचीं भाषणें सारखीं चालूच होतीं.

निवडणुकींत कितीं मतें कोणासंबंधी पडलीं त्याची जेव्हां मोजदाद झाली तेव्हां टेलर याचे संबंधी १३६०७५२, कॅस याचे साठीं १२१९९६२ आणि वॅानब्युरेन याचे साठीं २९१३४२ मतें पडलीं होतीं. या संबंधी आनंद प्रदर्शनार्थ ठिकठिकाणीं दीपोत्सव चालू झाले असून वर्तमानपत्रांतून प्रजापक्षी लोकां संबंधी मोठ्या ठळक अक्षरांचा मजकूर प्रसिद्ध होत असे. बराच भाग वर्तमानपत्रांतून कापून ते तुकडे जागजागीं

लावण्यांत आले होते. उत्तरेकडे लोकांची सर्वत्र सारखी समाधानवृत्ति दिसत होती कारण कीं टेलरची निवडणूक झाली म्हणजे गुलामगिरीचा प्रसार जास्त वाढण्याचें बंद होईल. असें त्यांना वाटलें होतें. फ्रिसॉइल पक्षाच्या सहाय्यानें प्रजापक्षी लोकांस जो जय प्राप्त झाला होता त्यामुळें एक अगदीं नवीनच पक्ष उद्भवण्याची तयारी असून या नवीन उद्भवलेल्या पक्षाकडूनच गुलामगिरीचा समूळ नाश व्हावयाचा होता; परंतु अब्राहाम लिंकन याच्या खेरीज इतरांस हें संभवनीय वाटत नव्हतें. वॉनब्युरेन याचेसाठीं जीं मतें पडलीं होतीं तीं बहुतेक प्रजासत्ताक लोकांकडून कॅस याचेसाठीं पडलीं असतीं तर कॅस याचीच निवडणूक झाली असती हें मात्र विसरतां कामा नये.

इलाख्याच्या निवडणूकीनंतर डिसेंबर मासांत राष्ट्रीय सभा जेव्हां पुनः भरली तेव्हां वस्तुस्थितींत अतिशय फेरफार दिसूं लागला. अब्राहाम आणि इतर प्रजापक्षी लोक उत्साही दिसत होते; आणि दक्षिणेकडील गुलामगिरीच्या हितासंबंधांत आपलें फार नुकसान झालें असें मानणारे प्रजासत्ताक लोक रागावलेले दिसत असून अगदीं निरुत्साही झाले होते. दक्षिणेंत जे त्यांचे प्रजासत्ताक पक्षांतले मित्र होते त्यांचा डाव साधून सूड उगविण्यास ते सिद्ध झाले होते. ह्यांपैकीं रूट हा एक असून तो ओहिओचा राहणारा होता. गुलामगिरी काढून

टाकावी आणि नवीन प्रांत कॅलिफोर्निया व न्युमेक्सिको ह्या दोन्ही ठिकाणीं राज्यव्यवस्थेंत कांहीं फेरफार करून सुधारणा करावी अशा संबंधी ठराव त्यानें सभेपुढें आणिला आणि त्यामुळें मोठी धामधूम चालू झाली होती. ज्या तहनाम्याच्या आधारानें मेक्सिकोशीं तंटा मिटला त्याच तहनाम्याच्या आधारानें दोन प्रांत मिळाले होते; आणि दक्षिणच्या लोकांस अशी आशा होती कीं ज्याप्रमाणें टेक्ससमध्यें गुलामगिरीचा प्रसार होत आहे त्याचप्रमाणें या दोन्ही प्रांतांतही होईल. स्लटचें हें मत दक्षिणच्या लोकांस आवडलें नाहीं. उत्तरेकडील फक्त आठ संस्थानांतील प्रजासत्ताक लोकांशिवाय सर्व प्रजासत्ताक लोक आणि उत्तरेकडील सर्व प्रजापक्षी लोक यांनीं स्लटच्या ठरावास संपूर्ण अनुकूल मतें दिलीं; परंतू अखेर गुलामगिरीच्याच लाभांत पुष्कळ मतें पडल्यामुळें एरंडाच्या गुऱ्हाळाप्रमाणें त्या ठरावाचा मुळींच अंमल झाला नसून कांहींएक निष्पन्न झालें नाहीं.

गुलामगिरीच्या संस्था निःसत्व आणि निर्बल व्हाव्या अशा बद्दल रुजूं झालेले सर्व ठरावांत अब्राहाम यानें जरी सभेंत चांगला पुढाकार पत्करला नव्हता तरीपण स्वातंत्र्यभक्त असे जे त्याचे स्नेही होते त्यांना तो गुलामगिरीचा उच्छेद करण्याबद्दल संमति देतच होता. प्रत्येक कामांत अब्राहाम मोठ्या सावधगिरीनें वागत असून या त्याच्या नेहमींच्या पद्धतीला अनुसरून इष्ट हेतु साधण्यासाठीं

तो संधि शोधीत बकासारखा टपून बसला होता. कांहीं दिवसानंतर त्यानें कोलंबिया प्रांतांत गुलामगिरीचा उच्छेद करण्याविषयीं एक नियमाचा मसुदा राष्ट्रीय सभेंत रुजूं केला. कोलंबियामध्यें न्यायाच्या मंदिरांत न्यायदेवतेच्या छायेखालीं राष्ट्रीय सभा देशोन्नति प्रीत्यर्थ आणि सार्वजनिक कामाकाजाचा खल करण्यासाठीं भरत असे, अशा ठिकाणीं गुलामगिरीस उत्तेजन देण्यासंबंधी व्यवहार चालावेत हें मोठें शरमेचें आणि निंदास्पद कृत्य होय असें त्यास वाटे; त्याचप्रमाणें वाशिंग्टन येथें गल्लोगल्लींतून हातबिडी घातलेले आणि सांखळीनें जखडून बांधलेले हारबंद दक्षिणेकडे जात असलेले गुलाम लोक पाहून अब्राहाम याचे कोमल हृदयाची स्थिति–पुष्पराशीवर अग्नि ठेविल्याप्रमाणें–होऊन शेवटीं त्याचे नखाची आग मस्तकास जात असे. सभेंतील प्रतिनिधि मंडळीचे कल कसे आहेत ह्याची प्रचिती पाहण्यास अब्राहाम यास ही संधि चांगली सांपडली होती. त्या नियमाच्या मसुद्यांत ठरविलें होतें कीः–( १ ) त्या प्रांता बाहेरला कोणीही मनुष्य गुलाम म्हणून धरला जाऊं नये. ( २ ) यापुढें कोणीही गुलाम बाळगूं नये व कोणासही गुलाम करूं नये; आणि ( ३ ) त्यावेळीं त्या प्रांतांत जे गुलाम असतील त्यांना गुलामगिरींतून मुक्त करण्यांत यावें; व अशा रितीनें मुक्त केलेल्या गुलामांचे जे मालक असतील त्यांना या संबंधांत झालेल्या नुकसानीबद्दल संयुक्त संस्थानांच्या सरकारांकडून योग्य मोबदला

मिळावा. ह्या नियमाच्या मसुद्यावर प्रथम त्या प्रांतांतील लोकांचीं अनुकूल मतें घेऊन नंतर तो कायद्याच्या रूपानें अमलांत आणावयाचा होता. ह्या नियमाच्या मसुद्याचें स्वरूप जरी इतकें उग्र नव्हतें तथापि कांहीं लोक त्याचे विरुद्ध होऊन शेवटीं भयंकर तुफान होण्याचें चिन्ह दिसूं लागलें. दक्षिणेकडील सभासदांनीं तर निश्चयच केला होता कीं ज्यामुळें गुलामगिरी निर्बल होईल असा कोणताही नियमाचा मसुदा सभेकडून मंजूर होऊं द्यावयाचा नाहीं. अब्राहाम याचा वरील मसुदा मत घेण्यासाठीं सभेपुढें आला नसून राष्ट्रीय सभेची बैठकही तहकूब राहून ती दुसऱ्या मितीस भरण्याचें ठरलें, आणि अब्राहाम याचे नेमणूकीची मुदत सरल्यानें तो परत इलिनॉइस येथें घरीं येऊन पोंचला. बारा वर्षांनंतर जेव्हां तो राष्ट्रीय राजधानींत येणार होता त्यावेळीं मात्र स्वतंत्र राज्याच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापावेतों गुलामगिरीचा उच्छेद होईपर्यंत तेथून हालावयाचे नाहींच असा त्याचा संकल्प होता.

इलिनॉइस परगण्यांत धाडसी आणि वजनदार प्रजापक्षीय लोकांचा विशेष भरणा होता म्हणून एकाच इसमाची राष्ट्रीय सभेंत लागोपाठ दोन वेळां नेमणूक त्या प्रांतांत करीत नसत; असें असून कोणी दुसऱ्यावेळीं नेमणूक होण्याचा प्रयत्न केला तर तो मार्ग गौण समजून लोक त्याला लोभी म्हणत असत.

अशा कारणानें दुसऱ्या निवडणुकीच्या वेळीं अब्राहाम हा उमेदवार झाला नव्हता. सॅरोगोर्डोच्या समरांगणांत यश संपादन करून एडवर्ड डी. बेकर हा नुकताच मेक्सिकन युद्धांतून परत आला असून अब्राहामानंतर याच इसमाची नेमणूक झाली. आपल्या साऱ्या आयुष्यांत अब्राहाम यानें फक्त पहिल्या आणि शेंवटच्या खेपेस नेमणूक करणाऱ्या अधिकाऱ्याकडे अर्ज केला होता या शिवाय त्यानें कधींही अर्ज केला नव्हता. टेलर याला अध्यक्ष नेमिलें असून त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें प्रजासत्ताक लोक कमी करून त्यांच्या सर्व जागा मोहिमेंत नोकरी करणाऱ्या प्रजापक्षीय लोकांस देण्यांत आल्या होत्या. सार्वजनिक सुधारणा कशा कशा कराव्यात या संबंधी अनेक तऱ्हेचे विचार अब्राहाम याचें मनांत घोळत होते, आणि त्याला जमीन मापण्याचा ही अनुभव चांगला असल्यामुळें आपण मुलकी खात्याचे मुख्य अधिकारी व्हावें अशी इच्छा उत्पन्न झाली; आणि या प्रमाणें मुलकी खात्यांत नेमणूक झाली म्हणजे संयुक्त संस्थानांतल्या जमिनीची विक्री व वांटणी करण्याचें काम त्याच्याकडेसच यावयाचें होतें. परंतु ह्या प्रयत्नांत अब्राहाम यास यश मिळालें नाहीं. त्यानें धारलेली जागा मिळाली नसून ऑरेगॉन परगण्याच्या सुभेदाराच्या जागेवर त्याची नेमणूक होण्याचें ठरलें. ह्यामुळें त्याच्या स्नेह्यांस फार आश्चर्य वाटलें आणि त्याच्याही स्वतःच्या मनाचा हिरमोड झाला. ही सुभेदाराची

जागा सुद्धां त्यानें नाकारली कारण ती त्याला पसंत नसून त्याला असेंही वाटलें कीं रॉकी पर्वताच्या बाजूस आपल्यास पुष्कळ काम असल्यामुळें ह्या जागेचें काम होणार नाहीं; शिवाय अब्राहाम याची बायको पासिफिक महासागराच्या किनाऱ्याकडे जाण्यासंबंधांत अगदीं विरुद्ध होती; पुढें पुष्कळ वर्षांनंतर जेव्हां तिचा नवरा अध्यक्ष झाला तेव्हां 'दूर प्रांतांतली सुभेदारी आपण पत्करीत होता परंतु मी तुह्मास संमति दिली नाहीं' या वाक्याची त्याला आठवण देण्यास ती विसरली नाहीं. ऑरेगॉन येथील सुभेदारी पत्करण्याचा हेतु असा होता कीं तो प्रांत लौकरच आपले पक्षांत येऊन तो ( अब्राहाम ) संयुक्त संस्थानांचा सेनेटर होईल; परंतु त्याच्या बायकोनें जेव्हां विरुद्ध मत दिलें तेव्हां त्यानें तो नाद सोडून दिला. पुढें असा कांहीं विलक्षण योग घडून आला कीं जेव्हां अब्राहाम हा अध्यक्ष झाला तेव्हां त्याचा स्नेही एडवर्ड डी. बेकर हा कॅलिफोर्निया मधून ऑरेगॉन येथें गेला आणि तेथून त्याची संयुक्त संस्थानांच्या सेनेटरच्या जागीं नेमणूक झाली.

अब्राहाम हा राष्ट्रीय सभेंत होता त्या मुदतींत ह्मणजे १८४७ च्या डिसेंबर मासापासून १८४९ च्या मार्च पावेतों त्यानें आपला मुक्काम स्प्रिंगफिल्ड येथें ठेविला होता; आणि त्याची बायको वॉशिंग्टन येथें राहत असून कधीं कधीं

त्याला भेटण्यास येत असे. सर्वांत वडील मुलगा रॉबर्टटॉड याचा जन्म तारीख १-८-४३ रोजीं झाला असून दुसरा मुलगा एडवर्ड बेकर याचा जन्म १८४६ च्या मार्चच्या १० व्या तारखेस झाला. तिसरा मुलगा विल्यम वालेस याचा जन्म १८५० च्या डिसेंबरच्या २१ व्या तारखेस झाला असून चवथा मुलगा टॉमस हा १८५३ च्या एप्रिल मासच्या ४ थ्या तारखेस जन्मला होता. ह्या चौघां मुलांपैकीं दुसरा बाल्यावस्थेंतच गत झाला. तिसरा मुलगा, अब्राहाम अध्यक्ष होता तेव्हांच मरण पावला. चवथा मुलगा मात्र बापाच्या पश्चात् राहिला परंतु तोही १९ वें वर्षीं मरण पावला. गारफिल्ड आणि आरथर ह्यांच्या हाताखालीं सर्वांत वडील मुलगा रॉबर्ट हा युद्ध खात्याचा सेक्रेटरी असून सर्व कुटुंबाचे पश्चात् यानेंच नांव चालविलें. राष्ट्रीय सभेंतून स्प्रिंगफिल्ड येथें परत आल्यावर अब्राहाम याचें कायद्याचें ज्ञान कमी झालें असल्यामुळें त्याला पुनः पहिल्यापासून आरंभ करावा लागला. परंतु राष्ट्रीय सभेंत काम करीत असतांना त्यानें चांगली अब्रू मिळविली होती, आणि त्याचा उद्योगी स्वभाव असल्यामुळें दृढाभ्यासानें तो कायद्याच्या विषयांत पुनः लौकरच चांगला निष्णात झाला. त्यानें स्प्रिंगफील्ड येथें एक घर खरेदी घेतलें असून तेथें तो सहकुटुंब राहत असे; आणि शेवटीं तो वाशिंग्टन येथें व्हाइटहौस राजवाड्यामध्यें राहण्यास गेला तोंपावेतों त्यानें स्प्रिंगफिल्ड सोडिलें

नव्हतें. घरची उत्तम रीतभात आणि जेथें कुटुंबांतल्या माणसाचें परस्परांवर अस्खलित प्रेम असतें त्या घरासारखें सुखी घरच नाहीं. स्वतःच्या मुलाबाळांत सदैव मिळून मिसळून राहण्यांत अब्राहाम यास मोठें भूषण वाटत असून त्यांत तो मोठा आनंद मानीत असे. आपल्या घरच्या माणसांवर तो कधींही संतापला नाहीं असें म्हणतात. मुलाबाळांचें त्याच्यावर फार प्रेम असे व हा आपल्या मुलांचे इतके लाड कां करितो याबद्दल कांहीं छिद्रान्वेषी मंडळीला मोठें आश्चर्य वाटत होतें; पण अब्राहाम यानें लहानपणीं गरिबींत खाण्यापिण्याच्या हाल अपेष्टा सोसून कसे दिवस काढिले याची त्याला आठवण होत असावी, व त्यामुळेंच तो हल्लीं मुलाबाळांवर विशेष प्रेम ठेवित असला पाहिजे असें वाटतें.

अब्राहाम लिंकनचा बाप टॉमस हा इलिनॉइस परगण्यांतील डिकेटूर गावीं राहत असून नंतर कोलस परगण्यांत जाऊन राहिल्यावर तेथें इ. स. १८५१ सालीं मरण पावला. मरणसमयीं त्याचें वय ७३ वर्षांचें होतें. अब्राहाम यानें आपल्या वडिलाची शुश्रूषा चांगली करून अखेरपर्यंत पितृप्रेम कायम ठेविलें. त्यानें आपला सापत्न बंधू जॉन जॉन्सन् यास एक उत्तम उपदेशपर पत्र लिहिलें त्यांतील मजकूर खालीं लिहिल्याप्रमाणें:—

" प्रियबंधू यासीः—मी परवा चार्लस्टन् येथें आलों तेव्हां मला असें समजलें कीं तूं ज्या जागेंत राहत आहेस ती जागा विकून मिसौरी येथें राहण्यास जात आहेस. माझें मनांत ह्या बद्दल विचार घोळतच होते म्हणून शेवटीं तुला स्पष्ट कळवितों कीं हा तुझा विचार निवळ मूर्खपणाचा आहे. येथल्यापेक्षां मिसौरीस जाऊन तूं काय जास्त फायदा मिळविणार ? तेथील जमीन जास्त सुपीक आहे असें तुला वाटतें काय ? तेथें तरी काम केल्याशिवाय गहूं वगैरे धान्य जास्त उत्पन्न होईल काय ? तुला जर काम करणेंच असेल तर मी तुला स्पष्ट सांगतों कीं हल्लीं आहेस त्यापेक्षां जास्त चांगली जागा दुसरी नाहीं आणि तुला काम करणेंच नसेल तर तूं कोठेंही गेलास तरी पळसाला पानें तीनच असणार. हिकडून तिकडे भटकल्यानें कांहीं एक तुझ्या हातून होणार नाहीं हें मी तुला सांगून ठेवितों. तूं चालू काम कांहीं एक न करितां उगाच एखाद्या खुशाल चेंडू प्रमाणें इतस्ततः उधळलास त्यामुळें धान्य उत्पन्न झालें नाहीं; व पैशाची अडचण पडली तेव्हां जमीन विकून ते पैसे उधळून टाकण्याचा तुझा हेतू दिसतो. जी जागा मी स्वतः अंगमेहनत करून तुला देवविली आणि ती तूं विकूं पाहत आहेस; तुला प्रतिज्ञेनें कळवितों कीं इतकी मोठी जागा तुला कधीं ही प्राप्त होणार नाहीं. त्या जागेची तुला हल्लीं फार तर अर्धी किंमत उत्पन्न होईल, त्यांतून मिसौरीस जाण्यास खर्च करशील आणि

बाकीचे सर्व पैसे खाणें–पिणें–राहणें–कपडे–लत्ते–वगैरेंत जाऊन कांहीं एक तुला राहणार नाहीं. अशा तुझ्या मूर्खपणाचे कृत्यांत मी आतां मुळींच लक्ष घालूं नये असें आतां मला वाटूं लागलें आहे, आणि तेंच माझें कर्तव्य आहे. पूर्वदिशेकडील ४० एकर जमीन मी मातोश्रीसाठीं तिचे हयाती पावेतों राखून ठेवितों; जरी तूं ही जमीन नांगरली नाहींस तरी ती खंडानें दिली असतां जें उत्पन्न होईल त्यांतून मातोश्रीचा निर्वाह चालेल. आतां या पत्राचा तूं भलताच अर्थ करून आपली गैर समजूत होऊं देऊं नकोस कारण मी कांहीं तें निष्ठुरपणानें लिहिलें नसून तूं सत्याचा मार्ग स्विकारून तुझें उत्तरोत्तर कल्याण व्हावें एवढ्याचसाठीं हें लिहिलें आहे. कोणता मार्ग सत्याचा हें मात्र तुला समजणार नाहीं कारण तूं आपला वेळ फुकट घालविलास व व्यर्थ आळशाप्रमाणें बसून राहिलास. तूं हजारों जरी सोंगें केलींस तरी त्यामुळें दुसरा कोणी ही फसणार नाहीं, परिणामीं तूंच ठकला जाशील हें पक्कें समज. " उद्योग कर " हेंच रामबाण औषध तुझ्या हल्लींच्या भयंकर व्याधीवर प्रयोजक होय. "

ह्या पत्रावरून अब्राहाम यानें आपल्या सापत्न भावाशीं कसा संबंध ठेविला होता हें सहज कळण्यासारखें आहे. ह्या पत्रावरून अब्राहाम याची स्वातंत्र्यभक्ति आणि स्वमताविषयीं निःशंकपणा हे गूण व्यक्त होत आहेत; आणि जसें हल्लींच्या तरुण मंडळीस परावलंबन पत्करून राहण्याची संवय असते

तसें अब्राहाम यास मुळींच आवडत नसून तो दुसऱ्यावर अवलंबून न राहतां स्वकष्टानें सर्व व्यवहार चालवीत होता. इतर कांहीं पत्रांवरून असें ही दिसतें कीं त्यानें स्वतःच्या सापत्न बंधूस चांगलीच मदत केली होती आणि ह्या पत्रावरून तर तो आपल्या सापत्न मातोश्रीसाठीं किती चिंता व काळजी वाहत होता हें स्पष्ट उघड होत आहे. ज्याप्रमाणें अब्राहामाचें त्यांच्यावर निष्कपट व अस्खलित प्रेम होतें तसेंच उलट त्यांचें याच्यावर नव्हतें; परंतू ते सर्व एकच असल्यानें अब्राहाम यानें यांचे संबंधी औदार्य व प्रेम दाखविणें हें त्यास मोठें भूषणास्पद होय. बाळपणापासून अब्राहाम यास उत्तम शिक्षण असल्यानें काटकसर कशी करावी हें तो चांगलें शिकला होता. कसें ही संकट येवो, कशी ही अडचण येवो, त्यानें आपल्या स्वाभाविक औदार्यास व मायाळू स्वभावास कलंक लागूं दिला नाहीं. त्याचे समकालीन इतिहासकार सांगतात कीं जी स्वतःची वृत्ति असेल त्याच वृत्तीला अनुसरून तो पैसे मिळवीत असे. ब्लॅकहॉकचे लढाईंत फक्त स्वखुषीनें नोकरी करणारा या नात्यानें त्याला एक पडतर जमिनीचा तुकडा मिळाला होता, व हीच कायती त्याची पुंजी होती. कालेंकरून तो जेव्हां वॉशिंग्टन येथें गेला त्यावेळीं त्याचे मिळकतीची मोजदाद झाली, त्यांत हल्लींच्या काळांत एखाद्या चांगल्या वकिलाची एका वेळची जेवढी फी असते त्यापेक्षां जास्त कांहीं त्याची मिळकत नव्हती असें कळलें. अब्राहाम यास कृपण असें कधींच कोणी म्हटलें नाहीं.

---

# प्रकरण ९ वें.

## " वकील " या नात्यानें त्याची प्रसिद्धी.



प्रामाणिकपणा हा सद्गुण अब्राहाम याच्यांत कायमचा असल्याबद्दल पुर्वीं कळविलेंच आहे. हा त्याचा आंगचा गूण लोकव्यवहारांत दिसून येत होता इतकेंच नव्हे तर राजकार्यांत व वकीलीच्या धंद्यांत त्याची या गुणाबद्दल मोठी ख्याति होती. कायद्याचें कामांतले पंच असोत अगर राजकीय विवादांतला श्रोतृसमाज असो, तरीपण विरुद्ध पक्षांचीं मतें कबूल करून आपल्या धोरणानें चालण्याबद्दल त्याची चांगली खात्री करून देणें जेवढें अब्राहाम यानें केलें तेवढें कोणत्याही अन्य मनुष्यानें केलें नसेल. वकील या नात्यानें तो एखादें काम कायदेशीर चालवीत असतांना प्रत्येक मुद्यावर तो असें सुरेख विवेचन करी कीं तें ऐकून जवळ असलेल्या लोकांची अतिशय त्रेधा उडत असे; आणि जेव्हां तो आपल्या बुद्धीच्या बळानें सर्व मुद्दे एकत्र करून ते प्रतिपादन करण्याचे कामांत विजयी होत असे त्यावेळीं सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटे; याचे वास्तविक कारण इतकेंच कीं कोणत्याही कामाची

संपूर्ण माहिती मिळवून त्याचें चांगलें मनन केल्याशिवाय तो काम चालवीत नसे. विरुद्ध पक्षाचा वकील कामाचे निर्बळ मुद्दे उघड करी पावेतों त्या मुद्यावर बोलण्याची तो मुळींच वाट पाहत नव्हता. ज्यांत पक्षपात मुळींच नसून सर्व समता आहे त्यालाच तो न्याय समजत असे; आणि प्रत्येक कामांत न्यायाचे तत्वावर त्याची मोठी श्रद्धा असून ही न्यायाचीं तत्वें त्यानें लोकांच्या मनांत चांगलींच बिंबवून दिलीं होतीं. प्रत्येक कामाचा शेवट आणण्यापूर्वीं तो त्या कामाचें मूळ कोठें आहे हें प्रथम शोधीत असे. त्याच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति अशी होती कीं एखादें काम चाललें असतांना त्या कामांत आपल्या लाभांतल्या गोष्टीचा फारसा विचार नकरितां प्रथम विरुद्ध पक्षाच्या हरकती काय काय आहेत याचें तो फारच सूक्ष्म रितीनें मनन करीत असे. प्रथम दर्शनीं पाहणाऱ्या लोकांस असें वाटे कीं निर्बळ बाबतींचाच तो फार विचार करित असतो. एखादी दुर्बोध, अवघड आणि यशाची खात्री नाहीं अशी गोष्ट असली म्हणजे त्यांत त्याला यश न आल्यामुळें मनाचा हिरमोड होऊन फार दुःख होऊं नये म्हणूनच तो अशा गोष्टींचा प्रथमपासूनच दुरवर विचार करीत असे. कप्तान डेविक्रॉकेट याचा ' तुझा पक्ष खरा आहे अशा बद्दल प्रथम खात्री करून घेऊन नंतर पुढें पाउल ठेवित जा ' हा उपदेश तो आजन्म विसरला नव्हता.

ज्या अर्थीं तो स्वतः प्रामाणिक होता त्या अर्थीं दुसऱ्याच्या अंगीं अप्रामाणिकपणाचा लेश दिसला कीं त्याला अगदीं सहन होत नसे. अन्यायी लोकांचें कपट व त्यांचीं दुष्ट कृत्यें पंचापुढें जेव्हां तो अक्षरशः मांडीत असे त्यावेळीं तो रागानें तांबडालाल होई. विरुद्ध पक्षानें पुढें आणलेल्या मुद्याकडे समोरच्या वकिलाचें लक्ष जाण्यापुर्वींच तो ते पुढें आलेले मुद्दे प्रथम हातांत घेत असे. जी गोष्ट लक्षांत येण्याजोगी असून पंचाच्या अज्ञानामुळें त्यांचें लक्षांत येत नव्हती ती त्यानें पंचापुढें मांडिल्यावर कधींही त्याला अपयश आलें नाहीं. या संबंधी एक लक्षांत ठेविण्यासारखें उदाहरण आहे तें असेः—कॅस नांवाचा एक वृद्ध मनुष्य होता त्याचे जवळून एक मोडका नांगर व बैल बर्फावर खेळणाऱ्या पोरांनीं विकत घेतले. पोरांजवळ पैसे रोख नव्हते ह्मणून त्यांनीं एक चिठ्ठी कॅस यास लिहून दिली होती. त्या चिठ्ठीचे पैसे पोरांकडून वसूल करून घेण्यासाठीं कॅस यानें अदालतींत दावा केला होता. मोडका नांगर व बैलाच्या जोडीचा माळ रानांतील जमीन नांगरण्याचे कामीं त्या काळांत फार उपयोग होत होता.बर्फावर खेळणारीं मुलें कायदेशीर रितीनें वयांत आलेलीं नव्हतीं. अदालतींत दावा झाल्यावर प्रतिवादीच्या वकिलानें कळविलें कीं 'ज्या वेळीं मुलांनीं चिठ्ठी लिहून दिली त्यावेळीं तीं कायदेशीर रितीनें वयांत आलेलीं नसून कायद्याप्रमाणें त्यांनीं चिठ्ठींत जो करार केला होता तो कायदेशीर

म्हणतां येत नाहीं आणि त्यामुळें वादीचा दावा चालू शकत नाहीं.

वादीतर्फे अब्राहाम यानें वकिलपत्र घेतलें असून मुलांनीं लिहून दिलेली चिठ्ठी त्यानें न्यायाधीशापुढें रुजू केली. मुलांनीं बैल घेऊन पैसे देण्याबद्दल चिठ्ठींत करार लिहून दिला ही गोष्ट न्यायाधीशानें ग्राह्य केली; आणि नंतर प्रतिवादीतर्फे वकिलानें 'चिठ्ठीवर मुलांनीं सही केली त्यावेळीं तीं कायदेशीर रितीनें वयांत आलीं नव्हतीं' असें न्यायाधीशापुढें सिद्ध करण्यास आरंभ केला.

"होय" अब्राहाम म्हणाला "माझें असें सांगणें आहे कीं आपण ती गोष्ट तूर्त ग्रहीत धरूं"

न्यायाधीशानें विचारिलें:–"बैल व नांगर यांची मोजदाद होऊन विकल्याबद्दल व घेतल्याबद्दल करारांत उल्लेख आहे किंवा कसें?"

अब्राहाम म्हणाला:--"होय; आपल्या कुळाचें वय किती आहे हें सिद्ध करण्यासाठीं प्रतिवादीच्या वकिलानें जो साक्षी बोलाविला आहे, त्यास मला एक दोन प्रश्न विचारणें आहेत."

अब्राहाम यानें साक्षिदारास विचारिलें:--"हल्लीं ती माळरान नांगरण्याची बैलाची जोड कोठें आहे?"

साक्षिदार:–"बर्फावर खेळणाऱ्या मुलांच्या शेतांत आहे."

अब्राहाम:–"अलीकडे ती बैलाची जोड उपयोगांत आणून जमीन कोणी नांगरल्याचें तुम्ही पाहिलें आहे काय?"

साक्षिदारः—"होय. कालच तीं मुलें जमीन नांगरीत होतीं."

अब्राहामः—"हल्लीं त्या मुलांचें वय किती आहे?"

साक्षिदारः—"त्यापैकीं एकास नुकतेंच एकविसावें वर्ष उलटलें आहे आणि दुसरा तेविशीच्या जवळ जवळ आहे."

अब्राहामः—"झालें. आतां मला कांहीं एक विचारावयाचें नाहीं."

त्या नंतर अब्राहाम यानें पंचास कळविलें:--"पंचांतील सभ्य गृहस्थहो! ह्या मुलांनीं स्वतःच्या बुद्धीनें वृद्ध बिचारा शेतकरी केस यास फसविण्याचा प्रयत्न कधींच केला नसता, परंतू वकिलानें सल्ला दिल्यामुळें हें कृत्य त्यांनीं केल्याचें दिसत आहे. अशी सल्ला देणें हें नीतीच्या व कायद्याच्या दृष्टीनेंही फार गैर असून अशा रीतीची फसवणूक कायद्याचे कामांत मुळींच चालणार नाहीं, आणि म्हणून प्रत्येक वकिलानें या संबंधांत फार सावधगिरी व धूर्तपणा ठेविला पाहिजे. या कामांत आपल्यास न्यायदृष्टीनें जी खरी गोष्ट वाटली असेल तीच आतां न्यायाधीश आपणास कळवितीलच; व मीही कळवितों कीं लहान मुलें जर हें पोरकट कृत्य करण्याइतकीं नीच असतीं तर वयांत आल्यावर त्यांनीं बैल व नांगर परत केले असते. करारविरुद्ध वर्तन करण्याची मुलांची इच्छा दिसत नाहीं आणि म्हणून चिठ्ठींत लिहिलेली सर्व हकीकत त्यांना कायदेशीर रितीनें

कबूल आहे हें उघड दिसत आहे." पंचांतले सर्व सभासदांनीं स्वतःच्या जागेवरून न उठतां अब्राहामचे लाभांत निकाल कळविला.

अब्राहाम यानें अदालतींत दुसरें एक काम चालविलें होतें त्यामुळें त्याची विशेष प्रसिद्धि झाली. या कामांत क्रामवेल नांवाचा इसम वादी असून बेली हा प्रतिवादी होता. कामाची हकिकत अशी होती कीं क्रामवेल यानें गुलाम म्हणून बाळगलेली एक नान्सी नांवाची सिद्दि जातीची मुलगी बेली नांवाच्या इसमास विकली. बेली जवळ रोख पैसे नव्हते म्हणून त्यानें एक मुदतबंदी चिठ्ठी लिहून क्रामवेल यास दिली. मुदत पुरी होतांच क्रामवेल यानें बेली जवळ चिठ्ठीच्या आधारानें रुपयाची मागणी केली, परंतु बेलीकडून रुपये न मिळाल्यामुळें त्यानें बेलीवर इलिनॉइस येथील टाझेवेल परगण्याचे अदालतींत दावा केला. या दाव्याचा निकाल बेलीच्या गैरलाभांत झाला; व त्यावर संस्थानांतील वरिष्ट अदालतींत अपील (विवाद) झालें. त्यांत बेली (अपिलेंट) तर्फे अब्राहाम यानें वकीलपत्र घेतलें असून त्यानें वरिष्ट अधिकाऱ्यापुढें अशी तक्रार आणिली कीं "इ० स० १७८७ च्या कायद्यांत ठरल्याप्रमाणें नान्सीची विक्री गुलाम या नात्यानें होऊं शकत नाहीं; कारण इ० स० १७८७ चे कायद्यांत उत्तर प्रांतांत गुलामगिरीचा धंदा करण्याची

मनाई केली आहे आणि इलिनॉइस हा ज्या अर्थी उत्तर प्रांताचाच भाग आहे त्या अर्थी तेथें मुलीची गुलाम म्हणून झालेली विक्री गैर कायदेशीर होते; शिवाय इलिनॉइस संस्थानांत सुद्धां गुलामगिरी बंद केल्याबद्दल ठराव प्रसिद्ध झाले आहेत." त्यानें आणखी असेंही जाहिर केलें कीं "मुदतीचे चिठ्ठींत मानवी जातीचें नांव स्पष्ट लिहिलें आहे आणि ज्याअर्थी इलिनॉइसच्या कायद्याप्रमाणें मानवी जातीची विक्री आणि खरेदी कायद्याला अनुसरून वर्ज्य झाली आहे त्याअर्थी ज्या चिठ्ठींत अशी विक्री व खरेदी लिहिली आहे ती चिठ्ठी रद्द समजली पाहिजे. स्वतंत्र संस्थानांत मनुष्य जातीची विक्री आणि अदलाबदल होऊं शकतच नाहीं." ज्या प्रश्नाबद्दल अब्राहाम यानें पुढें मोठा वाद-विवाद चालविला होता त्यासंबंधी कांहीं गूढ प्रश्न या कामांत गर्भित रितीनें गुंतले गेले होते. मनुष्य जातीस गुलाम म्हणून धरण्याचे संबंधांत इ० स० १७८७ सालचा नियम आणि राष्ट्रीय कायदा फार दूरवर विचार करून केला होता, आणि त्यामुळें अब्राहाम यानें हल्लीं जी तक्रार आणिली होती ती रास्त होती. त्याच्या म्हणण्याप्रमाणें वरिष्ट अदालतीनें खालच्या अदालतीचा ठराव रद्द करून 'बेली यानें करून दिलेली चिठ्ठीच गैर कायदेशीर आहे तेव्हां हें अपील काढून टाकिलें पाहिजे' असा, अब्राहाम याचे संपूर्ण लाभांत ठराव केला. हें काम मोठें महत्वाचें असल्यामुळें लोकांस याचें मोठें

नवल वाटलें. यावेळीं अब्राहाम याचें वय अवघें ३२ वर्षांचें होतें, आणि एवढ्या वयांत गुलामगिरीसारख्या मोठमोठ्या प्रश्नांचा खल करणें हें खरोखरच त्याचें प्रशंसनीय कृत्य होय. व या कामांत त्यानें मिळविलेल्या यशाबद्दल लोकांनीं त्याची फार प्रशंसा केली.

अदालतींतल्या दुसऱ्या एका कामांत अब्राहाम याचा संबंध असून तें कामही फार चित्तवेधक होतें कारण त्या कामाचें कायदेशीर स्वरूप जरी अगदीं बदललें होतें तरी तशा स्थितींत अब्राहाम यानें तें हातांत धरिलें. केंटकी पैकीं स्प्रिंगफिल्ड येथें एक वृद्ध स्त्री आपल्या मुलाबाळांसह हिंकल नांवाच्या एका इसमाचे ताब्यांत गुलाम या नात्यानें राहिली होती; कांहीं दिवसांनंतर हिंकल हा इलिनॉईस येथें आपल्या मुलामाणसांसह येऊन राहिला. इलिनॉइस हा स्वतंत्र मुलूख असून तेथें गुलामगिरी अगदीं बंद असल्यानें हिंकल यास आपले गुलामांस मोकळे सोडणें भाग पडलें आणि त्याप्रमाणें ते स्वतंत्रपणें फिरूं लागले. कांहीं दिवसांनंतर त्या वृद्ध स्त्रीच्या एका मुलानें आगबोटींत एक खोली संभाळण्याचें काम पत्करलें आणि तो मिसिसिपी नदींतून आगबोटी बरोबर सफर करण्यासाठीं चालता झाला. न्यूआर्लिन्स येथें तो किनाऱ्यावर उतरला परंतु अशा रितीनें तो निघून आल्यानें गुन्हा घडतो व त्यामुळें आपल्यावर खटला

होईल हें त्याच्या गावींही नव्हतें. त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें कोणीही गुलामगिरीचा डाग लागलेला मनुष्य मालकाच्या लेखी परवानगी शिवाय स्वतंत्रपणें फिरूं लागला तर त्याला पोलीस लोक धरून कोंडून ठेवीत असत, त्या अन्वयें त्या इसमास पोलीसानें धरून आपल्या अटकेंत ठेविलें; नंतर त्या मुलास कोंडवाड्यांतून बाहेर काढून त्याच्यावर कायद्याप्रमाणें काम चालून त्याला दंडाची शिक्षा झाली. ही हकिकत घडत होती त्या दरम्यान ज्या आगबोटींतून तो न्यूआर्लिन्स येथें उतरला होता ती आगबोट निघून गेली. आतां निरुपाय होऊन दंडाची रकम भरण्यासाठीं त्या मुलाची गुलाम या नात्यानें विक्री होऊन दंडाची रकम भरून घ्यावी लागली. तेथील एका दयाळू मनुष्यानें ही हकिकत त्या मुलाच्या आईस इलिनॉइस येथें ताबडतोब कळविली. हें ऐकून मुलाची आई फारच कष्टी झाली व अब्राहाम याजकडे जाऊन त्याला साग्र हकिकत जाहिर केली. अब्राहाम हा प्रसिद्ध वकील असून मुख्यत्वें करून या गुलामगिरीच्या हक्का संबंधांत चांगलाच प्रविण होता असें सर्व लोक उत्तम रितीनें जाणतच होते. अब्राहाम याला दया येऊन तो आपला भागिदार डब्ल्यु. हेरंडन याजकडे गेला, व ज्या स्वतंत्र सिद्दी मनुष्यास गुलाम या नात्यानें न्यूआर्लिन्स येथें वागवीत आहेत त्याला आपल्या घरीं आणण्यास कांहीं मार्ग आहे किंवा कसें असें तेथील सुभेदारास विचारावें असें आपल्या भागिदारास

कळवून व त्यास घेऊन न्यूआर्लिन्स येथें आला; आणि सुभेदारास ती हकिकत विचारली. तेथील सुभेदारानें कळविलें कीं ' येथील कायद्याप्रमाणें त्या गुलामास सुटण्यास कांहीं एक मार्ग नाहीं म्हणून या कामीं माझे हातून कांहीं एक होणें नाहीं. ' हें भाषण ऐकून अब्राहाम यास मोठा त्वेष चढला आणि तो आवेशानें म्हणला:–' परमेश्वराचे कृपेनें त्या सिद्द्यास मी लौकरच सोडवून आणीन. ' कांहीं दिवसांनंतर तो व त्याचा स्नेही वकील अशा उभयतांनीं गांठचे पैसे काढून त्या सिद्द्याचा दंड भरला आणि त्याला न्यूआर्लिन्स येथून सोडवून आणून त्याचे आईचे स्वाधीन केलें.

अब्राहाम याचा स्नेही एडवर्ड बेकर याजकडे परागंदा झालेल्या गुलामांचा ज्यांत निकट संबंध आहे असें एक अदालतीचें काम आलें. राजकार्यपटू या नात्यानें तें काम घेण्यास बेकर याची हिंमत होईना; परंतु अब्राहाम यानें मुळींच न डगमगतां तें काम आपल्या जबाबदारीवर पत्करून सिद्धीस नेलें.

जॅक आर्मस्ट्रॉंग आणि अब्राहाम यांचा स्नेह होता हें मागें कळविलेंच आहे. जॅक याचे मरणानंतर एके दिवशीं त्याची बायको अब्राहाम याजकडे येऊन रडूं लागली. अब्राहाम यानें कारण विचारिलें तेव्हां तिनें मोठ्या दुःखानें कळविलें कीं माझा मुलगा विल्यम आर्मस्ट्रॉंग याजवर खुनाचा खटला झाला

आहे तेव्हां अशा संकटसमयीं तुम्हावांचून आमचा कोणी त्राता नाहीं. अब्राहाम यास त्या खटल्याची मुळींच माहिती नव्हती परंतु विल्यमच्या आईनें सर्व खरी हकिकत त्यास समजाविल्या नंतर त्यानें तें काम पत्करिलें कारण त्याची खात्री झाली कीं विल्यम हा निरपराधी आहे.

सदरहू कामाची थोडक्यांत हकिकत अशी होती कीं विल्यम हा एके दिवशीं एका मारामारीच्या तंट्यांत सांपडून त्यानें एका तरूण मनुष्यास इतक्या वेगानें टोला दिला कीं त्यामुळें तो तरूण मनुष्य बेशुद्ध होऊन खालीं पडला व कांहीं वेळानें मरण पावला. याबद्दल रीतसर खटला होऊन काम चाललें त्यांत एका साक्षीदारानें कळविलें कीं ' चांदण्या रात्रीं विल्यम यानें टोला मारिला तो मी प्रत्यक्ष पाहिला. ' अब्राहाम यानें हें सर्व ऐकून घेतलें व विल्यमवर रचलेला हा कपटव्यूह पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. त्यानें न्यायाधीशास कळविलें कीं ' ज्या चांदण्या रात्रीं गुन्हा घडल्याबद्दल साक्षीदार म्हणतो त्या रात्रीं चांदणें मुळींच नव्हतें व त्याचे शाबितीसाठीं मी हें त्या सालचें पंचांग रुजूं करितों, या वरून आपली खात्री होईल. ' असेच दुसरे पुरावे अब्राहाम यानें आरोपीच्या लाभांत रुजूं केले त्यामुळें विल्यम हा सुटला. इकडे विल्यमची आई शोकानें विव्हल होऊन बसली होती तों तिला कोणी येऊन कळविलें कीं

' तुमचा मुलगा निर्दोषी होऊन सुटला, आतां कांहीं एक काळजी राहिली नाहीं ' हे शब्द ऐकतांच तिला अतिशय आनंद झाला व याबद्दल अब्राहाम याचे तिणें अत्यन्त अभार मानिले. कोणी अशी कंडी उठविली कीं अब्राहाम यानें बनावटी पंचांग या कामांत रुजूं केलें; परंतु त्याला जे लोक ओळखत होतें त्यांचे मतें अनीतीचा विटाळ अब्राहाम यास कधींच झाला नसून त्याचे हातून असें निंद्य कर्म होणें मुळींच संभवनीय नव्हतें.

अब्राहाम याची वकील या नात्यानें ही हकिकत लिहिलांना विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट अशी आहे कीं त्याची दुःखोत्पादक मृत्युवार्ता सरकारी रीतीनें जाहीर झाली तेव्हां ड्रूमॉड हे शिकागोचे न्यायाधीश असून त्यांनीं त्याचे संबंधांत खालीं दर्शविल्याप्रमाणें भाषण केलें. " मी आजपावेतों जे विद्वान् वकील पाहिले त्या सर्वांत अब्राहाम हा श्रेष्ट वकील असून तो अदालतींत काम चालविण्यास येत असे. त्याची वाणी फार मधुर असे परंतु एकदां खरोखर रागाचा आवेश चढला ह्मणजे मात्र ती अतिशय कर्कश असून कानाला गोड लागत नव्हती. वक्ता बोलण्यास उभा राहिला म्हणजे त्याचें स्वरूप चांगलें असावें लागतें परंतू अब्राहाम हा स्वरूपानें देखणा नव्हता. बाह्यात्कारी बुद्धीचें श्रेष्टत्व प्रगट करणें त्याला मुळींच आवडत नसे. इंद्रियज्ञानानें समजण्याची शक्ति त्याचे अंगीं

मोठी तीव्र नव्हती, तरीपण त्याचा मनोत्साह उत्तम व्यक्त होत असून त्याची विषयग्रहणशक्ति सुरेख आणि बेताची होती; तसेंच त्याची तर्कशक्ति अलौकिक असून तो दृढनिश्चयी होता. सर्व सनदी वकीलमंडळींत त्याच्या इतका प्रविण, धंद्यांत काबील आणि उत्तम वक्ता दुसरा कोणी नव्हता. अदालतीचें प्रत्येक काम वकील या नात्यानें तो अगदीं सरळ रितीनें व प्रामाणिकपणानें चालवीत असे. साक्षीदारासंबंधी मुद्दाम खोटा पुरावा रुजूं करणें अगर खोटी गोष्ट शाबीत करणें हें त्याचें हातून कधींच घडलें नाहीं. साक्षीदारांस तो न्यायाचे व रास्त प्रश्न असतील तेच विचारीत असून त्यांत तो बरोबर उत्तर नच देऊं शकला तर त्याचें म्हणणें त्यावेळीं तो ग्राह्य करीत होता. कायद्याची खरी बाजू लपवून ठेऊन न्यायाधीशाला आपले लाभांत कांहीं भासविण्याचा त्यानें कधींही प्रयत्न केला नाहीं"

अब्राहाम याचा कंठस्वर स्पष्ट व मधूर नव्हता आणि ज्याप्रमाणें एकाद्या कुलुपाची किल्ली उलटी धरून तोंडानें वाजविली असतां बारीक स्वर निघतो तसा त्याचा स्वर उंच चढत असे. साधारण संभाषणांत त्याच्या वाणीचा स्वर फारच मधुर निघत असून, शब्दोच्चारही स्पष्ट निघत असत. व्याख्यान देतांना एखादे वेळीं त्याला आवेश चढला म्हणजे तो मोठा भव्य

दिसून त्याचीं उंचीही अतिशय वाढलेली दिसत असे. संस्थानांत त्याची कीर्ति पसरल्यानंतर एके दिवशीं राजकीय वादाविवादाच्या पीठावरून संभाषण करीत असतांना एका पोक्त मनुष्यानें त्याचें आवेशयुक्त भाषण ऐकून म्हटलें 'कायहो! आवेशयुक्त भाषण करीत असतांना त्याची उंची वीस फूट दिसते' खरोखरच अशा स्थितींत अब्राहाम हा फारच ग्राम्य व अडाणी दिसत होता व याबद्दल त्याची सर्वत्र प्रासिद्धि होती. अशा स्थितींत त्याच्या नेत्रांतून ठिणग्याच पडत आहेत कीं काय असें दिसे. त्याचे मनांत दृढ प्रेरणा झाल्यानेंच त्याला आवेश चढून एवढा मोठा फरक त्याचे शरिरांत दिसत होता. सांसर्गिक रोगानें जसा एखादा मनुष्य काळा पडतो तद्वत् त्याचा चेहरा अगदीं कृष्णवर्ण दिसत असून तो ऐन तारुण्यांत होता तरी अकालींच त्यावर सुरकुत्या पडलेल्या दिसत होत्या. अर्धवट पारदर्शक अशा एखाद्या चंबूंत दिव्याचा प्रकाश पडतो तद्वत् त्याचे चेहऱ्यावर एक प्रकारचें तेज दिसत होतें. अब्राहाम यानें आजन्म शब्दोच्चार करण्याची पद्धत फार जुन्या रितीची ठेविली होती 'चेअर' या शब्दाचा उच्चार तो 'चिअर' आणि 'लेजिस्लेचर' याचा उच्चार 'लेजिस्लेटर' करीत असे. एखादा विषय सूक्ष्म रितीनें प्रतिपादन करीत असतांना

एखाद्यानें चूक काढिली तर तो हळूं हळूं ती कबूल करून हार खात असे; आणि नंतर तो अकस्मात् एक हिसका घेऊन चाकूच्या धारीप्रमाणें एकदम ताठ उभा राही. हें जरी तो सहजगत्या करी तरी ही त्याची पद्धत लोकांच्या चांगली लक्षांत राहत असे.

---



# प्रकरण १० वें.

## टॉमसचा मृत्यु. भयंकर चळवळ. लिंकन व डोग्लस.



गुलामगिरीचें बीजारोपण आतां या देशांत कायमचें झालें ' असें इ. स. १८५० सालीं पुष्कळ लोक खात्रीनें म्हणूं लागले. राष्ट्रीयसभेनें पुष्कळ नियम आणि ठराव केल्यामुळें सर्व सुरळीत होईल असें वाटत होतें परंतु गुलामगिरी चालूं असलेल्या संस्थानांत तसेंच स्वतंत्र संस्थानांत त्यापासून कांहीं एक उपयोग झाला नाहीं. या राष्ट्रीय सभेच्या ठरावामुळें ' मनुष्यमात्रास स्वतंत्रता असावी ' असें ज्यांस वाटत होतें ते लोक मात्र फार नाउमेद झाले. त्यावर्षी अब्राहाम आणि डब्ल्यु हेरंडन हे मार्गक्रमण करीत असतांना एके दिवशीं अब्राहाम यानें मोठ्या दुःखानें आणि खिन्नवदन होऊन खालीं लिहिल्याप्रमाणें उद्गार काढिले " एखाद्या देशांत न राहण्यापेक्षां तेथें राहून देशाचें कल्याण केल्याशिवाय मरण पावणें किती दुःखद आहे बरें ! ज्या बाबतीची ओरड सर्वत्र पसरली आहे त्याकडे लोकांनीं दुर्लक्ष करून निराश होऊन बसावेंना ! आतां काय करावें ? कांहीं करावयाचें उरलें आहे

काय ? कोणी कांहीं करूं शकेल ? आणि तो कोणत्या रितीनें करूं शकेल ? याबद्दल तुम्हीं कधीं तरी विचार करीत असतां काय ? ”

या वर्षी टॉमसलिंकन हा मरण पावला. वडिलाची प्रकृति दिवसानुदिवस थकत चालली असून अंथरुणावर पडून राहिले आहेत असें अब्राहाम यास कळलें होतें तरी पण त्याचे मागें पुष्कळ विवंचना असल्यानें तो अहोरात्र काळजींत होता आणि त्यामुळें वडिलास भेटण्यास तो जाऊं शकला नाहीं. आपले वडील आजारी असतांना अब्राहाम यानें एकदां आपल्या सावत्र भावास पत्र लिहिलें त्यांतील मजकूर येणें प्रमाणें:—

‘ अद्याप मला अशी आशा आहे कीं बाबांची प्रकृति पूर्ववत् चांगली होईल; परंतू त्या कृपाळु जगन्नियंत्या परमेश्वरावर श्रद्धा ठेऊन सदा सर्वकाळ त्याचें नामस्मरण करण्यास त्यांना प्रत्येक वेळीं सांगत जा, असें केल्यानें तो सर्व व्यापक त्यांना कधींही विसंबणार नाहीं. चिमणी कशी पडते व आपलें डोक्यांवर केस किती आहेत त्याची नोंध त्या परमेश्वराजवळ आहे आणि प्राणोत्क्रमणाचे वेळीं जो त्याचे श्रद्धापूर्वक स्मरण करितो त्याला तो कधींही विसरत नाहीं. बाबाला असा माझा निरोप कळीव कीं जर आपण आतां एकमेकांस भेटलों तर त्यापासून सुख होईल किंवा दुःख होईल याची मला मोठी शंका आहे;

परंतु दैवयोगानें जर त्यांना राम म्हणण्याची वेळ आली तर आपल्या प्रिय पूर्वजांची व त्यांची भेट होऊन त्यांना मोठा आनंद होईल व आपण जे शेष राहूं तेही सर्व परमेश्वराच्या कृपेनें हळूं हळूं त्यांचे भेटीस जाऊं.'

इ. स. १८५२ सालीं अब्राहाम यानें आपल्या संस्थानांतल्या प्रजापक्षी लोकांत निवडणूक करणाराची जागा पत्करली. या वेळीं प्रजापक्षी उमेदवारांस अपजय मिळाला आणि प्रजासत्ताक लोकांनीं नेमिलेला फ्रांकलीन पीयर्स हा पसंत ठरला. अब्राहाम यास जरी स्वतःच्या प्रजापक्षी लोकांनीं निवडणूक करणाऱ्याच्या जागीं नेमिलें होतें तरी त्यास तें पसंत नसल्यामुळें मोहिमेकडे त्याचें चांगलें लक्ष लागलें नाहीं; कारण गुलामगिरीचा विषय न बोलण्याबद्दल त्याला सुचना आली असल्यामुळें दुसरा कोणता विषय प्रतिपादन करून लोकांत चळवळ उत्पन्न करावी हेंही त्याला तावडतोब सुचलें नाहीं. नंतरच्या दोन वर्षांत अब्राहाम याच्या स्वाभाविक मनोवृत्तींत कांहीं विशेष जागृति उत्पन्न व्हावी असा कोणताच महत्वाचा प्रकार घडला नाहीं. संस्थानांतल्या वरिष्ट अदालतींत आपला वकिलीचा धंदा सरळपणानें व मोठ्या हुशारीनें तो चालवीत असे.

इ. स. १८५४ सालीं लोकांत मोठी चळवळ उत्पन्न झाली. स्वातंत्र्य आणि गुलामगिरी या दोन्ही विषयांसंबंधी आणखी

एकदा तंटा उपस्थित व्हावयाचा संपूर्ण रंग दिसत होता. इ. स. १८२० मध्यें मिसौरी येथें गुलामगिरीच्या प्रश्नासंबंधी आपसांत निकाल होऊन तंटा मिटला त्यांत असें ठरलें होतें कीं " मिसौरी ( गुलामगिरी चालू असलेलें संस्थान ) हें संयुक्त संस्थानास जोडावें, आणि उत्तर प्रांतात गुलामगिरीच्या धंद्यास मनाई असावी. हा ठराव इ. स. १७८७ च्या नियमान्वयेंच केला होता व ज्या वेळीं मिसौरी संस्थान सं. संस्थानास जोडलें त्यावेळीं तेथें गुलामगिरी चालू होती. जर मिसौरी हें ' स्वतंत्र संस्थान ' या नात्यानें सं. संस्थानांस जोडलें असतें तर तेथील सत्ताही स्वतंत्र संस्थानांतील सत्ते प्रमाणेंच कायम झाली असती. मिसौरीस जी सवलत दिली होती त्या वेळीं असें ठरून चुकलें होतें कीं त्याच्या उत्तरेकडील प्रांतांत गुलामगिरी कायमची बंद रहावी.

कँसस व नेब्रास्का हे दोन्ही नवीन प्रांत संयुक्त संस्थानांत मिसळून जाण्याच्या अगदीं बेतांत होते; वास्तविक्र पाहतां हे दोन्ही प्रांत मिसौरीच्या उत्तरेस असल्या मुळें इ. स. १८२० च्या ठरावांत त्यांचा समावेश झाला होता. स्टिफन ऑरनाल्ड डोग्लस हा इलिनॉइस येथून सेनेटर होऊन आला होता आणि कँसास व नेब्रास्का येथील गुलामगिरीच्या प्रश्नाचा निर्णय त्या दोनी प्रांतांतल्या लोकमता-

प्रमाणें करावा अशा आशयाचा एक नियमाचा मसुदा त्यानें सभेपुढें मांडला. ज्या ठरावाच्या आधारानें मिसौरी येथील तंटा आपसांत मिटून उत्तर प्रांतांतली गुलामगिरी बंद झाली होती त्या ठरावा बद्दल लोक फार शेखी मिरवीत होते; परंतु स्टिफनचा वरील मसुदा सदर ठरावास रद्द करण्या सारखा होता.

गुलामगिरी चालू असलेले संस्थान सं. संस्थानास जोडण्या संबंधी मोठ्या धारिष्टानें छाती ठोकून एकाएकीं दिलेल्या सव-लतीमुळें उत्तर प्रांतांत भयंकर चळवळ चालू झाली होती. मिसौरी संस्थानास मिळालेल्या सवलतीमुळें गुलामगिरीच्या व्यापारास गैरशिस्त लाभ मिळाला असें उत्तर प्रांतांतील लोकांस वाटूं लागलें. मिसौरीस दिलेली सवलत जर काढून घेतली असती तर त्या हद्दींत गुलामगिरीची जी भयंकर लाट उसळली होती तिची आडकाठी काढून टाकल्याप्रमाणें होणार असून मूळ तेरा संस्थानांचा जेवढा विस्तार होता तेवढा गुला-मगिरी चालू असलेल्या संस्थानांचा झाला असता. ही भयं-कर चळवळ चालू असतांनाच डोग्लसचा नियमाचा मसुदा इ. स० १८५४ च्या मे महिन्याच्या आठवे तारखेस राष्ट्रीय सभेनें अखेर मंजूर केला. ह्या हकिकतीच्या सन्मानार्थ वाशिं-ग्टन येथील मुख्य टेंकडीवर तोफेची मोठी सरबत्ती झाली.

ह्यामुळें उत्तरे कडील लोकांचा कोपाग्नि एकदम पेटला. स्वतःच्या जन्माचे स्वतंत्र हक्क नष्ट करून घेतल्याबद्दल डोग्लस याची चहूंकडे छीःथू झाली. डोग्लस यास असें वाटलें असेल कीं ' मी लोकसत्ताक राज्याचा अध्यक्ष होईन आणि गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांचा मला चांगला आश्रय मिळेल ' लोकनिंदेस मुळींच न जुमानितां त्यानें असें प्रतिपादन केलें कीं ' प्रत्येक समाजांत गुलामगिरी असावी किंवा स्वतंत्रता असावी याचा निर्णय लोकांच्या इच्छेवर अवलंबून असावा. ' डोग्लसच्या मित्रांनीं ' लोकांची राजसत्ता ' असें नांव प्रसिद्ध केलें व हें नांव राजकीय वादविवादांत या टोंकापासून त्या टोंकापावेतों गाजत होतें.

त्यानंतर वरील दोन्ही प्रांत स्वाधीन करून घेण्यासाठीं शर्यतीस प्रारंभ झाला. उत्तरेकडून पुष्कळ लोक तिकडे जाऊन स्वतंत्र सत्ता स्थापन करण्याच्या हेतूनें सदरहू नवीन प्रांत घेण्यासाठीं टपून बसले होते आणि गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून पुष्कळ लोक गुलामगिरीचा धंदा त्या नवीन प्रांतांत चालू करण्याच्या हेतूनें तेथें जाऊन राहिले होते असे लोक कॅंसास येथें पुष्कळ जमले होते; स्वतंत्र संस्थानांतले लोक पश्चिमदिशेचे बाजूनें जवळ येऊन राहिले होते. मिसौरी आणि अर्कान्सस हीं दोन गुलामगिरीनें व्यापिलेलीं संस्थानें असून

तेथील गुलामगिरी कायम राहण्यासाठीं दृढनिश्चयानें सरहद्दीवर लोकांचे थवेच्या थवे एकत्र जमले होते. राष्ट्रीय सभेकडून नियमाचा मसूदा मंजूर होतांच ह्या चळवळीस प्रारंभ झाला. तीन मास, ह्या चळवळी चालू होऊन झाले नाहीं तोंच ' स्वतंत्र संस्थानांतील लोक ' आणि ' भावी गुलामगिरी चालू करणारे लोक ' ह्या दोनी नामाभिधानांची सर्वत्र अतिशय चर्चा झाल्यानें पश्चिमेकडील आबालवृद्धांस तीं चांगलींच माहित झालीं होतीं.

अब्राहाम हा आपल्या नेहमींच्या धंद्यांत शांतपणें गुंतला होता परंतू आसपास काय हकिकती घडत आहेत याबद्दल तो फारच सावधगिरी नेहमीं ठेवीत असे. प्रजापक्ष जरी दुर्बळ होत चालला होता तरी तो प्रजापक्षांतच राहिला असून या पक्षाच्या अवशिष्ट राहिलेल्या दुर्बळ भागापासूनच एक प्रकारची उत्तम व कायमची व्यवस्था लागावयाची होती, आणि या नवीन व्यवस्थेचा पुढाकारही अब्राहाम याजकडेच यावयाचा होता.

उत्तरे कडील लोक खवळून जाऊन ओरड करीतच होते; त्यांची ओरड ऐकून मोठमोठ्या सरदार लोकांस फार आश्चर्य वाटलें आणि राष्ट्रीय सभेची बैठक आगष्ट महिन्यांत होणार असल्यानें ते सर्व त्वरेनें आपापल्या घरीं गेले. डोग्लस हा उत्तरे कडील मनुष्य असून दक्षिणच्या लोकांत मिसळला हें

पाहून उत्तरे कडील लोक त्याच्यावर अतिशय संतापले होते व त्यामुळें तो अगदीं भिऊन गांगरल्या सारखा झाला होता. लौकरच तो इलिनॉइस येथें येऊन पोहोंचला कारण त्याची अशी संपूर्ण खात्री होती कीं ' आपण मोठ्या धारिष्टानें आपल्या कपटपटुत्वाचें तर्कशास्त्र आणि पोकळ पांडित्य लढवू व त्यामुळें कॅनसास–नेब्रास्कासंबंधी नियमाच्या मसुद्यामुळें, वाईट परिणाम घडतील असे लोक धारीत आहेत तसे खास होणार नाहींत; ' हा हेतू साधण्यासाठीं प्रथम तो शिकागो येथें बरेच दिवस राहिला परंतू त्यानें धारल्या प्रमाणें त्याचें म्हणणें कोणी ऐकिलें नाहीं. तेथील भिंतीवर त्यानें आपल्या अगदीं विरुद्ध जाहिरनामे डकविलेले पाहिले आणि आपणास अनेक प्रकारें धमकी देऊन अपशब्दांचा वर्षाव आपल्या डोक्यावर होत आहे असें त्याला दिसलें. लोकांनीं त्याचें तोंड अगदीं बंद केलेलें होतें आणि त्यामुळें तावडतोब त्याला स्प्रिंगफिल्ड येथें जाणें भाग पडलें.

इ. स. १८५४ च्या आक्टोबर महिन्याच्या प्रारंभीं संस्थानांतल्या लोकांचें शेतकीच्या विषयासंबंधी एक मोठें संमेलन होत असें. लोकांचें हें संमेलन स्प्रिंगफील्ड येथें होत असून तेथें इलिनॉइसच्या प्रत्येक भागांतून पुष्कळ लोक एकत्र व्हावयाचे होते. डोग्लस यास ही संधि मोठी अनुकूल वाटून त्यानें

ती मोठ्या उमेदीनें साधण्याचा निश्चय केला. ह्या संमेलनास पुष्कळ लोक एकत्र जमले असून कँसासनेब्रास्कासंबंधी मसुदा मोठ्या न्यायाचा असून लोकांच्या हिताचा आहे अशा मजकुराचें व्याख्यान डोग्लस देणार आहे अशी तेथें सर्वत्र कंडी पसरली. सर्वांचे एकमत झालें असून एकंदर मंडळीचे डोळे अब्राहाम याजकडे एकसारखे लागले होते, कारण इलिनॉइसहून आलेल्या अशा उद्धट व लाघवी सेनेटरास प्रत्युत्तर देण्यास तोच ( लिंकन ) लायक व उत्तम वक्ता होता. ठरलेल्या दिवशीं अब्राहाम येऊन पोंचला व डोग्लस यानें एकमत झालेल्या अशा संमेलनांत आपलेंच मत स्थापन करण्यासंबंधी भाषण चालू केलें. अब्राहाम व डोग्लस हे उभयताही बुद्धिवान असून मोठे धिप्पाड होते; त्यांच्यांत चालू झालेलें वाग्युद्ध पाहण्यास जे लोक जमले होते ते त्यांना संपूर्ण रितीनें ओळखत होते. पश्चिमेकडील प्रजासत्ताक ( डेमोक्रॅटीक ) लोकांचा तो पुढारी असून उत्तरे-कडील त्याच्या पक्षांतील लोकांचा तो मुख्य होता व त्यामुळें ते ' डोग्लसचे प्रजासत्ताक लोक ' असें स्वतःला म्हणूं लागले. तो स्वमतनिष्ठ, स्वेच्छाचारी, तामसवृत्तीचा व उद्धट असून कपट-विद्या व राजकीय कृति यामध्यें परिपूर्ण होता. संस्थानांतल्या कित्येक भागांत त्यानें पुष्कळ भाषणें केलीं होतीं परंतू त्या-पासून काहींएक उपयोग झाला नाहीं. हा त्याचा एक भगिरथ प्रयत्नच होता परंतू तो सर्व फुकट गेला.

दुसऱ्या दिवशीं अब्राहाम यानें डोग्लस यास उत्तर दिलें. अब्राहाम याचें हें भाषण लक्षांत ठेविण्याजोगें होतें. त्यानें आपल्या नेहमींच्या प्रामाणिकपणाच्या पद्धतीनें कळविलें कीं 'जी अगदीं खरी हकिकत असेल तीच मला निदर्शनास आणावयाची आहे; आणि या खऱ्या हकिकतींत जर डोग्लस यानें कांहीं योग्य चूक दाखविली तर याच ठिकाणीं ती मी मोठ्या खुषीनें कबूल करून सुधारीन.' अब्राहाम याचें भाषण चालू असतांना डोग्लस यानें मध्येंच त्याला अडथळा करून थांबवावें, अप्रासंगिक प्रश्न विचारावेत, आणि त्याचें भाषणांतला चालू मुद्दा फिरवून टाकण्याचा प्रयत्न करावा अशा रितीनें त्यानें आपला हेतू साधून घेतला. शेवटीं या त्रासानें अब्राहाम खवळला आणि म्हणाला :—'सभ्य गृहस्थ हो! अशा रितीनें अडफांटे घालण्यांत व पांचपेचाच्या बाबतींत वेळ फुकट घालविण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं, जें सत्य असेल तेंच मी प्रतिपादन करण्याचें पत्करतों. डोग्लस यानें माझ्या चुका अशा अप्रासंगिक रितीनें सुधारण्याचें जें काम चालू केलें आहे तें आतां बंद करावें. अडथळा न होतां बोलण्याची त्यास परवानगी मिळाल्यावर त्यानें (लिंकन यानें) तीन तास आणि दहा मिनिटें पर्यंत अव्याहत भाषण केलें; हें भाषण सर्वांची खात्री होईल असें असून तर्कशास्त्राचें विवेचन त्यांत फारच उत्तम रितीचें केले होतें; शिवाय

त्यांतील खऱ्या हकिकतींचें व मुद्यांचें वर्णन करण्याची शैली फारच सुंदर होती. शेवटीं सिंहाप्रमाणें अब्राहाम हा अतिशय खवळला आणि डोग्लस याचें अप्रमाणिक आणि तिरस्कारयुक्त वर्तन पाहून त्याचा कोपाग्नि तर विशेष भडकून त्यानें जोरदार भाषण केलें. त्यावेळीं श्रोतृसमाज तल्लीन होऊन गेला होता. स्प्रिंगफिल्ड येथील एका वर्तमानपत्रांत अब्राहाम याचें भाषणावर टीका आली होती. त्यांत लिहिलें होतें कीं:— ' अब्राहाम हा मनोविकारामुळें इतका सद्गदीत झाला कीं त्याचें अंगांत हुडहुडी भरून अंतःकरणांत एका प्रकारचें स्फुरण उत्पन्न झालें. त्यास्थळीं जिकडे तिकडे शांतता व स्वस्थता दिसत होती. ' नियमाच्या मसुद्याविरुद्ध इतक्या उमेदीनें व उत्साहानें तो बोलला कीं मसुद्याचे तुकडे तुकडे करून हवेंत फेंकून देईल कीं काय असें सर्वत्रांस वाटलें. नियमाचे मसुद्या विरुद्ध एक बलाढ्य शत्रु उत्पन्न झालेला पाहून लोकांस फार आश्चर्य वाटलें. या कामीं त्याला चांगलें यश आलें आणि ' सत्याचा विजय, सत्याचा विजय ' असा हर्षोत्पादक ध्वनि जिकडे तिकडे फार वेळ पावेतों ऐकू येऊं लागला. तेथें जमलेल्या सर्व स्त्रिया तिकडील रिवाजाप्रमाणें आपापली संमति आहे असें मोठ्या आनंदानें प्रदर्शित करण्यासाठीं स्वच्छ पांढरे रुमाल हातांनीं इतस्ततः हालवूं

लागल्या. नियमाचा मसूदा किती मूर्खपणाचा होता आणि त्यांत काय काय कपट होतें तें सर्व लोकांच्या निदर्शनास आणिलें आणि जेव्हां त्याचे ( मसुद्याचे ) तुकडे तुकडे करून हवेंत फेंकण्यासाठीं हातांत उंच धरिले तेव्हां वक्त्याचे मुखावर आणि सर्व श्रोतृसमाजांतील मंडळीच्या मुखावर एक प्रकारच्या तिरस्काराची झुळूक स्पष्ट दिसत होती. सर्वत्रांची अशी पूर्ण खात्री झाली कीं अब्राहाम यानें जें भाषण केलें त्याला प्रत्युत्तर देण्यास आतां कोणीच समर्थ नाहीं. सर्वत्र मंडळींनीं अब्राहाम याचा पुन्हा एकवार मोठ्यानें जयजयकार केला आणि श्रोतृसमाजास असें वाटलें कीं अज्ञानांधःकाराचा समूळ नाश करण्यासाठीं लिंकन हा प्रत्यक्ष भानूच पृथ्वीवर उगवला आहे कीं काय ?

अब्राहाम याचें हें जें प्रसिद्ध भाषण झालें त्यांत कांहीं कांहीं बाबती इतक्या उपयुक्त होत्या कीं त्या अद्याप ''म्हणी' म्हणून लोकांत चालू आहेत गुलामगिरीच्या प्रश्नाचा निकाल लोकांच्या मतावरच अवलंबून असावा असें जें डोग्लस यांचें मत होतें त्याच मताच्या घमेंडींत तो राहिला. त्यानें असें प्रतिपादन केलें कीं ' कॅन्सास आणि नेब्रास्का येथें जे लोक येऊन वसाहतीस राहिले त्यांना गुलामगिरीच्या प्रश्नाचा निकाल तुमचे मतावर अवलंबून नाहीं असें सांगणें व तुम्ही

सत्ता चालविण्यास समर्थ नाहीं असें म्हणणें हा त्यांचा एक प्रकारचा मोठा अपमान केल्यासारखें होणार आहे. याचें उत्तर अब्राहाम यानें दिलें तें अत्यंत महत्वाचें व लक्षांत ठेविण्याजोगें आहे. तो म्हणालाः—"मी कबूल करितों कीं, 'कॅनसास आणि नेब्रास्का येथें जो वसाहत करण्यास आला तो स्वतःवर सत्ता चालविण्यास समर्थ आहे खरा परंतू—( इतकें सांगून वक्तयानें एकदम ताठ उभें राहून आपली खरी उंची प्रगट केली व म्हणाला ) एखाद्या मनुष्याच्या संमतीशिवाय त्याच्यावर सत्ता चालविण्याचा मला हक्क आहे असें जर वसाहत करणारा म्हणेल तर ती गोष्ट मात्र मला मुळींच कबूल नाहीं हें मी निक्षून सांगतों." या एकंदर हकिकतींत हा मुद्दा फारच मार्मिक होता. 'लोकांची राजसत्ता' या संबंधी जो डोग्लस यानें खोटेपणाचा आभास दाखविला तो मात्र वरील मुद्यामुळें स्पष्ट दिसला. गुलामगिरी चालविण्यांत स्वाभाविक अन्याय व दुष्टपणा आहे असें डोग्लस ग्राह्य करीत नव्हता, परंतू अब्राहाम यानें तर प्रतिज्ञेवर कळविलें कीं गुलामगिरी चालू करणें हा निवळ अन्याय आहे इतकेंच नव्हे तर दुष्टपणाचा कळसच समजणें रास्त होय.

अब्राहाम यानें कांहीं दिवसानंतरच्या वादविवादांत जें प्रतिपादन केलें तें सर्व लक्षांत घेतलें असतां या दोघांचें वास्तविक काय म्हणणें आहे त्याचा आपणांस उत्तम बोध होईल; अब्राहाम याचें म्हणणें निःसंशय न्यायाचेंच होतें; तो म्हणाला

' डोग्लस याचें असें म्हणणें आहे कीं राजसत्ता सिद्दि मनुष्यासाठीं नसून गोऱ्या मनुष्यासाठींच आहे. होय! मलाही वास्तविक पाहिलें तर तसेंच वाटतें; परंतू न्यायाधीश डोग्लस याच्या वरील प्रतिपादनांत कांहीं विशष अर्थ आहे, आणि नेब्रास्का प्रकरणांत जी त्यानें ढोबळ चूक केली आहे ( जर तशी चुक असेलच तर ) त्या ढोबळ चुकींची गुरु किल्ली वरील विशेषार्थांत आहे. या वरून असें दिसतें कीं सिद्दि लोकांची मनुष्यजातींत गणना आहे असें या न्यायाधीशाचे सोज्वळ बुद्धीस वाटत नाहीं. आणि म्हणून सिद्दि लोकांच्या नैतिक स्थितीच्या प्रश्नासंबंधी कायद्यांत कांहीं उल्लेख असावा हें त्याच्या गावींही नाहीं एखाद्या मनुष्याच्या शेताला लागून दुसऱ्या एका इसमानें नवीन शेत घेतलें, आतां त्या नवीन शेतांत तो इसम तंबाकू उत्पन्न करो अगर फक्त गुरें कोंडून ठेवो त्याची जशी शेजारच्या शेतवाल्याला पर्वा नसतें तसेंच या न्यायाधीशाचे विचारांत असें येतें कीं जो नवीन देश संयुक्त संस्थानास जोडावयाचा त्या नवीन देशांत गुलामगिरी चालू राहो अगर न राहो याची पर्वा संयुक्त संस्थानाला काय म्हणून असावी? ही ज्याचे त्याचे मर्जीची गोष्ट आहे. "

अहाब्राम याचें हें भाषण संपल्यावर डोग्लस यास वाटलें कीं अब्राहाम यानें आपला बराच पाडाव केला; त्याला मोठा राग आला आणि भिवया चढवून तो भाषण करण्याच्या उंच

स्थानावर चढून बोलला कीं " या अब्राहाम यानें मजवर अपशब्दांचा वर्षाव केला. " नंतर त्याला वाटलें कीं आपण फार गैर बोललों; कारण अब्राहाम याचें सर्व भाषण लोकांनीं लक्षपूर्वक ऐकिलें आहे म्हणून ' तो मोठ्या मर्यादेनें बोलला ' एवढें वाक्य पूर्वींच्या वाक्यास त्यानें जोडून देऊन उच्चार केला. डोग्लस यानें अब्राहामाच्या भाषणावर अडखळत अडखळत टीका करण्यास प्रारंभ केला होता; परंतू टीका बरोबर न साधल्यामुळें संध्याकाळीं पुन: बाकी राहिलेली टीका करण्यास येईन असें त्यानें कळविलें परंतू त्या प्रमाणें त्याचे कडून कांहीं एक घडलें नाहीं.

आक्टोबर महिन्याच्या १६ वे तारखेस सोमवारीं अब्राहाम यानें पिओरी आइल येथें भाषण करण्याचें कबूल केलें होतें; ' विनाशकाले विपरीत बुद्धिः ' या न्यायानें डोग्लस ( जणूं काय आपला नाश करून घेण्यासाठींच कीं काय ) त्याचे मागोमाग गेला. डोग्लस याचें दोन प्रहरीं तीन तास भाषण झालें; त्याचा परिणाम जसा स्प्रिंगफिल्ड येथें झाला, तसाच येथेंही झाला. अब्राहाम याचें लागलींच संध्याकाळीं तीन तास भाषण झालें. तात्विक दृष्टीनें पाहिलें तर अब्राहाम याचें भाषणाचा झोंक अगदीं वेगळा असून व त्यांत भारदस्तपणा विशेष असून महत्वाच्या प्रश्नांचा

खलही त्यानें उत्तम केला होता. स्प्रिंगफिल्ड येथील भाषणानें जशी लोकांच्या मनोवृत्तींत चलबिचल झाली तसी पिओरिया येथील भाषणानें झालीं नाहीं; बाकी पिओरिया येथील भाषणाची रचना आणि त्यांत प्रतिपादन केलेलें तर्कज्ञान हीं खरोखरच चकित करून सोडण्या सारखीं होतीं यांत संशय नाहीं. गुलामगिरीच्या प्रश्नासंबंधी त्या भाषणांत जें विवेचन त्यानें केलें तेंही अतर्क्य व अवर्णनीय होतें.

ह्या भाषणाचे शेवटीं डोग्लस यानें अब्राहाम यास कळविलें कीं, ' संयुक्त संस्थानाच्या सेनेटमध्यें जे विरुद्ध बाजूचे लोक आहेत त्यापेक्षां देशांत गुलामगिरीचा प्रतिबंध करण्याचा प्रश्न तुलाच चांगल्या रितीनें समजला आहे. या संबंधांत आतां तुझ्याशीं वादविवाद करून माझ्याच्यानें कांहींएक होणें नाहीं. बाबा अब्राहामा ! येथें आणि स्प्रिंगफिल्डमध्यें, सेनेटमधील विरुद्ध बाजूच्या सर्व लोकांपेक्षां तूंच मला अतिशय श्रम दिलेस'. अब्राहाम हा मोठ्या मनाचा होता म्हणून डोग्लस यानें ' आतां आपणा उभयतांमध्यें जें विवेचन झालें तेवढेंच पुरें आहे, आतां जास्त नको ' अशी जी विनंती केली, त्यास अब्राहाम यानें आपली संमति दिली.

डोग्लस याचा साथीदार सेनेटर जेम्स शील्डस् हा प्रजासत्ताक असून इलिनॉइस येथून आला होता; त्याचे जागीं त्या

वर्षाच्या कायदे करणाऱ्या मंडळीकडूनच दुसऱ्या इसमाची नेमणूक व्हावयाची होती. अब्राहाम हा वकील असतांना कांहीं वर्षांपूर्वीं त्याच्याशीं द्वंद्वयुद्ध करण्याचें ज्यानें धारिलें होतें तोच हा तंटेखोर शील्डस् होय. पुनः निवडणूक होण्यासाठीं हा उमेदवार होता परंतु अब्राहाम व डोग्लस यांच्या संबंधी जी हकिकत वर वर्णन केली आहे, त्यामुळें आणि देशांतील चळवळीमुळें संधि साधेल किंवा नाहीं हें खात्रीपूर्वक शील्डस याला सांगतां आलें नाहीं. डोग्लस याच्या स्नेहभावामुळें अगर अब्राहाम याच्या विरुद्धपणामुळें संयुक्त संस्थानाच्या सेनेटमध्यें जागा मिळण्याच्या संबंधांत शील्ड याची संधि फुकट जाण्यासारखी होती असें मात्र निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. शेवटीं शील्डस याचे विरुद्ध अब्राहाम हा होता तरी तो सर्वानुमतें सेनेटमध्यें उमेदवार पसंत ठरला. पुनः जेव्हां कायदेकरणाऱ्या मंडळीची बैठक झाली त्यावेळीं डोग्लसच्या विरुद्ध जे लोक होते ते तेथें आले नाहींत लिमनट्रंबूल नांवाचा वादविवाद करण्याचें कामीं हुशार आणि काम चालविण्यांत मोठा कुशल वकील असून तो डोग्लसच्या विरुद्ध जे उमेदवार होते त्यापैकीं एक होता आणि दुसरा अब्राहाम लिंकन होता. प्रथम दर्शनीं मत देणारांचा जो लेखी संमतीचा गुप्त कागद पाहण्यांत आला, त्यांत अब्राहाम याचे तर्फे ४५ मतें, ट्रंबूलसाठीं ५ आणि शील्डस् साठीं ४१ मतें पडलेलीं दिसलीं. याचप्रमाणें दहा-

वेळां होऊन शेवटीं डोग्लस याचें मताचे अगदीं विरुद्ध मनुष्याची निवडणूक झाली. पुढें अब्राहाम याच्या अध्यक्ष या नात्याच्या कारकिर्दींत तो मनुष्य सेनेटमध्यें चांगलाच उदयास आला. स्वार्थत्याग व निष्काम बुद्धि हे अब्राहाम याचें आंगीं अवर्णनीय गुण होते आणि त्यामुळें इलिनॉइस येथील स्वतंत्र लोकांचीं अंतःकरणें हल्लीं मिळालेल्या जयश्रीनें प्रफुल्लित झालीं होतीं. सेनेटरची जागा आपल्यासच मिळावी अशी त्यास मोठी उमेद होती कारण कीं जागा मिळाल्यानंतर स्वतंत्र राजसत्तेचीं मोठमोठीं कामें करण्याचा आपला मुख्य हेतू साधेल अशी त्याची संपूर्ण खात्री होती. ट्रंबूल हा अब्राहाम याचा जरी प्रतिस्पर्धी होता तरी अब्राहाम हा इतका उदार व मोठ्या मनाचा होता कीं ट्रंबूलच्या लाभांत मत देण्यासाठीं त्यानें सर्व लोकांस अनेक वेळां विनंति केली होती; परंतू तसें कांहीं न होतां अब्राहाम याचें औदार्य व अनेक गुण पाहून त्याचेच लाभांत मत देण्याची लोकांची प्रवृत्ति झाली.

---



# प्रकरण ११ वें.

## "कँसस" संबंधी वाटाघाट. गुलामगिरी आणि गुलामांचा व्यापार. फ्रिसॉइल पार्टीचा आग्रेसर.



मागील प्रकरणांत कळविलेली हकिकत घडत होती त्या दरम्यान स्वतंत्र संस्थानांतून आणि गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून कँसास येथें वसाहत करण्यास लोकांचा भरणा इतका होत चालला कीं तेथें मुंग्याप्रमाणें माणसें गोळा होत होती. न्यूइंग्लंद, उत्तरइलिनॉइस आणि आयोवाकडील माणसें वज्रदेही आणि राठ असून त्यांच्यावर गुलामगिरी चालू असावी अशा मतांच्या लोकांचे हल्ले जरी चालू होते तरी पण ते लोक एकसारखे येतच होते आणि सर्वांत त्यांची संख्याही जास्त झाली होती. ह्या लोकांच्या भरतीस प्रतिबंध करून तिचा ओघ स्वतंत्र संस्थानाकडे मागें फिरविण्याचा प्रयत्न चालू झाला. जुलमानें तात्काळ आपलें ठाणें बसवून अमल चालू केला. मिसौरी आणि अर्कान्सस येथील तिसमारखान व

अक्कडबाज लोक सरहद्दीवर उभे राहिले असून स्वतंत्र संस्थानांतल्या लोकांच्या मतांचे गुप्त कागद पेटींत दडपून त्यांत लबाडीचीं खोटीं मतें भरण्यास तयार होते. स्वतंत्र संस्थानांतले लोक हे तेथील रहिवाशी असल्यामुळें जमीन घेणें, शेतीकरणें, आपल्या कुटुंबासाठीं घरें बांधणें वगैरे त्यांचा क्रम चालू होता आणि सरहदीवरील लोक राठ, घोड्यावर बसणारे, शिकार करणारे, व जुगार खेळणारे असून त्यांचा सर्व काळ दारूपिणें, गोळी मारणें, शिकार शोधणें, आणि गरिब बिचाऱ्या स्त्रियांस व लहान मुलांस भीति दाखविणें, यांत जात होता. स्वतःचें मत खंडन करणारा कोणी दिसला कीं त्यांच्या आंगाची आग होत असे आणि स्वतःचें मत खंडन करण्यास कोणी अभिप्राय दिला कीं तसा अभिप्राय देणाराचें हृदय विदारणच कारितील कीं काय, इतका त्यांना राग येत असे; अशा कुरापतीमुळें परस्परांत भयंकर वैमनस्य उत्पन्न झालें. गुलामगिरीच्या पद्धतीस अनुसरणाऱ्या लोकांस 'सरहद्दीवरील निर्दयी कर्मचांडाळ' असें म्हणत असत आणि स्वतंत्र संस्थानांतील लोकांस साधारण रितानें 'खंडन करणारें' असें म्हणत असत.

मिसौरीचा डॅव्हे ॲचिसन याच्या वाईट वर्तणुकीचा डंका सर्व ठिकाणीं वाजला होता. हा संयुक्त संस्थानाचा सेनेटर असून

स्वतंत्र संस्थानांतल्या लोकांचा तो फार तिरस्कार करीत असे; त्यांच्या मुलुखांत फिरण्यासाठीं डॅव्हे यानें स्वतः पुढारी होऊन कांहीं गुप्त मंडळ्या स्थापन केल्या. ह्या गुप्त मंडळ्या जेथें जमत असत त्या जागेस ' कृष्ण कारस्थानाचें गुत्ते ' असें नांव दिलें होतें. स्वतंत्र संस्थानांतले लोक नवीन वसाहत करण्यासाठीं मिसूरी नदीमधून आगबोटींतून जात असतांना त्यांना हे निर्दयी कर्म-चांडाळ फारच त्राही त्राही करून सोडित असत; तें त्यांना हांकून लावीत आणि त्यांची जंगम मिळकत गुरें ढोरें किनाऱ्या-वर हांकून देत; या सरहद्दीवरील दुष्ट लोकांस संयुक्त संस्थाना-तल्या अधिकाऱ्यांचे उत्तम सहाय्य मिळत होतें, त्याचप्रमाणें मिसुरी ( मिसौरी ) संस्थान आणि तेथील शिबंदी लोकांचीं ही त्यांना चांगली मदत होती. हे दुष्ट कर्मचांडाळ सरहद्दीवर घोड्यावर बसून फिरत आणि स्वतंत्र संस्थानांतील लोकांचीं धान्याचीं शेतें जाळून टाकींत; त्यांच्या राहत्या घरावर टळटळीत दुपारीं विस्तव ठेवित, त्यांचीं गुरें ढोरें मारून टाकीत अगर पळवून नेत आणि पुष्कळ मैल पावेतों देशाची राख रांगोळी करीत असत. स्ट्रिंगफेलो नांवाचा डॅव्हेआचिसन याचा एक अनुयायी असून दोघेही वर्त्तणुकीच्या बाबतींत एकाच माळेंतले मणी होते त्यांनीं उभयतांनीं पुढारीपणा पत्करून संयुक्त संस्थानां-तील स्वतंत्र लोकांवर स्वाऱ्या करून त्यांच्या मुलुखांत लुटफाट

करण्याचें ठरविलें. स्वतंत्र संस्थानांतल्या लोकांचे बाजूस *जीमलेन सारखे शूर योद्धे होते. त्याचप्रमाणें ×जॉनब्राऊन, +चार्लस रॉबिन्सन, ॥ सिलास सी. पॉमेराय आणि इतर शूर मंडळी पुष्कळ होती.

जेव्हां स्थानिक निवडणूकीची वेळ आली तेव्हां सरहद्दीवरील हे कर्मचांडाळ, कायद्याला अनुसरून चालणाऱ्या ह्या स्वतंत्र संस्थानांतल्या लोकांची बरोबरी करून त्यांच्यापेक्षां आम्ही जास्त लायक आहोंत असें दाखवित होते. ह्या लोकांनीं सेंटलुई शहरासंबंधी एक नामनिर्देशक ग्रंथ ( डिरेक्टरी ) आणिला होता आणि त्यांतून गुलामगिरीचे अनुयायी उमेदवारांचीं नांवें मतदेणाऱ्यांच्या यादींत टिपून ठेवीत होते. गुप्तमतांच्या कागदांच्या पेटी पावेतों त्यांनीं आपल्या मंडळीची एक रांग उभी केली होती. मत देणारा आला कीं त्यानें गुप्तमताचा कागद त्यांना दाखवावा लागत असे; जर तो गुलामगिरी चालू करण्याच्या संबंधांत असला तर तो कागद त्या पेटींत टेऊं देत असत आणि विरुद्ध असला तर तो भिरकावून फेंकून देत आणि त्याची फजिती करून त्याला जीव घेऊन

* हा पुढें कँसासहून सेनेटर व बलाढ्य योद्धा ह्मणवून आला होता.

× याला सर्व ओसाओटोमी ह्मणत असत.

+ हा पुढें स्वतंत्र संस्थानाचा सुभेदार झाला.

॥ नवीन संस्थानांतून सेनेटर ह्मणून आला होता.

पळण्याची वेळ ते आणीत असत. अशाप्रकारें लोकांचा छळ दररोज चालू होता आणि त्यामुळें कधीं कधीं प्राणहानिही होत असे.

खून आणि घातपात वारंवार होऊ लागले त्यामुळें या लहानशा दुर्दैवी देशांतली भूमि रक्तानें नाहली आहे असें चहूंकडे दिसत होतें. अशा प्रकारें सर्वत्र कहर उडून राहिला आणि या कहरांत ओसाओटोमी याच्या मुलाचा खून झाल्यानें त्यानें ‘ या गुलामगिरीचा मुळापासून उच्छेद करून माझ्या पुत्राच्या वधार्थ सूड उगवीन ’ अशी भयंकर प्रतिज्ञा केली होती. सर्व ठिकाणीं लोकांचीं घरेदारें उध्वस्त केलेलीं दिसत असून कांहीं दिवस पावेतों हे सरहद्दीवरील कर्मचांडाळ वेळ अनुकूळ असल्यानें व राष्ट्रीय सरकाराचें आणि मिसौरीच्या शिबंदी लोकांचें चांगलें पाठबळ असल्यानें फारच उन्मत्त झाले होते. अशा पद्धतीनें गुलामगिरीला अनुकूळ मतें पडून कॅन्सास प्रांतांत कोणाही मनुष्यास गुलाम बाळगण्याचा हक्क असावा अशा पायावर एके प्रकारची राजसत्ता स्थापन झाली. ह्या निर्दयी लोकांच्या लाजीरवाण्या दुष्ट कृत्यांची व जुलूमाची बातमी सर्व देशभर पसरली व त्यामुळें लोकांच्या मनोवृत्तींत बराच फरक दिसू लागला. हे दुष्ट लोक जे हल्ले करीत होते ते जमीन बळकावण्याकरितां नसून फक्त गुलामगिरी चालू करण्याचाच त्यांचा त्यांत मूळ हेतू होता. ते परत स्वस्थानीं आले आणि कांहीं दिवसानंतर त्यांचा मनोभंग

होण्याचा रंगही दिसू लागला. ज्यांना ज्यांना गुलाम म्हणून धरिले होते ते ते सर्व जवळच्या स्वतंत्र संस्थानांत पळून गेले, आणि देशांत अशी यादवी माजल्यामुळें त्यांचा पाठलाग होणेंही संभवनीय नव्हतें. पियर्स आणि त्याच्या नंतर बुशनन ह्या अध्यक्षांनीं एकामागून एक सुभेदारांच्या नेमणुका केल्या. देशांत गुलामगिरी चालू केलीच पाहिजे परंतू एकाही सुभेदाराचे हातून हें कृत्य सिद्धीस गेलें नाहीं; आणि जेव्हां वाशिंग्टन येथें गुलामगिरीच्या अनुयायी मंडळीनें जुलमानें लोकांच्या मिळकती बळकाविण्याचा कहर आरंभिला तेव्हां प्रत्येक सुभेदार नोकरीवर तिलांजुली देऊन आपआपल्या घरीं चालता झाला. कॅनसास देशास सुभेदारांची स्मशानभूमि असेंही कित्येक लोक म्हणत असत.

कॅनसास या संस्थानास आतां देश असें म्हणत असून तेथें राष्ट्रीय सभेचे नियम व कायदे चालू झाले होते. तेथें लोकांनीं निवडणूक केलेल्या मंडळीकडून राज्यव्यवस्था चालत नसून तेथील अध्यक्षानें नेमिलेल्या अंमलदारांकडूनच सर्व राज्यव्यवस्था चालत होती; हा देश संयुक्तसंस्थानांत येण्याची आणि कायदेकानू, सुभेदार व इतर अंमलदारांची तेथील लोकांकडूनच योजना होण्याची संधि पुढें येणार होती व अशी वेळ येईपर्यंत गुलामगिरी तेथें चालू राहणारच हें उघड होय. इकडे स्वतंत्र संस्थानांतील लोक जरी निराश झाले होते तरी त्यांनीं जीवावर उदार होऊन एक स्वतंत्र राज्यसत्ता स्थापन केली आणि कायदे

व नियम नवीन करून त्यांतून गुलामगिरी चालू करण्याचीं सर्व कलमें काढून टाकिलीं. त्यांनीं एक चार्लस रॉबिन्सन नांवाचा सुभेदार नेमून आपल्या स्वतंत्र संस्थानाच्या राजधानीचें ठिकाण टोपेका येथें निश्चित केलें; व स्वदेशासाठीं कायदेकानू करण्याची व राज्यकारभार चालविण्याची मुख्य कचेरी लिकॉप्टन येथें करण्याचें ठरविलें. गुलामगिरी चालू करण्यासाठीं कॅंसास येथें चालू असलेला भयंकर जुलूम पाहून अब्राहाम याचें अंतःकरण दुभंग होऊन जात असे परंतु त्यामुळें त्याच्या अंतर्यामीं कोपानलाची ज्वाला जेवढी भडकली होती तेवढी त्याच्या मुखावरून बाहेर व्यक्त होत नव्हती; तसेंच त्याचा हमेशा स्वभाव स्थीर व शांत असून तो बुद्धिमान व मोठा चाणाक्ष असल्यामुळें त्यानें जीं जीं जाहीर भाषणें केलीं त्यांत अंतर्यामीं वाढत असलेला कोप यत्किंचित्ही बाहेर दिसू दिला नाहीं. यावेळीं त्याचा केंटकीचा स्नेही जोशुआस्पीड गुलामगिरी चालू असलेल्या ठिकाणीं अद्याप राहत असून त्याचें लक्षही त्याच विषयांत गढून गेलेलें दिसत होतें. अब्राहाम यानें अशा स्थितींत त्यास एक पत्र पाठविलें त्याचा कारणापुरता उतारा खालीं दिला आहे.

'ज़र कॅंसास हें स्वतंत्र संस्थान आहे असें तेथील लोक आपण होऊन मत देतात असें तुझें म्हणणें आहे तर त्याबद्दल स्वधर्माभिमानी या नात्यानें तुला आनंदच होईल अशी माझी

खातरी आहे; व ज्याअर्थी तूं म्हणतोस कीं गुलाम बाळगणाऱ्या सर्व शिष्ट लोकांचें या प्रमाणें म्हणणें आहे त्याअर्थी या त्यांच्या सरळ बुद्धीबद्दल मला मुळींच शंका नाहीं परंतू ते त्या रीतीचें लेखी मत कधींच देत नाहींत. जरी तूं आपल्या खानगी पत्रांत अगर संवादांत कँसास स्वतंत्र होईल अशा प्रकारची आपली पसंदगी दर्शविलीस तरीपण सभेस जाऊन उघड रीतीनें तसें प्रतिपादन करणाऱ्या कोणत्याही मनुष्याबद्दल तूं मत देणार नाहींस कारण तो त्याच प्रमाणें ती गोष्ट उघड रीतीनें भर सभेंत सांगणार. कोणत्याही गुलामगिरीच्या संस्थानांतून अशा मनुष्याची निवडणूक होऊं शकणार नाहीं. तुझ्या प्रांतांत गुलाम बाळगणारे आणि गुलामांचा धंदा करणारे लोक थोडे असून लोक त्यांचा द्वेष करितात.'

कँसास येथें चालू असलेला प्रकार नाहींसा होई पावेतों अब्राहाम याची गणना प्रजापक्षी लोकांत होत होती. ह्या प्रजापक्षी लोकांची मंडळी आतां खातरीनें लयास जाण्याच्या बेतांत होती आणि दुसरी कोणतीही मंडळी अद्याप स्थापन झाली नव्हती. कँसास नेब्रास्काच्या मसुद्याविरुद्ध प्रजासत्ताकलोकांपैकीं ट्रंबूल हा असून त्याचीच निवडणूक झाली होती आणि त्यामुळें डोग्लसच्या स्नेह्यांस फारच आश्चर्य वाटलें; परंतु इतकें असून शेवटीं एवढें मात्र स्पष्ट दिसलें कीं अब्राहामाच्या अपजयामुळें

प्रजासत्ताक लोकांत दुफळी झालेली दिसत होती. अब्राहाम हा धूर्त असल्यामुळें त्याला इतकें समजून चुकलें कीं अर्ध्या देशांत गुलामगिरी आणि अर्ध्या देशांत स्वातंत्र्य अशी अर्धवट स्थिति फार दिवस टिकावयाची नाहीं. ज्या देशाची या पुढें संयुक्तसंस्थानांत गणना व्हावयाची त्या देशांत गुलामगिरीचा प्रवेश अगदीं होऊ द्यावयाचा नाहीं, ह्मणून अब्राहामलिंकन भगीरथ प्रयत्न करील यांत मुळींच संशय नाहीं. परंतु हें मात्र त्यानें खास ताडलें होतें कीं जेथें जेथें गुलामगिरी चालू आहे तेथें तेथें ती वाढत जाईल. इ. स. १८५४ सालीं पिओरिया येथं अब्राहाम याचें जें भाषण झालें त्यांत त्यानें प्रतिपादन केलें कीं + "गुलामगिरीच्या पद्धतीविषयीं लोकांच्या ह्या औदासिन्याचा मला मोठा तिटकारा येतो; कारण गुलामगिरीची पद्धत ह्मणजे मोठा अन्याय होय. या दुष्ट पद्धतीमुळें लोकसत्ताकस्वतंत्रपक्षाच्या न्यायी तत्वांचें वर्चस्व जगांतून नाहींसें होत आहे. तसेंच स्वतंत्रसंस्थांचा द्वेष करणारे लोक हे आपणांस 'तुम्हीं ढोंगी आहांत' असा टोमणा मारितात. आपले स्नेही स्वातंत्र्यप्रिय आहेत खरे परंतु आपल्या मनमोकळेपणाविषयीं त्यांना वारंवार संशय येतो. या गुलामगिरीच्या पद्धतीमुळे आपल्यापैकीं पुष्कळ चांगल्या लोकांस उघडपणें लढण्याचा प्रसंग येत आहे व ते आपल्या 'स्वातंत्र्यनिवेदनाच्या' ठरावावर टीका करितात;

+ ॲरटकृत लिंकन याचें चरित्र पहा.

त्याचें असें ह्मणणें आहे कीं स्वार्थाशिवाय आम्हांस दुसरें कांहीं दिसत नाहीं.

+ दक्षिणेकडील लोकांचें असें मत आहे कीं ' गुलामगिरीच्या उत्पत्तीविषयीं त्यांचेपेक्षां आपण जास्त जबाबदार आहोंत,' व मीही ती गोष्ट कबूल करितों. त्यांच्या असेंही ह्मणण्यांत येतें कीं ' ही संस्था हल्लीं चालू आहे खरी, तरीपण सुखासमाधानानें ती नाहींशी करितां येणें फार कठीण आहे.' ही गोष्ट मी समजतों आणि त्यांचें ह्मणण्याचें हें धोरण मी चांगलें ओळखून आहे. जी गोष्ट कशी करावी हें माझें मलाच समजत नाहीं ती त्यांनीं केली नाहीं ह्मणून त्यांस कधींही मी दोष देणार नाहीं. या भूमंडळावरील सर्व साम्राज्याच्या रश्मी माझ्या हातांत प्रभुसत्तेनें आल्या तरीपण जेथें गुलामगिरी चालू आहे अशा देशाबद्दल काय तजवीज करावी हें मला सुचणार नाहीं. जेव्हां लोक आपलें राज्य आपण स्वतःचालवितात तेव्हां त्यास स्वराज्य ह्मणतात पण जेव्हां ते दुसऱ्यावरही फाजील सत्ता चालवितात तेव्हां त्यास जुलूम ह्मणतात. जर शिद्दिलोक मनुष्य आहेत, आणि ' ईश्वरानें सर्व प्राणी सारखे उत्पन्न केले आहेत ' अशी माझी दृढ समजूत आहे तर एका मनुष्यानें दुसऱ्यास गुलाम ह्मणून बाळगावें हें नीतिदृष्ट्या अगदीं गैर आहे असें मला

+ ( बॅरट कृत लिंकन यांचे चरित्रांतून हा भाग घेतला आहे )

वाटतें. गुलामगिरी हें मनुष्याच्या आपलपोटेपणाचें मूळ आहे व त्याच्या न्यायरुपी मनदेवतेला ही गोष्ट कधींही पसंत पडणार नाहीं. मिसौरी प्रकरण मिटविल्याबद्दल कित्येक लोकांचा त्यांत विशेषेकरून प्रजापक्षी ( व्हिग ) लोकांचा आरोप आहे खरा पण तेच लोक पुर्वस्थिति पुनः चालू करण्याविषयीं कांकूं करितात. आपण हळूहळू जुन्या धर्माचा त्याग करून नवा धर्म स्विकारीत आहोंत. सुमारें ८० वर्षांपूर्वी आपण जगास असा बोध केला कीं सर्व मनुष्यें सारखींच उत्पन्न झालीं आहेत पण तेच आपण हल्लीं असें मानूं लागलों आहोंत कीं कांहीं लोकांनीं दुसऱ्यास गुलाम करणें म्हणजे हा स्वराज्याचा ईश्वरदत्त हक्कच होय. ह्या गुलामगिरीच्या संबंधांत जर माझे हातांत पूर्ण सत्ता आलीतर सर्व गुलाम मोकळे करून त्यांना लिबेरिया ( स्वदेशीं ) येथें पाठवून द्यावयाचे असा माझा प्रथम निश्चय होईल; परंतु तेथें जर सर्वच एका दिवशीं गोळा झालेतर पुढील दहा दिवसांतच ते खातरीनें मरतील आणि तेथें त्यांना दहा दिवसांत पुष्कळ वेळां नेण्याइतकीं जास्त गलबतें व जास्त द्रव्य तरी कोठें आहे? तर मग कसें करावें?" हें कोडें अब्राहाम तूर्त उलगडूं शकला नाहीं; ही हकीकत इ. स. १८५४ मध्यें घडली हें विसरतां कामानये.

अब्राहामलिंकन हा गुलामगिरी आणि गुलामांचा व्यापार नाहींसा करण्याविषयीं अहोरात्र इतके श्रम करीत होता व

त्यांचें वास्तविक स्वरूप काय होतें, आणि त्यांचा परिणाम श्रमविभाग, विद्या, धर्म आणि लोकसंस्था यांजवर काय झाला हें वांचकांचे लक्षांत येण्यासाठीं सदरहु संबंधी हकिकत संक्षिप्त रितीनें या खालीं दिली आहे. * फार प्राचीन काळापासून गुलामांचा व्यापार प्रथम आफ्रिका खंडांत चालत होता; नंतर त्याचा प्रसार हळूहळू युरोपांत होऊन अमेरिकेंत तो बऱ्याच वाढत्या प्रमाणावर चालू झाला.

कोलंबसानें अमेरिकाखंड शोधून काढिलें त्यावेळीं हा व्यापार बराच कमी झाला असून इ. स. १४९५ सालीं कांहीं इंडियन लोक गुलाम म्हणून धरून स्पेन देशांत नेले होते. बार्बरी संस्थानांतून पुष्कळ शिद्दि लोक युरोपखंडांत गुलाम म्हणून धरून नेण्यांत आले होते पण त्यापासून व्हावा तसा फायदा झाला नाहीं, कारण कीं त्यावेळीं निरानिराळ्या देशांत मजुरींचे दर फारच स्वस्त झाले होते त्यामुळें गुलामांचा व्यापार चालू ठेविण्याविषयीं पुष्कळ राष्ट्रांनीं आपली संमति दिली नाहीं. त्यावेळीं मेक्सिको आणि मध्यअमेरिका येथें गुलामांचा व्यापार बराच चालू होता.

शिद्दि लोक हे मेहनतू असून चौपट काम कारितात असें दिसून आल्यावरून आफ्रिकेंतील गुलामांचा व्यापार

* " ब्राउन " कृत लिंकन याचे चरित्रांतून हा भाग घेतला आहे.

फारच वाढत चालला. इंग्लंद देशांत इ. स. १५६२ मध्यें ह्या व्यापारास प्रारंभ झाला. त्यावेळीं अमेरिकाखंडांत नवीन वसाहत होत होती व तेथील लोकांस, गुलामांचा व्यापार करणारे इंग्लिश व्यापारी गुलामांचा पुरवठा करीत असत. गुलामांचा प्रसिद्ध व्यापारी एडमिरलहॉकीन याच्याशीं या व्यापारांत इंग्लंदच्या इलिझाबेथराणीनें कांहीं भाग ठेविला होता. स्टुअर्ट घराण्यांतील दुसरा चार्लस आणि जेम्स राजा हे अशा व्यापारी संस्थेचे सभासद झाले असून त्यांनीं बराच त्यांत फायदा मिळविला होता.

+ क्रॉमवेल हा लॉर्डप्रोटेक्टर ( राज्यसंरक्षक ) असतां गुलामांचा व्यापार करण्याची सर्वांस उघडपणें मोकळीक मिळाली होती. दुसरा चार्लस राजा पुनः गादीवर बसल्यावर 'रॉयलआफ्रिकन कंपनी'स या संबंधांत पार्लमेंट सभेकडून बरीच मदत आणि संरक्षणाची हामी मिळाली. पुष्कळ वर्षांनंतर बऱ्याच कंपन्या स्थापन झाल्या त्यांत तीन कंपन्यांनीं तर इ. स. १७१३ मध्यें स्पेनदेशाच्या सरकाराशीं करार करून तीस वर्षेंपावेतों शिद्दि गुलाम पुरविण्याचें ठरविलें होतें.

+ गुलामांचा व्यापार इतर राष्ट्रांनीं देखील हातांत घेतला होता पण इंग्लिश लोक इतर राष्ट्रांपेक्षां विशेष धाडसी

---

+ ब्राउन कृत लिंकनचें चरित्र.

च साहसकर्मी असल्या कारणानें इतर राष्ट्रांपेक्षां त्यांनीं पुष्कळ शिद्दि लोक गुलाम म्हणून धरून अमेरिका खंडांत नेले. युनाइटेड् स्टेट्सूमधील जेम्सटौन् येथें इ. स. १६१९ मध्यें प्रथम वीस शिद्दि गुलाम म्हणून धरून नेण्यांत आले होते. त्या देशांत कापसाचें पीक चांगलें होईल असें दिसून आल्यावरून मॅसेच्युसेटस् पासून व्हर्जिनिया पर्यंतच्या प्रदेशांत कापसाचें पीक करण्याकडे ह्या गुलाम लोकांस कामीं लावले होते. इ. स. १६१९ पासून १६५० पावेतों सर्व वसाहतींत गुलामगिरिच्या संस्था पूर्णपणें स्थापन होऊन चांगल्याच उदयास आल्या होत्या.

* इ. स. १७८६ च्या सुमारास ग्रेनविलीशार्प, विल्यम विल्बरफोर्स, क्लार्कसन, कॅनिंग, वगैरे बऱ्याच स्वातंत्र्यभक्तांनीं इंग्लदांत सर्व वसाहतींत गुलामगिरीचा समूळ उच्छेद करण्याविषयीं बरीच चळवळ चालविली, आणि इ. स. १८३३ च्या एप्रिल महिन्याच्या २८ व्या तारिखेस गुलामगिरीच्या सर्व संस्था बंद करण्याबद्दल कायदा झाला, त्यामुळें ग्रेटब्रिटनच्या वसाहतींतून व आश्रित संस्थानांतून मिळून सुमारें एक कोटी बारा लक्ष गुलामांची सुटका झाली. फ्रान्सदेशाच्या राज्यक्रांतीच्या वेळीं म्हणजे इ. स. १७९१ सालीं फ्रान्सदेशानेंही अशाच प्रकारचा कायदा मंजूर केला.

---

* ब्राऊन कृत लिंकनचें चरित्र.

+ अमेरिकेच्या राष्ट्रीय सभेनें सुद्धां इ. स. १७७६ सालीं देशांत जास्त गुलाम न येऊं देण्याविषयीं कायदा केला, पण इ. स. १७८८ च्या कायद्यानें गुलामांचा व्यापार बंद करण्याची मुदत इ स. १८०८ पर्यंतची ठरली होती. गुलाम बाळगणारे, गुलामांचा व्यापार करणारे आणि कापसाचें पीक करणारे ह्या लोकांस हा एका प्रकारचा गैर कायदेशीर फायदाच झाला होता खरा पण फार दिवसापासून चालत आलेली ही संस्था एकदम बंद करणें मोठें धोक्याचें होतें. वाशिंग्टन, फ्रँकलीन, ह्यामिल्टन, जेफर-सन, मेडीसन, आणि रँडल्फ सारखे मोठमोठे नामांकित मुत्सद्दी व शहाण्या लोकांचें हेंच मत होतें. युनाइटेड्स्टेट्स्च्या कांग्रेसनें असा कायदा केला कीं गुलामांचा व्यापार हा एक केवळ लुटारूपणाचा धंदा होय, आणि या कायद्याविरुद्ध वर्तन कर-णाऱ्यांस शिक्षाही होत असे. शेवटीं इ. स. १८६१ च्या नोवेंबर महिन्यांत नॅथनिअलगोर्डन ह्यास ह्या कायद्याचें उल्लं-घन केल्याबद्दल न्यूयार्क येथें फांशीची शिक्षा झाली.

+ इ. स. १४४४ पासून गुलामांचा व्यापार बंद होईपावेतों ह्मणजे इ. स. १८०८ पर्यंत युनाइटेडस्टेटस् आणि ब्राझिल् ह्या देशांत एकंदर ४० कोटी गुलाम आले अशी हकिकत उपलब्ध असून ती विश्वसनीय आहे.

---

+ ब्राऊन कृत लिंकनचें चरित्र.

× इ. स. १७७७ पासून १८५० पावेतों व्हरमाँट, पेन्सिल्वॅनिया, मॅसाच्युसटेस, कानिक्टिकट, न्यूयार्क, न्यूजर्सी, वगैरे संस्थानांनीं, गुलामगिरीचा व्यापार आणि गुलामगिरीच्या संस्था बंद केल्याबद्दल कायदेशीर रीतीनें जाहिर केलें ज्यू, इजिप्शन, फिनिशन, ग्रीक, रोमन आणि इतर राष्ट्रें लढाईंत कैदी धरून त्यांस गुलाम करीत अगर त्यांचे पैसे घेऊन त्यांस सोडून देत असत. केव्हां केव्हां तर त्या गुलामांचा अतिछळ होत होता; अमेरिका खंडांत जो गुलामांचा व्यापार चालत होता तो फक्त पैसे मिळविण्या करितांच होता. खाऊन पिऊन पुष्ट झालेल्या प्राण्यांप्रमाणें ह्या गुलामांचा क्रयविक्रय होत असे. शिद्दिलोक निराश्रित व अशिक्षित असल्यानें त्यांच्याशीं वैर वाढविण्याचा अगर त्यांजबरोबर लढाई करण्याचा प्रसंग कधींही आला नाहीं. बार्बरी संस्थानांचा युरोपांतील राष्ट्रांशीं गुलामांचा व्यापार बराच चालत होता पण संयुक्त-संस्थानांचा अध्यक्ष जेफरसन याजकडून युरोपांतल्या राष्ट्रांस वेळोंवेळीं आरमारांची चांगली मदत मिळाल्यामुळें युरोपांतील राष्ट्रांनीं तो व्यापार १९ व्या शतकाच्या प्रारंभीं अगदीं बंद केला.

× गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांत गुलामगिरीच्या

---

× ब्राउन कृत लिंकनचें चरित्र.

संस्थेमुळें मजुरीचे दर फारच उतरले होते. दक्षिणे कडील मुलुखांतल्या गरीब गोऱ्या लोकांची स्थिति फारच निकृष्ठ झाली असून त्यांस खाण्यासही पोटभर मिळत नसे. कपडालत्ताही घेण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत राहिलें नव्हतें इतकेंच नव्हेतर त्यांच्यांतील स्वातंत्र्याचें तेजही लोपत चाललें होतें. कॅलहौन, जेफरसनडेविस, जुडाबेंजामिन, अलेक्झांडरस्टिफन्स आणि जॉन. सी. ब्रेकिनरीज ह्यांच्या निष्ठुर अमलाखालीं मजुरवर्गाची स्थिति फारच बिघडली होती. देशांत अज्ञान वाढत चाललें, आणि विद्या, कला व कौशल्य ह्यांस उतरती कळा लागली होती. धर्माविषयीं लोकांची पूज्यबुद्धि दिवसेंदिवस कमी होऊ लागली. गुलामांचे व्यापारापासून पैसे मिळविण्याकडे लोकांची प्रवृत्ति असल्यानें ' सर्व मनुष्यें ईश्वराचीं लेंकरें आहेत व त्यांचें एकमेकांशीं बंधुत्वाचें नातें आहे ' हें उदात्त तत्व कोणाचेही लक्षांत राहिलें नाहीं.

* व्हर्जिनीया, पश्चिमव्हर्जिनीया, टेनिसी, केंटकी आणि मिसौरी ह्या संस्थानांत गुलामगिरीचें प्राबल्य फारसें माजलें नव्हतें. गुलामगिरीच्या संस्थेपासून पुष्कळ अनिष्ट परिणाम झाले होते. ग्रेटब्रिटन देशापासून स्वतंत्र होण्याबद्दल जी मोठी लढाई इ. स. १७७६ सालीं चालू झाली त्यावेळीं गुलाम बाळ-

* ब्राउनकृत लिंकनचें चरित्र.

गणाऱ्या मोठ्या लोकांशीं तंटा करून गुलामगिरीचा समूळ ऱ्हास करण्या इतकें लोकांत त्राण राहिलें नव्हतें म्हणून हें अवघड कृत्य तडीस नेण्याचें काम विशेष कष्टतर होऊन पुढील पिढीवर येऊन पडलें. जेव्हां इ. स. १८६१ मध्यें लिंकन अध्यक्ष झाला त्या-वेळीं पुष्कळ लोकांची अशी समजूत झाली होती कीं ही गुलाम-गिरीची पद्धत अजीबाद बंद होणें अति दुर्घट होय.

+ जेव्हां अब्राहाम लिंकन याची निवडणूक झाली तेव्हां त्याला दिसून आलें कीं गुलामगिरीची संस्था फार बलवत्तर असून ती बंद करण्याविषयीं प्रचंड वादविवाद करावा लागेल. स्प्रिंग फिल्ड येथें इ. स. १८६१ च्या फेब्रुवारी महिन्यांत तो आपल्या नजीकच्या स्नेही मंडळीस म्हणाला कीं " सरकारची कितीही शक्ति असली तरी ती सर्वस्वीं गुलाम बाळगणाऱ्या लोकांच्या हातांत आहे. ह्या लोकांचें सामर्थ्य इतकें आहे कीं त्याची आपणांस कल्पनाही करितां येणार नाहीं. " व्हानब्युरेन, मार्सी, कॅस, आणि डोग्लस यांच्या सारखे मोठमोठे वजनदार लोक गुलामगिरीचे लाभांत असून प्रसंग पडल्यास लढाई करून आपले इष्ट हेतू सिद्धीस नेण्याचा त्यांचा निश्चय झाला होता. त्याप्रमाणें लढाई वगैरे झाल्याची हकिकत या पुढें येईलच.

+ स्वतंत्र संस्थानांतील लोक फारच उद्योगी आणि मोठे

---

+ बाऊनकृत लिंकनचें चरित्र.

उत्साही असून उद्योग धंद्याच्या व्यवसायांत त्यांचा सर्वकाळ जात असे. त्याच प्रमाणें निर्जन अरण्यांतील जमीन सुपीक करून वसाहतीस लायक करण्याचें मनस्वी काम त्यांजवर पडलेलें होतें. याचा परिणाम असा झाला कीं स्वतःचें काम करून सार्वजनिक राजकीय आणि महत्वाच्या विषयाशिवाय दुसरा कोणताच विषय त्यांना सुचत नसे. नवीन वसाहतींत पत्रव्यवहार आणि अन्योन्य व्यवहार करण्याचीं साधनें फारशीं उपलब्ध नसल्यामुळें त्यांना फार अडचण पडत असे व त्यामुळेंच ह्या पश्चिमेकडील प्रदेशांत गुलामगिरीचा शिरकाव बराच झाला.

* इ. स. १७८८ च्या कायद्या अन्वयें तेरा संस्थानें एकत्र झाल्यामुळें त्यांस युनाइटेडस्टेटस् (संयुक्त संस्थानें) म्हणत असत. ह्यां पैकीं, कानिक्टिकट, मॅसेचुसेटस्, न्यूहॅंपशायर, न्यूयार्क, न्यूजर्सी, पेन्सिलवॅनिया, आणि र्‍होडबेट हीं सात स्वतंत्र संस्थानें असून, डिलावेर, जॉर्जिया, मेरिलँड, उत्तर कॅरोलिना, दक्षिण कॅरोलिना, व व्हर्जिनीया ह्यां सहा संस्थानांत गुलामगिरी चालू होती. युनाइटेडस्टेटस् मध्यें गुलामगिरीची संस्था प्रचलित असल्यानें ती लौकर बंद होणें फार कठिण होतें; कारण पुष्कळ सुखवस्तु लोकांपाशीं गुलाम असल्यानें, शेती वाडी, घरकाम, व्यापार, वगैरे कामें करविण्यास त्यांस फार थोडे पैसे लागत

* बाऊनकृत लिंकनचें चरित्र.

होते, त्यामुळें हे लोक गुलामगिरीच्या संस्था बंद करण्याचे विरुद्ध होते. पण देशाची कशी निकृष्टावस्था होत होती व गुलामांचा किती छळ होत असून त्यांवर कसकसे जुलूम होत होते हें कोणीही न्याय दृष्टीनें पाहत नव्हता. अब्राहामासारखे जे कित्येक परोपकारी पुरुष होऊन गेले त्यांनीं गुलामगिरीचा संपूर्ण ऱ्हास करण्याविषयीं अश्रान्त श्रम केले व त्यांत अब्राहाम यास किती यश आलें त्याबद्दलची हकिकत यापुढें आलीच आहे.

अब्राहाम यानें अध्यक्ष झाल्यावर काय काय केलें? अध्यक्षाची कारकिर्द चालू असतां गुलामगिरी कोणत्या रीतीनें लयास गेली आणि त्यावेळीं +खंडण करणारी जी मंडळी होती त्यांत मिसळण्यास तो कां खुषी नव्हतां, हे सर्व ज्यांना माहीत होतें ते सुद्धां याची संपूर्ण खुलासेवार हकिकत सांगू शकत नव्हते; अब्राहाम हा राजकार्यधुरंधर होताच आणि जर साम्राज्याची सर्व सत्ता त्याचे हातांत आली असतीतर त्यानें सर्व गुलामांचे बंद एका क्षणांत मोकळे करून त्यांचे अखंड आशिर्वाद घेऊन तो सुखी झाला असता हे निःसंशय होय. परंतु ज्याअर्थीं अशी सत्ता त्याला प्राप्त झाली

+ गुलामगिरीचा हळूंहळूं नाश व्हावा अशा मताच्या लोकांस "खंडण करणारी मंडळी" ( एबॉलिशनिस्ट ) असें म्हणत असत.

नाहीं त्याअर्थीं युद्धप्रसंग व जुलूम केल्याशिवाय आपला हेतू साधेल अशी योजना करण्याचें त्याचें धोरण होतें. त्याला हेंही कळलें होतें कीं जर गुलामागिरी समूळ बंद केली तर ती पुढें पुढें अगदीं नाहींशीं होईलच; परंतु अर्ध्या देशांत गुलामगिरी व अर्ध्या देशांत स्वातंत्र्य अशी अर्धवट स्थिति फार दिवस चालावयाची नाहीं. 'एकाद्या घराचें त्यांतले त्यांतच विभाग केले तर तें कसें बरें टिकेल?' या त्याच्या वाक्याचें त्याला वरचेवर स्मरण होत असे. अब्राहाम हा जरी कडकडीत प्रजापक्षी होता तरी पण ह्या पक्षाचें नांव आतां बहुतेक नाहींसें झाल्या सारखेंच होतें. आतां या गुलामगिरिच्या सांसर्गिक व्याधीवर जणूंकाय रामबाण मात्राच अशी एक दुसरी मंडळी स्थापन होऊन तिचा उदय व्हावयाचा होता. प्रजासत्ताक+ आणि खंडण* करणारे अशा दोन पक्षांच्या मधला भाग स्वीकारणारी ही नवीन मंडळी होती. ह्या नवीन मंडळीस 'फ्री सॉइल पार्टी' ह्मणत असून तीचा हेतु गुलामागिरीचा ताबडतोब नाश करण्याचा होता.

---

+ गुलामागिरी चालू ठेवण्याचे कामीं जिनें विडा उचलला होता अशा मंडळीस 'प्रजासत्ताक' (डीमोक्रॅट) असें ह्मणत असत.

× गुलामगिरीचा उच्छेद करणारे.

या आजपावेतोंच्या एकंदर इतिहासावरून अब्राहाम हा गुलामगिरीचा तात्काल उच्छेद करणाऱ्या मंडळीचा ( फ्री सॉइल पार्टी )अग्रेसर होता हें उघड होत आहे. ह्या गुलामगिरीच्या विषयांत पारंगत असलेला त्या काळांत अब्राहामचा हात धरणारा कोणीही नव्हता हें वाचकांच्या लक्षात आलेंच असेल. स्वदेशाच्या स्वातंत्र्याचें खरें बीजारोपण अब्राहाम याचें हृदयांत झालें असून त्याला अंकूर फुटण्याची आतां संधि होती; स्वदेशासाठीं खरें प्रेम त्याचें हृदयांत उत्पन्न झालें होतें आणि राजकार्यांत तो मोठा चतूर असून सर्व पेंचपांच त्याला चांगलेच अवगत होते. तो मोठा शांत, गंभीर आणि सावध असून कोणास जय मिळेल याचा सावकाश विचार करीत होता; आणि शेवटीं कोणत्या तरी एका प्रकारचें युद्ध हें होणारच असें त्यानें भविष्य प्रथम पासूनच केलें होतें. गुलामगिरीचा धिक्कार करून स्वातंत्र्याचा पक्ष त्यानें अगदीं उघड रीतीनें पत्करून म्हटलें कीं ' जो श्रमाची फेड करितो अशा मनुष्यावर सूर्य आपला कृपाप्रकाश पाडतो, पर्जन्य देवता आपलें जलाशय मोकळे करितो व वायू अनुकूळ रीतीनें वाहू लागतो यांत कांहीं एक संशय नाहीं. "

* अब्राहाम याच्या कारकिर्दीत, डोग्लस, क्ले, बॅटन, जॅकसन, वेब्स्टर, व्हानब्युरेन, हॅरिसन, कॅस, स्कॉट, बुश,

* ब्राउन कृत लिंकन चरित्रांतून हा भाग घेतला आहे.

बन, जेफरसनडेविस वगैरे मोठमोठे राज्यकारस्थानी पुरूष होऊन गेले त्यांचे विषयी थोडीशी माहिती येथे दिली आहे. डोग्लस आणि अब्राहाम एकाच ठिकाणीं वाढले असून त्यांची स्थितिही सारखीच होती. डोग्लस हा विद्वान् हुशार व माहितगार असून राजकीय अगर कायद्याचे बाबतींत मोठा वादविवाद करणारा होता. तो अब्राहामलिंकन यास आपल्या बरोबरीचा मानीत असे. डोग्लस हा राजकीय विषयांत कपटपटुत्व लढविण्यांत मोठें पुरुषत्व समजत होता. क्ले हा प्रजापक्षीय ( व्हिग ) असून दोनी बाजूवर हात ठेविणारा होता. बेंटन हा गुलाम बाळगणारा असून आपल्या संस्थानांत मात्र गुलामागिरी राहवी व तिचा इतर ठिकाणी विस्तार न व्हावा असें त्याचें मत होतें. आपसांत तंटा न होतां गुलामगिरी कायम राहावी असें जॅकसन याचें मत होतें. वेबस्टर हा गुलामगिरीच्या विरुद्ध आपण आहोंत असें तोंडानें मात्र ह्मणे पण तशी चळवळ आपल्या संस्थानांत कोणी केली तर त्याला ती खपत नसे. व्हानब्युरेन, हॅरिसन, कॅस, स्कॉट, बुशनन, आणि इतर कित्येक सुबुद्धलोक हे आपल्या पक्षातील मंडळींचें जसें धोरण दिसले त्या प्रमाणें चालणारे होते. जेफरसनडेवीस हा गुलामगिरीचे लाभांतला असून तो अब्राहामचा मोठा प्रतिस्पर्धी होता. गुलामगिरीचा ऱ्हास करण्याच्या संबंधांत जें आपसांतलें युद्ध ( सिव्हिल वॉर ) झालें त्यांत जेफरसनडेवीस हा बंडखोरांच्या पक्षाचा होता ही हकिकत पुढें आली आहेच.

# प्रकरण १२ वें.

## लोकसत्ताक स्वतंत्रपक्ष ( रिपब्लिकन् ) "टोपेका" येथील राष्ट्रीयसभा. "कॅन्सस" संस्थानावर बंदुका झाडल्या.



इ. स. १८५६ च्या मे महिन्याच्या २९ वे तारखेस इलिनॉइसपैकीं ब्लुमिंग्टन् येथें कॅन्सासनेब्रास्का प्रकरणाच्या विरुद्ध असलेल्या मंडळीची सभा भरावयाची होती. यापुढें गुलामगिरीचा प्रसार होऊं नये असें इलिनॉइस प्रांतांतील ज्या लोकांस वाटत होतें त्या लोकांची ती सभा होती; शिवाय गुलामगिरी व स्वातंत्र्य या दोन विषयाच्या तंट्यासंबंधी बारीकसारीक प्रश्नांत भिन्न भिन्न मतांचे लोक या सभेंत असणें हें स्वाभाविक होय. आणि खरोखर गुलामगिरी, व तिच्या प्रसाराविरुद्ध असणें या पलीकडे कोणत्याही तात्विक प्रतिपादनांत ते एक मत होत नव्हते हें उघड आहे. अब्राहाम याला या सभेस बोलाविलें होतें आणि जेव्हां त्यानें सभेचे व्यवस्थापक घोटाळ्यांत असलेले पाहिले तेव्हां तो म्हणाला ' या मंडळीचें ऐक्य होऊन सर्वांची संघशक्ति बळकट करण्यासाठीं आपल्या सन्त्रांच्या स्वातंत्र्याच्या प्रतिज्ञेचा एक शीलालेख याच खडकावर आपण स्थापन करून आपली प्रतिज्ञा करूं म्हणजे नरकाच्या द्वाराचें दर्शनही आपणांस होणार नाहीं'. या लोकसंमत सभेनें ( या

सभेस हेंच नांव दिलें तरी हरकत नाहीं ) खालीं लिहिल्या प्रमाणें सर्वानुमतें ठराव केला; या ठरावांत अब्राहाम यानें विचार विस्तारानें प्रदर्शित केले होते:—"गेल्या साठ वर्षांतल्या राज्यव्यवस्थेंत जे पक्ष होऊन गेले त्या सर्व पक्षांतील मोठमोठ्या राजकार्य धुरंधरांच्या रितीरिवाजास व अभिप्रायास अनुसरून आह्मी असें प्रतिज्ञेवर मानितों कीं या राज्यव्यवस्थेच्या स्वरूपाअन्वयें या सभेस देशांतल्या गुलामगिरीचा प्रतिबंध करण्याचा संपूर्ण अधिकार आहे; आणि आह्मी प्रतिज्ञेवर असें मानितों कीं आमच्या प्रतिज्ञालेखांत आणि राज्यव्यवस्थेच्या स्वरूपांत शपथेवर लिहिल्याप्रमाणें न्याय, भूतदया, स्वातंत्र्याचीं तत्वें आणि आमच्या राज्याची शाश्वती व शुद्धता यांना आह्मी अनुसरत आहोंत. या पूर्वींचे जे देश स्वतंत्र आहेत त्या देशांत गुलामगिरीच्या प्रसारास प्रतिबंध करणें हेंच आह्मांस इष्ट आहे आणि त्या प्रमाणें करण्यास आह्मी सर्व आजपासून एक मतानें या लेखानें वाग्बद्ध होत आहोंत."

या प्रमाणें लोकसत्तक स्वतंत्रपक्ष ( रिपब्लीकन ) नवीन स्थापन झाला. या राष्ट्रीय लोकसंमत सभेचा विस्तार बराच मोठा असून त्यांत स्वातंत्र्यासाठीं कळकळीनें झटणारे आणि सार्वजनिक मत प्रदर्शित करणारे पुढारी मोठे वजनदार लोक होते; अशा थोर थोर मंडळीच्या सभेंत अब्राहामलिंकन हा सूर्याप्रमाणें शोभत असून त्यानें मोठ्या कुशलतेनें जें भाषण

केलें त्या भाषणाच्या योगानें समाजांतील लोकांच्या अंतःकरणांत स्वातंत्र्यस्फुरणाची ज्वाला भडकू लागली. देशाच्या भावी उन्नतीच्या आनंदानें त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले; आणि रोग्यास शक्तिवर्धक औषध मिळाल्यानें जशी त्याच्या मुखावर टवटवी दिसूं लागते तद्वत् स्वातंत्र्याच्या प्रोत्साहनानें सर्वांचीं मुखकमलें प्रफुल्लित दिसूं लागलीं. लोकांचें स्फुरण जागृत करणारीं अशीं अब्राहाम यानें पुष्कळ व्याख्यानें दिलीं, परंतु त्यांचे उतारे आज कोठेंच उपलब्ध नाहींत ही मोठी दुर्दैवाची गोष्ट होय; त्यांतील श्रोत्यांपैकीं एकानें असे उद्गार काढिले आहेत कीं " अब्राहाम याच्या भाषणानें विद्युद्वेगाप्रमाणें समाजावर परिणाम झाला, असें मानवी वक्तृत्व कोठेंच पाहण्यांत अगर ऐकण्यांतही नाहीं. त्याचें आवेशयुक्त भाषण चालू असतांना पुष्कळ देशभक्त वेगानें वारंवार उठून उभे राहून मोठा जयघोष करीत असत, आणि त्यामुळें व्याख्यानमंदीर दणदणून जात असें. असा अब्राहाम याच्या जोरदार भाषणाचा महिमा जेवढा वर्णन करावा तेवढा थोडाच; सारांश या लोकसंमत राष्ट्रीय सभेची संघशक्ति अखेरपावेतों कायम राहिली हें विसरता कामा नये. "

वर लिहिल्याप्रमाणें व्यवस्था इतर संस्थानांतही झाली होती. प्रत्येक संस्थानांत स्वातंत्र्यासाठीं निरनिराळी मंडळी आपापल्या इच्छेनुरूप स्थापन झाली. इ. स. १८५६ सालच्या

जून महिन्याचे १७ वे तारिखेस लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाची राष्ट्रिय सभा फिलाडेल्फिया येथें प्रथमच भरली होती. कॅलिफोर्नियाचे जॉर्जचार्लस फ्रेमॉंट यांना अध्यक्ष नेमिले असून न्यूजर्सीचे विलयम एल्. डेटन यांस उपाध्यक्ष नेमिलें होतें. अब्राहाम यानें उपाध्यक्ष होण्यासाठीं उमेदवार व्हावें असा प्रयत्न त्याची इलिनॉइस येथील मित्र मंडळी करूं लागली कारण ते सर्व अब्राहाम याचे शुभचिंतक होते. परंतु मि. डेटन याचे साठीं २५९ मतें पडलीं आणि अब्राहाम याचे साठीं ११० पडलीं. अब्राहामलिंकन हा स्प्रिंगफिल्ड येथें असतांना त्याला जेव्हां असें समजलें कीं ' लिंकन यांस उपाध्यक्ष नेमण्यासाठीं मतें पडलीं आहेत ' तेव्हां स्वतःची कीर्ति दिवसानुदिवस वाढत आहे हें अब्राहाम यास माहित नव्हतें म्हणून त्यानें उद्गार काढिले कीं ' ज्या लिंकनबद्दल मतें पडली असतील तो बहुधा मॅसॅचुसेटसचा प्रसिद्ध लिंकन असेल. '

या दरम्यान प्रजासत्ताक पक्षाची सभा इ. स. १८५६च्या जून महिन्याच्या १७ व्या तारखेस सिनसिन्नाटी येथें भरली होती. पेन्सिलव्हेनियाचा जेम्सबुकानन यास अध्यक्ष आणि केंटकीचा जान सी. ब्रेकनरीज यास उपाध्यक्ष नेमिलें होतें. अब्राहाम याचा प्रतिस्पर्धी हा मनांत मांडे खात होता कीं ज्या अर्थी आपण गुलामगिरी नवीन देशांत चालू ठेविण्याचे तजविजबद्दल वकिली केली आहे त्या अर्थी आपलिच निवड-

पूर्व इलाख्या साठीं होईल, परंतु हा सन्मान न मिळाल्यामुळें त्याला मोठा विषाद वाटला. गुप्त मतांचा सोळावा कागद पाहतां बुशनन याचे साठीं १६८ मतें पडलीं त्यांत १२१ स्वतंत्र संस्थानांतलीं होतीं आणि ४७ गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून होतीं. डोग्लस याचे साठीं १२२ मतें पडली त्यांत ४९ स्वतंत्र संस्थानांतून असून ७३ गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून होतीं. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील मंडळीनें आपल्या ठराविक तत्वाला अनुसरून राष्टीय सभेला अथवा कोणत्याही प्रांतिक कायदे करणाऱ्या मंडळीला तसेंच कोणत्याही व्यक्तीस अथवा व्यक्तींच्या समाजास संयुक्त संस्थानांतिल कोणत्याही देशांत गुलामगिरीला कायदेशीर अस्तित्व नमूद करण्याचा अधिकार देण्याबद्दल प्रतिकूल मत दिलें; शिवाय या लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतिल मंडळीनें असें जाहीर रितीनें कळविलें कीं 'राज्यव्यवस्थेच्या स्वरूपाला अनुसरून संयुक्त संस्थानांतील देशाचा सरकार याना त्यानें राज्यकारभार चालविण्याचा राष्ट्रीय सभेला संपूर्ण अधिकार आहे, मात्र अशी राज्यसत्ता चालवितांना ( १ ) अनेक बायका करण्याची चाल आणि ( २ ) गुलामगिरी, ह्या ज्या निंद्य व जुलूमाच्या दोन बाबी आहेत त्यांस प्रतिबंध करणें हें राष्ट्रीय सभेचें मुख्य कर्तव्य व तसें करण्यास सभेस कायदेशीर हक्कही आहे असें खात्रीनें समजावयाचें आहे.' इकडे प्रजासत्ताक पक्षांतील मंडळीचीं तत्वें अशीं बाहेर आलीं होतीं कीं

'डोग्लेसच्या म्हणण्याप्रमाणें कॅन्सास व नेब्रास्का येथें तेथील लोकांच्या इच्छेनुरूप गुलामगिरी चालू असावी अशीं मतें त्यांनीं द्यावीत'. ह्या सर्व हकिकती वरून लोकसत्ताक स्वतंत्रपक्ष ( रिपब्लिकन् ) आणि प्रजासत्ताकपक्ष ( डेमोक्रॅटिक ) ह्या दोन्ही पक्षांच्या वास्तविक अटी काय आहेत हें अगदीं चांगल्या रितीनें उघड होत आहे.

या वर्षी ' अमेरिकन्मंडळी ' या नांवाचा एक तृतीयपक्ष उत्पन्न झाला असून त्या लोकांचें तत्व असें होतें कीं स्थाइक रहिवाशांस ( ज्यांची ती जन्मभूमि असेल अशांना ) मत देण्याचा विशेष हक्क असून तो हक्क परकीयांनीं क्वचितच वापरावा. ह्या अमेरिकन् मंडळीनें, फिलमोर आणि डोनेल्सन हे दोघे पुढारी असून अध्यक्ष जनरलटेलर याच्या मरणानंतर, उपाध्यक्षाचे जागीं मि. फिलमोर याची नेमणूक केली होती. अद्याप प्रजापक्षी लोक कोठें कोठें दिसत असून त्यांना त्या पक्षाचें नांव बुडालें नाहीं असें वाटत होतें. हे लोक *फिलमोर याचे तर्फे मतें देतील अशी सर्वांची समजूत होती.

अब्राहामलिंकन नेहमीं प्रमाणें आपल्या संस्थानांतून निवडणूक करणारा असून इलिनॉईस मध्यें लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतून होणाऱ्या निवडणूकींत प्रमुख होता. सभेच्या वादविवादांत त्यानें चांगलें लक्ष घातलें असून इ. स. १८५६ सालीं

---

*इ. स. १८४८ सालीं टेलरच्या बरोबर याची निवडणूक झाली होती.

त्यानें पुष्कळ ठिकाणीं व्याख्यानें दिलीं; या व्याख्यानाचा सर्व झोंक प्रजासत्ताक पक्षाचा पुढारी डोग्लस याचे विरूद्ध होता. त्याच्या अंगीं असलेल्या असामान्य वक्तृत्वशक्तीचा उपयोग करण्या साठीं हल्लीं त्याचे जवळ पुष्कळ सामुग्री होती. दक्षिणे कडील लोक आणि उत्तरे कडील त्याचे प्रजासत्ताक साथीदार, देशांत गुलामागिरी चालू करण्याचा प्रयत्न मोठ्या नेटानें करीत होते आणि त्यांच्यावर अवलंबून राहणाऱ्या लोकांनीं कँसास प्रांतांत रक्ताचा जणूं काय प्रवाहच चालविला होता. याच प्रसंगीं या लहानशा प्रांतांत फांटाफूट होऊन तेथें आपसांतलें युद्ध ( सिव्हिल वॉर ) माजलें. स्वतंत्रसंस्था अगर गुलामागिरीच्या संस्था या पैकीं कोणत्या स्थापन करावयाच्या हें जरी तेथील एकंदर लोकमतांवर अवलंबून होतें तरीपण डोग्लस याच्या प्रत्युत्तराप्रमाणें तेथें कायदेशीर रितीनें गुलामागिरीच चालू करावयाचा असा निश्चय दिसत होता. या मोहिमेंत अब्राहाम दक्षिण प्रांतांत जेथें गुलामगिरी चालू करण्याकडे लोकांची दृढ प्रवृत्ति होती अशा एका संस्थानांत व्याख्यान देत असतां श्रोत्यांपैकीं एकानें त्यास उद्देशून म्हटलें ' बैलांची जोडी हांकीत हांकीत आपण या संस्थानांत अनवाणी शिरलात ही गोष्ट खरी काय ? ' हा अप्रासंगिक व चालू विषयास लागू न पडणारा चमत्कारिक प्रश्न ऐकून अब्राहाम यानें किंचित् वेळ थांबून अशा अप्रयोजक प्रश्नाचें उत्तर

मावें किंवा कसें याबद्दल विचार केला आणि ह्मटलें कीं ' जर या चालू विषयांत या प्रश्नाचें उत्तराची अपेक्षाच असली तर मी या कांहीं मंडळी समक्ष असें खात्रीनें सिद्ध करून देईन कीं ' मी बैलांची जोड हांकीत अनवाणी शिरलों. ' नंतर स्वातंत्र्यापासून देशाला कसे कसे फायदे झाले व होतील आणि गुलामगिरी चालू असणें अगर चालू करणें हें केवळ अनीतीचें कर्म असल्यामुळें देश कसा अधोगतीस जातो याचें त्यानें चांगलेंच विवरण करून दाखविलें; शिवाय तो असेंही ह्मणाला कीं "जो पावेतों देशांत जाहीर रितीनें बोलण्याच्या श्रमाचा मोबदला मिळालेल्या मनुष्यावर आणि देशावर सूर्यनारायण आपला कृपाप्रकाश पाडील, पर्जन्य आपलें जलाशय मोकळें करील आणि वायू अनुकूल वाहील तों पावेतो गुलामगिरीचे विरुद्ध आणि स्वातंत्र्याचे लाभांत मी जाहीर व्याख्यानें दिल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. "

या मोहीमेंत गुलामगिरी चालु असलेली पाहून होणाऱ्या वेदना विंचवाच्या तीव्र वेदने प्रमाणें चित्तास अतिशय ताप देत होत्या. या लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचें मूळ उपटून फेंकून देण्याच्या हेतूनें गुलामगिरी चालू करण्याकडे प्रवृत्ति असलेल्या मंडळीनीं अपशब्दांचा भडिमार विरुद्ध पक्षावर चालू केला होता. फ्रिमॉट नांवाच्या एका पुढाऱ्यानें कॅलिफोर्निया कडील मोहिमेंत आपल्या अनुयायी मंडळीसह अति संकटें सोसलीं, व या मोहि-

मेंत त्या निर्जन प्रदेशाचा शोध त्यानें प्रथम लाविला ह्मणून त्याच्या अनुयायी मंडळींनीं त्याला 'मार्ग शोधक' अशी पदवी दिली, कारण त्यांना तो एक रणशूर योद्धयाच्या ठिकाणीं होता. विरुद्ध पक्षाचे लोक त्याला 'खेंचरें भक्षण करणारा काळा स्वतंत्र मनुष्य' असें ह्मणत होते, आणि त्याच्या अनुयायी मंडळीला लोक 'लोंकरीच्या धोड्याची मंडळी' असें ह्मणत असत, कारण त्यांतील एकानें या लोंकरीच्या धोड्याचा नवीन शोध लाविला होता. अब्राहाम यानें प्रथम पासून भविष्य वर्तविल्या प्रमाणें निवडणूकीचा निकाल झाला आणि जेम्सबुशनन् याची नेमणूक झाली. स्वातंत्र्यासाठीं होणारा झगडा संपून त्याचा परिणाम असा झाला कीं फक्त एक शिवाय करून बाकीच्या गुलामगिरी चालू असलेल्या सर्व संस्थानांतील लोकांनीं प्रजा सत्ताक पक्षाच्या उमेदवारासाठीं मतें दिलीं. त्यांत बुशननसाठीं १७४ मतें पडलीं. खालीं लिहिलेल्या गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतल्या लोकांनीं त्याचे तर्फे मतें दिलीं तीं संस्थानें:—अल्बामा, अर्कान्सस, डिलावेर, फ्लोरिडा, जॉर्जिया, केंटकी, लुशियाना, मिसिसिपी, उत्तरकॅरोलिना, दक्षिणकॅरोलिना, टेनिसिस, टेक्सस आणि व्हर्जिनिया. आतां ज्या स्वतंत्र संस्थानांतील लोकांनीं बुशनन् साठीं मतें दिलींतीं येणे प्रमाणें:—कॅलिफोर्निया, इलिनॉइस, इंडियाना, न्यूजर्सी आणि पेन्सिलव्हेनिया. फ्रिमॉंट साठीं ज्या स्वतंत्र संसथनांतील लोकांनीं मतें

दिलीं तीं:-कनेक्टिकट, ओयावा, मेइन, मेसॅचुसेटस्, मिचि-गेन, न्यूहँपशायर, न्यूयार्क, ओहिओ, ऱ्होडबेट, व्हर्मोट आणि व्हिसकॉन्सीन. हीं सर्व मतें ११४ होतीं, आणि बुशनन साठीं १७४ होतीं. गुलामागिरी चालू असलेल्या मेरिलँड नांदा-च्या संस्थानांतून आठ मतें फिलमोरसाठीं पडलीं. या प्रमाणें बुशननूचे लाभांत पांच स्वतंत्र संस्थानांतून आणि चौदा गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून मतें पडलीं. अकरा मतें स्वतंत्र संस्थानांतून फ्रिमाँटसाठीं पडलीं होतीं आणि गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून फिलमोर साठीं एक मत पडलें होतें. मत देणारांची एकंदर संख्या मोजतां असें आढळून आलें कीं बुशनन् याचे साटीं १८३८१६९, फ्रिमाँटसाठीं १३४१२६४ आणि फिलमोरसाठीं ८७४५३४ मते पडलीं. इलिनॉइस येथें लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचा उमेदवार बिसेल याची सुभेदाराच्या जागेसाठीं निवडणूक झाली.

या दरम्यान कॅँसास येथें गुलामागिरी आणि स्वातंत्र्य या दोन बाबती साठीं तंटा चालूच होता. गुलामगिरीस अनुसरणा-ऱ्या लोकांचें असें ह्मणणें होतें कीं स्वतंत्र पक्षांतील लोकांस सभेंत मत देण्याचा हक्क नाहीं आणि त्यामुळें त्यांनीं 'लिकाँ-प्टन' येथें एक कायदे करणारी मंडळी स्थापन करून गुलाम-गिरी चालू करणे अवश्य असल्याबद्दल कांहीं नियम तयार करविले. स्वतंत्र पक्षांतील लोकांनीं अशी कायदे करणारी मंडळी

व त्यांनीं केलेले उपहासास्पद नियम आह्मांस मान्य नाहींत असें स्पष्ट सांगितलें. या स्वतंत्र पक्षांतील लोकांनीं तेथील स्थाईक रहिवाशी मंडळीची एक सभा भरवून राजकीय विषया संबंधी टोपेका येथें भरणाऱ्या राष्ट्रीय सभेस पाठविण्यासाठीं कांहीं प्रतिनिधींची निवडणूक केली आणि या प्रतिनिधींनीं राष्ट्रीय सभेंत जाऊन गुलामगिरीस देशांतून आजिवाद खो मिळावा असे नियम तयार करून घेतले. त्या दिवसापासून कॅंसास देशांत गुलामगिरी चालू करावी असें ज्यांचें मत असेल त्यांस ' लिकॉप्टन ' असें ह्मणत आणि चालू करूं नये असें ज्यांचें मत असेल त्यांना ' ऍन्टिलिकॉप्टन ' असें ह्मणत. या प्रमाणें ' लिकॉप्टन ' व ' ऍन्टिलिकॉप्टन ' अशीं दोन नांवें राजकीय कारभारांतल्या मंडळींत चालू झालीं. टोपेको येथें राष्ट्रीय सभेंत जें राजकीय कारभाराचें स्वरूप ठरलें त्या बद्दल तेथील सर्व लोकांनीं अनुकूल मतें दिलीं; व त्या प्रमाणें लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाच्या नियमाला अनुसरून लोक अमलदारांच्या निबडणूकी करण्याचे तयारीस लागले. टोपेका येथील राज्यव्यवस्थेचें स्वरूप कॅंसास येथील जे खरे रहिवाशी लोक होते त्यांच्याच श्रमाचें फल असून त्यांची संख्याही मोठी होती, आणि तेथें जे नांवानें येऊन राहिले होते त्यांची संख्या फार थोडी असून त्यांनीं लिकॉप्टन राज्यव्यवस्थे तर्फे मतें दिलीं होतीं. या दोनी तंट्यांचा निर्णय वाशिंग्टन् ये राष्ट्रीय सभेच्या पसंतीप्रमाणें व्हावयासाठीं सर्व प्रकरण तेथें

रवाना झालें. बुशनन् हा अध्यक्ष असून त्यांने रॉबर्ट वॉकर यास तेथील सुभेदार नेमिलें होतें. रॉबर्ट वॉकर हा ताबडतोब वॉशिंग्टन् येथें गेला आणि लिकॉँप्टनच्या राज्यव्यवस्थे विरुद्ध त्यानें तेथें राष्ट्रीय सभेंत वादाविवाद चालविला आणि असें प्रतिपादन केलें कीं ' लिकॉँप्टन येथील राज्यव्यवस्थेचें स्वरूप अगदीं खोटें आणि निवळ कपटाचें होय व अशाच बद्दल त्या प्रांतांतील लोकमतही आहे.' तो वाशिंग्टन् येथें जाऊन पोंचण्याचे पूर्वीच तेथील अध्यक्षानें लिकॉँप्टन येथील राज्य व्यवस्थेचे लाभांत राष्ट्रीय सभेस शिफारस केली होती. टोपेका येथील राज्यव्यवस्थेच्या तर्फे जे स्वतंत्र संस्थानांतून अमलदार तेथें गेले होते त्या सर्वांना तुरुंगांत टाकिलें. अध्यक्षाच्या हुकुमान्वयें संयुक्तसंस्थानांतील फौजेनें कायदे करणाऱ्या मंडळीची रानोमाळ दाणादाण करून टाकिली आणि कॅंसास संस्थानावर बंदुका झाडून तेथील लोकांस गुलामगिरी स्विकारण्यास भाग पाडिलें.

---



# प्रकरण १३ वें.

## अब्राहामलिंकन आणि डोग्लस्. आत्म चरित्र कथन. मनुष्य जातीचे स्वातंत्र्य.



आणखी एकवेळ अब्राहामलिंकन आणि डोग्लस या उभयतांमध्ये द्वंद्वयुद्ध व्हावयाचें होतें. इ. स. १८५८ सालीं डोग्लस यांची सेनेटरच्या जागेची मुदत संपण्याची संधी होती; इलिनॉइस येथील लोकांनीं आपले लाभांत मतें देऊन स्वतःची पुनः निवडणूक करून घेण्याची त्याची उत्कटेच्छा होती. लिकॉप्टन येथील राज्यकारभाराचे नियम कायदेशीर झालेले पाहून आणि कॅनसासवर गुलामगिरी जबरदस्तीनें लादलेली पाहून डोग्लस यानें अध्यक्षाशीं द्वैतभाव ठेविण्यास आरंभ केला आणि लिकॉण्टन येथील व्यवस्थेच्या विरुद्ध मी आहे असें लौकरच त्यानें उघडपणें दाखविलें. त्यानें केलेल्या कॅनसास नेब्रास्का संबंधी नियमाच्या मसुद्यामुळें ज्या गोष्टी घडण्यासारख्या होत्या त्याचेच विरुद्ध त्यानें आतां खटपट करणें अगदीं असंबद्ध दिसत होतें, तरीपण ती खटपट त्यानें केलीच आणि त्यामुळें पूर्वेकडील संस्थांच्या स्वतंत्र पक्षांतील बऱ्याच लोकांस हा आपल्यांत यापुढें

येऊन मिळेल असें वाटलें होतें; इलिनॉइसच्या स्वतंत्र पक्षांतील लोकांस त्यांनीं **डोग्लस** याचे लाभांत मतें देण्याबद्दल सल्ला दिली. त्याला आतां 'लिकॉप्टन विरुद्ध प्रजासत्ताक मनुष्य' असें ह्मणत होते; गुलामगिरीच्या विरुद्ध झाल्याशिवाय स्वातंत्र्यासाठीं आपणास उघड मत देतां येणार नाहीं अशीही त्याची खातरी होती. इलिनॉइस येथील स्वतंत्र पक्षांतील लोक डोग्लस यांस चांगल्या रीतीनें ओळखत होते; त्यांचा याच्यावर विश्वास बसेना आणि ह्मणून त्यांनीं इ. स. १८५८ सालीं जेव्हां मोठी सभा भरली त्यावेळीं डोग्लस याची मुदत सरल्यावर संयुक्त संस्थानाच्या सेनेटराच्या जागीं **अब्राहाम** लिंकन यासच नेमण्याबद्दल सर्वत्रांनीं जाहीर रीतीनें कळविलें.

या सर्व हकीकतीवरून **अब्राहाम** यानें, हें प्रकरण बरेंच माजून शेवटीं मोठें युद्ध खास होणार, असें ताडलें. **डोग्लस** याचा कावेबाजपणा अब्राहाम यासच संपूर्णपणें माहीत होता. त्याच्या सामर्थ्याची किंमत **अब्राहाम** चांगली जाणत असे. इलिनॉइस येथील लोक मनुष्य जातीस गुलामगिरी करण्यास लावण्याचे कामीं किती कोंवळ्या मनाचे होते हें फक्त **अब्राहाम** संपूर्णपणें जाणत होता. पुढें होणाऱ्या सभेच्या वादविवादांत आखेरचें भाषण कसें करावयाचें तें सर्व त्यानें मुद्देसूद तयार करून ठेवलें होतें. सेनेटर नेमण्यास ( स्वतःस अगर **डोग्लस** यास ) कोणकोणते लोक लायक आहेत याची निवडणूक अद्याप

व्हावयाची होती. कायदे करणाऱ्या मंडळींत सेनेटर आणि प्रतिनिधि नेमण्याचें काम ज्या लोकांकडे होतें त्यांजकडे अब्राहाम व डोग्लस यांस अर्ज करावयाचे होते. अब्राहाम यानें आपलें भाषण स्वतःचा भागीदार डब्ल्यू. एच. हेरंडन यास वाचून दाखविलें; त्या भाषणाचें पहिलेंच कलम वाचून हेरंडन याची हिंमत खचली; तें असें '—ज्या घरांत कलह माजला आहे तें घर सुखानें कसें बरें नांदेल! ज्यांत अर्धी गुलामगिरी व अर्धे स्वातंत्र्य वास करीत आहे अशा राज्याची शाश्वति नाहीं असें मी समजतों.' हेरन्डन ह्मणाला 'तूं ह्मणतोस तें खरें परंतु त्या वेळीं असें जाहीर रीतीनें बोलणें हें समंजसपणाचें काम नव्हें असें मला वाटतें.' अब्राहाम हा आपल्या वरील ह्मणीस उद्देशून ह्मणाला:—"हा सिद्धांत सहा हजार वर्षांपासून सिद्ध असून चालत आला आहे, ह्मणून मी हिंमतीनें व प्रतिज्ञेनें कळवितों कीं, तो मी माझ्या भाषणांत अक्षरशः जाहिर रीतीनें बोलून लोकांचें मनांत चांगला बिंबवीन;" आणि त्याचप्रमाणें त्यानें केलें.

तें व्याख्यान चालू असतांना त्यानें प्रतिपादन केलें कीं "ही संघशक्ति नष्ट व्हावी असें मला वाटत नाहीं; तसेंच हें एकोप्याचें घर कोसळून पडावें असेंही मला वाटत नाहीं, आणि त्याचे विभागही होऊ नयेत अशी माझी बळकट इच्छा आहे. कोणत्याही कामाचा कोणता तरी एक निर्णय होणें हें चांगलें, विनाकारण

भिजत घोंगडें ठेवण्यांत अर्थ नाहीं. त्याप्रमाणें एक तर गुलामगिरीचे शत्रु असतील ते गुलामगिरीचा विस्तार होऊं न देतां सर्वानुमतें तिला अगदींच बंद करतील अगर तिचे हितचिंतक असतील ते उत्तर व दक्षिण प्रांतांत तसेंच जुन्या संस्थानांत तिचा विस्तार वाढवून तिला कायदेशीर स्वरूप तरी आणतील. ”

अब्राहाम आणि डॉग्लस या उभयतांमध्यें जो वादविवाद झाला तो फारच महत्वाचा असून लक्षांत ठेविण्याजोगा होता. ह्या उभयतांची शारिरिक स्थिति ऐन उमेदींत असून मानसिक विचारही चांगले तरतरीत होते. डॉग्लसचें वय ४५ वर्षांचें असून अब्राहाम याचें वय ४९ वर्षांचें होतें. डॉग्लस हा व्हर्मॉटचा राहणार असून तो एका सुताराकडे काम शिकावयास राहिला होता व नंतर तो आपल्या वयाच्या २० वें वर्षी इलिनॉइस येथें जाऊन राहिला; तेथें त्यानें एका लिलांव करणाराकडे कारकुनाची नोकरी पत्करली होती. अब्राहामाप्रमाणेंच तो त्या वेळीं स्वतःसिद्ध असून आपल्या बुद्धिप्रभावानें चांगलाच उदयास आला. वयाचें २२ वें वर्षी लहान संस्थानांत मुखत्याराचे ( अटॉर्नी जनरल ) जागीं त्याची नेमणूक झाली. कारकुनाची नोकरी सोडून देऊन संस्थानांत कायदे करणाऱ्या मंडळींत त्याची निवडणूक झाली, तेथें त्यानें राजकार्यपटू या नात्यानें लवकरच चांगलें नांव मिळवून उत्तम वादविवाद करणारा आणि सर्वगुणसंपन्न असें चारचौघांत ह्मणवून घेतलें. ह्याच संधीस त्याचा

आणि अब्राहाम याच्या प्रथम भेटीचा योग आला. अमेरिकें- तील राजकारभाराच्या प्रकरणांत अब्राहाम हा डोग्लसचा पुष्कळ वर्षेपर्यंत प्रतिस्पर्धी होता. कांहीं दिवसानंतर सभेंत डो- ग्लस याची प्रतिनिधि या नात्यानें तीन वेळां पाळी पाळीनें नेमणूक झाली. वकील मंडळींत आपली जागा पत्करण्यापूर्वीं त्याची इलिनॉइस येथून संयुक्तसंस्थानाच्या सेनेटरच्या जागीं नेमणूक झाली. डोग्लस हा मोकळ्या मनाचा असून मोठ्या टेंकीचा व मिष्टभाषणी होता. तो मोठा हिंमतबहाद्दर असून वादविवाद करितांना मुळींच अडखळत नसे. त्याचें हृदय जरी राजकारस्थानानें भरलेलें होतें तरी त्याचे मुखावरून आंत- ला प्रकार कोणासच कळत नसे; इतक्या आंतल्या गाठीचा मनुष्य असून बाहेरून मी मोठा प्रामाणिक व सत्यवादी आहे असें लोकांस मोठ्या ऐटीनें भासवील असे, हें मात्र विशेष म्हटलें पाहिजे. त्याचा चेहरा असा कांहीं चित्ताकर्षक होता कीं त्याचे स्नेही लोहचुंबकाप्रमाणें त्याच्याशीं नेहेमीं संलग्न असत. पुढें होणाऱ्या वादविवादांत अब्राहाम आणि डोग्लस यांच्या गांठीं पडावयाच्या असून त्यांच्या वादविवादांत सर्व संस्थानांसंबंधी उलाढाली व्हावयाच्या होत्या.

अब्राहामलिंकन याच्या शरीराचा बांधा अतिशय मजबूत असून त्याची उंचीही बरीच होती. त्याचे केंस राठ असून ने- हमीं ताठ उभे राहिलेले व विसकटलेले असत. त्याचा चेहरा

काळा असून मस्तक मोठें व कपाळ रुंद होतें. दैवशाली मनुष्यांचीं जीं जीं लक्षणें ठरलीं आहेत तीं तीं सर्व अब्राहाम यांत संपूर्णपणें वास्तव्य करीत होतीं. त्यानें आपलें स्वतःचें चरित्र थोडक्यांत कळवावें असा त्याला एकदां कोणी प्रश्न केल्यावरून त्यानें आपलें संक्षिप्त चरित्र लिहिलें तें येणें प्रमाणें:—

"कैंटकीच्या हार्डिन परगण्यांत इ. स. १८०९ च्या फेब्रुवारी महिन्याचे १२ वे तारिखेस माझा जन्म झाला. माझे आईबाप व्हर्जिनिया येथें एका साधारण कुटुंबांत जन्मले होते. माझी आई हँक्स घराण्यांतली असून ती माझे वयाचे दहावें वर्षीं निवर्तली. माझा आजा अब्राहामलिंकन व्हर्जिनियाच्या रॉकिंगहॅम परगण्यांतून इ. स. १७८१ अथवा ८२ चे सुमारास कैंटकी येथें येऊन राहिला. तो जमिनींत काम करीत असतांना इंदियन लोकांनीं त्याला कपटानें मारिलें. तो निवर्तला तेव्हां माझा बाप सहा वर्षांचा असून त्याला लिहिणें वाचणें वगैरे शिक्षण मिळालें नव्हतें. मी आठ वर्षांचा होतों तेव्हां तो कैंटकीहून इंदियाना येथील स्पेन्सर परगण्यांत आला, आणि त्याच वेळीं तें संस्थान संयुक्त संस्थानांस जोडिलें. त्या काळांत तेथें जंगलीं जनावरें पुष्कळ होतीं आणि तेथेंच मी लहानाचा मोठा झालों. त्यावेळीं तेथें कांहीं शाळा होत्या, परंतु शिक्षकांस लिहिणें, वाचणें, त्रैराशिकाचें गणित या पलीकडे विद्या येत नव्हती. लॅटिनभाषा जाणणारा एखादा इसम तेथें आल

तर त्याला ' कोणी चेटकी आला आहे ' असें ह्मणत असत. शिक्षणाच्या अशा अव्यवस्थित स्थितीमुळें मी अशिक्षितच राहिलों. मला लिहिणें, वाचणें, त्रैराशिक या पलीकडे कांहींएक येत नव्हतें.

मी बावीस वर्षांचा झालों तों पावेतों शेतांत कामकाज करीत होतों. मी २१ वें वर्षीच इलिनॉइस येथें आलों आणि एक वर्ष मॅकॉन परगण्यांत घालविलें. नंतर मी एक वर्ष न्यु-सालेम येथें एका वखारींत कारकुनाची नोकरी धरून राहिलों. कांहीं दिवसांनीं ब्लॅकहॉकचे युद्धास प्रारंभ झाला, त्यांत आपखुषीनें नोकरी करणारांत मला कप्तान नेमिलें त्यामुळें मला इतका आनंद झाला कीं तसा कधींच झाला नसेल. या मोहिमेंत मला चांगलें यश मिळाल्यामुळें मी हर्षानें फुगलों आणि इ. स. १८३२ सालीं कायदे करणाऱ्या मंडळींत प्रवेश केला. पुढें मला मार बसला तो इतका कीं साऱ्या जन्मांत मला हा एवढाच एक वेळ मात्र लोकांकडून मार मिळाला. काळें करून चार वेळां माझी कायदे करणाऱ्या मंडळींत निवडणूक झाली; नंतर मात्र मी उमेदवारी केली नाहीं. ह्या कारकिर्दींत कायद्यांचा अभ्यास चांगला केला, आणि वकिली करण्यासाठीं स्प्रिंगफिल्ड येथें जाऊन राहिलों. इ. स. १८४६ सालीं राष्ट्रीय सभेच्या खालच्या वर्गांत माझी निवडणूक झाली. पुनः निवडणूक होण्यासाठीं मी उमेदवारी केलीच नाहीं. इ. स. १८४९ ते १८५४ पावेतों

वकिलीचा धंदा फारच व्यासंगानें केला. राजकार्यांत माझा प्रजा-पक्षी बाणा होता, आणि अनेक वेळां प्रजेच्या कल्याणास्तव मी सभेंत मोठमोठाले वादविवाद केले; राजकार्यांत माझें लक्ष कमी होत चाललें होतें इतक्यांत मिसौरी येथील झालेला आपसांतला निकाल जेव्हां रद्द झाला तेव्हां पुनः मला त्याच विषयासंबंधी नवें स्फुरण उत्पन्न झालें; या नंतर मी पुढें काय काय केलें हें सर्वांस चांगल्याच रितीनें माहित आहे. माझ्या शरिराचें वर्णन ऐकणें असेल तर तें थोडक्यांत सांगतों. माझी उंची सहा फुट चार इंच असून माझें शरीर मांसल नाहीं. माझें एकंदर वजन १८० पौंड भरतें. माझा चेहरा काळा असून केंस काळे राठ आणि डोळे घारे आहेत. या शिवाय जास्त खाणाखुणा मला आठवत नाहींत."

मी आपला,

**अब्राहामलिंकन.**

अब्राहाम आणि डोग्लस या उभयतांमध्यें वादविवाद चालू होण्याचे पूर्वी संयुक्त संस्थानांतील वरिष्ठ कोर्टाचे न्यायमूर्ती टॅनी यांनीं ' प्रजासत्ताक स्वतंत्र लोकांच्या राज्यकारभारा परत्वें सर्व देशांत गुलामगिरी चालू आहे आणि राष्ट्रीय सभेस ती बंद करण्याचा हक्क नाहीं ' असें निर्णयात्मक ठरविलें. ह्या निकालमुळें सर्वत्रांस मोठी धास्ती उत्पन्न झाली व ' ड्रेड-

स्कॉटचा निकाल ' असें त्या निकालाचें नांव प्रसिद्ध झालें. कोणी एका शिद्यानें स्वतःची आणि स्वतःच्या बायकापोरांची गुलामगिरीच्या भयंकर कचाट्यांतून मुक्तता होण्यासाठीं अदालतींत दावा आणिला आणि मिसौरीच्या आपसांतल्या निकालास अनुसरून सरहद्दीच्या उत्तरेकडील मुलूख गुलामगिरींतून मुक्त आहे असा पुरावा दिल्यामुळें त्या सर्वत्रांची कायद्याला अनुसरून सुटका झाली. ह्या निकालामुळें गुलामगिरीला राष्ट्रीय स्वरूप आणि स्वातंत्र्याला स्थानिक स्वरूप प्राप्त झालें.

यावरून देशांत दोन विषय प्राधान्य झाले होते ते असे कीं ( १ ) ड्रेडस्कॉटच्या निकालापासून गुलामगिरी आणि स्वातंत्र्य ह्या दोहोंवर काय परिणाम होईल आणि ( २ ) कॅन्सास येथील तंट्याचा कसा निकाल होईल. जरी डोग्लस हा प्रजासत्ताक असून लिकॉम्प्टन विरुद्ध हल्लीं होता तरी पण कॅन्सास येथें जो परिणाम लागला आणि त्यांत त्यानें ' लोकांचें राज्य ' असें जें म्हटलें त्याबद्दल तद्देशीय लोक त्याच्यावर काम चालविणार होते. ड्रेडस्कॉटचा निकाला झाला तो सुद्धां त्याला पसंत होता आणि त्यामुळें ' लोकांचें राज्य ' अगर लोकांची राज्यसत्ता ' असें जें त्याचें तत्व होतें त्या त्याच्या मूळ वाक्याला हरताळ लागली हेंही उघड होत आहे. गुलामगिरीचे लाभांत अगर विरुद्ध, लोकमत पडण्याचे पूर्वीच, संयुक्त स्थानांतील सर्व मुलुखांत गुलामगिरीनें आपला पगडा बसविला.

डोग्लस याचा अब्राहामवर असा आरोप होता कीं ' संस्थानांतील संघशक्तीचा भंग झाला ' अशी जी त्याची ओरड आहे त्याला कारणीभूत तोच ( अब्राहाम ) झाला. त्याचें उत्तर अब्राहाम यानें असें दिलें कीं ज्यांनीं राज्यकार-भाराचे नियम रचिले त्यांना गुलामगिरी नष्ट होईल असें वाटलें होतें आणि त्यांनीं असेंही ठरविलें होतें कीं जेथें गुलामगिरी चालू नसेल तेथें ती चालू करू नये. त्या काळांतल्या लोकांस स्वतंत्र पक्षांतील मंडळीच्या मुद्देसूद प्रश्नास तर्कशास्त्राला अनु-सरून योग्य उत्तरें देण्याचें सामर्थ्य नव्हतें आणि या नात्यानें डोग्लस यानें प्रतिपादन केलें कीं ' काळे आणि गोरे लोक अशा दोन्हीही जाति अब्राहाम यास समसमान आहेत. ' याचें अब्राहाम यानें प्रत्युत्तर दिलें कीं ' शिद्दी तरुण स्त्रियेशीं मला लग्न लावण्यास हरकत नाहीं पण तिला गुलाम ह्मणून मात्र मी बाळगणार नाहीं. अशा तुमच्या खोट्या तर्कटाच्या मी अगदीं विरुद्ध आहे आणि शिवाय मी प्रतिज्ञेनें सांगतों कीं यापुढेंही मी विरुद्ध राहीन. '

अब्राहाम याचें स्प्रिंगफिल्ड येथें भाषण झालें त्यांत त्यानें बोलून दाखविलें कीं ' डोग्लस हा कधीं तरी संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष होईल, आणि हा सुदिन कधीं उगवेल याची वाट त्याचे पक्षांतले मोठमोठे मुत्सद्दी पाहत आहेत. ' अब्राहाम यानें विशेष प्रतिपादन केलें कीं:—

" डॉग्लस याचे पक्षांतील लोकांनीं त्याचे बरोबर सफर करीत असतांना पुष्कळ आनंदी मंडळी, पोष्ट आफिसें, बंदरें, शस्त्रें बाळगणाऱ्या अमलदारांच्या कचेऱ्या–आगबोटीकडील नेमणुकीचे प्रकार, तोफा वगैरे राहणारीं गलबतें, परकीय राज्यांतील मंडळी वगैरे पुष्कळ बाबती पाहिल्या. त्यांनीं मोठ्या चैनीनें हासून खेळून दिवस काढिले, अति लोभामुळें जें हातास लागेल तें बेलाशक ते बळकावित गेले आणि ज्या अर्थीं ते फक्त एका चित्ताकर्षक मूर्तीकडे एकसारखी टक लावून व सर्व भिस्त त्यावर ठेवून बसले होते त्या अर्थीं स्वतःच्या मंडळींत किंचित् द्वैतभाव दिसत होता तरी पण तो न गणकारता ते स्वतः हताश झाले नव्हते. त्यांचा असा लोभी स्वभाव असल्यामुळें ते अंतर्यामीं चिंताग्रस्त असून तसेच त्याचे पुढें जात असत आणि त्याचे बरोबर आगतस्वागत, मेजवान्या, मानपान, वगैरेंचे सुखोपभोग घेत असत परंतु मी अध्यक्ष होईन असें मात्र त्यापैकीं एकालाही वाटलें नाहीं. "

अब्राहाम आणि डॉग्लास यांनीं वादविवाद कशा रितीनें करावा याबद्दल परस्परांत बराच पत्रव्यवहार होऊन शेवटीं सात निरनिराळ्या मुद्यावर वादविवाद करण्याचें ठरलें, त्यापैकीं पहिल्या मुद्यावरील वादविवाद इ. स. १८५८ च्या आगष्ट महिन्याच्या २१ वे तारिखेस ओटावा येथें झाला आणि शेवटचा वादविवाद तारीख १५ आक्टोबर रोजीं आल्टन येथें झाला.

या उभयतांच्या वादविवादामुळें सर्व देशांतल्या लोकांचीं मनें चंचळ झालीं होतीं. गुलामगिरी आणि स्वातंत्र्य हेच दोन ठळक मुद्दे या वादविदांत होते. राज्यव्यवस्थेचें स्वरूप ठरल्या दिवसापासून ज्या दोन मोठ्या प्रश्नांचा घोळ पडला होता तो या वादविवादानें अगदीं निघून जाईल असें लोकांस वाटलें होतें. जसा एखाद्या दिवाणी कामाच्या हुकूमनाम्यांत निर्णय असतो तसा निर्णय यांत व्हावयाचा नव्हता; परंतु या वादविवादांतून, ॥ वादे वादे जायते तत्वबोधः॥ या न्यायानें च खरें तथ्य निष्पन्न व्हावयाचें होतें आणि त्याच तथ्यावर देशाचा उदय अथवा ऱ्हास होणें अवलंबून होतें. अब्राहाम याची वर्तणूक साधी व काटकसरीची होती आणि डोग्लस हा दांभिक असून उधळ्या होता. वादविवादांतील मूलतत्वाकडे डोग्लस याचें मुळींच लक्ष नसून त्याचे अनुयायी अप्रासंगिक भाषणें करून त्याचे प्रतिपक्षास वादविवादांत वरचेवर अडथळा करीत असत. अब्राहाम याचा या वादविवादांत पुष्कळ अपमान झाला परंतु ॥ उदार चरितानां तु वसुधैव कुटुंबकं॥ या कवि उक्ती प्रमाणें अब्राहाम हा इतक्या मोठ्या मनाचा होता कीं त्यानें त्या अपमानाबद्दल एक शब्दही उच्चारून दाखविला नाहीं. डोग्लस हा आपल्या कुलशीला प्रमाणें अपशब्दांचा भडिमार करीतच सुटला होता. तो वरचेवर हेंच गाणें गात असे कीं स्वतंत्र पक्षाचे लोक, शिद्दी लोकांस सामाजिक रितीनें समान मानीत

आहेत, व याला अनुसरून तो त्या लोकांस ' काळे स्वतंत्र लोक ' असें थट्टेनें व तिरस्कार बुद्धीनें ह्मणत असे. ह्या सर्व हकिकती वरून इतकें तर सिद्ध आहेच कीं अब्राहाम हा डोग्लस पेक्षां हजार पटींनें श्रेष्ठ होता. त्याचा भारदस्तपणा, अचल बुद्धि आणि मार्दव ह्या सद्गुणांकडे पाहून कोणीही इतिहासप्रिय विद्यार्थी त्याला प्रेमादरानें पूज्य मानील यांत संशयच नाहीं.

या वादविवादांत डोग्लस याचें असें ह्मणणें होतें कीं ( १ ) " शिद्दी लोकांस कांहीं हक्क देणें अगर न देणें याबद्दल संस्थानांतील प्रत्येकास निर्णय करून घेण्याचा हक्क आहे; ( २ ) काळे लोक गोऱ्या लोकांच्या मांडीस मांडी टेकून बसण्यास अथवा त्यांची बरोबरी करण्यास स्वाभाविक रितीनेंच योग्य नाहींत; ( ३ ) प्रत्येक देशांतील लोकांस गुलामगिरी चालू करावी अगर करू नये याबद्दल मत देण्याचा हक्क आहे; ( ४ ) देशांत अर्ध्या ठिकाणीं गुलामगिरी व अर्ध्या ठिकाणीं स्वातंत्र्य चालू असणें अशी व्यवस्था राहिली तरी संघशक्ति आणि राज्यव्यवस्था चिरकाल व उत्तम रितीनें चालूं शकेल. " अब्राहाम हा दृढ निश्चयानें " स्वातंत्र्य ' हाच मुद्दा धरून बसला होता. तो ह्मणाला " प्रत्येक मनुष्य जन्मास येतो त्याचवेळीं तो स्वातंत्र्याच्या हक्कासह उत्पन्न होतो, आणि आत्मसंरक्षण, स्वातंत्र्य आणि सौख्य ह्यासंबंधी जे हक्क त्याला जन्मतःच प्राप्त झालेले असतात त्या हक्कापासून त्याला पराङ्मुख कोणासच करितां

येणार नाहीं व तसा कोणासच अधिकारही नाहीं. मी प्रतिज्ञेनें स्पष्ट सांगतों कीं, शिद्दी ( काळे ) लोकांची गणना मनुष्य जातींतच आहे. ऐन दोनप्रहरीं एखाद्या नांदत्या घरावर दरोडा घालावा हें जसें अन्यायाचें कृत्य आहे तद्वत् गुलामगिरी म्हणजे निव्वळ अन्याय ! अन्याय ! अन्याय ! असें मी कायावाचामनें करून तीन वेळ सांगतों. जर गुलामगिरी चालू ठेविणेंच असेल तर ज्या ज्या संस्थानांत ती मूळपासूनच आहे तेथें तेथें ती पाहिजे तर चालू राहो. ड्रेडस्कॉटच्या निकालामुळें देशाची जी स्थिति झाली आहे तशी स्थिति मात्र स्वाभाविक रितीनेंच नसली पाहिजे ( ह्या मुद्यावर अब्राहाम यानें डोग्लस् यास त्याच्या असंबद्धपणाबद्दल हिणवून त्याजवर दोषारोपण केलें ). 'लोकांची राजसत्ता म्हणजे गुलामगिरी चालू असावी किंवा नसावी ह्याबद्दल मतें देण्यास लोकांचा हक्क' या संबंधी डोग्लस् यानें ओरड केली होती परंतु ड्रेडस्काटच्या निकालामुळें असें कळलें कीं गुलामगिरी देशांत चालूच आहे."

गुलामगिरीच्या विषयासंबंधी डोग्लस् हा मुळींच पर्वा ठेवित नव्हता हें चांगलें नव्हें म्हणून ही पद्धत त्यानें सोडावी आणि त्यांत खरें खोटें काय आहे याचा संपूर्ण विचार करावा असें अब्राहाम यानें डोग्लस् यास सुचविलें आणि त्यासंबंधी कांहीं प्रश्न तयार करून ते डोग्लस् यास विचारण्याचें ठरविलें; त्यांत त्यानें असें स्पष्ट दर्शविलें होतें कीं एकतर त्यानें गुलाम-

गिरीसंबंधी पृथक् पृथक् हक्क ग्राह्य धरिले पाहिजेत अगर ते स्पष्ट नाकबूल केले पाहिजेत. अब्राहाम याच्या स्नेही मंडळीनीं त्याला दोन गोष्टी सांगून सुचविलें कीं हे प्रश्न जर तूं डोग्लस् यास विचारशील तर त्याला असें वाटेल कीं या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं असतां देशांत ड्रेडस्काटच्या निकालाचा अंमल ज्यारीनें चालू होईल आणि मग आपल्यास युद्ध करण्यास कारणच राहणार नाहीं; तो ड्रेडस्काटचा निकाल तात्विक दृष्टीनें मात्र कबूल करील परंतु त्याप्रमाणें अंमल चालू करण्याबद्दल तो कधींही मत देणार नाहीं. तो स्पष्ट ह्मणेल कीं 'तो निकाल न्यायाचा असून खरा आहे परंतु त्याचा अंमल मात्र देशांत होऊ द्यावयाचा नाहीं.' अब्राहाम ह्मणाला 'माझ्या प्रश्नांचें तो जर असें उत्तर देईल तर मग तो अध्यक्ष कालत्रयींही होणार नाहीं.' त्याची स्नेही मंडळी ह्मणाली 'तें तुला पाहण्याची जरूर नाहीं. तुला फक्त सेनेटरच्या जागेबद्दल काय तो तूर्त विचार करावयाचा आहे.' तो पुनः ह्मणाला 'माझ्या मित्रांनो! असें नव्हें; मी महत्कृत्य शिरावर घेत आहे. इ. स. १८६० च्या सालीं युद्धाची किंमत यापेक्षां शंभरपट जास्त आहे'. त्या सालीं इलाख्यासाठीं अब्राहाम स्वतंत्रपक्षाचा उमेदवार होईल आणि डोग्लस् हा प्रजासत्ताकपक्षाचा उमेदवार होऊन त्यास अपयश मिळेल असें अब्राहाम यास वाटलें होतें काय? अब्राहाम हा माठ

शहाणा असून तो जीं जीं भविष्यें वर्तवीत असे तीं तीं सर्व अ-क्षरशः खरीं होत असत- अब्राहाम यानें ठरल्याप्रमाणें डो-ग्लस यास ते प्रश्न विचारिले व त्याचीं उत्तरेंही डोग्लस यानें अशा रीतीनें दिलीं कीं त्यामुळें त्याचे जे कांहीं योग दक्षिण प्रांताशीं जुळून यावयाचे होते ते सर्व फसले.

वरील मुद्यावर सात दिवस वादविवाद झाले असून त्या-बद्दल प्रत्येकास वाटलें कीं, अब्राहाम व डोग्लस या उभयतांत अब्राहाम याचीच वरचढ होत होती; कित्येक वेळां तर डो-ग्लस यासही तसेंच वाटलें असें त्याच्या रितीभातीवरून स्पष्ट दिसत होतें. जेव्हां चार्लस्टन येथें चवथी सभा झाली त्यांत अब्राहाम यानें मोठ्या आवेशानें व उत्साहानें डोग्लस यास प्र-त्युत्तर दिलें, त्यावर डोग्लस यानें जें एक विलक्षण तर्कट का-ढिलें त्यावरून सर्वांस फारच आश्चर्य वाटलें, इतकेंच नव्हें तर डोग्लस याची मित्रमंडळी सुद्धां अगदीं भयभीत झाली. डो-ग्लस यानें शेवटीं हातपाय गाळले. त्याला खास असें वाटलें कीं आपणास यांत अपयश येणार व आतां प्रत्युत्तर देण्यासही आपण अगदीं असमर्थ आहोत. त्याचें चित्त व्यग्र झालें व तो आपल्या जागेवरून उठून खिशांतलें घड्याळ हातांत धरून वक्त्याचे मागें फिरू लागला व त्याची वृत्ति अधीर दिसू लागली. त्याची अशी स्थिति ज्यानें प्रत्यक्ष पाहिली त्यानें एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं ' तो अतिशय संतापला होता, आणि

त्याच्या डोक्यावरील केसाचे गुच्छ हवेनें इतस्ततः उडत होते. एखाद्या सिंहास भक्ष न मिळालें तर जसा तो खवळून इकडे तिकडे फिरतो तद्वत् तो चवताळून फिरत होता. त्यावेळीं अब्राहाम याचें अस्खलित भाषण चालू असून तें इतकें आवेशाचें होतें कीं ऐरणीवर हातोडीचे ठोके पडून जसा ध्वनि निघतो त्याप्रमाणें डोग्लसचें मत खंडन करित असतांना हात आपटल्यानें ध्वनि निघत होता. इतक्यांत डोग्लस यानें आपल्या खिशांतले घड्याळ काढून अब्राहाम यास ओरडून ह्मटलें ' अब्राहाम! बसा आतां, आपली वेळ होऊन गेली ' अब्राहाम याचें मुख तांबडें लाल होऊन गेलें आणि त्यानें मागें पाहून शांतपणानें डोग्लस यास उत्तर दिलें ' होय, माझी वेळ होऊन गेली मी आतां संपवितोंच. '

ह्या वादविवादामुळें देशांतील सर्व लोकांचीं मनें अगदीं व्यग्र झालीं होतीं, आणि त्याचा परिणाम असा झाला कीं संस्थानाचे आणि आसपासचे लोक बाहेर जाऊ लागले. अब्राहाम आणि डोग्लस हे उभयतां वादविवादास ठरल्या प्रमाणें तयार असत आणि श्रोतृ समाजही ऐकावयास सिद्ध राहत असे. हल्लीं जशा आगगाड्या चहूकडे चालू आहेत तशा त्या दिवसांत नसून पुष्कळ लोक शेतीच्या कामीं उपयोगीं पडणाऱ्या गाड्यांतून प्रवास करीत असत. ज्या मोठ्या गांवांत सभा भरत असे तेथील व त्याच्या आसपासच्या खेड्यापाड्यांतील लोकांचीं मनें तो

वादविवाद ऐकण्यास फार उत्कंठित होत असत. त्या वादविवादावर देशाचें बरें वाईट अवलंबून असून त्यांत सत्य व असत्य यांचा निर्णय व्हावयाचा होता, व त्यांत देशाचें स्वातंत्र्य, राज्यकारभार वगैरे विषयांचा खल व्हावयाचा होता. असा महत्वाचा वादविवाद ऐकण्यासाठीं आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस उत्कटेच्छा उत्पन्न होणें हें अगदीं स्वाभाविक होय. त्या वादविवादाची बातमी सर्व देशभर पसरून दूरदेशांत जे गुलामगिरीच्या कचाट्यांत सांपडलेले लोक होते त्यांनाहि ती कळतांच बंधनांतून सुटण्याची आशा उत्पन्न झाली.

हा वादविवाद होण्याचें ठरलें तेव्हां अब्राहाम याचे स्नेहीमंडळीस निकाल कसा काय होतो याची मोठी भीति पडली होती, कारण सर्वांचें त्याजवर अतोनात प्रेम असून त्यांची निष्ठा उत्तम होती; आणि डॉग्लस् याचें सर्वत्र मोठें वजन पडत असून तो पुष्कळ कामांत यशस्वी होत गेला होता, व तो विरुद्धपक्षाचा नेहमीं पाडाव करीत असे. आपली मित्रमंडळी स्प्रिंगफिल्ड येथें झालेल्या वादविवादाचे निकालाविषयीं भयभीत झालेली पाहून अब्राहाम त्यापैकीं एकास ह्मणाला " मित्रा, मी तुला एक गोष्ट सांगतों ती ऐक. आपण मुशाफरी करीत होतों त्यावेळीं वाग्युद्धास योग्य असे फक्त दोन इसम आपण पाहिले, त्यापैकीं तो छोटा ब्रह्मराक्षस पोकळ

ऐट मिरवीत असून अतिशय बडबड मात्र करणारा आहे, त्याची बिशाद काय ? आणि दुसराही त्याच माळेंतला मणी होय व तो एक शब्दही बोलूं शकत नाहीं. तुह्मी कांहींएक काळजी करूं नये. शेवटीं सत्याचाच विजय होणार. " अब्राहाम याचें हें ह्मणणें ऐकून त्याच्या मित्रमंडळीची शंका दूर होऊन त्यांची अर्धी काळजी कमी झाली.

शेवटीं डोग्लस् याची संयुक्तसंस्थानाच्या सेनेटरच्या जागीं नेमणूक झाली. संस्थानाच्या कायदे करणाऱ्या मंडळींत कित्येक सेनेटर असून ते प्रजासत्ताक पक्षांतले होते, पण ज्या जिल्ह्यांतून त्यांची निवडणूक झाली होती ते जिल्हे मात्र हल्लीं स्वतंत्रलोकसत्ताकपक्षांतले ( रिपाब्लिकन् ) होते. संस्थानाची विभागणी होऊन वेगवेगळे जिल्हे केले ही गोष्ट अब्राहाम याच्या बाजूच्या लोकांस पसंत नव्हतीच व त्यामुळें असा परिणाम झाला कीं कायदे करणाऱ्या मंडळींत स्वतंत्रपक्षांतील लोकांच्या मतांपेक्षां प्रजासत्ताक लोकांचीं मतें पुष्कळ पडलीं; परंतु जेव्हां सर्व मतांची बेरीज एकत्र करून पाहिली तेव्हां असें आढळून आलें कीं अब्राहाम याचे साठीं १२६०४८ मतें पडलीं आणि डोग्लस् याचे साठीं १२१९४० मतें पडलीं; इतकेंही असून कायदे करणाऱ्या मंडळींत जरी डोग्लस् याची सेनेटरच्या जागीं निवडणूक झाली तरीपण न्याय व नीति या

दोनी दृष्टीनें अब्राहाम याचेच गळ्यांत यशाची माळ पडली. डोग्लसचा पराभव होऊन वादविवादांत अब्राहाम हाच विजयी झाला असें सर्व लोकांस वाटलें. वरील विषयावर वादविवाद चालू असतांना एके दिवशीं अब्राहाम आपल्या भाषणांत बोलला कीं ' ह्या टोलेजंग वादविवादाच्या निर्णयासंबंधीं विचार केला तर एक रात्र उलटल्यावर या समुहापैकीं कोणास डोग्लसाचें अगर माझें स्मरण होईल असें मला वाटत नाहीं. आह्मांस जरी यासंबंधी कांहीं एक वाटत नाहीं तरी पण या मोठ्या निर्णयाशीं राष्ट्राच्या भावी कल्याणाचा निकट संबंध असला तर त्या निर्णयाची आणि संयुक्तसंस्थानाच्या सेनेटरच्या जागेची तुलना केली असतां सेनेटरच्या जागेचें महत्व मला वाटत नाहीं. '

या वादविवादांत अब्राहाम यानें प्रतिपादन केलेले पुष्कळ मुद्दे त्याचें प्राथमिक शिक्षण उत्तम असल्याबद्दल साक्ष देत होते; त्याच्या भाषणांतले वाक्यालंकार व त्यांतील रूपकें व यावरून जंगलांतील व शेतांतील त्याचा श्रेष्ठ अनुभव चांगला व्यक्त होत असून अमेरिकेंतलें त्याचें ऐतिहासिक ज्ञानहि चांगलें दिसून येत होतें. मनुष्यजातीच्या ऐतिहासिक ज्ञानाचा विषय ज्याला प्रिय असेल अशा मनुष्यास अब्राहाम लिंकन याच्या मानसिक प्रवृत्तीची व उत्तम वागणूकीची हकी-

कत वाचण्याची जास्त गोडी लागेल यांत संशय नाहीं. जेव्हां त्यानें कायद्याचे विषयांत प्रवेश केला तेव्हां ' सिद्धांन्त ' या शब्दाचा पुष्कळ ठिकाणीं उपयोग होत असलेला त्यानें पाहिला, तेव्हां त्यानें सत्याचा प्रभाव कसा आहे तें पाहण्यासाठीं सिद्धान्ताचा उत्तम अभ्यास केला. वादविवाद चालू असतांना अब्राहाम हा डोग्लस याजवर अतिशय संतापला होता. कारण सेनेटर ट्रंबूल याचे कांहीं कांहीं ध्यानांत ठेविण्यासारखे मुद्दे आपल्या भाषणांत अब्राहाम यानें काढिले होते ते मुद्दे डोग्लस याला खोटे दिसत असल्यानें पसंत पडले नाहींत. शेवटीं अब्राहाम यानें कळविलें कीं " जर ट्रंबूल याचा एकही मुद्दा खरा नाहीं तर तो खोटा आहे असें सिद्ध करून डोग्लस लोकांचे निदर्शनास कां आणित नाहीं ? ज्यानें सिद्धान्ताचा अभ्यास केला आहे त्याला युक्लीडचें हें तत्व माहित असलेंच पाहिजे कीं ' प्रत्येक त्रिकोनांत हे सर्व कोन दोन काटकोनांच्या बरोबर आहेत. ' हा सिद्धान्त युक्लीड यानें स्पष्ट सिद्ध केला आहे. आतां युक्लीड यांचा सिद्धान्त खोटा आहे असें तुह्मी सिद्ध करून दाखवून युक्लीड यास लबाड ठरवू शकाल काय ? आणि याच न्यायानें डोग्लस यानें ट्रंबूलच्या खऱ्या मुद्यासंबंधी जें विवरण केलें तें निवळ थोतांड आहे असें ह्मणण्यास कांहीं एक प्रत्यवाय नाहीं."

---

# प्रकरण १४ वें.

## तंट्यानंतरची स्थिति.

## कूपर युनिअन येथील व्याख्यानाची हकीकत.



नि वडणुकीचें काम संपलें आणि त्यामुळें उभयतां वरिांची स्थिति निरनिराळी झाली. हा तंटा बराच मोठा असून पुष्कळ दिवस टिकला आणि त्यामुळें अब्राहाम यांस जरी अतीशय श्रम झाले होते तरी कुस्त्याच्या आरंभीं एखाद्या मल्लास जशी तरतरी व हुशारी असते तद्वत् अब्राहाम याचे अंगांत चांगली तरतरी असून त्याचें मुख सतेज दिसत होतें. लहानपणापासून चालू असलेलें त्याचें सुशिक्षण आणि आहार—विहार करण्याचे कामीं मोठा नियमितपणा, हे त्याच्या हल्लीं चांगलेच उपयोगीं पडलें. दारू पिण्यापासून होणारे अनर्थ तो चांगले जाणत होता, ह्मणून तो दारूस विषवल्ली समजत असून तिचा त्याला इतका तिटकारा होता कीं दारू पिण्यासंबंधी कोणी कांहीं गोष्ट काढली पुरे कीं हा आपला तेथून उठून दुसरीकडे चालता होत असे. डोग्लस याची स्थिति मात्र अब्राहामाच्या अगदीं विरुद्ध झाली

होती. तो अतिशय थकला असून त्याचा स्वरहि अगदीं बदलला होता. तो आपली मित्रमंडळी सोडून कोठें तरी कांहीं दिवस विश्रांति घेत स्वस्थ बसला होता, परंतु तो वज्रदेही असल्यामुळें कांहीं दिवस विश्रांति घेतल्यावर लौकरच पूर्ववत् सशक्त झाला. कांहीं दिवसानंतर तो दक्षिणेकडील संस्थानांत फिरून मिसिसिपी नदींतून मेक्सिकोच्या आखाताकडे गेला. तिकडील लोक त्याचीं भाषणें ऐकून त्याचा मोठा सत्कार करीत असत. त्यावेळीं बुशनन याच्या राजनीतीला अनुसरून क्यूबा आणि असेच कांहीं आणखी गुलामगिरी चालू असलेले मुलूख खरेदी घेण्याचें ठरलें व डोग्लस याचेंही तसेंच मत पडलें होतें. न्यूआर्लिन्स येथें त्यानें असें कळविलें कीं एखाद्या जातीस स्वतः राज्य चालविण्याचें सामर्थ्य नसेल तर त्याहून बलिष्ठ जातीनें तिच्यावर राज्यसत्ता चालविलीच पाहिजे. शिद्दि लोकांची जात राज्य चालविण्यास समर्थ नाहीं असें त्यानें स्पष्ट सांगितलें. गोऱ्या लोकांनीं शिद्दि लोकांस गुलाम धरून चाळगणें हें अत्यावश्य न्यायाचें आणि सरळ मार्गाचें आहे असें ज्या लोकांचें मत होतें त्या मंडळींच्या सहायानें आपला पक्ष दृढ व्हावा अशा झोंकावर त्याचीं सर्व भाषणें चालू होतीं.

एकदा अब्राहाम यास डोग्लस म्हणाला कीं "मगर (जलचर) आणि शिद्दि या दोहोंत शिद्याची बाजू मी स्वीका-

रीन, परंतु शिद्दि ( काळे लोक ) आणि गोरे लोक या दोहोंत मात्र गोऱ्या लोकांची बाजू मी स्वीकारीन. " त्यावेळीं अब्राहाम यानें वरील हकीकत आपल्या स्मरणवहींत टिपून ठेविली आणि प्रसंगोपात तो त्या हकीकतीस उद्देशून म्हणाला " हा एक प्रकारचा डोग्लस याचा सप्रमाण सिद्धांतच म्हटला पाहिजे. शिद्दि मनुष्य मगरास अगर अधम पशूस न्यायदृष्टीनें अधम पशूच मानील त्याअर्थीं गोरा मनुष्य याच न्यायानें शिद्यास अधम पशूच मानिल हें उघड आहे. आतां, केंटकी येथील माझ्या देशबंधूंनीं जर हें खरें मानलें असेल तर त्यांनीं डोग्लस न्यायाधिशाचे खुशाल आभार मानावेत ".

अब्राहाम हा राजनीतीचीं कामें पांहतो असें बाहेरून मात्र दिसे, पण वास्तविक पाहतां त्याचें सर्व लक्ष वकिलीच्या धंद्याकडे लागलें असून राजकीय बाबतींत आपली सरशी होण्याबद्दल विचार करणें त्यानें अलीकडे अगदीं सोडून दिलें होतें; मात्र संयुक्तसंस्थानांत सेनेटरच्या जागीं त्याची निवडणूक न झाल्यामुळें झालेला मनोभंग त्याला लपवितां आला नाहीं; त्याची छाया त्याच्या मुखावर स्पष्ट दिसत होती.

अब्राहाम लिंकन हा स्वभावानें उत्तम असून त्याची राहणीही अगदीं साधी असल्यामुळें पश्चिमेकडील मुलखांत तो पु-

फकळ लोकप्रिय झाला होता. तिकडील लोक फार साधे असून अब्राहाम यास 'आपल्यांतलाच एक' असें मानीत असत. अब्राहाम याचें त्यांच्यावर अस्खलित प्रेम असून ते त्याचे नेहमीं गुणानुवाद गात असत.* गुणी मनुष्य हा कोणास प्रिय होणार नाहीं? अब्राहाम आणि डोग्लस या दोघांचा झालेला वादविवाद अब्राहाम याचीच कीर्ति दूरवर पसरण्यास कारणीभूत झाला. या उभयतांमधील वादविवादांचीं भाषणें ठिकठिकाणीं वाचण्यांत येत असून राष्ट्रीय रंगभूमीवर या दोघांचीं झालेलीं कामें पाहून पूर्वेकडील लोकांनीं या दोघांस चांगलेंच ओळखून ठेविलें. उत्तरेकडील संस्थानांत सर्वत्र तंटे चालू होणार असल्यामुळें त्याची मदत मिळण्यासाठीं अब्राहाम याजवर आमंत्रणाचा जणूकाय वर्षावच चालू होता. इ. स. १८५८–५९च्या हिवाळ्याचे दिवसांत तो आपल्या खासगी कामांत निमग्न झाला होता. सार्वजनिक विषयासंबंधी लोकांत जागृति झाली असून लोकांचीं मनें क्षुब्ध झालीं होतीं; त्यामुळें सर्व लोकांस सभा होणें अवश्य दिसत असून त्यांचा त्याबद्दल उद्योग चालूच होता. वर्तमानपत्रांत या विषयीं येत असलेली हकीकत अब्राहाम याचे ऐकण्यांत येत असे. इ. स. १८५९च्या मे महिन्यांत इलाख्यासाठीं उमेदवार म्हणून अब्राहामाची निवडणूक

---

* ॥ गुणाः पुजास्थानं गुणिषु नच लिंगं नच वयः ॥ १ ॥ उत्तरराम चरित.

होईल असा संभव दिसू लागला. कित्येक संस्थानांतील नवीन वसाहत करणारांचे राजकीय हक्क कमी करण्याबद्दल ज्या खटपटी झाल्या होत्या त्यासंबंधी बऱ्याच लोकांनीं त्याला प्रश्न केले. इलिनाइस येथील एक जर्मन डॉक्टर थिओडर कॅनिशियस यानें, अशा प्रकारची एक खटपट नुकतीच मॅसॅचुसेटस् येथें झाली होती, त्याबद्दल अब्राहाम यास एक पत्र लिहिलें होतें. या पत्राचें उत्तर अब्राहाम यानें असें पाठविलें होतें कीं "असा प्रयत्न मॅसॅचुसेटस् येथें झाला असेल तर मला त्याबद्दल अत्यंत खेद होत असून त्याविरुद्ध कांहीं तजवीज करण्याचा मला हक्क असल्यास मी अवश्य त्याविरुद्ध होऊन योग्य ती तजवीज करीन. मनुष्याचें स्वातंत्र्य आणि देशाची उन्नति यांची उत्तरोत्तर वृद्धि होत जावी ही माझी इच्छा आहे, आणि या विरुद्ध जो कोणी वागेल त्याच्याशीं माझें शत्रुत्वाचें नातें राहील हें उघड आहे. काळ्या लोकांची दिवसानुदिवस होत चाललेली निकृष्ठावस्था पाहून मला फार खेद होत आहे, आणि त्यामुळें परकीयांची ( काळ्या लोकांची ) जन्मभूमि वेगळी असली अगर त्यांची भाषा भिन्न असली म्हणून त्यांचे राजकीय हक्क तुडविले जावेत हें मला मुळींच आवडत नाहीं."

इ. स. १८५९ च्या मे महिन्याच्या १० वे तारीखेस इलिनॉइस येथील लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील ( रिपब्लिकन )

मंडळीची मेकॉन परगण्यांतील डिकेटूर येथें वार्षिक सभा भरली होती. अब्राहाम त्या सभेंत हाजर असून त्याची उंच भव्य मूर्ति लोकांनीं पाहतांच ' अब्राहामकी जय ' असें एकदम मोठ्या आनंदानें ह्मणून त्याचे नांवाचा अनेक वेळां जयघोष केला. त्याची निवडणूक अद्याप सेनेटरच्या जागीं झाली नसून जरी त्यास वारंवार अपयश मिळत गेलें होतें तरी पण अशा पुरुषाचा इतका मोठा जयघोष होणें खरोखरीच आश्चर्य होय. थोर पुरुषांचा महिमा खरोखरच अगाध असतो. संस्थानांतील लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचा गव्हर्नर रिचर्ड ऑगल्स्बी यानें सांगितलें कीं ' या सभेस कांहीं देणगी देण्यासाठीं मेकॉन परगण्यांतला एक जुन्याकाळचा प्रजासत्ताक ( डेमोक्रॅट ) मनुष्य त्या द्वाराजवळ उभा आहे. ' त्यास वकिल मंडळींनीं पाहिलें तेव्हां त्यांना मोठें कौतुक वाटलें. इलाख्यासाठीं लोकांकडून ही प्रथमच अब्राहाम याची नेमणूक झाली होती; यामुळें त्याला मोठासा आनंद झाला नाहीं, परंतु त्यास समाधानमात्र वाटलें.

कॅनसास देशासाठीं अब्राहाम यानें पुष्कळ परिश्रम घेतले असून त्यांत त्यानें इ. स. १८५९—६० सालीं प्रथमच प्रवेश केला. प्रवेश होतांच ठिकठिकाणीं लोकांना स्वातंत्र्याचें स्फुरण चढून त्यांनीं त्याचा मोठा जयजयकार केला. लिव्हेनवर्थ येथें-तर गल्लोगल्लींत भयंकर तुफान चालू होतें तरी पण त्यांतले

त्यांत लोकांनीं एक मोठी मिरवणूक काढून त्याला मोठ्या समारंभानें मिरवीत नेलें. ही मिरवणूक पाहण्यासाठीं लोकाचे थवेच्या थवे जमले असून आबालवृद्ध स्त्री पुरूष मोठ्या उत्सुकतेनें अब्राहाम यास फक्त पाहण्यासाठीं घराच्या दारांत, खिडक्यांत, रस्त्यांतील गर्दींतून ज्याला जेथें उभे राहण्यापुरती जागा मिळेल तेथें उभेराहून हा थाटाचा समारंभ पाहत होते.

इ. स. १८५९ च्या सप्टेंबर महिन्यांत ओहिओ येथें अब्राहाम याचीं पुष्कळ व्याख्यानें झालीं. तो कैंटकीच्या सरहद्दी नजीक येऊन पोंहचलाच होता ह्मणून अनायासें सिनसिन्नाटी येथें संस्थानिकांचा एक मोठा समाज भरवून त्यांत त्यानें भाषण केलें. त्यानें लोकांस सहज बोलतां बोलतां विचारिलें कीं " संयुक्त संस्थानाचा तुह्मी आपला कांहीं भाग घेणार असा जो धाक दाखवितां तो घेऊन काय करण्याचा तुमचा विचार आहे? आमच्या सारख्या जुलमी मंडळीच्या शेजारी तुह्मीं येऊं इछिता किंवा तुमच्या व आमच्यामध्यें एक मोठी भिंत बांधू इच्छिता? कारण भिंत मध्यंतरीं असली ह्मणजे मग तुमची मिळकत आह्मी बळकाबून घेऊं अशी तुह्मांस धास्तीच राहणार नाहीं. "

इ. स. १८६० च्या प्रारंभीं प्लिमौथच्या एका भव्य देवळांत भाषण करण्यासाठीं ब्रुकलिन येथील धर्मोपदेशक हेनरी

वॉर्ड बिचर यानें अब्राहाम यांस पाचारण केलें. हें आमंत्रण त्यानें मोठ्या खुषीनें पत्करिलें परंतु त्याला सुचविलें कीं संभाषण करण्यासाठीं संयुक्त संस्थानांत 'कूपरयूनियन' नांवाचा भव्य व विशाल दिवाणखाना आहे तो मुकरर करावा. याप्रमाणें ती जागा मुकरर होतांच अब्राहाम तेथें गेला आणि पूर्वेकडील लोकांशीं हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें लोकांचा जमाव पाहून ( अंतर्यामीं ) किंचित् हिम्मत खचल्यासारखें त्याला वाटलें परंतु न डगमगतां तसाच तो संभाषण करण्यास उठून उभा राहिला. वर्तमानपत्राचा लेखक व प्रसिद्ध कवी विल्यम क्यूलेन यानें पूर्वेकडील लोकांशीं अब्राहाम याची रीतीप्रमाणें प्रथम ओळख करून दिली. संभाषण करण्यासाठीं जें उच्चस्थान ठरलें होतें त्यावर व त्याचे सभोंवतीं मोठमोठे नागरिक, धर्मशास्त्री, वक्ते आणि टीकाकार बसले होते. कांहीं लोकांनीं योजिलें होतें त्याहून अगदीं भिन्न रीतीचें संभाषण अब्राहाम यानें तयार केलें होतें. हास्यरसोत्पादक दंतकथा अगर थट्टेच्या चमत्कारिक गप्पागोष्टी सांगून मनरंजन होण्याचा विषय त्या भाषणांत नव्हता. न्यूयॉर्क शहरांत असें लक्षांत ठेविण्यासारखें व महत्वाचें जाहीर भाषण कधींच झालें नसेल. या भाषणांत मुख्यत्वें करून गुलामगिरीच्या विषयासंबंधानें वेळेला अनुसरून प्रतिपादन केलें असून राजकीय संस्थेस कसें रूप येऊं लागलें तें त्याचें आणि त्या वेळच्या लोकसत्ताक पक्षाच्या इति-

हासाचें चांगलेंच स्पष्टीकरण केलें होतें. या संभाषणांत अब्राहाम यानें आपल्या अंगांत असलेल्या चातुर्याची, विद्वत्तेची आणि अलौकिक तर्कशास्त्राची कमाल करून सोडिली होती. त्याची संभाषण करण्याची शैली उत्तम असून, उत्साहानें व तरतरीतपणानें त्याचें मुख सत्तेज दिसत होतें आणि दृष्टान्त देण्याची त्याची पद्धत इतकी स्पष्ट व सहज समजण्याजोगी होती कीं, लोकांस त्याची चांगली समजूत पडत असे. त्याची वाणी इतकी रसभरीत होती कीं त्याचें मुखांतून जणूं काय अमृताचा वर्षाव होत असून त्याचें पान सर्व लोक करीत आहेत कीं काय असें वाटत असे. संभाषणांतील मुख्य मुद्दे सिद्ध करून लोकांपुढें ठेविले त्यावेळीं सर्वत्रांनीं एकदम त्याचें नांवानें जयघोष केला.

हें संभाषण चालू असतांना एका इसमानें आपल्या स्मरणवहींत कांहीं कांहीं गोष्टी टिपून ठेविल्या होत्या त्यांतील तात्पर्य:—

" अब्राहाम जेव्हां भाषण करण्यास उठून उभा राहिला तेव्हां माझें मनाचा विरस होऊन मी मोठा दुःखी झालों. अबब! केवढी त्याची उंची! एवढ्या उंचीचा धिप्पाड पुरूष माझ्या आजपावेतों पाहण्यांत नव्हता. त्याच्या पिळदार शरि-

वॉर्ड बिचर यानें अब्राहाम यांस पाचारण केलें. हें आमंत्रण त्यानें मोठ्या खुषीनें पत्करिलें परंतु त्याला सुचविलें कीं संभाषण करण्यासाठीं संयुक्त संस्थानांत 'कूपरयूनियन' नांवाचा भव्य व विशाल दिवाणखाना आहे तो मुकरर करावा. याप्रमाणें ती जागा मुकरर होतांच अब्राहाम तेथें गेला आणि पूर्वेकडील लोकांशीं हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें लोकांचा जमाव पाहून ( अंतर्यामीं ) किंचित् हिंम्मत खचल्यासारखें त्याला वाटलें परंतु न डगमगतां तसाच तो संभाषण करण्यास उठून उभा राहिला. वर्तमानपत्राचा लेखक व प्रसिद्ध कवी विल्यम क्यूलेन यानें पूर्वेकडील लोकांशीं अब्राहाम याची रीतीप्रमाणें प्रथम ओळख करून दिली. संभाषण करण्यासाठीं जें उच्चस्थान ठरलें होतें त्यावर व त्याचे सभोंवतीं मोठमोठे नागरिक, धर्मशास्त्री, वक्ते आणि टीकाकार बसले होते. कांहीं लोकांनीं योजिलें होतें त्याहून अगदीं भिन्न रीतीचें संभाषण अब्राहाम यानें तयार केलें होतें. हास्यरसोत्पादक दंतकथा अगर थट्टेच्या चमत्कारिक गप्पागोष्टी सांगून मनरंजन होण्याचा विषय त्या भाषणांत नव्हता. न्यूयॉर्क शहरांत असें लक्षांत ठेविण्यासारखें व महत्वाचें जाहीर भाषण कधींच झालें नसेल. या भाषणांत मुख्यत्वें करून गुलामगिरीच्या विषयासंबंधानें वेळेला अनुसरून प्रतिपादन केलें असून राजकीय संस्थेस कसें रूप येऊं लागलें तें त्याचें आणि त्या वेळच्या लोकसत्ताक पक्षाच्या इति-

हासाचें चांगलेंच स्पष्टीकरण केलें होतें. या संभाषणांत अब्राहाम यानें आपल्या अंगांत असलेल्या चातुर्याची, विद्वत्तेची आणि अलौकिक तर्कशास्त्राची कमाल करून सोडिली होती. त्याची संभाषण करण्याची शैली उत्तम असून, उत्साहानें व तरतरीतपणानें त्याचें मुख सत्तेज दिसत होतें आणि दृष्टान्त देण्याची त्याची पद्धत इतकी स्पष्ट व सहज समजण्याजोगी होती कीं, लोकांस त्याची चांगली समजूत पडत असे. त्याची वाणी इतकी रसभरीत होती कीं त्याचें मुखांतून जणूं काय अमृताचा वर्षाव होत असून त्याचें पान सर्व लोक करीत आहेत कीं काय असें वाटत असे. संभाषणांतील मुख्य मुद्दे सिद्ध करून लोकांपुढें ठेविले त्यावेळीं सर्वत्रांनीं एकदम त्याचें नांवानें जयघोष केला.

हें संभाषण चालू असतांना एका इसमानें आपल्या स्मरणवहींत कांहीं कांहीं गोष्टी टिपून ठेविल्या होत्या त्यांतील तात्पर्य:—

" अब्राहाम जेव्हां भाषण करण्यास उठून उभा राहिला तेव्हां माझें मनाचा विरस होऊन मी मोठा दुःखी झालों. अबब! केवढी त्याची उंची! एवढ्या उंचीचा धिप्पाड पुरूष माझ्या आजपावेतों पाहण्यांत नव्हता. त्याच्या पिळदार शरि-

राची ठेवण ढोबळ दिसत असून त्याची आकृति मोठी विलक्षण दिसली. अशा मूर्तीस पाहून खरोखरच माझें अंतःकरण खिन्न झालें. कपड्यांची तरी व्यवस्था अशीच! काळे कुळकुळीत असून ते अंगांत धड बसतही नव्हते. ह्मणजे कोठें तंग तर कोठें पोकळ अशी सर्व अव्यवस्था दिसत होती. संभाषण करितांना त्यानें केव्हां केव्हां हात उंच केले ह्मणजे तो आजानुबाहूच दिसत होता. त्याचा कंठस्वर इतका सावकाश व हळू होता कीं जर कोणी त्यावेळीं वाद्याचा सूर धरिला असता तर त्याला खालच्या सुरांतच सूर धरावा लागला असता. त्याची ही सर्व पद्धत पाहून मी इतका तल्लीन झालों कीं, मी आपल्याशींच बोललो ' अरे जुन्या काळच्या माझ्या मित्रा! ही तुझी राहणी खरोखरच रे तुला शोभत नाहीं! हें तुझें सर्व वर्तन एखाद्या ग्राम्य पशुप्रमाणें आहे; पण एवढें मात्र खास आहे कीं ह्या न्यूयॉर्कच्या लोकांस तुझा विसर कधींही पडणार नाहीं ' या प्रमाणें संभाषण करण्यास उभा राहिल्यानंतर लागलींच त्यानें इष्ट विषय प्रतिपादनास आरंभ केला. तो ताठ उभा राहिला असून अंतर्यामींच्या ज्ञानजोतीचा प्रकाश त्याचे मुखावर पडून तें टवटवीत दिसत होतें. व्याख्यान चालू असतांना एकाएकी त्याचे आकृतींत फरक पडून केव्हां केव्हां त्याची चर्या एकदम बदलत असे. परंतु त्याचे ते कपडे, त्याच्या

शरिराचा बांधा वगैरे सर्व मी हल्लीं विसरून गेलों हें माझें दुर्दैवच होय. विलक्षण अचाट बुद्धीच्या पुरुषाकडे पाहून इतरांप्रमाणें मीही उभा राहून मोठ्या आनंदानें जयघोष करीत होतों. कांहीं वेळानें व्याख्यान संपल्यानंतर मी बाहेर आलों तों माझ्या अंगांत जणूं काय एक प्रकारचें स्फुरण चढलें आहे कीं काय असें मला वाटलें. अशी माझी स्थिति पाहून एकानें मला त्या गर्दींत प्रश्न केला ' कांहो! अबेलिंकनचें भाषण कसें काय वठलें ' मी ह्मणालों ' हा खरोखरच महा भाग थोर पुरूष दुसरा सेंटपॉलच ह्मटला तरी चालेल ' परमेश्वर करो आणि असे सत्पुरूष चिरायू होवोत! अशा महात्म्यांचे जडदेह जरी नाश पावले तरी त्यांची धवलकीर्ति त्रैलोक्यांत अजरामर राहते यांत काहीं संशय नाहीं. "

पूर्वेकडील लोक अतिशय घाबरून गेले होते परंतु अब्राहामलिंकन याच्या वरील संभाषणामुळें त्यांच्या अंतःकरणावर सर्वोत्तम ठसा उमटल्यामुळें ते पुनः उत्साही दिसू लागले. अब्राहाम याच्या अंगीं बुद्धिसामर्थ्य, सुशिक्षण वगैरे जे सद्गुण वास्तव्य करीत होते त्यांचें चांगलेंच चीज झालें. त्यानें अचाट कल्पना व बुद्धिचातुर्य चालवून शेवटीं त्या सुशिक्षित समाजास आपलेंसें करून घेऊन लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचे मंडळींत मिसळून घेतलें. ज्या राज्यसत्तेच्या

छायेखालीं आपण हल्लीं राहत आहोंत त्या राज्यसत्तेची घटना जेव्हां आपल्या वडिलांनीं योजिली त्यावेळीं आपण हल्लीं समजत आहोंत त्यापेक्षां गुलामगिरीच्या प्रश्नाचें ज्ञान त्यांना जास्त अवगत होतें असें अब्राहाम याचा जुना प्रतिस्पर्धी डोग्लस याचें ह्मणणें असून त्या रात्रीं अबे यानें बहुतेक याच विषयावर प्रतिपादन केलें; आणि हाच मुद्दा उभयतांस वादविवादास कारणीभूत होईल असें अबे-चेंहीं ह्मणणें होतें. आपल्या वडिलांनीं पूर्वीं राज्यव्यवस्थेसाठी नियम केले त्यावेळीं गुलामगिरीसंबंधांत काय काय प्रयत्न केले व कोणकोणते विचार आमलांत आणिले यासंबंधी त्या वादविवादांत चांगलाच खल झाला होता. त्यानें ऐतिहासिक चांगली चांगलीं निर्णयात्मक उदाहरणें देऊन सर्वांची खातरी केली. त्याच्या व्याख्यानाच्या दुसऱ्या भागांत त्यानें दक्षिण प्रांतांतील लोकांस मोठ्या प्रेमळबुद्धीनें व दयार्द्र अंतःकरणानें उपदेश केला होता; संभाषणाचा शेवटला बहुतेक भाग लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाला उद्देशून होता. व्याख्यान संपतां संपतां त्यानें जे उद्गार काढिले ते:—‘ खोटीं खोटीं दूषणें देऊन खोटे खोटे दोषारोपण आपल्यावर करून कोणी आपल्या-वर आळ घालूं लागले तरी पण आपण स्वकर्तव्यपराङ्मुख कधींही होऊं नये, इतकेंच नव्हें तर कोणी अशी जरी दहशत घातली कीं ‘ राज्याचा नायनाट करूनटाकूं ’ तरी पण आपण भिऊन

जाऊ नये. सत्य हें एक बळच आहे, मात्र आपली श्रद्धा दृढ असली पाहिजे; आपण आपलें कर्तव्य अवश्य बजाविलेंच पाहिजे.'

ज्यांनीं ज्यांनीं अब्राहाम याचें हें भाषण ऐकिलें त्यांनीं त्यांनीं त्यांतील शब्दरचनेची, तर्कशास्त्रप्रतिपादनाची, आणि समजण्यास सुलभ अशा भाषाशैलीची पुष्कळ तारीफ केली. शहरांतील बहुतेक वर्तमानपत्रांतून ही हकीकत येत असल्यानें ती ताबडतोब चहूंकडे प्रसिद्ध झाली. अब्राहामाचें हें भाषण ऐकण्यास याले नांवाचा एक विश्वविद्यालयांतील अध्यापक आला होता. त्यानें आपल्या स्मरणवहींत मुख्य मुख्य व उपयुक्त असे सर्व मुद्दे टिपून घेऊन त्याचें शिक्षण विद्यार्थ्यांस देऊन तो कित्ता वळविण्यास सुचना दिली. पूर्वेकडील लोकांच्या मनावर आपल्या भाषणाचा इतका जोरदार ठसा उमटेल असें अब्राहाम यास मुळींच वाटलें नव्हतें. ' अबेलिंकन हा सुवंशशक्तिमान-कुलीन-मोठ्यामनाचा बुद्धिवान् ' अशा प्रकारचे जयघोष श्रवण करीत करीत व लोकांचे आशिर्वाद घेत घेत तो घरीं गेला.



## प्रकरण १५ वें.

### १ अध्यक्ष अब्राहाम लिंकन.

### ॥ २ साधु संत येती घरा तोचि दिवाळी दसरा. ॥

### ३ एक दुष्ट स्वप्न.



इ. स. १८६०च्या उन्हाळ्याच्या दिवसांत दक्षिणेकडील लोक अगदीं भयभीत होऊन गेले आणि कॅंसास हे आतां गुलामांचें संस्थान ठरेल अशी आशा मुळींच त्यांना राहिली नव्हती. प्रतिनिधिमंडळीपैकीं पुष्कळ लोक प्रतिकूळ झाले होते, त्यामुळें लिकॉंप्टन राज्यपद्धतीस अनुसरून कॅंसास संस्थान जोडून देणें मोठें अशक्य होतें; त्याचप्रमाणें क्यूबा घेणेंही अशक्यच होतें. गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांकडून जरी धमकी मिळाली होती तरी पण कॅलिफोर्निया हें स्वतंत्र संस्थान या नात्यानें पुष्कळ दिवसांपासून जोडून दिलें होतें. गुलामगिरीची सत्ता वाढविण्यासाठीं कांहीं नवीन प्रांत घेण्यासंबंधी जेवढे प्रयत्न झाले तेवढे सर्व अगदीं फसले. आतां नवीन

अध्यक्ष पसंत करावयाचा होता. प्रजासत्ताक पक्षांत (डेमोक्रॅटिक) लिकॉम्प्टन आणि ऍन्टिलिकॅम्प्टन असे दोन कायमचे तट पडले होते. 'तट मोडून फांटाफूट करूं' असें उघड रीतीनें म्हणून लोक दहशती घालीत होते. जर दक्षिणेच्या लोकांस आश्वासन मिळालें तर हे दहशतीचे शब्द परत घेण्याची वेळ येईल व या सर्व निवळ गप्पा आहेत असेंही कित्येक म्हणत होते. कित्येक मित्र लोकांस असें वाटत होतें कीं दक्षिणेकडील लोकांस धीर देणें अत्यावश्य होय. कूपर युनियन येथें अब्राहामाचें जें भाषण झालें त्यांत त्यानें दहशत घालणाऱ्या लोकांस कळविलें कीः—"तुम्ही म्हणता कीं तुम्ही संघशक्तीचा नाश कराल, आणि त्याचें प्रायश्चित्त आम्हांस भोगावें लागेल. वाहवा! हें मात्र फार चांगलें; वड्याचें तेल वांग्यावर असा हा न्याय झाला म्हणावयाचा." इलाख्यासाठीं उमेदवार निवडण्याबद्दल इ. स. १८६० च्या एप्रिल मासच्या २३ वे तारिखेस चार्लस् टौन (दक्षिण कॅरोलिना) येथें प्रजासत्ताक लोकांची सभा भरली. उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील पुढाऱ्यांचें कोणत्याही उमेदवारासंबंधी ऐक्य होईल असें कोणास वाटलें नव्हतें. ह्या मंडळींत डग्लस हा अग्रेसर असून फक्त उत्तरेकडील प्रजासत्ताक लोकांशिवाय त्याला कोणी पत्करील असें नव्हतें; पण सभेंत अब्राहाम याच्याशीं झालेले

त्याचे वादविवाद, आणि कॅंसास देशासाठीं लिकाँप्टन राज्य-पद्धती विरुद्ध त्याचें वर्तन ह्या दोन्ही बाबती दक्षिणेकडून त्याला मिळालेल्या आश्रयाच्या आड आल्या. ज्यांनीं गुलामगिरीच्या विरुद्ध अगदीं विडाच उचलला होता अशा शूर व दृढनिश्चयी वीरांना अमुक अटीवर गुलामगिरी चालू करावी असें जरी खात्रीनें कळविण्यांत आलें तरी त्यांचें समाधान होईना. एरंडाच्या गुऱ्हाळा प्रमाणें अनेक निरर्थक वादाविवाद झाल्यानंतर या प्रजासत्ताक लोकांत अतिशय फांटाफूट झाली. गुलामगिरी या पुढें चालू करण्यासाठीं जे प्रतिनिधि नेमिले होते त्या सर्वांनीं एकत्र होऊन अंग काढून घेऊन 'राज्यपद्धतींची सभा' दुसऱ्याएका इमारतींत भरविण्याचें ठरविलें; त्यांत नेमणूका वगैरे कांहींएक न होतां सर्व काम तहकूब राहून रिचमंड ( व्हर्जिनिया ) येथें पुनः सभा भरविण्याचें ठरलें. या सभेंतील कांहीं लोक चार्लस्टौन येथें होते व त्यांनीं सुद्धां विशेष कांहींएक काम न करितां जूनच्या १८ व्या तारखेस बाल्टिमोर येथें सभा भरविण्याचें ठरविलें. मे महिन्याच्या नवव्या तारिखेस बाल्टिमोर येथें व्हिग ( प्रजापक्षी ) पक्षाची पोक्त मंडळी आणि ' नो–नथिंग्झ ' ( विषयशुन्य ) यांची सभा भरून त्यांनीं टेनिसीचा जॉनबेल यास अध्यक्ष आणि मॅसेचुसेटस्‌चा एडवर्डएव्हरेट यास उपाध्यक्ष नेमिलें. हा प्रयत्न राजकीय पक्षाकडून झाला असून गुलामगिरीच्या विषया संबंधी

अज्ञ, अविचारी आणि नीतिशून्य असा एक अध्यक्ष त्यांनीं नेमिला होता; रिचमंड येथील सभा प्रजासत्ताक लोकांची असून त्यांनीं जॉन. सी. ब्रेकनरिज ( भावी बंडांतील सेनापती ) यास अध्यक्ष नेमिलें. कांहीं दिवसांनीं एक सभा ( यांत फक्त लिंकनच्या विरुद्ध प्रजासत्ताक लोक होते ) बाल्टिमोर येथें सुरळीत रितीनें भरून त्यांत स्टिफन. ए. डोग्लस याची अध्यक्षाच्या जागीं नेमणूक झाली. या सर्व हकिकतीवरून उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील प्रजासत्ताक लोक असे दोन कायमचे तट ठरून चुकले होते.

शिकागो येथें इ. स. १८६० च्या जूनच्या १७ व्या तारखेस जी लोकसत्ताक स्वतंत्रपक्षाची ( रिपब्लिकन ) राष्ट्रीय सभा भरली त्यामुळें एकंदर लोकसत्ताक राज्यांत भयंकर चळवळ चालूझाली. राष्ट्रांतील अवाढव्य कारभार चालविण्याची ही आतां आणीबाणीची वेळ आली आहे असें प्रत्येकास वाटल्या वांचून राहिलें नव्हते. मानवी गुलामगिरीच्या मार्मिक प्रश्नासंबंधीं प्रजासत्ताक लोक निराश झाले होते व त्यांच्यांत कायमची दुफळी झाली होती. त्यावेळीं संयुक्त संस्थानांत सुमारें चाळीस लक्ष मनुष्यें गुलामगिरीच्या बंधनांत सांपडलेलीं असून त्यांची गुराढोरा प्रमाणें अथवा जंगम मिळकती प्रमाणें खरेदी व विक्री एकसारखी चालत असे. जे देश अगदी स्वतंत्र होते त्यांत गुलामगिरी झपाट्यानें

चालू करण्याचा गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांचा सतत प्रयत्न होता. अशा संस्थानांत गुलामगिरी मोठी पवित्र व न्यायाची संस्था आहे असें अनेक लोक मानीत असत. त्या संस्थानांतील सर्व लोक जेथें जेथें ती चालू नसेल तेथें तेथें ती चालू करण्याच्या प्रयत्नांत अगदीं तत्पर झालेले असत आणि लोकसत्ताक स्वतंत्र राज्यांतील कायद्यांत ( १ ) गुलामगिरी ही एक प्रकारची मिळकत असून ती सर्व ठिकाणीं सुरक्षित राहावी, ( २ ) सिद्दि पुरुष आणि सिद्दि स्त्रिया यांना संयुक्तसंस्थानांतील प्रत्येक संस्थानांत गुलामगिरीची एक मिळकत समजून त्यांचें रक्षण व्हावें आणि ( ३ ) जो कोणी गुलामगिरीच्या बंधनांतून पळून जाईल तो जेथें जेथें अमेरिकन लोकांचा झेंडा फडकत असेल त्या त्या भागांत सुरक्षित राहू नये. अशा प्रकारची ढवळाढवळ करून त्या प्रमाणें अमल करण्याचा ते प्रयत्न करीत असत. ज्या मंडळींतील लोक आपआपले उमेदवार तयार करणार होते ते सर्व गुलामगिरीच्या प्रसाराविरुद्ध होते. अब्राहामलिंकन याच्या संमतीनें असें शपथेवर ठरून चुकलें होतें कीं ' जगन्नियंत्या परमेश्वरानें सर्व मनुष्यांस जन्मापासुनच जीवन, स्वातंत्र्य, आणि सौख्यासाठीं सतत उद्योग असे तीन प्रकारचे कायमचे हक्क दिले असुन ते कोणासही काढून घेतां यावयाचे नाहींत, आणि ज्याचें वर्तन या तत्वाच्या विरुद्ध असेल त्याची निवडणूक कधींही करण्यांत यावयाची नाहीं. '

संयुक्त संस्थानाच्या प्रत्येक भागांतून अपरिचित लोकांची शिकागो शहरांत अतिशय गर्दी झाली होती. ही राष्ट्रीय सभा भरण्यासाठीं 'विगवॉम' नांवाची एक भव्य इमारत उभारली असून तिच्या आंत आणि सभोंवतीं मिळून एकंदर सुमारे वीस हजार लोकांचा जमाव एकत्र झाला होता. उत्तरे कडील संस्थानांत भरलेल्या सभेंत अब्राहाम यानें अनेक वेळां जीं जीं राजकीय तत्वें प्रतिपादन केलीं होतीं त्याच राजकीय तत्वांचा समावेश हल्लींच्या राष्ट्रीयसभेच्या ठरावांत केला होता. गुलामगिरीच्या विरुद्ध ओहिओ येथील एका जोशुआ गिडिंग्ज नांवाच्या वृद्ध मनुष्यानें राष्ट्रीय सभेसाठीं एक तखता तैयार केला असून त्यावर स्वातंत्र्यप्रतिज्ञालेख ( डिक्लेरेशन आफ इन्डिपेन्डन्स ) लिहिला होता. व 'प्रत्येक मनुष्यास जन्मापासूनच स्वातंत्र्याचा हक्क उत्पन्न होत असतो' असा मजकूर त्या तखत्यावर मोठ्या अक्षरानें लिहिला होता. गुलामगिरी विरुद्ध मुद्याचा खल करण्याच्या संबंधांत या राष्ट्रीयसभेंतल्या सभासदांच्या मुखावर भित्रेपणाची तुरळक झुळूक दिसत होती; गुलामगिरीचें समूळ खंडन करणाऱ्यांचा पुष्कळ दिवसांपासून तिरस्कार होत होता आणि त्यामुळें ते बिचारे अगदीं भेदरून गेले होते, त्यांत राष्ट्रीयसभेंतल्या कांहीं लोकांत ही मंडळी मिसळून जाऊन गोंधळ होण्याची अद्याप मोठी धास्ती होती. न्यूयॉर्क येथील जॉर्ज डब्ल्यु. कार्टिस नांवाच्या प्रतिनिधीनें गिडिंग्जच्या बरो-

ल वाक्याच्या पुष्टीकरणासाठीं एक मोठें सबळ कारण पुढें आणिलें व तें ग्राह्य होऊन मोठ्या उमेदीनें सभेनें ठराव मुकरर केले. त्या इमारतींत हजारों लोक जमले होते त्यांतून एक भयंकर गर्जना ऐकू आली; कित्येक मंडळींनीं तर ती ऐकू येतांच आनंद प्रदर्शक टाळ्यांचा एक सारखा गजर केला. 'स्वातंत्र्याचा हक्क मनुष्यास जन्मापासून उत्पन्न होतो' या निर्णयात्मक वाक्याचा तोफेच्या गडगडाटाप्रमाणें मोठा ध्वनि झाला आणि तें वाक्य राष्ट्रीय सभेनें जाहीर केलें. सर्वत्रांनीं चिठ्या लिहून गुप्तरितीनें आपआपलीं मतें सभेंत देण्यास प्रारंभ केला. न्यूयॉर्क येथील विलयम इवॉर्टस् यानें त्या संस्थानाच्या विलयम एच. सिवर्ड याचें नांव सभेपुढें आणिलें. त्याचप्रमाणें इलिनॉइसच्या ज्युडड यानें अब्राहामलिंकन याचें नांव पुढें केलें. न्यूजर्सी येथील मी. डेटन, पेन्सिलवॅनिया येथील सिमन कॅमेरॉन, ओहिओ येथील सालमन. पी. चेस, मिसौरी येथील एडवर्डबेटस आणि ओहिओ येथलि जॉन मॅकलिन् या सर्वांचीं नांवें अनुक्रमें सभेपुढें आली. ह्या सर्व मंडळींत नवीन पक्षाचे मुख्य पुढारी सिवर्ड आणि अब्राहामलिंकन या उभयतामुळें उत्साह व उंमद उत्पन्न होऊन सर्वत्रांच्या मुखावर टवटवी दिसत होती. या सर्वत्रांचा नामोच्चार होतांच खवळलेल्या समुद्राच्या लाटांचा किनाऱ्यावरील दगडांवर आघात होऊन जसा ध्वनि उत्पन्न होतो त्या प्रमाणें त्यांच्या

सर्व मित्र मंडळींनीं एकदम जयघोष केला. सर्व श्रोतृसमाज शांत झाल्यानंतर सभेच्या मुख्य कामाकडे सर्वत्रांचें लक्ष लागलें. तारेनें बातमी देणारे आपआपलीं साधनें घेऊन बातम्या देण्यास अगदीं तयार होऊन बसले होते. वर्तमानपत्रांतून बातमी देणारांची तर इतकी गर्दी झाली होती कीं जणूं काय त्यांचें एक प्रकारचें मोठें सैन्यच जमलें आहे असें दिसत होतें. वारा शांत वाहत असून जिकडे तिकडे सामसूम झाली होती आणि मुख्य मुद्याची वेळ अगदीं नजीक येऊन पोंचली असें सर्वत्रांनीं ताडलें. राष्ट्रांतील जणुं काय एका ऐतिहासिक नाट्य प्रयोगास प्रारंभ व्हावयाचा असून रंगभूमीवर पात्रें सज्ज होऊन आपआपलीं कामें बिनचूक करण्यास प्रवृत्त झालीं होतीं. संस्थानांतील मत देणारांचीं पहिल्या वेळीं नांवें वाचण्यासाठीं त्यांच्या नांवाचा पट मागविला, पण तो मागवून कांहीं होणार नाहीं असें उघड दिसत होतें. मधून मधून आनंदोत्पादक टाळ्यांचा सारखा गजर चालू असल्यामुळें प्रतिनिधिमंडळीस आपसांतील निर्णयात्मक मतें एकमेकांस ऐकू येईनाशीं झालीं. सभेंत जयघोष चालू असतांना संस्थानाच्या साम्राज्यांतील स्वातंत्र्यसौख्यदेवीचा अत्यंत प्रियपुत्र सिवर्ड याचे साठीं न्यूयॉर्क येथील मंडळीचीं ७० मतें पडलीं, आणि इंडियाना व इलिनॉइस येथील स्वातंत्र्यप्रिय लोकांनीं अब्राहाम याचेसाठीं जेव्हां आपआपलीं मतें दिलीं त्यावेळीं सुद्धां असाच हर्षोत्पादक टाळ्यांचा गजर

झाला. पहिल्यावेळीं जीं मतें पडलीं तीं येणेंप्रमाणें:—विल्यम एच. सिवर्ड याचेसाठीं १७३॥ मतें पडलीं, अब्राहामलिंकन याचेसाठीं १०२, एडवर्डबेटस् ४८, सिमनकेमेरॉन ५०॥ आणि सॉलमन् पी. चेस् याचेसाठीं ४९ मतें पडलीं. बाकी राहिलेल्या ४२ मतांची ज्या मंडळींत विभागणी झाली ती मंडळी येणें प्रमाणें:—जॉनमॅक्लिन् बेंजामिन् वेड, विल्यम्डेटन्, जॉनरीड, जेकबकोलेमर, चार्लस्समर आणि जानक्लेमंट. तेथें कोणाच्या पसंतीची अपेक्षा नव्हती कारण एकंदर ४६५ मतांपैकीं २३३ मतांची नेमणुकीसाठीं अवश्यकता होती.

दुसऱ्यावेळीं मतदेणारांच्या नांवांची यादी पाहण्यांत आली त्यावरून असें कळलें कीं अब्राहाम यास व्हर्मांट, न्यूहँपशायर आणि पेन्सिल्वेनिया येथून ७९ मतें मिळालीं तीं व पहिलीं मिळून एकंदर १८१ झालीं; त्याचप्रमाणें सिवर्ड यास ११ मिळालीं तीं व पहिलीं मिळून १८४॥ झालीं. तिसऱ्यावेळीं मत देणाराची यादी विशेष महात्वाची असून सर्व लोकांस असें खास वाटलें कीं याचा निर्णय या खेपेस होऊन कोणाची नेमणूक होणार तेंही आतांच ठरेल. यावेळीं सभेचा देखावा अत्यंत प्रेक्षणीय होता. कित्येक लोक खालीं बसले होते आणि कित्येक तर खिडक्यांतून सज्ज्यांतून आणि ज्याला जशी सोय सांपडेल तशा रितीनें उभे-राहून चातक पक्षाप्रमाणें निकालाची वाट पाहत होते. हातांत

पेनसिली व कागद घेऊन जो निर्णय होईल तो टिपून घेणारांची प्रतिनिधींच्या सभोंवतीं गर्दी उडाली होती. सर्वांचीं मतें एकत्र करून प्रतिनिधि मडंळी त्यांची व्यवस्था करीत होते तोंच श्रोतृसमाजांत कुजबुज चालू झाली, कीं 'अब्राहामलिंकन याचीच नेमणूक होण्याचा रंग दिसत आहे.' या एकंदर मतांचा निकाल झाला तो येणें प्रमाणें:—अब्राहाम याचेसाठीं २३१॥ मतें पडलीं, म्हणजे फक्त त्याची नेमणूक होण्यासाठीं १॥ मत पाहिजे होतें.

यावेळीं त्या ठिकाणीं इतकी सामसूम दिसत होती कीं जणूं काय सर्व लोक आपआपल्या घरीं निघून गेल्या कारणानें तीं सर्व इमारत रिकामीच झाली आहे कीं काय असें वाटे, इतक्यांत ओहिओ येथील मि. कार्टर यानें उठून जाहिर केलें कीं 'या संस्थानांतून ४ मतें फिरवून तीं अब्राहम लिंकन याचेसाठीं देण्याबद्दल सर्वत्रांची संमती आहे.' हें वाक्य ऐकतांच सभेचें काम संपलें आणि अब्राहाम याची नेमणूक झाली.

इमारतीच्या कळसाजवळ एक मनुष्य सूचनेस्तव प्रथमपासून बसवून ठेविला होता, त्यास खालून सेक्रेटरीनें मोठ्यानें जयघोष करून म्हटलें "अब्राहाम लिंकन याची नेमणूक झाली, सन्मानार्थ तोफेची सरबत्ती करा." त्या मनुष्यानें ही आनंदाची बातमी ऐकतांच एकदम इमारतीवरून धांवत धांवत खाली

तोफेची सरबत्ती करण्यासाठीं जयध्वज उभारिला व खालीं येऊन सर्व मंडळीस त्यानें ही आनंदाची बातमी कळविली. इमारतीच्या आंतील भागांत सर्वत्रांचीं मुखकमलें उत्साहानें प्रफुल्लित दिसूं लागलीं व सर्वत्रांनीं मोठ्यानें ' अब्राहाम लिंकन अध्यक्षकी जय ' याप्रमाणें जयघोष केला; व सर्व लोकांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. कोणी मस्तकावरून हातांत टोप्या घेऊन हालवूं लागले, कोणी आनंदानें नाचूं लागले, व त्यामुळें असें वाटे कीं यांना हर्षवायूच झाला आहे कीं काय? एकमेकांनीं आपआपल्या हातांचीं चुंबनें* घेतलीं व अब्राहाम याच्या नांवानें वारंवार जयघोष केला. विगवॅामची भव्य इमारत सर्वजणांनीं आपल्या मस्तकावरच घेतली आहे कीं काय असें वाटूं लागलें. कारण जयघोषाचा ध्वनि इतका वाढला कीं ती सर्व इमारत हालत आहे असें वाटूं लागलें. इमारतींतून लोकांच्या झुंडीच्या झुंडी जयघोष करीत करीत बाहेर पडूं लागल्या आणि त्यांच्या या जयघोषाचा आंत प्रतिध्वनि होऊन सामसूम होण्याची तयारी होती तरी तो ऐकूं येतच होता. ह्या इमारतीच्या जवळील एका हॉटेलाच्या ( भोजनगृह ) मोकळ्या जागेंत तोफेचा जयसूचक

* पाश्चिमात्य लोकांत प्रेम दर्शविण्यासाठीं हातांचीं चुंबनें घेण्याचा रिवाज आहे.

मोठा ध्वनि झाला. 'अब्राहाम लिंकन याची अध्यक्षस्थानीं नेमणूक झाली' या आनंदाच्या वाक्याची लाट शहरांत, गल्लो-गल्लींत, व घरोघर पसरली इतकेंच नव्हें तर मिचिगॅन सरोवरापावेतों दूरवर जाऊन पोंचली. घरोघरीं सुवासिनी स्त्रिया, प्रार्थना करूं लागल्या कीं ' हे देवी ! हे स्वातंत्र्यसौख्य माते ! तुझा प्रियपुत्र अब्राहाम लिंकन हा आज अध्यक्ष झाला आहे त्याला उदंड आयुष्य असो. ' आजपावेतों अब्राहाम स्वतःच्या संस्थानाशिवाय इतर ठिकाणीं फारसा प्रसिद्ध नव्हता परंतु अध्यक्ष झाल्यानें त्रैलोक्यांत त्याच्या धवलकीर्तीचे ध्वज लोकांनीं उभारले. याप्रमाणें ज्या प्रचंड रंगभूमीवर भयंकर दुःखपरिणामसूचक व करुणारस प्रधान नाटकाचा हृदयद्रावक व अपूर्व प्रयोग व्हावयाचा होता त्या विशाल रंगभूमीच्या पायऱ्या अरण्यांत राहणाऱ्या टॉमसलिंकनचा मुलगा चढून वर गेला.

सुमारें एक तासपावेतों सभेचें काम तहकूब राहिलें आणि त्यानंतर मेन् येथील हॅानिबाल हॅमलिन् यास अब्राहाम याच्या जोडीस उपाध्यक्ष नेमिलें. स्प्रिंगफिल्ड येथें एका वर्तमानपत्रकाराच्या कचेरींतील खोलींत काय बातमी येते त्याची वाट पाहत अब्राहाम स्वस्थ बसला असून त्याचे सभोंवतीं त्याची स्नेहीमंडळी बसली होती. स्वतःच्या पक्षाचा राष्ट्रीय उमेदवार होणें अगर राजकीय बाबतींतून अंग काढून स्वस्थ

विश्रांति घेत घरीं बसणें यांपैकीं कोणता तरी एक मार्ग, बातमी कळल्यावर, त्याला स्विकारणें भाग होतें. इतक्यांत नेत्रस्फुरण, बाहुस्फुरण, वगैरे शुभ चिन्हें त्यांस होऊं लागलीं. ॥ प्रसाद चिन्हानि पुरः फलानि ॥ याकवि उक्ती प्रमाणें असें होणेंही स्वाभाविकच होय शेवटीं एक बातमीदार तार आफिसांतून येऊन पोंचला. त्याचे अंगांत एक प्रकारचें स्फुरण उत्पन्न होऊन त्याचे अंतर्यामीं आनंदलहरी इतक्या वेगानें उसळली होती कीं ती त्याला आवरेनाशी झाली तरी पण त्यानें ती तशीच आवरून धरून हा प्रकार बाहेरून अगदीं दिसूं दिला नाहीं ॥ निश्चयाचें बळ तुका । म्हणे तेंचि फळ॥ ह्या साधुवाणींतील तत्वाचा त्याचे अंगांत चांगलाच संचार झाला होता. त्याच दृढनिश्चयाचे वेगांत तो ( बातमीदार ) एकदम अब्राहाम याचे एकाबाजूस जाऊन आदरानें उभा राहिला व त्याला हर्षातिरेक होऊं नये म्हणून म्हणाला ' काँग्रेसमध्यें नेमणूक झाली आणि सिवर्ड याचें नांव यादींत दुसरें आलें आहे.' इतके शब्द उच्चारल्यावर त्यानें तात्काळ जवळच्या मेजावर उडी मारिली व मोठ्यानें म्हणाला " संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष अब्राहामलिंकन या वाक्याचा जयजयकार राष्ट्रिय सभेंत झाला आणि अब्राहाम लिंकन अध्यक्ष या नावाचा जयजयकार द्वीपांतरा पावेतों जाऊन पोंचत आहे. हे महाभाग ! हे स्वातंत्र्यप्रियनरशिरोमणे! जे कोट्यावधि गुलामांच्या स्वातंत्र्य सुखावर आग पाखडीत आहेत, ज्यांच्या

बायकापोरांचा अतोनात छळ होत आहे आणि ज्यांच्या अहो-रात्र तळतळाटांनीं ही पुण्यभूमि त्रस्त होऊन दुःखसागरांत बुडत आहे, त्या दुष्टांचा विध्वंस करून तो त्यांचा संतापाग्नि तूं शांत करशील, त्यांचा छळ बंद करशील, बायकापोरांचे तळतळाट नाहींसे करशील, स्वतःच्या पुण्यमातेस दुःखार्णवांतून बाहेर काढशील आणि सर्वांना परावलंबनदैन्याच्या कारागृहांतून मुक्त करशील व ते सर्व तुला सहस्रावधि आशिर्वाद देतील आणि 'परमेश्वरा आमचा अब्राहाम चिरायू होवो आणि त्याच्या कीर्तीचे जयध्वज दिगंतरीं फडकोत' असें ह्मणून अहो-रात्र अभिष्टचिंतन करतील यांत संशय नाहीं. हे सत्पुरुषा ! हे लिंकनकुलदीपका ! तुझा विजय असो. " वरील संभाषण करितांना त्या दूतास अत्यानंद झाला होता. स्प्रिंगफिल्ड येथें पेठेपेठेंतून 'अब्राहाम' या नांवाचा जयजयकार चालूच होता आणि त्याचा प्रतिध्वनि दूरपावेतों ऐकूं येत होता. ठिकठिकाणीं लोक विजयोत्सव करीतच होते. ॥ साधुसंत येती घरा, तोचि दिवाळी दसरा। तुका ह्मणे तोचि संत, सोशी जगाचे आघात ॥ या उक्तीप्रमाणें अब्राहाम यास सज्जन ह्मणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. ही आनंदाची बातमी ऐकून, आपल्या स्नेहीमंडळीच्या हातास हात मोठ्या आनंदानें मिळवून व त्यांचें यथोचित अभि-नंदन श्रवण करून अब्राहाम यानें तारेंतून आलेल्या बातमीचा कागद आपल्या खिशांत ठेविला व 'आठवे गल्लींत एक

गरीब स्त्री राहत आहे, ती ही आनंदाची बातमी ऐकण्यास फारच उत्सुक्त झाली असेल ' असें ह्मणून आपल्या घरमंडळीस ही बातमी सांगण्यास तो घरीं चालता झाला.

राष्ट्रीय सभेंत अध्यक्षाचे जागीं अब्राहाम याची नेमणूक झाल्या बद्दलची लेखी सूचना अब्राहाम याजला पाठविणें हें सभेचे कर्तव्य होतें, व त्याप्रमाणें मॅसेच्युसेट्स येथील जॉन ॲशमन् यास प्रमुख नेमून त्याचे हाताखालीं एक मंडळी स्थापन झाली. या मंडळीनें अध्यक्षाचे तैनातींत राहून त्याजकडे रितसर सूचना पाठविण्याचें ठरलें होतें. ही व्यवस्था होत होती त्या दरम्यान स्प्रिंगफिल्ड येथील नागरिक जनांनीं आपला लोकप्रिय व परम पूज्य अध्यक्ष अब्राहाम याचे सन्मानार्थ व आनंदप्रदर्शनार्थ १०० तोफांची सलामी दिली. कांहीं वेळानें लोकांचा मोठा समुदाय त्याचें स्वागत करण्यासाठीं निघाला आणि ते सर्व लोक अब्राहाम याच्या लहानशा झोंपड्यासभोंवतीं जमून उभे राहिले. मनुष्यास संपत्ति, ऐश्वर्य किंवा मोठी पदवी यापैकीं कोणतेंही प्राप्त झालें ह्मणजे तो विकारवश होऊन अभिमानानें अतिशय फुगतो व आपल्यापेक्षां खालच्या पायरीचे लोक त्याला कस्पटाप्रमाणें वाटूं लागतात, परंतु या महाभागास मिथ्याभिनाचा विटाळही झाला नसून जरी अध्यक्षाच्या-मोठ्या पदवीस तो चढला होता तरी जे लोक त्याच्या झोंपड्यास

भोंवतीं जमले होते त्यांतील प्रत्येकाच्या हाताशीं हात त्यानें मिळविला व त्यामुळें सर्वत्रांस अतिशय समाधान वाटून त्यांनीं आपल्या नव्या अध्यक्षाचें मोठें गौरव केलें; स्प्रिंगफिल्ड येथील त्याचें कौतुक करणाऱ्या त्याच्या कित्येक भक्तमंडळीनीं त्याच्या सन्मानार्थ कांहीं उंचीं उंचीं मद्यें पाठविलीं, परंतु अब्राहाम यानें त्यांपैकीं कोणतेंच मद्य स्विकारिलें नाहीं, कारण मद्य हें एक प्रकारची विषवल्ली आहे असें तो समजत असे ह्मणून त्यानें स्नेही मंडळीचे मोठे आभार मानून तीं सर्व मद्यें परत केलीं. अब्राहाम याचे तैनातींत जी मंडळी स्थापन झाली होती ती येऊन पोंचली. ही मंडळी येऊन पोंचतांच सन्मानार्थ व स्वागतार्थ मद्याचा उपयोग न करितां झऱ्याचें ताजें उदक सर्वत्रांनीं प्राशन केलें.

जून महिन्याच्या २३ व्या तारखेस अब्राहाम यानें राष्ट्रीय सभेकडे हमेशच्या पद्धतीप्रमाणें पत्र पाठविलें, त्यांत इलाख्यासाठीं झालेली नेमणूक त्यानें स्विकारल्याबद्दल मजकूर होता. हें पत्र संक्षिप्त आणि मोठ्या सरळ रितीनें लिहिलेलें होतें. सभेनें प्रतिपादन केलेलीं तत्वें त्यानें ग्राह्य केलीं होतीं आणि पत्राच्या शेवटीं जीं वाक्यें होतीं तीं येणें प्रमाणें:—‘ जगंनियंत्या परमेश्वराचें नामस्मरण करून आणि सभेंत जी मुख्य मुख्य मंडळी आहेत त्यांच्या विचारास व कलास अनुसरून तसेंच

संस्थान, देश आणि राष्ट्र यांतील सर्व लोकांचे हक्क लक्षांत ठेऊन आणि राज्यकारभाराची शाश्वती, अव्याहत संघशक्ति, ऐक्यभाव आणि सर्वांची भरभारटी ह्या सर्व गोष्टी मनांत बिंबवून, राष्ट्रीय सभेचीं जीं जीं तत्वें ठरावीक आहेत त्यांस मी मोठ्या खुषीनें अनुमोदन देतों आणि त्या सर्वांस उत्तम यश मिळावें अशी माझी उत्कटेच्छा आहे.'

अमेरिकेंतील लोकसत्ताक स्वतंत्र राज्याच्या इतिहास भांडारांत भर घालण्यास योग्य असा इलाख्याच्या ह्या सालच्या सभेचा हा अद्वितीय भाग होय. स्वतंत्र संस्थानांतील उत्साह सर्वत्र जागृत झाला होता. स्वातंत्र्यसौख्यदेवीच्या भक्तजनांनीं अर्धवट लष्करी मंडळ्या स्थापन करून चांगली सुधारणा केली होती आणि ह्या मंडळ्या त्या दिवसापासून राजकीय मोहिमेंत झळकूं लागल्या. ह्या मंडळ्यास 'वाइड अवेक' (सुप्रबुद्ध मंडळी) असें नांव दिलें असून हे रात्रौं मशाली घेऊन व दिवसास झेंडे घेऊन लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील लोक सुचवितील त्याप्रमाणें चहूंकडे नेहमीं हिंडत असत. फुरसुदीप्रमाणें ही मंडळी मोहिमेंतलीं गाणीं गाऊन करमणूक करीत असत; आणि जेणें करून स्वातंत्र्याचें स्फुरण लोकांत जागृत राहील असे उपाय सर्वत्र चालू होते.

या एकंदर हकिकती वरून अब्राहामाच्या विरुद्ध कोणीही

नव्हतें अगर त्याला कोणीच शत्रू नव्हते असें मात्र समजावयाचें नाहीं. निवडणूकींतले लोकमतांचे कागद पाहिले असतां अब्राहाम याचे विरुद्ध पुष्कळ मंडळी होती असें स्पष्ट दिसून येत होतें. ही विघ्नसंतोषी मंडळी अब्राहाम याची व लोकसत्ताक स्वतंत्र-पक्षांतील सर्वांची अतिशय निंदा करीत व त्यांचा पदोपदीं तिरस्कार करीत; इतकेंच नव्हे तर हे स्वतंत्र पक्षांतील लोक सिद्दि लोकांचे कनवाळू आहेत ह्मणून त्यांना ही दुष्ट मंडळी 'काळे सिद्दि'च म्हणत असत. इतकेंही करून त्यांचें समाधान नच झालें तर त्यांच्यावर अपशब्दांचा भडिमार करून हे विघ्न संतोषी लोक संतोष मानीत असत. डोग्लस यानें स्वतःसाठीं मुख्यस्थान पत्करलें होतें ह्मणून त्याच्या मित्रमंडळीस आतिशय आश्चर्य वाटलें, कारण स्वतःची निवडणूक होण्यास्तव आपणच आपली शिफारस करण्याची पद्धत त्या काळांत फार गौण मानली जात होती. कसी महत्वाच्या जागेसाठीं जे उमेदवार पश्चिमेकडे राहत होते त्यांच्यांत हा रिवाज चालू होता, आणि तोच रिवाज डोग्लस सारख्यानें स्विकारणें खरोखरच अश्लाघ्य होय असें ते म्हणत असत. डोग्डलस याला यश मिळणार नाहीं व उलट तो निंदेस पात्र होईल अशी पुष्कळांची खात्री होती; 'लौकिक दृष्ट्या मीच उमेदवार योग्य आहे' असें सिद्ध करून दाखण्याचा त्याच्या सर्व भाषणाचा कल होता. ब्रेकीनरिज् हा गुलामगिरीच्या लाभांत असून अब्राहाम हा जे जे गुलामगिरीच्या

लाभांत असतील किंवा बोलतील त्या सर्वांस पाण्यांत पहात होता, परंतु या दोन्ही पक्षांतील लोकांनीं सध्यां या संबंधांत कांहीं एक करावयाचें नाहीं असा निश्चय केला होता. ह्यावेळीं मात्र ( १ ) गुलामगिरीचा प्रसार अगर ( २ ) गुलामगिरीची मर्यादा या पैकीं कोणत्या तरी एका बाबतीचा कायमचा निर्णय व्हावयाचा होता.

अब्राहाम हा घरीं स्वस्थ बसून होता तरी पण कधीं कधीं संयुक्त संस्थानांतील पुष्कळ लोक त्याचे भेटीस येत असत. यांपैकीं कित्येक गुलहौसी केवळ कौतुक पाहूनच गुंगावयास येत असत व कित्येक मात्र उमेदवारांची निवडणूक होऊन जागा भरण्याची वेळ आली तर आपली ही कांहीं डाळ शिजेल कीं नाहीं ह्याचा अंदाज पाहण्यासाठीं येय असत, आणि कित्येक प्रामाणिकपणानें त्याला केवळ उत्तेजन देण्यासाठींच येत होते. संस्थानांतल्या राजधानीच्या एका भव्य राजवाड्यांत अब्राहाम यास उत्तम शृंगारलेली जागा राहावयास दिली असून जून महि-न्यांत नेमणूक झाल्यापासून नोवेंबरांत निवडणूक होईपावेतों जे जे लोक भेटीस येत होते त्यांना तेथें मोठ्या खुषीनें व आदरानें तो भेटत असे. तो जात्याच मोठा धूर्त असल्यामुळें हल्लीं त्यानें व्याख्यान देणें, संभाषण करणें वगैरे सर्व प्रकार अगदीं बंद ठेविले होते.

अब्राहाम याची निवडणूक झाली तेव्हां त्याची चित्तवृत्ति

जरी शांत होती तरी औदासिन्याची छाया त्याचे मुखावरून नाहींशी झाली नव्हती. त्याचे मस्तकावर मोठ्या जबाबदारीचा बोजा लादला होता. ' स्वतंत्र संस्थानांतील कोणाही मनुष्याची निवडणूक झाली तर आह्मी आपलें अंग काढून घेऊन चालते होऊं ' अशा बद्दल दक्षिणे कडील संस्थानांनीं उघड रितीनें वारंवार जाहिर केलें होतें. या शिवाय दुसरें पुष्कळ महत्वाचे विचार त्याचे मनांत घोळत असल्यानें तो अगदीं चिंताग्रस्त झाला होता. ॥ चिंतातुराणां न सुखं न निद्रा ॥ चिंतारूप व्याधीनें एकदां मानवी देहांत प्रवेश केला म्हणजे मग तो मनुष्य सर्वतोपरी कितीही बलाढ्य असला तरी त्याला सुखानें झोंप यावयाची नाहींच व त्याचें सर्व शरीर एक सारखें झिजत असतें हा ठराविक सिद्धांत होय. ज्याप्रमाणें हा नरदेह अचेतन ( जड ) झाला म्हणजे क्रव्याद नांवाचा अधोमुखी अग्नि त्याचें भक्षण करून एका क्षणांत रक्षा करून टाकितो त्याप्रमाणें सचेतन जडदेहास हा चिंताग्नि अहर्निश जाळीत असतो. अशीच अब्रहाम याचीही स्थिति झाली होती; एवढी अवाढव्य जबाबदारी डोक्यावर पडल्यामुळें बिचाऱ्या अब्राहामाच्या देहास चिंताग्नीनें स्पर्श केला होता त्यामुळें त्याचें तरतरीत मस्तक अगदीं भणभणून गेलें होतें. नानाप्रकारचे विचारतरंग त्याचे मनांत अव्याहत चालू होते. आपण यशस्वी झालों अशी बातमी जेव्हां त्याला कळली त्यावेळीं एक विलक्षण व

आश्चर्योत्पादक प्रकार घडला त्याबद्दलची गोष्ट अब्राहाम यानें स्वतः सांगितली आहे ती अशी कीं, "इ. स. १८६० सालीं माझ्या निवडणूकीची सुवार्ता जेव्हां मला समजली त्यावेळीं पुष्कळ मुलांनीं एकत्र जमून माझ्या सभोंवतीं जयजयकार शब्दाचा एक सारखा गोंगाट करून सोडल्यामुळें मी अगदीं कंटाळलों व घरीं जाऊन माझ्या विश्रांतीच्या खोलींत स्वस्थ एका पलंगावर पडून राहिलों. माझ्या समोर एक मोठें कपाट होतें आणि जवळच तेथें एक आरसा टांगला होता; (इतकें सांगून त्यानें उठून बसून त्यावेळची सर्व स्थिति हुबेहूब दाखविली) त्या आरशांत मी माझें प्रतिबिंब लांबलचक पडलेलें पाहिलें, पण त्या प्रतिमेंत माझी तोंडें मात्र दोन वेगळीं वेगळीं स्पष्ट दिसत होतीं. एका तोंडाच्या नाकाच्या टोंकापासून दुसऱ्या तोंडाच्या नाकाच्या टोंकापावेतों ३ इंचांचें अंतर होतें. हा प्रकार पाहून मी थोडासा त्रासल्यासारखा झालों व कांहींसा भ्यालोंही खरा; त्यानंतर मी उठलों व आरशांत पाहिलें तों ती प्रतिमा नाहींशी झाली. दुसऱ्या वेळीं पुन्नः मी असें करून पाहिलें तों ती प्रतिमा पहिल्यापेक्षां विशेष स्पष्ट दिसत होती; परंतु यावेळीं मात्र प्रतिमेंतील एका तोंडावर जी औदासिन्याची छाया व्यक्त होत होती त्या पेक्षां दुसऱ्या तोंडावर पांच पट छाया दाट दिसत होती. कांहीं वेळानें मी उठून बसलों व तो सर्व प्रकार नाहींसा होऊन हल्लीं मी तो अगदीं विसरलों. पर-

चेवर मला असें मात्र वाटे कीं हें कांहीं तरी दुश्चिन्ह असावें व तसें वाटलें म्हणजे मला कांहींसें दु:ख होई. हा प्रकार मी माझ्या कुटुंबास कळविला. ही कांहीं तरी भुताटकी असावी असें तिला वाटून ती अमळ बाबरली, परंतु थोडासा दुरवर विचार करून तिनें आपला अभिप्राय कळविला कीं ' जीं दोन तोंडे दिसलीं त्यावरून माझी अशी खातरी आहे कीं आपण आणखी एकदां म्हणजे एकंदरींत दोनदां अध्यक्ष व्हाल, परंतु दुसऱ्या खेपेस मात्र आपल्या जिवास धोका पोंचण्याचा संभव आहे." अब्राहाम याची बुद्धि मोठी तीव्र व शोधक होती, त्यानें वरील प्रकारासंबंधी आरशास चीर पडल्यामुळें दोन तोंडें दिसत असावींत असें अनुमान केलें, परंतु अब्राहाम याचे कुटुंबाचें मनांत मात्र तो तिचा वरील अभिप्राय बिंबला तो कायमचाच बिंबला.



# प्रकरण १६ वें.

॥ परोपकाराय सतां विभूतयः ॥

## अध्यक्षाचा वर्तनक्रम; बंडाची उत्पत्ति.



लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील (रिपब्लिकन्) लोकांत सांप्रत जिकडे तिकडे शांतता दिसत होती तरीपण अब्राहाम लिंकन याची चित्तवृत्ति शांत नव्हती. ॥ नातिश्रमापनयनाय नच श्रमाय॥राज्यं स्वहस्तधृतदंडमिवातपत्रं ॥ प्रत्येक मनुष्यास इच्छित वस्तु प्राप्त होतांच ती मिळविण्यासाठीं जी हाव असते ती नष्ट होते आणि तिचें रक्षण कसें करावें या विवंचनेमुळें त्याच्या जिवास क्लेश मात्र होतात. छत्रीचा दांडा हातांत धरण्यास ज्या मानानें श्रम पडतात त्यामानानें तिच्यापासून श्रमाचा अपहार होत नाहीं, म्हणून राज्य हें छत्रीप्रमाणें आहे असें कविकुलगुरू कालिदासानें म्हटलें आहे. अब्राहाम याची स्थिति अशीच होती, त्याजवर जबाबदारीचें मोठें ओझें होतें. त्याच्या पाठीमागें सध्यां दोन उपाध्या लागल्या होत्या, त्यापैकीं पहिली उपाधि, कचेरींत आपणांस कोठें तरी चांगली जागा मिळावी

म्हणून त्याजकडे अर्ज करणाऱ्या लोकांची होती आणि दुसरी उपाधि लढाईची वेळ अगदीं येऊन ठेपल्याबद्दलची होती. ह्या दोहों पैकीं पहिली उपाधि लहान असल्यानें जरी क्षुल्लक दिसत होती तरीपण ती कमी त्रासदायक नव्हती. एकंदर व्यवस्थेचा मोठा बोजा त्याचे डोक्यावर होताच, त्यांत या दोन उपाध्याची भर पडल्यामुळें मोठमोठाल्या प्रश्नासंबंधीं दुरवर विचार करण्याचे कामीं त्याची मति अगदीं कुंठित झाल्यासारखी झाली होती आणि ते प्रश्न महत्वाचे असून त्यांचा निर्णयही लौकर झाला पाहिजे होता. अब्राहाम हा सुस्वभावाचा, शांत वृत्तीचा, आर्द्रअंतःकरणाचा व मोठा * दयाशील असे. त्याला कोणताही प्रश्न विचारिला तरी त्याचा चांगला उलगडा करून स्वतःच्या तर्कशक्तीनें त्याचें योग्य प्रतिपादन करण्याचे कामीं तो मोठी उमेद बाळगीत असे; नद्या आपलें उदक आपणच प्राशन करीत नाहींत, तसेंच वृक्ष आपलीं फळें आपणच खात नाहींत आणि मेघ भूमीवर जलवृष्टी करून लोकांस संतुष्ट करितात त्याप्रमाणें अब्राहाम हा मोठा परोपकारि असून त्यास एवढें मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें होतें तरी द्रव्यमदाचा किंवा

---

*॥ प्रायः सर्वोभवति करुणावृत्तिरार्द्रान्तरात्मा ॥—मेघदूत ९८ ॥

साधारणतः असा नियमच आहे कीं जें अंतःकरण आर्द्र असतें तें दयेनें ही संपूर्ण भरलेलें असतें.

ऐश्वर्यमदाचा त्याचे डोळ्यावर मुळींच धूर नव्हता. कोणी कसलीही याचना करो त्याची इच्छा तृप्त केल्याशिवाय त्यास चैन पडत नसे। परोपकाराय सतांविभूतयः । असें जें म्हटलें आहे त्याप्रमाणें खरोखरच त्याच्यासारखे परोपकारी पुरूष जगांत फार थोडे सांपडतील. एखाद्या अर्जदारानें अर्ज केला व त्या अर्जांत लिहिल्याप्रमाणें त्याची लायकी असो किंवा नसो परंतु कोणतेही रितीनें ती अर्जी नामंजूर करणें त्याच्या अगदीं जिवावर येई. मनांत कांहीं करावयाचें नसलें अगर हरएक रितीनें स्वतःचें अंग काढून घेणें असलें तर त्या अर्जीवर आपल्या हाताखालच्या लोकांकडे अगर दुसऱ्या कोणाकडे निकालास्तव पाठविण्याचा रवाना शेरा अधिकारी लोक करितात परंतु अब्राहाम यास ही पद्धत मुळींच पसंत नव्हती. कोणी कितीही गरिब व चेंगट असला तरी त्याच्या अर्जाकडे तो कानाडोळा करीत नसे. अब्राहाम याच्या क्षमेला सीमाच नव्हती असें म्हणतात. क्षमा ही एक जणूं काय त्याला ईश्वरी देणगीच मिळाली होती ॥ क्षांन्तितुल्यं तपो नास्ति, संतोषान्नसुख परं । नास्ति तृष्णासमोव्याधिर्नच धर्मोदयापरः ॥ क्षमेसारखें तप नाहीं, संतोषासारखें सुख नाहीं, तृष्णेसारखा व्याधि नाहीं आणि दयेसारखा धर्म नाहीं; हे सर्व गुण अब्राहाम यांत वास्तव्य करीत होते. अशा नाजुक स्थितींत अब्राहाम याच्या

जिवश्च कंठश्च स्नेही मंडळींनीं त्याला अत्यंत मदत केली व त्याचें चांगलें रक्षण केलें.

परंतु इतका जरी तो सुस्वभावी, आनंदी व परोपकारी होता तरीपण स्वतःस मिळालेल्या अधिकाराचा दुरुपयोग तो कधींच करीत नसे. इतके जरी उमेदवार नोकरीसाठीं अर्ज्या घेऊन त्याजकडे खेपा घालीत होते, तरीपण जागा देण्याबद्दल तो कोणास आश्वासन देत नव्हता; लोकांचे वंशपरंपरा चालत आलेले हक्क तो अव्याहत चालवीत असे. कोणाचा कोणताही कायदेशीर हक्क तुडविला न जावा याबद्दल तो फारच दक्षता ठेवीत असल्यानें त्याची फार प्रसिद्धी झाली. ॥ उत्तम पुरुष म्हणावा जो करितो शत्रुवरिहि उपकार ॥ या उक्तीला अनुसरून आब्राहाम यानें स्वतःच्या पक्षाविरुद्ध जे लोक त्याचे तैनातींत होते त्यांना तो मुळींच दुखवीत नसे आणि त्यांचेविषयीं मनांत द्वेषबुद्धिही ठेवीत नसे; दक्षिणेकडील लोक म्हणजे त्याचे कट्टे शत्रु होते, परंतु त्यांपैकीं जर कदाचित् एखादा इसम त्याचे तैनातींत राहिला असता तरीपण त्याचेविषयीं त्याचे ठायीं पूज्यबुद्धिच राहिली असती. स्वतःचे हाताखालीं जे जुने, प्रामाणिक, हुशार आणि विश्वासूक नोकर होते त्यांचेवर समदृष्टि ठेऊन त्यांचे हक्कांस तो कधींही तुडवीत नव्हता. ॥ सुन्हृन्मित्रार्युदासीनमध्यस्थ द्वेष्यबंधुषु ॥ साधुष्वपि-

च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते (भ. गी. ६. ९) दुसऱ्याच्या प्रत्युपकाराची अपेक्षा न करितां त्यावर उपकार करणारे ते सुहृद, ओळखीचे स्नेह्यावर उपकार करणारे असे निरपेक्ष बुद्धिचे ते मित्र, शत्रू, उदासीन (अपकार अगर उपकार न करणारे), मध्यस्थ, दुसऱ्याचें वैभव पाहून अंतःकरणांत जळणारे असे द्वेष्टे, बंधू, साधू, पापी, यांच्याठायीं ज्याची समबुद्धि असते तोच श्रेष्ट समजावा. शत्रू आणि मित्राविषयीं सारखी बुद्धि असणें हा कांहीं लहानसहान गुण नव्हे. खरोखरच अशा सत्पुरुषाचे गुणानुवाद गावे तेवढे थोडेच. त्याच्या वर्तनाची हकीकत जेव्हां त्याच्या मित्रमंडळीच्या कानावर जाई तेव्हां त्यांचे मनाचा विरस होऊन ते अब्राहाम याजवर अतिशय रागावत असत. स्वतःस लाभ होणार नाहीं अशामुळें ते रागावत नव्हते परंतु । शठं प्रतिशठं कुर्यादादरं प्रतिचादरं । तत्र दोषो न भवति दुष्टे दुष्टं समाचरेत् । असें त्यांचें म्हणणें असून आजपावेतों जे जे अध्यक्ष होऊन गेले ते ते सर्व अशा रीतीनें (अब्राहामाप्रमाणें) वागत नव्हते व असें वर्तन त्या काळाला अनुसरून उचित नसल्याबद्दल त्यांनीं अब्राहाम यास कळविलें; परंतु अब्राहाम याचे वृत्तींत यत्किंचितही फरक पडला नाहीं. तो म्हणाला "। त्वयामेलुंचिताः केशा मयाच शिरमुंडनम् । ही वर्तणूक मला अगदीं पसंत नाहीं व यापूर्वीं होऊन गेलेल्या अध्यक्षांची वर्तणूक अमुक एका प्रकारची होती व तीच वागणूक कशीही अ-

सली तरी त्याचें अनुकरण मी केलें पाहिजे असें नाहीं." ज्या सुधारणेला कांहीं दिवसानंतर लोक व्यावहारिक सुधारणा म्हणत होते, तशा सुधारणेचे प्रकार त्यावेळीं कोणीही सुचविले नव्हते. संस्थानाच्या प्रजासत्ताकपक्षाचे (डेमोक्रेटिक्) सेक्रेटरी (चिटणीस) **विल्यम एल. मार्सी** यानें "लुटी ह्या जिंकणाराच्याच असावयाच्या" याप्रमाणें एक नवीन वाक्य शोधून काढिलें आणि ऍन्ड्रयु जॅकसनपासूनच्या सर्व प्रजासत्ताकपक्षाच्या अध्यक्षांनीं ह्या नवीन वाक्यातील तत्व स्थापन करून त्याला अनुसरून सर्व व्यवस्था केली. आपल्या हाताखालचे जे लोक राज्यकारभारांत आणि राज्यपद्धतींत आपल्या विरुद्ध मत देतील त्यांस वागविण्याचे कामीं अध्यक्ष **बुशनन्** ह्याचा स्वभाव अतिशय तिखट होता. प्रजासत्ताक पक्षांत (डेमोक्रॅटिक्) **लिकॉंप्टन्** (गुलामगिरीच्या लाभांतले) आणि ऍन्टि **लिकॉंप्टन्** (गुलामगिरी विरुद्ध असलेले) असे दोन तट पडले होतेच. या दोन तटांत मतभेद वाढत चालला असून त्या दरम्यान **बुशनन्** व त्याचा सेक्रेटरी यांनीं डॉग्लस याच्या स्वतःच्या संबंधांत आणि त्याच्या प्रजासत्ताक राज्यपद्धतीचे संबंधांत हितचिंतक कोण कोण आहेत याबद्दल फार बारीक चौकशी चालविली होती. (उदाहरणार्थ) कॅलिफोर्निया येथें प्रजासत्ताक पक्षांतील गुलामगिरीविरुद्ध डेविड् **सी. ब्रॉडरिक** (डाग्लस याचा स्नेही) याची संयुक्त संस्थानांत सिनेटरच्या जागीं निवडणूक झाली

त्या संस्थानांतला दक्षिणेकडील गुलामगिरीचा हितचिंतक **विल्यम् एम्. ग्विन** हा दुसरा सिनेटर होता. संस्थानांतून कोणास आश्रय अगर उत्तेजन देण्याचें काम सरकारी रितीनें **ग्विन** याजकडे सोंपलें असून **ब्रॉडरिक** यानें त्याजकडे ज्या शिफारशी कराव्या त्या सर्व नामंजूर होत होत्या. कांहीं दिवसानंतर प्रजासत्ताक पक्षांतील वर कळविलेल्या दोन्ही तडांत इतकें वैर बळावलें होतें कीं **बुशनन** याच्या राज्यकारभारांतल्या कांहीं स्नेही मंडळींनीं ब्रॉडरिक यास भुलथाप देऊन द्वंद्वयुद्ध करावयास लाऊन एका न्यायाधिशाचे हातून या बिचाऱ्या निरपराधी प्राण्यास विनाकारण मारविलें. हाच न्यायाधीश कालेंकरून मोठी लढाई झाली त्यांत बंडखोरांचें सैन्यांत एक मोठा अमलदार झाला होता.

अशी यादवास्थळी जिकडे तिकडे चालू असतांना लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील कांहीं पुढारी, **अब्राहाम** आतां सर्व सत्ताधीश असून त्यानें याचा चांगला बंदोबस्त करून निर्णयात्मक मार्ग कां काढूं नये, याचा विचार करूं लागले. त्यांत कांहीं स्वदेशाभिमानी गृहस्थ होते त्यांना असें वाटूं लागलें कीं ज्या अर्थी आतां नवीन अध्यक्षाची नेमणूक योग्य रितीनें झाली आहे त्याअर्थी आतां एक सुद्धां प्रजासत्ताक पक्षांतला इसम तैनातींत कां असावा? ह्या एकंदर स्थिती-

वरून कित्येकांस तर देशांत आपसांतलें युद्ध ( सिव्हिल वार चालू होईल असा रंग दिसूं लागला. जर दक्षिणेकडील लोक संयुक्त संस्थानांतून निघून चालते झाले तर मग अब्राहाम याचा पुढें काय करण्याचा विचार आहे हेंही जाणण्याची पुष्कळांची उत्कंठा होती; 'शिवाय अब्राहाम त्यांच्याशीं कांहीं समजुतीचे करार करून आपल्या ताब्यांत ठेऊन घेईल किंवा कसें आणि जर ठेऊन घेतलें तर त्यांना काय शर्तीवर व कोणती आशा दाखवून ठेवील' असेंही कित्येकांना वाटून जशी ज्याची लहर लागेल तशी त्याने अब्राहाम यास सल्ला देण्यास प्रारंभ केला. "स्वराज्य" म्हणजे काय हें आतां लोकांस चांगले कळूं लागले आणि गुलामगिरीच्या विरुद्ध त्यांची प्रवृत्ति आतां स्पष्ट दिसूं लागली त्याअर्थी अब्राहाम यानें आतां सोडें मन करून अध्यक्षाच्या जागेचा राजीनामा देऊन दक्षिणेंतल्या लोकांची समजूत घालावी व दुसरा अध्यक्ष नेमण्याबद्दल व्यवस्था करावी असेंही कित्येक भित्र्या लोकांनीं सुचविण्यास कमी केलें नाहीं.

यापैकीं कित्येक अप्रयोजक सूचना करणारांस अब्राहाम यानें चोख उत्तर देऊन वाटेस लाविलें परंतु एकंदरींत पाहतां इलाख्याच्या सभेचें काम चालू असतांना जें शहाणपणाचें मौन्यव्रत धारण केलें होतें तेंच त्यानें हल्लीं ही धारण केलें होतें.

' ज्या वेळीं वाशिंग्टन् येथें मी आपल्या जागेवर जाईन त्या वेळीं निर्णयात्मक कोणता मार्ग स्विकारावयाचा हें मी कळवीन ' असेंही उत्तर त्यानें कित्येकांस दिलें. तो अर्जदारांस ह्मणत असे कीं ' माझें आज पावेतोंचें वर्तन, जाहीर भाषणें, मी काढलेले उद्गार, या सर्वांचें जर तुह्मी चांगलें मनन केलें तर मी आखेर कोणता मार्ग स्विकारीन हें तुह्मांस स्पष्ट कळून आलें-च पाहिजे, या शिवाय तूर्त मी कांहीं एक स्पष्ट सांगूं शकत नाहीं.'

ह्यापैकीं कित्येक जिज्ञासु शोधक मंडळीस शहाणप-णाच्या उपदेशाच्या गोष्टी सांगून त्यानें वाटेस लाविलें आणि शेवटीं गोष्ट या थरास येऊन पोंचावी हें त्यांना विशेष पसंत पडलें नाहीं. त्यांनीं घरीं जाऊन आपल्या मनाचा विरस झाल्या-मुळें अशी कंडी उठविली कीं ' नवीन झालेला अध्यक्ष ह्मणजे निवळ खुषमस्कऱ्या आहे. ' अब्राहाम याची अशी अपकीर्ति ऐकून संतोष मानणारे लोक कांहीं कमी होते असें नाहीं. मनु-ष्यमात्र चुकीस पात्र आहेच म्हणून अब्राहाम याचे हातून कांहीं चूक झाली असावी अगर लहरीमुळें लोकांस एक प्रका-रची गंमत वाटण्यासाठीं त्यानें असा प्रकार केला असावा असें हीं पुष्कळांचें अनुमान होतें. एकंदरीत बरेच लोक त्रासून गेले व अब्राहाम याचे संबधांत त्यांचा वाईट ग्रह

होऊन ते आपल्या घरीं चालते झाले. अब्राहाम यास जे चांगले ओळखत होते त्यांस तो खुशमस्कऱ्या अगर गंमत करणारा असेल असें वाटलें नव्हतें, परंतु त्याचा स्वभावच तसा आहे असें ह्मणत असत.

इ. स. १८६० च्या नोवेंबर महिन्यांत निवडणूक होण्यापूर्वी इलिनॉइसचा न्यूटन बेटमेन याचें अब्राहाम याच्याशीं कांहीं बोलणें झालें त्यावरून अब्राहाम याचे स्वधर्माविषयीं कसे विचार होते हें चांगलें कळून येण्याजोगें आहे. स्टेटहौस (संस्थानाचा राजवाडा) मध्यें अब्राहाम याचे ताब्यांत जो दिवाणखाना होता त्याचेच नजीक मी. बेटमेन (सरकारी शाळेचे सुप्रीटेंडन्ट) यांची कचेरी होती. लोकसत्ताकस्वतंत्रपक्षांतील मंडळींनीं, स्प्रिंगफिल्ड शहरांतील लोक, पुढील इलाख्याच्या निवडणूकींत कशीं काय मतें देणार आहेत याची चांगलीच बारीक व काळजीपूर्वक चौकशी केली होती. एके दिवशीं अब्राहाम आणि बेटमेन असे उभयतां सहज बोलत असतांना अब्राहाम यानें पुस्तकाचीं कांहीं पानें चाळून पाहिलीं आणि स्प्रिंगफिल्ड येथील पाद्री लोकांची यादीही बारीक रितीनें शोधून पाहिली तेव्हां त्यानें खिन्न वदन करून बेटमेन यास कळविलें कीं 'फक्त वीस जणांपैकीं तिघे माझे हितचिंतक असून बाकीचे सर्व माझ्या विरुद्ध आहेत; शिवाय कित्येक

देवळांतली बरीच पाद्रीमंडळीही विरुद्ध मतांची आहेत.'

तो ह्मणाला:—'मी ख्रिस्ती नाहीं आणि मी ख्रिस्ती होईन किंवा नाहीं हें परमेश्वरास माहीत; जरी मी बायबल (ख्रिस्ती धर्म पुस्तक) चांगलें वाचलें आहे तरी पण तें जितकें मला चांगलें समजलें पाहिजे तितकें तें समजलें नाहीं. देशांतील लोकांस स्वातंत्र्यसुख संपूर्ण असावें अशी माझी बळकट इच्छा आहे व ती बरेच लोक चांगल्या रीतीनें जाणत आहेत. राज्यकारभाराच्या स्वरूपाला व कायद्याला अनुसरून जेवढें स्वातंत्र्य देववेल तेवढें सर्वत्रांस दिलेंच पाहिजे. माझ्या प्रतिस्पर्धी मंडळीचें मत गुलामगिरी चालू असावी असें आहे, आणि ज्या ह्या धर्मपुस्तकाच्या तेजांत मानवी ज्ञान पळभरही टिकूं शकणार नाहीं तें हातांत धरून ते माझ्याविरुद्ध मतें देणार आहेत याचें मला मोठें आश्चर्य वाटतें.'

येथपावेतों भाषण केल्यानंतर त्याचा कंठ दाटून ऱ्हदय एकाएकीं भरून आलें व तो एकदम उठून उभा राहिला आणि पुन्हा देहभान ठिकाणीं येई पावेतों इतस्ततः खोलींत फिरला. प्रेमाश्रूनें डोळे भरून येऊन त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले आणि अंगास डवडवून घाम सुटला. अशा स्थितींत तो बोलला—"परमेश्वराला दास्यत्व आणि अन्याय या दोन

गोष्टींचा अतिशय तिटकारा आहे. दुःखार्णवांत तृणाच्यां नौकेंत बसून मी भयंकर तुफानांत सांपडलों आहे खरा. मी यःकश्चित मनुष्य—माझी किंमत ती काय? परंतु परमेश्वरानें माझ्या नौकेस आपला हात लाविला आहे. परमेश्वरास सत्य प्रिय आहे व तो सत्यसंकल्पाचा दाता आहे. मी जो मार्ग स्विकारला आहे तो सत्याचा आहे. स्वातंत्र्य हाच सत्याचा मार्ग होय व तोच मला माझ्या गुरूनें स्विकारण्यास उपदेश केला आहे. ज्या अर्थी माझा गुरु व परमेश्वर हे मी दोन समजत नाहीं त्या अर्थी हा मार्ग पत्करण्यास मला परमेश्वराचीच आज्ञा आहे असें मी खास समजतों. मी लोकांस असें स्पष्ट कळविलें कीं ज्या नांदत्या घरांत दुही माजली त्या घराचा नायनाट झाल्यावाचून कधींही राहणार नाहीं. आपला सद्गुरू आपल्यांत प्ररणाबुद्धि उत्पन्न करितो व आपली प्रेरणाबुद्धि ज्या अर्थी स्वातंत्र्याचाच सन्मार्ग पत्करण्यास सुचवीत आहे त्या अर्थी ही सद्गुरूचीच आज्ञा आहे हें उघड दिसत आहे. गुलामगिरी चालू राहो अगर तिचा नायनाट होवो याबद्दल डग्लस यास तर पर्वा नाहींच पण परमेश्वर दीनवत्सल आहे त्यास मात्र त्याची पर्वा आहे व मलाही त्याची अत्यंत काळजी आहे, आणि मी प्रतिज्ञेनें सांगतों कीं परमेश्वराच्या सहायानें मी यांत यशस्वी होईन. कदाचित् याचा मी आखेर परिणाम जरी पाहणार नाहीं तरी त्याचा प्रत्यय मला आल्यावांचून राहणार नाहीं; आणि

शेवटीं या लोकांनीं आपलीं धर्म पुस्तकें चांगलीं वांचलीं नाहींत अशी त्यांची खातरी झाल्यावांचून राहणार नाहीं."

अब्राहाम हा याप्रमाणें बराच वेळ आपल्या मनाशीं बोलला व कांहीं वेळानें त्यानें उद्गार काढिले कीं " ह्या वादाचा लोक नैतिक दृष्टीनें अगदींच विचार करीत नाहींत याबद्दल मला वरचेवर फार आश्चर्य वाटतें. मी माझे विचार जर प्रगट केले तर गुलामगिरीचा नाश झाला पाहिजे किंवा या राज्याचा तरी नाश झाला पाहिजे याचें चांगलें स्पष्टीकरण होऊं शकणार नाहीं. पुढें मोठा भयंकर प्रसंग येणार व तो मी पाहणार परंतु ही प्रधानमंडळी माझ्यासाठीं कशीं काय मतें देतात तें प्रथम पाहण्यासाठीं मी या खडकावर उभा आहे ( हातांतल्या धर्मपुस्तकाकडे पाहतो ); आतां पापाचा घडा भरला आहे आणि त्यामुळें ईश्वरी कोपही लौकरच होईल. ज्याप्रमाणें भविष्यकाळीं कांहीं चांगलें व्हावयाचें असलें म्हणजे प्रथम पासूनच शुभचिन्हें होऊं लागतात त्याप्रमाणें भविष्यकाळीं एखादा भयंकर प्रसंग यावयाचा असला म्हणजे प्रथम पासूनच दुश्चिन्हेंही होऊं लागतात." अब्राहाम याचे वरील उद्गार भावी दुश्चिन्हसूचक होते. इ० स० १८६० सालीं स्वतःच्या पक्षाचे आपण प्रमुख होऊं असें अब्राहाम यास पुष्कळ दिवसांपासून वाटणें संभवनीय होतें, आणि खरोखरच त्याप्रमाणें ज्यावेळीं तो प्रमुख झाला त्याचवेळीं निवड-

णूकही खास होईल अशाबद्दल त्याची खात्री झाली होती. एखाद्या चव्हाट्यावर उभें राहणें जसें दुश्चिन्हसूचक असतें तव्दत् अब्राहाम स्वतःचा खानगी आयुष्यक्रम व सार्वजनिक आयुष्यक्रम या दोन मार्गांच्या चव्हाट्यावर हल्लीं उभा असल्यानें संयुक्त संस्थानावर ईश्वरी क्षोभानें जो भावी प्रसंग गुदरणार त्याबद्दल भविष्य वर्तविण्याचे विचार त्याचे मनांत एकसारखे घोळत होते. 'गुलामगिरी न्यायाची आहे व ती दैविकही आहे म्हणून जे जे गुलामगिरीच्या विरुद्ध होतील' ते सर्व ईश्वरी द्रोहाच्या मोठ्या गुन्ह्यास खातरीनें पात्र होतील असे उद्गार काढून उपदेश करीत भटकणाऱ्या पाद्रीभटांचा दक्षिणप्रांतात व न्यु इंग्लंदांत अतिशय सुळसुळाट झाला होता. अब्राहाम याची या सर्व प्रकारावर फारच सूक्ष्मदृष्टि व उत्तम देखरेख होती आणि भूतदयेच्या विरुद्ध जो हा प्रकार चालला होता आणि जें हें महत्पाप घडत होतें तें पाहून टॉमस जेफरसनप्रमाणें स्वदेशासाठीं त्याचे अंगांत कांपरे भरत असे व तो अहोरात्र परमेश्वराची प्रार्थना करीत असे.

नोव्हेंबर महिन्यांत निवडणूकीचीं सर्व मतें पाहण्यांत आल्यावर अब्राहाम हा यशस्वी झाला अशी जेव्हां सर्वत्रांची खातरी होऊन चुकली तेव्हां लागलींच गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून, 'आम्ही संयुक्त संस्थानांतून चालते होतों' अशी भयंकर ओरड ऐकू येऊं लागली. बरेच दिवसांपासून हे लोक

संयुक्त संस्थानाची हद्द सोडण्याचे बेतांत असून कांहींतरी निमित्त शोधीत होतेच व अब्राहाम याचीच निवडणूक होणार अशी खातरी होतांच वरील प्रकारास त्यांनीं प्रारंभ केला. दक्षिणेकडील लोक स्वतंत्र संस्थानांतील लोकांशीं मिळून मिसळून राहतील ही गोष्ट स्वप्नींही येणें असंभवनीय होतें. राज्यांत अर्ध्या ठिकाणीं गुलामगिरी चालू असणें व अर्ध्या ठिकाणीं चालू नसणें हें राज्य नाशास कारण होणार असें जें अब्राहाम याचें म्हणणें होतें तें अगदीं यथार्थच होतें. संधि मिळतांच हे लोक संयुक्त संस्थानांतून जाऊ लागले व जातां जातां, सभा भरविणें, विरुद्ध भाषणें करणें वगैरे बरेंच अवडंबर त्यांनीं माजविलें होतें.

राजद्रोहांत व बंडांत सामील होणारे लोक संस्थानांच्या प्रधान मंडळांत होते त्यांनीं स्वल्प उपायानें बंड होऊन जेणें करून राज्यास धोका बसेल असे प्रयत्न चालविले होते. जॉन बी. फ्लॉइड ( दक्षिणें कडील ) हा युद्धखात्याचा सेक्रेटरी असून त्यानें दक्षिणेंत चहूंकडे सैन्य रवाना करून दिले होतें. नूतन अध्यक्षाचें आगमन राष्ट्रीय राजधानींत झालें म्हणजे त्याचे जवळ सैन्य राहूं नये म्हणून सैन्याची सर्वांत मोठी तुकडी अगदीं दूर म्हणजे टेक्सासच्या मध्य भागांत त्यानें नेऊन ठेविली होती इतकेंच नव्हे तर त्यानें उत्तरेकडील किल्ल्यांतून लढाईचीं हत्यारें, तोफखाना,

वगैरे सर्व युद्धसामुग्री काढून दक्षिणेकडील किल्ल्यांत ताब- डतोब पाठवून दिली होती. बंडखोरांच्या अगदीं मुठींत अस- लेला उत्तरेकडील मी. आयझेक टाऊशी नांवाच्या इस- मानें संयुक्त संस्थानांतील लहानसें आरमार चारी दिशेला ( छावण्याकडे ) रवाना केलें होतें. बंडास परिपक्व स्थिति प्राप्त होऊन बंड ऐन रंगात आलें असतां आरमाराचा उपयोग होऊ नये यासाठीं वरील योजना झाली होती. जार्जियाचा हॉवेल कॉब ( भावी बंडाच्या सैन्यांतील मुख्य सरदार ) हा त्यावेळीं तिजोरीचा सेक्रेटरी होता व राष्ट्रीय राजधानीच्या हिशेबांत मुद्दाम कांहीं घोटाळा करून नंतर त्यानें त्या जागे- चा राजीनामा दिला; हा इसम राजीनामा देऊन गेल्यानंतर खजिन्याची रोजकिर्द पाहिली तों त्यांत शिल्लक आवळ्या एवढें पूज्य दिसलें. सालिसिटरांचे ( वकिलांचे ) प्रमुख ब्लॅक् यानें कोणत्याही संस्थानाशी राष्ट्रीयसभा अगर अध्यक्ष या पैकीं कोणास युद्ध करितां येणार नाहीं असें सरकारी रितीनें मत दिलें. जेम्सबुशनन् हा अशक्तवृद्धकपी असून नांवा- चाच अध्यक्ष होता, परंतु प्रधान मंडळांत बंडखोरांनीं मात्र आपले दीर्घ प्रयत्न मोठ्या नेटानें चालविले होते. वाशिंग्टन् येथें राजकीय मंडळींत जी जी हकिकत घडत होती ती ती सर्व स्वमतपराङ्मुख होऊन मतांतर स्विकारलेल्या ह्या मंडळीस तात्काळ कळत होती. दक्षिण कॅलिफोर्निया हें राजद्रोहाचें व

बंडाच्या खलबताचें आदिस्थान ठरलें होतें. दक्षिणेकडील एकूण एक सिनेटर व प्रतिनिधि हे वाशिंग्टन् येथें जागचा पगार घेऊन व नियमित काम करून आपआपलीं सरकारी कामें संभाळून अखेर पावेतों राहिले होते आणि राज्यांतील हिंताचिंतकाप्रमाणें बाह्यात्कारें वागून आंतून राज्याचें जूं झुगारून देण्याबद्दल त्यांची सतत खटपट व कारस्थानें चालूंच होतीं.

बंडास नुकतेच स्वरूप येत चाललें असून त्यास बुशनन् हा मोठ्या खुशीनें मदत करीत होता. उत्तरेकडील कांहीं प्रजासत्ताक लोक, बुशनन् आणि त्याचे अनुयायी लोकांस अद्याप पावेतों धरून बसले होतेच परंतु बूशनन् हा बंडास मोठ्या खुषीनें साह्य करीत असलेला पाहून ते सर्व लोक कुरकुर करूं लागले होते. चार्लस्टन् बंदरांत आलेल्या फोर्ट-मौल्ट्री नांवाच्या किल्ल्यांत एका लहानशा सैन्यासह मेजर अंडरसन हा अडकला असून त्याचे मदतीस कुमक पाठविण्यास अध्यक्ष आडवा आल्यानें लेविस कॅस यानें संस्थानाच्या सेक्रेटरीच्या जागेचा राजीनामा दिला.

ब्लॅक हॉकच्या लढाईंत अब्राहाम यास, याच अंडरसनानें संयुक्त संस्थानाच्या तैनातींत घेतला होता. संयुक्त संस्थानाशीं दक्षिण करोलिनाचा संबंध एकदां सुटला म्हणजे चार्लसटौन्

बंदरांतील फोर्ट मौल्ट्री व इतर किल्ले अनायासेंच शत्रूचे ताब्यांत जावयाचे होते. मी. ब्लॅक् यानें सुद्धां राजीनामा दिला आणि त्याचे जागीं एडविन्-ऍम्-स्टॅन्टन् याची नेमणूक झाली. एडविन् स्टॅन्टन् हा एकनिष्ट प्रजासत्ताक असून संयुक्त संस्थानाचा खरा अभिमानी होता. न्यूयॉर्कचा जनरल जॉन. ए. डिक्स् याची हॉवेल कॉबचे जागीं खजिन्याचा सेक्रेटरी ( चिटणीस ) ह्मणून नेमणूक झाली. जनरल डिक्स् हा संयुक्तसंस्थानाचा कट्टा अभिमानी असून जेव्हां तो बुकाननच्या मंडळींत होता त्यावेळीं त्यानें मुलकी खात्यांतल्या उपरी कमांडरास ( अम्मलदारास ) ' अमेरिकेचा झेंडा कोणी ओढून खालीं पाडील अगर पाडण्याचा जो कोणी प्रयत्न करील त्यास त्याच जागीं गोळी घालून ठार करावें ' या प्रमाणें चोख लिहुन पाठविलें होतें. फ्लॉइड हा राजद्रोही असून सरकारी कामांतही त्यानें अप्रामाणिकपणा दाखवून तो चालता झाला आणि त्याच्या लष्करी खात्याच्या सेक्रेटरीच्या जागेवर संयुक्तसंस्थानाचा खरा हितचिंतक ( केंटकीचा ) जोसेफ होल्ट याची नेमणूक झाली.

मुख्य सॉलिसिटरच्या (वकील) कचेरींत स्टॅंटन् हा ब्लॅक्पेक्षां मोठ्या भिन्न प्रकृतीचा मनुष्य होता, आणि ब्लॅक् नोकरी सोडून पेन्सिलवेनिया येथें स्वस्थ घरीं बसला होता.

जेकब टॉम्सन् यानें गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतील आपल्या अनुयायी बंडखोर बंधूंस मदत करण्याच्या हेतूनें मध्यभागच्या सेक्रेटरीची जागा संभाळून ठेविली होती; या जेकब टॉम्सन्नें मेजर अँडरसन यास आपल्या लहानशा सैन्यानिशीं परत बोलावून घेण्याबद्दल व चार्लस्टन् बंदरांतील किल्ले शत्रूच्या ताब्यांत जाऊं देण्याबद्दल अध्यक्षास संमति दिली. स्टॅंटन् यानें अध्यक्षास स्पष्ट कळविलें कीं ' अध्यक्ष-साहेब ! कायदेशीर सल्लागार यानात्यानें मी माझें कर्तव्य स्मरून तुह्मास स्पष्ट कळवितों कीं संयुक्त संस्थानांतील शिपाई अथवा संयुक्त संस्थानांच्या सरकाराची मिळकत शत्रूच्या ताब्यांत देण्यास तुम्हास कायदेशीर हक्क नाहीं, आणि मध्यभागाच्या सेक्रेटरीच्या सल्ल्याप्रमाणें जर तुह्मी वागाल तर तुमच्या एकंदर लोकांसह राजद्रोहाच्या भयंकर गुन्ह्यांत सांपडाल. ”

जेम्स बुशनन्च्या मंडळींत प्रथम राजद्रोहाच्या गुन्ह्याचें खरें नांव बाहेर पडलें परंतु तें लौकरच नाहींसें झालें. ह्या राजद्रोही मंडळीस असें वाटलें कीं वॉशिंग्टन् येथील कृष्णकारस्थानें आतां संपूर्ण करून तीं बंद ठेवावींत कारण आतां उघड रितीनें बंडाचा डंका वाजविण्यास कांहींएक हरकत नाहीं. बंडाची परिपक्वस्थिति सर्वत्र दिसत असून आंतून सर्व कडेकोट तयारी झाली होती. कित्येक तर आपल्या संस्थानांतून उघड-

पणें सुचना येण्याची वाट पहात बसले असून कांहीं मंडळीं दक्षिणेकडे जें एक नवें जूट निर्माण झालें होतें त्यांत त्वरेनें जाऊन मिळाली. विरुद्ध होणाऱ्या मंडळीच्या कार्यक्रमाप्रमाणें दक्षिण कॅरोलिनाकडील लोक रितीप्रमाणें पुढाकार घेऊन उघडारितीनें जाऊ लागले. हें संस्थान फार दिवसापासून दुहीचें जणूंकाय एक माहेरघरच होऊन बसलें होतें, आणि या नूतन चळवळींसंबंधी तेथील लोकांस पुढाकार देण्यांत कांहीं विशेष कारण होतें इ. स. १८६० च्या नोवेंबर महिन्याच्या सातव्या तारिखेस कॅलिफोर्निया संस्थानांतील लोकांनी निराळें झाल्याचा ठराव मान्य करून त्या प्रमाणें व्यवस्था करण्यास प्रारंभ केला. मिसिसिपी कडील लोकांनीं इ. स. १८६१ च्या जानेवारीच्या ९ व्या तारिखेस, फ्लॉरिडा जानेवारी १०, अल्बामा जानेवारी ११, जॉर्जिया जानेवारी १९, लुशियाना जानेवारी २५ आणि टेक्सस् फेब्रुवारी १ ली, ह्याप्रमाणे संस्थानांतील लोकांनीं त्या त्या तारिखेस सर्व व्यवस्था दक्षिण कॅरोलिना प्रमाणें केली. “ ज्यावेळीं अब्राहाम वॉशिंग्टन् येथें शपथ घेऊन स्थानापन्न होण्यास येईल त्या वेळीं आम्ही संयुक्त संस्थानाच्या जुटांत नसून वेगळे आहोंत” असें जाहीर करण्याकरितां ह्या सात संस्थानांतील लोकांनीं वर कळविल्या प्रमाणें तयारी केली होती. या साती संस्थानांचें एकाच वेळीं एक जूट झालें नसून प्रत्येकानें प्रथम आपआपलें स्वातंत्र्य

वेगवेगळ्या वेळीं जाहीर केलें. दक्षिण कॅरोलिना येथें निराळें झाल्याचा ठराव पास झाल्यावर अमेरिकेंतील संयुक्तसंस्थानें आणि दक्षिण कॅरॉलिना यामधील ऐक्यभाव आजपासून नष्ट झाला असें उघड रितीनें जाहीर झालें. संस्थानाचे गव्हर्नर (सुभेदार) पिकेन्स यानें 'दक्षिणकॅरोलिना हें एक स्वतंत्र राज्यसत्तेचें अगदीं स्वतंत्र संस्थान असून त्याचा आतां कोणत्याही संस्थानाशीं मुळींच संबंध नाहीं' असा एक जाहिरनामा काढिला. चार्लस्टन् हें बंडाचें मुख्य स्थान असून तेथील नागरिक लोकांस वरील कृत्यामुळें इतका आनंद झाला कीं ते वेड्यासारखे इकडे तिकडे नाचूं लागले आणि फार दिवसापासून घाटत असलेली गोष्ट मनाप्रमाणें घडल्या मुळें आनंदाचे भरांत कित्येकांनीं तर मेजवान्या व मोठमोठे उत्सवही केले. ह्या लोकांनीं संयुक्त संस्थानाचा अतिशय तिरस्कार केला व अमेरिकेचा झेंडा केवळ पोरकट असून त्यांत कांहींच अर्थ नाहीं अशी निर्भत्सना करू लागले इतकेंच नव्हें तर ह्या खुळया मंडळींनीं क्षणिक सुखास मोहित होऊन अमेरिकेच्या झेंडयाचें कापड जमिनींवर हांथरून त्यावर नाचण्यास व बागडण्यासही कमी केलें नाहीं.

इ. स. १८६१ च्या फेब्रुवारीच्या ४ थ्या तारिखेस विभक्त झालेल्या संस्थानांतील प्रतिनिधि अल्बामा प्रांतांतील मॉंट्गॉ-

मरी येथें एकत्र जमले आणि तेथील लोकांनीं ह्या संस्थानांचें एक जूट तयार करून मिसिसिपीचा डेव्हिस्‌जेफरसन् यास काम चलाउ अध्यक्ष नेमून जॉर्जिया येथील अलेक्झांडर एच. स्टिफन यास उपाध्यक्ष नेमिलें. कांहीं दिवसापूर्वी अब्राहाम संयुक्त संस्थानाच्या सैन्यांत होता त्यावेळीं हाच डेविस, ब्लॅक्‌हॉक्‌च्या युद्धांत अमलदार होता. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाच्या ( रिपब्लिकन् ) खर्चानें डेविस् यास वेस्टपॉइंट येथें लष्करी शिक्षण उत्तम मिळालें होतें. ह्या एक जूटरूपी मोठ्या यंत्रांतील सर्व पोटयंत्रांची चांगलीच जुळवाजुळव झाली असून राज्यांतील वेगळ्या वेगळ्या शाखेसाठीं एक स्वतंत्र चिटनिसाची योजना झाल्यानंतर प्रथम डेविस् यानें सर्व पुढाकार पत्करून वरील यंत्ररचनेस गति दिली.

वरील राज्यक्रांति सूचक घाट मोठ्या गंभीरपणानें लक्षांत आणून अब्राहाम हा वाशिंग्टन् येथें जाण्याची तयारी होईपर्यंत स्प्रिंगफिल्ड येथें आपल्या घरीं काळजी करीत बसला होता. लोकसत्ताक स्वतंत्र संस्थानांचा ( रिपब्लिकन् ) नाश करूं पाहत असलेल्या राजद्रोही बंडखोरांवर एकाएकीं हात उचलण्यास तो समर्थ नव्हता, कारण कीं जरी त्याला संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष ह्मणत होते तरीपण ' मी इतरांप्रमाणें एक नागरिकच आहे ' असें तो समजत होता; लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील

राजनिष्ठ लोक राष्ट्रीय राज्याची नौका चालविण्यास एखादा हुशार नावीक पाहिजे असें मनांत आणून ईश्वराची आराधना करीत होते आणि अध्यक्ष या नात्यानें अब्राहामलिंकन हा स्थानापन्न होण्याची वाट पाहत होते. अब्राहामलिंकन हा सहनशील वृत्ति व क्षमा धारण करून आणि जो कोणी भेटेल त्यास चांगला धीर देऊन संकट निवारणार्थ मोठ्या औदार्यानें जें भाषण तो पुढें करणार त्याची मनांत जुळवाजुळव करीत स्वस्थ बसला होता. इकडे विरुद्ध बाजूस जेफरसनडेव्हिस् हा गुलामगिरीच्या पुढाऱ्यांस वैर साधण्यासाठीं उत्तेजन देतच होता आणि जेव्हां तो माँटगॉमरी येथें स्थानापन्न होण्यासाठीं जावयास निघाला त्यावेळीं तो ह्मणाला कीं ' जेथून पुढें सरकण्यास सोपा मार्ग मिळेल अशा ठिकाणींच आपल्यास युद्धास प्रारंभ केला पाहिजे.' वरील उभय पक्षांपैकीं एका पक्षांत सहनशीलता, औदार्य, व स्वधर्माभिमान आणि क्षमा इतके गुण जागृत होते आणि दुसऱ्या पक्षांत, द्वेष, आत्मस्तुति आणि जुलूम करणें इतके अवगूण वास्तव्य करीत होते.

दक्षिणेंतलि सर्वच वजनदार लोक वरील विघ्नसंतोषी लोकांच्या कृष्णकारस्थानास अनुकूल नव्हते. दक्षिणेंतील कांहीं कांहीं ठळक सज्जन मंडळी युनाइटेडस्टेटस्च्या जुटींतून अलग होऊं इच्छिणारांचीं कृत्यें निवळ मूर्खपणाचीं आहेत असें

समजत होते; तेथील वजनदार लोकांपैकीं एक अलेक्झांडर एच. स्टिफन यानें संघशक्तींतून अलग होण्याचे ठरावाचे संबंधांत स्वतःच्या संस्थानांतील सभेस दोन गोष्टी सांगून त्यांचीं मनें वळविण्याच्या स्तुत्य प्रयत्नास प्रारंभ केला. अलेक्झांडर. एच. स्टिफन हा अब्राहाम यास उत्तम रितीनें ओळखून होता इतकेंच नव्हें तर त्याचें औदार्य, न्यायदृष्टि आणि कडकडीत स्वदेशाभिमान या सर्वाबद्दल त्याला चांगलीच माहिती होती. स्वतःच्या संस्थानांतील सभेस दोन गोष्टी सांगतांना स्टिफन् म्हणाला " माझ्या मित्रांनो ! या क्षणिक सुखास भुलू नका. थांबा ! मी पुन्हा हात जोडून विनंति करितों. चित्त स्थीर करा; या तुमच्या दुष्ट कृत्याचे संबंधांत जेणेंकरून तुमचेंच समाधान होईल असें तुम्ही काय उत्तर द्याल याचा पूर्ण विचार करा; तुम्हांवर ओढवणाऱ्या महत्संकटांत तुमच्या सारख्या समदुःखी मंडळीस खरोखरच दुःसह यातना भोगाव्या लागतील, त्यांचें तुम्ही कसें सांत्वन कराल ! या भूमंडळावरील सर्व राष्ट्रांस तुम्ही न्यायदृष्टीनें काय जबाब द्याल याचा, माझ्या मित्रांनो ! विचार करा, विचार करा ! गुलाम बाळगण्याचे संबंधांत दक्षिणेकडील लोक युद्धास सिद्ध होतील व त्यांच्यावर लष्करी कायद्याचा अंमल होऊन सर्व गुलाम मोकळे होतील व यामुळें तुमची सर्वस्वीं हानी होईल "

अर्ध्या राज्यांत गुलामगिरी आणि अर्ध्या राज्यांत स्वातंत्र्य

असें कधींही सतत निभावयाचें नाहीं, हें अब्राहाम याचें मूळ-पासूनच म्हणणें होतें; दक्षिणेकडील लोकांनीं बंडाचा व्यूह रचून एक मोठें युद्ध चालविण्याचा विचार केला होता आणि हल्लीं त्यांच्या भावी अध्यक्षानें तर असें कळविलें कीं 'हें युद्ध चालविल्यानें परिणामीं सर्व गुलामांची सुटका होण्याचा संभव खचित दिसत आहे.' स्टिफन् यानेंही 'अब्राहाम याचेंच भविष्य खरें होण्याचा जास्त संभव दिसतो' असें चोख कळविलें. अब्राहाम यानें तर या घोर युद्धाचा शेवट म्हणजे सर्व गुलामांची सुटका, असें खास जाणलें होतें परंतु या युद्धामुळें लौकर गुलाम सुटतील असें मनांत आणून त्यानें त्वरेनें कांहींएक कृत्य न करितां राज्यकारभाराच्या व कायद्याच्या उचित मार्गास अनुसरूनच आपली वागणूक ठेविली होती व या सर्व ढवळा ढवळीकडे पाठ करून तो स्वस्थ बसला होता. संयुक्त संस्थानांतील संघशक्तीचें रक्षण व्हावें हाच त्याचा दृढ निश्चय होता. 'गुलामगिरी जेथें मूळ पासूनच चालू असेल तेथें ती खुशाल चालो, मला त्याची पर्वा नाहीं व मी तिकडे बघणारही नाहीं; परंतु परिणामीं ती दक्षिणचे लोकांकडूनच रसातळास जाईल.' या प्रमाणें त्याचे उद्गार होते.

कित्येक हितचिंतक मंडळी, उत्तरेकडील कांहीं लोकांचें मनांत जें शत्रुत्व उत्पन्न झालें होतें तें नाहींसें करण्यासाठीं एक

सारखा प्रयत्न करीत होते. संयुक्त संस्थानांतील सैन्यास युद्ध सामुग्रीचा पुरवठा करण्यासाठीं चार्लस्टन् बंदरांत असलेल्या आगबोटीवर बंडखोर लोकांनीं एकदम तोफेचा भडिमार चालविला. अशा रितीनें दक्षिणेकडील लोकांच्या बंडाचें उग्ररूप दिवसानुदिवस बळावत चाललें होतें, व यामुळें उत्तरेकडील संस्थानांतील लोकांचा कोपाग्नि विशेष भडकत चालला. या उपस्थित झालेल्या युद्धाचें निवारण करण्यासाठीं वॉशिंग्टन् येथें एक ' पीस काँग्रेस ' ( शांतता परिषद् ) भरविली. दक्षिणेंत बंडाचा अग्नी धुपसत असून हळी त्यानें चहूंकडे पेट घेतलाच होता व तो विझविण्यासाठीं न्यूयॉर्क आणि इतर स्वतंत्र संस्थानांतील मोठमोठाल्या शहरांत सभा भरवून लोक प्रयत्न करीतच होते. ' अमुक एक भागांत स्वातंत्र्याचें चांगलें बिजारोपण झालें ' हें मात्र दक्षिणेकडील लोक अगदीं विसरले होते.

गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांशीं युद्ध होण्याचा रंग दिसल्यामुळें दक्षिणेकडील लोकांचा ज्याज्या ठिकाणीं व्यापार व उद्योग चालू होता तेथें सुद्धां मोठी भीति उत्पन्न झाली होती. उत्तरेकडील संस्थानांतून दक्षिणेकडे कापसाचा पुरवठा चांगला होत होता आणि दक्षिणेंत पुष्कळ माल उत्पन्न होत नसल्यानें त्यांचें जीवन उत्तरेकडील संस्थानावर अवलंबून होतें. अशा कारणामुळें उत्तरेकडील लोकांची दक्षिणेकडील संस्थानाशीं तह करण्याची उत्कटेच्छा असणें अगदीं स्वाभाविक होय, कारण

तसें न केलें तर गिऱ्हाइकीपासून होणाऱ्या नफ्याचे त्यांस बरेंच नुकसान होणार होतें. दक्षिणेकडील लोकांशीं तह करणें म्हणजे गुलामगिरी जी अव्याहत चालत आली आहे ती तशीच चालू राहूं देणें हें होय. उत्तरेकडील संस्थानांतील लोकांस ही गोष्ट सर्वथैव मान्य होणें अगदीं दुरापास्त होतें हें आजपर्यंतच्या इतिहासावरून वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. यामुळें शेवटीं आपसांतलें युद्ध ( सिव्हिलवॉर )होण्याची वेळ येऊन ठेपली.

---



# प्रकरण १७ वें.

## प्रयाणकाळीं अध्यक्षाची स्थिति; वाटेनें जातांना ठिकठिकाणीं त्याचा सत्कार; अध्यक्षास ठार मारण्याचें कृष्णकारस्थान फसलें वॉशिंग्टन् राजधानींत प्रवेश.



इ. स. १८६१ च्या फेब्रुवारी महिन्याच्या ११ व्या तारीखेस आपल्या घरची मंडळी व कांहीं खास स्नेहीमंडळी बरोबर घेऊन व स्प्रिंगफिल्ड येथील आपलें सुखाचें घर सोडून अब्राहम हा राष्ट्रीय राजधानीस जाण्यास निघाला. भावी संकटासंबंधी त्यानें काय काय कल्पना केल्या असतील, स्वतःवर, स्वतःच्या देशावर आणि घरच्या माणसांवर पुढें ओढवणाऱ्या संकटासंबंधी त्याच्या मनांत कोणकोणते त्रासदायक विचार घोळत असतील ते त्याचे त्यालाच माहीत; त्यांची कोणासच कल्पना होणें संभवनीय नाहीं; राष्ट्रीय राजधानीस जात असतांना इलिनॉइस् येथील आपल्या नेहमींच्या परिचयांतलीं सर्व ठिकाणें त्याला अनायासेंच दिसत होतीं आणि त्यामुळें वरील त्रासदायक विचारांनीं त्याचें डोकें अगदीं भणभणून गेलें होतें. खुनाच्या दहशतीची गुणगुण प्रथम

पासूनच चहुंकडे पसरली होती आणि अब्राहाम यास वॉशिंग्टन् येथें जिवंत पोहोचूं द्यावयाचा नाहीं असा संयुक्त संस्थानाच्या विरुद्ध मंडळीस मिथ्याभिमान होता. कांहींही असो परंतु आतां लौकरच युद्धास प्रारंभ होईल असें प्रत्येकास वाटून सर्वांचीं धार्वीं दणाणून गेलीं होतीं; आणि ज्यांना केवळ परमेश्वरावर हवाला टाकून राष्ट्रीय कामकाज करावयाचें होतें त्यांनीं मोठ्या चिंताग्रस्त स्थितींत आपल्या गांवकरी स्नेही मंडळीस अखेरचा सलाम ठोकला. जणूंकाय पुढील सर्व भविष्य त्याला आतांपासून कळलें असावें असें अब्राहाम याच्या एकंदर स्थितीवरून आणि वर्तनावरून स्पष्ट व्यक्त होत होतें; 'आतां हा माझा देश मी पुनः पाहीन असें मला वाटत नाहीं' असें जेव्हां त्याच्या मनांत आलें तेव्हां त्याचा कंठ दाटून येऊन डोळे भरून आले व सर्वांगावर रोमांच उभे राहून त्याचे अंगांस घाम सुटूं लागला. आगगाडीच्या स्टेशनावर सर्व गांवकरी मंडळी त्याला पोहोंचविण्यास आली होती त्यावेळीं त्यानें स्वधर्मास आणि परमेश्वरास एकनिष्ठेनें स्मरून स्नेही-मंडळींशीं व आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्याशीं अत्यंत प्रेमळ व हृदयद्रावक भाषण केलें तें येणें प्रमाणें:—'माझ्या मित्रांनो ! माझे वियोगदुःख कोणीही जाणण्यास समर्थ नाहीं. ज्या मंडळीचें कोमल अंतःकरण माझ्याबद्दल दयार्द्र असून कळवळत आहे त्या सर्व स्नेहीमंडळीचा आणि या मातृभूमीचा मी अत्यंत ऋणी आहे. येथें मी माझ्या आयुष्याचीं २५ वर्षें काढिलीं आणि लहा-

नाचा मोठा व अशक्तचा सशक्तही येथेंच झालों. वाशिंग्टन संबंधी जें माझें कर्तव्य आहे त्याही पेक्षां महत्कार्यभार मस्तकावर सहन करून मी येथें केव्हां परत येईन अगर येईन किंवा नाहीं हें या प्रयाणकालीं माझ्याच्यानें निश्चयात्मक सांगवत नाहीं. सच्चिदांनद परमात्मा स्थिरचर व्यापक असून त्याचेच आज्ञेनें या अवाढव्य सृष्टींतील सर्व कार्यें घडत आहेत. त्याला अगणित डोळे व हातपाय आहेत व अशा प्रभूची मी एकनिष्ठेनें अव्याहत सेवा केली आहे; त्याच्या कृपाप्रसादाशिवाय मी यशस्वी होणार नाहीं. त्याच्यावर एकनिष्ठेनें श्रद्धा असली ह्मणजे तो सदैव आपल्या पाठीशींच कंबर बांधून उभा असतो; तो भूमि, पाणी, तेज वगैरे सर्व स्थावरजंगमवस्तूंत व्याप्त होऊन उरला आहे व अशी त्याची व्याप्ति असल्यामुळें त्याच्या कृपेनें सर्व कांहीं चांगलेंच होईल. त्याच्यावर सर्व भार ठेऊन तुमचें अभिष्टचिंतन मी ज्या प्रमाणें करितों त्याचप्रमाणें तुह्मी सर्व त्या दीनवत्सल प्रभूचरणीं लीन होऊन अहोरात्र माझ्याविषयीं अभिष्टचिंतन करालच अशी माझी संपूर्ण खातरी आहे. उत्तरोत्तर प्रेमाची वृद्धी असावी येवढें तुमच्याजवळ मागणें मागून मी आतां तुमची परवानगी घेतों.'

अब्राहाम याचे वरील हृदयद्रावक उद्गार ऐकून सर्व स्नेहीमंडळींचीं अंतःकरणें अतिशय कळवळलीं व हृदयभरून येऊन दुःखाचा वेग आवरेनासा झाला तेव्हां त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा

वाहू लागल्या; वरील दुःखोद्गार सर्वत्रांच्या हृदयमंदिरांतून आजन्म नाहींसे झाले नाहींत.

इलिनाईसहून राष्ट्रीय राजधानीकडे जातांना वाटेंत, इंदियाना, ओहिओ, न्यूयॉर्क, न्यूजर्सी, पेन्सिल्वॅनिया, आणि मेरिलँड, इतकीं संस्थानें त्याला लागलीं; त्याला वाटेनें जीं जीं आगगाडीचीं स्टेशनें लागलीं त्या त्या प्रत्येक स्टेशनावर, अब्राहाम यास मोठ्या कौतुकानें एकदां तरी पाहून आपल्या डोळ्याचें पारणें फेडावें असें प्रत्येकास वाटून उत्साही लोकांची अतिशय गर्दी होत असे. पुष्कळ लोक त्याला जाहीर भाषणें करण्यासंबंधीं विनंति करीत, पण वर कळविलेल्या कारणांस्तव त्यानें कोठेंही जाहिर भाषण केलें नाहीं. अब्राहाम हा प्रसिद्ध वक्ता असून आतां जाहिर भाषण करण्यास पहिल्याप्रमाणें कां उत्सुक दिसत नाहीं याचें लोकांस मोठें आश्चर्य वाटत असे. इंदियानापॉलीस् येथें तर लोकांनीं त्याला मोठा सन्मान देऊन त्याचें फार गौरव केलें, त्यामुळें अगदीं नाइलाज होऊन त्याला आपल्या मौन व्रताचा भंग करणें भाग पडून 'हल्ला करणें' व 'बलात्कार' या संबंधांत तो दोन शब्द बोलला, कारण त्या समयीं प्रत्येकाच्या तोंडीं हेच शब्द होते. दक्षिणेकडील लोक व त्यांचे उत्तरेकडील स्नेही यांना अशी सूचना होती कीं संयुक्त संस्थानांतील सत्ताधीश आपल्या राजसत्तेच्या संरक्षणार्थ संयुक्त संस्थानाचा त्याग

करून गेलेल्या लोकांवर स्वारी करतील. बुशनन अध्यक्षाच्या कायदेशीर सल्लागारांनीं असें स्पष्ट जाहीर केलें होतेंकीं, संयुक्त संस्थानाच्या सत्ताधीशास कायदेशीर रितीनें आणि राज्यव्यवस्थेच्या स्वरूपाला अनुसरून संयुक्त संस्थानास सोडून जाण्याची ज्याची इच्छा असेल त्याजवर बलात्कार करितां येणार नाहीं. 'बलात्कार करणें' आणि 'स्वारी करणें' हीं दोन्हीं कृत्यें राज्यव्यवस्थेच्या धोरणाविरुद्ध, राजद्रोही, आणि ईश्वराच्या आज्ञेविरुद्ध होत, असें दृढनिश्चयानें वागणारे लोक ह्मणत होते. अब्राहाम हा ह्मणाला "तर मग बलात्कार करणें ह्मणजे काय? स्वारी करणें ह्मणजे काय? दक्षिण कॅरोलिना येथील लोकांच्या संमती शिवाय त्यांवर लष्करानें चाल केली तर ह्या कृत्यास स्वारी करणें ह्मणतां येईल काय? त्याला स्वारी करणें ह्मणतां येईल, पण जर संयुक्त संस्थानांतील लोकांनीं स्वतःचेच गेलेले किल्ले परत ताब्यांत घेतले आणि देशांतून येणाऱ्या मालावरील जकात गोळा केली तर ह्या गोष्टीस स्वारीकरणें ह्मणतां येईल किंवा बलात्कार ह्मणतां येईल? एकंदर राष्ट्रांतील जमीन व लोकवस्ती या पैकीं $\frac{1}{5}$ भाग सुद्धां ज्या संस्थानांत नाहीं तें संस्थान, राष्ट्राचा मोड आणि लोकांवर बलात्कार कोणत्या न्यायाच्या तत्वाला अनुसरून करूं शकेल?"

वरील हकीकतीवरून अब्राहाम यानें आपल्या भाषणांत निर्णयात्मक असें कांहींच प्रतिपादन केलें नसून प्रश्नांचा निर्ण-

य करण्याचें काम त्यानें लोकावरच सोपलें असें उघड दिसत होतें. लोकांपुढें हकिकत मांडण्याची ही एक त्याची मोठी आवडती रीत होती. कांहीं महत्वाचे प्रश्न विचारून व त्यातील मुख्य मुद्दा स्पष्ट कळवून त्याचा निर्णय लोकांकडून करविणें हें त्याला फार पसंत पडत असे. एके समयीं अब्राहाम यास सर्व लोकांनीं एकत्र जमून एक व्याख्यान देण्याबद्दल अतिशय आग्रह केला. अब्राहाम याचा स्वभाव फार भिडस्त असून कोणाचें मनाचा विरस करणें त्याला अगदीं आवडत नसे; त्यामुळें एक साध्या पद्धतीचें व्याख्यान देण्याचें कबूल करून इंदियाना प्रांतांतील लॉरेन्सबर्ग येथें त्यानें थोडक्यांत भाषण केलें. त्यांतील तात्पर्य खालीं लिहिल्या प्रमाणें होतें':–अध्यक्ष या नात्यानें मी तुमच्याशीं मूर्खपणाचें अगर दुष्टपणाचें वर्तन करूं लागलों परंतु तुम्ही आपला न्यायमार्ग न सोडतां कर्तव्यपराङ्मुख झाला नाहींत तर तुम्हीं कधींही फसणार नाहींत असें मी प्रतिज्ञेनें सांगतो. माझी सत्ता पाण्याच्या बुडबुड्या प्रमाणें अगर मृगजळा प्रमाणें अशाश्वत आहे परंतु स्वातंत्र्याच्या तत्वाप्रमाणें तुमची सत्ता मात्र शाश्वत व अचलच आहे. असें निश्चयात्मक समजावें.'

ओहिओचें मुख्य शहर सिनसिनाटी येथील लोक तर उत्साहानें जणूं काय शुद्ध वेडेच बनले होते. पश्चिमेकडील या

मोठ्या शहरांत अशी अपूर्व शोभा कधीं कोणी पाहिलीच नव्हती. शहरांतील मोठमोठे रस्ते, पेठा, गल्ल्या वगैरे सर्व ठिकाणीं मुख्य मुख्य इमारती शृंगारल्या होत्या. जिकडे तिकडे मुंग्यां प्रमाणें माणसें हिंडत फिरत होतीं. रात्रीच्या वेळीं सर्व शहरभर रोषनाई केली असून ठिकठिकाणीं भव्य कमानी उभारल्या होत्या. कमानीवर 'स्वागतं' 'स्वातंत्र्याचा विजय' अशीं अक्षरें लिहिलीं असून सर्व ठिकाणीं उत्सव चालू होते. अशा संधीस अब्राहाम यानें थोडक्यांत एक चटकदार भाषण केलें व नंतर तो केंटकीच्या सरहद्दीवर गेला. केंटकी येथें त्यानें आपल्या जुन्या स्नेहीमंडळीस चांगला उपदेश केला. तेथील पुष्कळ लोक त्या संस्थानास संयुक्तसंस्थानांतून सोडविण्याच्या खटपटींत होते. या प्रमाणें मोठ्या उत्साहानें व शांतपणानें स्वातंत्र्याचें स्फुरण लोकांचें अंगांत जागृत ठेऊन अब्राहाम लिंकन हा आपल्या पुढील उद्योगाच्या स्थळीं सुखरूप येऊन पाहाचला.

वाटेंत जेथें जेथें तो थोडावेळ थांबत होता तेथें तेथें लोक त्याचें मोठ्या प्रेमानें स्वागत करीत होते आणि त्यामुळें त्याला आनंद वाटून तो प्रत्येकाला धीर देत असे. त्यानें धारिलें असतें तर तो तावडतोब वॉशिंग्टन् येथें जाऊन पोहोंचता, परंतु घाई करणें व मनांतले विचार प्रगट करून व्यर्थ दंभ माजविणें त्याला बरें वाटत नव्हतें; शिवाय ज्या मंडळीवर त्याचा

पूर्ण विश्वास होता व ज्यांच्या स्वदेशाभिमाना बद्दल त्याची संपूर्ण खातरी होती, अशा सरळ मार्गानें चालणाऱ्या लोकांशी दोन उत्तेजनाचे शब्द बोलून व त्यांना धीर देऊन नंतर पुढें जावें असा त्याचा मानस होता. कारण 'मी आतां पुनः या लोकांस भेटण्यास येणार नाहीं ' अशा बद्दल इतरांपेक्षां त्याचे स्वतःचेंच मन त्यास जास्त साक्ष देत होतें. या प्रमाणें पिटर्स बर्ग येथेंही त्याचें अति उत्तम व अत्यन्त प्रेमपुरस्सर स्वागत झालें असून त्यावेळीं नागरिक लोकांनीं भिन्नभाव मुळींच मनांत धरिला नव्हता. अब्राहाम म्हणाला ' जर आतां आपसांतली दुही कायम राहिली तर संयुक्तसंस्थानाच्या संघशक्तिरूप नौकेस भयंकर तुफानांतून कोण वांचवील? याचा विचार करा.' लाँगफेलो यानें नौका बांधणें या विषयावर केलेल्या कवितेचें अब्राहाम यास यावेळीं स्मरण झालें व तो हमेश ती कविता प्रसंगानुरूप म्हणत असे. त्या कवितेंतील मतलब असा होता कीं,'-हे संयुक्त संस्थानाच्या लढाऊ गलबता! तूं खुशाल पाण्यांतून जा. हे संघशक्तिदेवी! तूं आपल्या संपूर्ण सामर्थ्यानें या लढाउ गलबतांत सदैव वास्तव्य कर, म्हणजे तें कधींही व कोणत्याही तुफानांत सांपडणार नाहीं. हे अनुकंपार्द्रहृदये माते! भूतदया ही अगदीं पंगू आहे, कारण तिच्या भावी उत्कर्षाचें सर्व सुकाणूं केवळ तुझ्या हातांत आहे.'

नॉर्थईस्ट स्टेशनानजीक एक मोठा गमतीचा प्रकार घडला तो असा कीं,:–इलाख्यासाठीं नेमणूक होईपावेतो अब्राहाम हा दाढी मिशा काढवून चेहेरा स्वच्छ ठेवित असे. त्याची मान लांब असून गाल काळसर व खोलगट दिसत होते; उंचमान व खोलगट गाल अशा स्थितींत कल्ले ठेविले तर चांगलें शोभतील असे मनांत योजून स्टेशनावर एका तरूण मुलीनें अब्राहाम यास कल्ले ठेवण्या विषयीं एक पत्र लिहून तें त्याचे हातांत जाईल अशी तजवीज केली. अब्राहाम यानें तें पत्र आपल्या प्रिय पत्नीस दाखवून तिचें अनुमोदन घेतलें व त्या प्रमाणें कल्ले ठेविले. 'ती मुलगी समाजांत हाजर असलीतर आपण तिच्याशीं मोठ्या कौतुकानें दोन शब्द बोलूं' असें त्यानें सुचवितांच ती त्या गर्दींतून अब्राहाम याजपुढें येऊन उभी राहीली. त्या वेळीं तिचें मुख प्रफुल्लित दिसत असून चेहेऱ्यावर तारुण्याचें तेज चमकत होतें. अब्राहाम यानें तिजकडे पाहतांच तिनें लाजून खालीं मान घातली. अब्राहाम यानें तिचा मोठासत्कार व गौरव करून मोठ्या आनंदानें तो तिच्याशीं दोन शब्द बोलला व नंतर तो पुढे चालता झाला.

न्यूयॉर्क शहराची राजधानी आल्बनी येथें अब्राहाम-लिंकन येऊन पोहोंचतांच हजारों लोकांनीं त्याचे नांवाचा जय जयकार केला. नामदार इ. डी. मॉर्गन् हा त्यावेळीं संस्थानाचा

गव्हर्नर ( सुभेदार ) असून त्यानें अब्राहाम यास मोठ्या आदरानें आमंत्रण केलें होतें; कांहीं दिवसा नंतर सर्व राज्याचा मुख्य गव्हर्नर हाच झाला असून सर्व युद्धाचें अधिपत्यही याचेकडे होतें. त्याचा स्वभाव मोठा उदार असून तो स्वदेशाभिमानी होता. तेथील राजवाड्याच्या एका भव्य दिवाणखान्यांत अब्राहाम यानें अगदीं साध्या रितीनें उत्तम भाषण केलें. श्रोतृसमाजांत राष्ट्रांतील मोठमोठी नामांकित मंडळी असल्यामुळें त्याला व्याख्यान देतांना फार संकोच वाटला. त्यावेळीं तो ह्मणाला:—‘ संयुक्त संस्थानाचे आजपर्यंत जे जे अध्यक्ष होऊन गेले त्यांचे पेक्षां माझी योग्यता अतिशयच कमी आहे. सूर्यापुढें काजव्याचें तेज जसें निरर्थक, तद्वत् त्यांचे तेजापुढें माझें तेज होय, परंतु त्यांचेपेक्षां मात्र महत्कार्यभार मला उचलावयाचा आहे.’ या नंतर सध्यां जी त्याला काळजी लागली होती त्याबद्दल व यापुढें काय करावयाचें त्यासंबंधी तो ह्मणाला:–‘ मी अधिकारारूढ झालों ह्मणजे मला आपल्या कामांत सर्व गोष्टींचें यथार्थ ज्ञान व्हावें व त्या ज्ञानाचा सदुपयोग व्हावा, या साठीं मी प्रत्येक गोष्ट नीटपणें पाहावी आणि ऐकावी हें अगत्याचें होय.’ अब्राहाम यानें आजन्म हेंच व्रत कायम ठेविलें होतं, व कोणतेंही कामांत तो घाई करित नसे.

न्यूयॉर्क शहरांत अब्राहाम याचा उत्तम सत्कार झाला. व त्यामुळें त्याला मोठा आनंद झाला. जे महात्मे आहेत

त्यांना सन्मान मिळाला ह्मणजे विपुल द्रव्य प्राप्तिच झाली असें वाटतें. या लोकसत्ताकस्वतंत्रराज्याच्या मुख्य राजधानींत पूर्वीं एकदां त्याचें आगमन झालें होतेंच परंतु हल्लीं तो वेगळ्या रितीनें आला होता; त्यावेळच्या आणि हल्लींच्या स्थितींत महदंतर दिसत होतें. पूर्वीं तो आला होता तेव्हां अगदींच अपरिचित असून 'कूपरयुनियन' येथें जें त्यानें प्रथम व्याख्यान दिलें त्यामुळें त्याची पूर्वेकडील संस्थानांत सर्व ठिकाणीं प्रसिद्धी झाली होती. हल्लीं तो राष्ट्रांत लोकमान्य ठरून स्वतंत्र राज्यांतील एक न्यायाधीश अथवा मोठा सत्ताधीश होऊन आला होता. त्यावेळीं फरनेंडोवुड हा तेथील मेयॉर (न्यायाधीश) असून ऍन्टवर्प व इतर संस्थानें जशीं स्वतंत्र होतीं तसेंच न्यूयॉर्क संस्थानाच्या स्वातंत्र्यासंबंधी तो मोठा अभिमानी होता. न्यूयॉर्क हें संस्थान संयुक्त संस्थानाचें मोठें बंदर असून मुख्य शहर आहे आणि या संस्थानांत युद्धप्रसंग झाला तर भयंकर हानि होण्याचा संभव आहे ह्मणून येथें नेहमीं शांतता असावी असें मी. वुड यानें प्रतिपादन केलें. संयुक्त संस्थानांविषयीं आपली पूज्यबुद्धि पुनः व्यक्त करून अब्राहाम यानें मोठ्या शहाणपणानें त्याचें असें उत्तर दिलें कीं "संयुक्त संस्थानांच्या बळावर आज बरींच संस्थानें भरभराटीच्या स्थितीस येऊन पोंहचलीं आहेत, करितां संयुक्त संस्थानाच्या अफाट वृक्षाचीं मुळें न्यूयॉर्क सारख्या अफाट संस्थानाच्या स्वतंत्र भूमींत फार खोल जाणें अत्यावश्य आहे" शि-

पाय तो ह्मणाला " जसें एखादें गलबत बारदानानें भरलें असून तें भयंकर तुफानांत सांपडलें आहे, व हें गलबत, त्यांतील बारदान व उतारू लोकांसह होतां होईल तों वाचविणें हें मुख्य कर्तव्य आहे परंतु गलबत वांचविण्याची अगदीं आशा सुटली तरी निदान त्यांतील बारदान व उतारू लोकांस किनाऱ्यावर नेऊन सोडिलेंच पाहिजे असें मी समजतों, तसें संयुक्त संस्थानांतील लोकांच्या स्वातंत्र्याचें संरक्षण करणें हें माझें मुख्य कर्तव्य कर्म असून तें चिरकाल शाश्वत राहण्यासाठीं जेवढें सामर्थ्य मला परमेश्वरानें दिलें आहे तेवढें सर्व अशा सत्कार्यांत खर्च केल्यावांचून मला कधींही चैन पडावयाचें नाहीं हें खास समजावें. "

अब्राहाम यानें वॉशिंग्टन् याचें चरित्र वाचून त्यांतून त्याच्या आचरणाचें फारच सूक्ष्मरितीनें मनन केलें होतें त्याला अनुसरून तो ह्मणाला:—

" पाया शुद्ध आणि उदात्त नीतीचें वर्तन, समरांगणांत कर्णासारखें शौर्य, स्वदेशाभिमानाचें सदैव जागृत स्फुरण, धाडसी स्वभाव आणि सर्वोत्तम ऐक्य इतक्या सदगुणांचे पूर्वीच्या शूर-महात्म्यांनीं जणु काय कल्प वृक्षच लाऊन ठेवले होते; परंतु हे कृपासिंधो ! ते सर्व वृक्ष हल्लीं कोठें आहेत ? ते तर समुळ नाहिसे झालेले दिसतात. लहानपणीं मला चिरस्मृत वॉशिंग्टन्‌चें

चरित्राचें पुस्तक मिळालें असून त्याचें उत्तम रितीनें मी अध्ययन केलें होतें; देशाच्या स्वातंत्र्यासाठीं जिवावर उदार होऊन हातांत शिरकमलें घेऊन शूरवीर ज्या समरांगणांत लढले त्यासमरांगणाचें हृदयद्रावक वर्णन त्या पुस्तकांत मी वाचलें; राज्यक्रांतीसंबंधी त्या पुस्तकांत जी हकीकत मी वाचली त्यांत ट्रेंटन येथील रणवार्ता वाचून तर माझ्या हृदयांत जे स्फुरण उत्पन्न झालें तें अद्याप पावेतों जागृत आहे. सामाजिक ऐक्य, राज्य कारभाराचें स्वरूप आणि लोकांचें स्वातंत्र्यसौख्य चिरकाल अचल राहावें अशी माझी उत्कटेच्छा आहे व मजसारख्या पामरास पुढें करून तो कृपासागर स्वातंत्र्याचा कायमचा जयध्वज सत्वर उभारील अशी माझी संपूर्ण खातरी आहे."

वॉशिंगटन् शहराकडे जात असतांना वाटेंत नवीन अध्यक्षास ठार मारण्याच्या संबंधांत कृष्ण कारस्थान झाल्याबद्दल नानाप्रकारच्या कंड्या सर्व ठिकाणीं पसरल्या; त्याच प्रमाणें लोकांस अनेक प्रकारचे संशयही उत्पन्न झाले. असल्या कंड्याकडे अब्राहाम याचें मुळींच लक्ष नसे किंबहुना त्याचे गांवींही ती गोष्ट नव्हती. आपली ज्या जागीं नेमणूक झाली ती जागा मोठ्या महत्वाची आहे आणि त्यामुळें आपली किंमत व मोठेपणा वाढला असें त्याला कधींही वाटलें नाहीं. पुढें जरी त्यास मोठा अधिकार मिळाला होता तरी तो गर्वानें कधींही फुगला नाहीं.

ही प्रवासी मंडळी हळू हळू जॉर्जिया जवळ येत चालली होती. दक्षिणेकडे व्हर्जिनिआ हें संस्थान बंडांत सामील असून उत्तरेकडील मेरिलँड संस्थानांतील लोकही राजद्रोही व दंगखोर झाले होतेच. संगनमताच्या व कारस्थानाच्या कुजबुजी विशेष स्पष्ट रितीनें ज्याचे त्याचे कानावर येऊ लागल्या असून ह्या संगनमताचें मुख्यस्थान बाल्टिमोर नांवाचें शहर होतें. बाल्टिमोर येथील लोकांनीं कालें करून संयुक्त संस्थानांत सामील असल्या बद्दल उघड रीतीनें प्रतिपादन केलें होतेंच, परंतु हल्लीं तर जिकडे तिकडे बंडाची ओरड एक सारखीं चालू होती. कांहींही असो परंतु बाल्टिमोर हें शहर बंडाचें खास आगर ठरून चुकलें होतें.

अब्राहामलिंकन हा बाल्टिमोर येथून जातांना दग्यानें त्यास ठार मारावें अशा बद्दल एक कृष्ण कारस्थान ठरून सर्व जुळवा जुळव झाली होती; आणि या संबंधांत कांहीं खास मंडळींनीं गुप्त हेर नेमून योग्य सुचनाही त्यांना दिल्या होत्या. अब्राहाम हा फिलाडेल्फिआ येथें येऊन पोंहचतांच त्याला वरील हकिकत सबळ पुराव्यानिशीं समजली. त्यावेळीं संयुक्त संस्थानाचा लष्करी अधिकारी जनरल विन फिल्डस्कॉट हा वॉशिंग्टन् येथें राहत असून त्याला गुप्त हेरांच्या द्वारें वरील कृष्ण कारस्थानाची बातमी समजली. न्यूयार्कचा सिनेटर सिवर्ड यास जनरल

स्कॉट यानें सामील करून घेऊन त्याच्याच साहायानें मी. फ्रेडरिक सिवर्ड नांवाचा एक अत्यंत विश्वासू दूत, अब्राहाम यास सावध करण्यासाठीं त्यानें फिलाडेलल्फिया येथें तावडतोब पाठविला. वॉशिंग्टन् येथें येतानां अब्राहाम याजवर ओढवणारें भयंकर संकट त्यास टाळतां यावें अशा रितीनें त्यानें सावध राहण्याबद्दल दूतास सुचना देऊन ठेविली होती. फिलाडेल्फिया येथें अब्राहाम यास दूतानें वरप्रमाणें वर्दी कळवितांच त्याची चित्तवृत्ति अस्वस्थ झाली. वाटेनें जातांना कोणी माझा खून करील किंवा कसें याबद्दल अद्याप त्याला थोडी शंका होती. विनाकारण माझा जीव घेऊ पाहणारा असा नीच दुष्ट व अधमाधम मनुष्य सांपडेल किंवा नाहीं हा विचार त्याचें मनांत घोळत होता. इंडिपेंडन्सहॉल ( स्वातंत्र्या संबंधीं प्रतिज्ञालेख झाला तो ) मध्यें फिलाडेल्फिया येथील नागरिक लोकांस भेटण्याचें त्यानें कबूल केलें होतें. फेब्रुवारी महिन्याच्या २२ व्या तारिखेस वॉशिंग्टन् याचा वाढदिवस असून त्याचे सन्मानार्थ इंडिपेंडन्सहॉलच्या इतिहासप्रसिद्ध इमारतीचे कळसावर जयध्वज उभारण्याचा समारंभ होणार होता आणि याच दिवाणखान्यांत स्वातंत्र्यासंबंधी प्रतिज्ञालेख तयार होऊन त्यावर सह्या झाल्या होत्या. पेन्सिल्व्हेनिया संस्थानाची राजधानी हॅरिसबर्ग येथें त्याच दिवशीं दोन प्रहरीं कायदे करणाऱ्या मंडळीस भेटण्यासाठीं अब्राहाम यानें आमंत्रण स्विकारलें होतें.

सल्लामसलती होऊन इतकी जरी कान उघाडणी झाली होती, तरी अब्राहाम यानें कळविलें कीं 'जरी कोणी मला ठार मारिलें तरीपण मी वरील दोन्ही ठिकाणीं कबूल केल्याप्रमाणें खास जाणार.' प्रथम ठरल्याप्रमाणें जयध्वज उभारण्याचा समारंभ होऊन गेला. अब्राहाम यास रितीप्रमाणें मोठ्या जनसमूहांत नेलें, आणि त्या समुहांत कृष्णकारस्थानांत सामील असलेले कांहीं लोक असल्याबद्दल खास संशय होता. येथें अब्राहाम यानें मोठ्या आनंदानें व भारदस्तपणानें व्याख्यान दिलें. ज्या ठिकाणीं स्वतंत्र्यासंबंधी प्रतिज्ञा लेख झाला होता त्या ठिकाणीं अब्राहाम यानें मोठ्या संतोषानें व शहाणपणानें वरील प्रतिज्ञालेखांत ठरल्याप्रमाणें या जगांतील सर्व लोकांच्या स्वातंत्र्याचें तत्व समाजांतील लोकांच्या मनांत आणखी एकदां चांगलेंच बिंबवून दिलें; आणि परावलंबनाचा मोठा बोजा खांद्यावर बाळगून बाळगून लोकांचे खांदे फार जड झाल्यानें त्यांना भारही दुःसह झाला होता तो योग्य वेळीं काढून टाकून लोकांचे खांदे मोकळे केले पाहिजेत अशाबद्दल अभय वचनांचा त्या प्रतिज्ञा लेखांत उल्लेख असल्याचेंही त्यानें स्पष्ट कळविलें. शेवटीं त्यानें प्रतिज्ञेवर असें निक्षून सांगितलें कीं 'जर हा देश परवशतेच्या प्रखर जाचांतून माझे हातून मुक्त न झाला तर त्याच्या आधीन होण्यापेक्षां मी खातरीनें सांगतों कीं जर कोणी मला याच ठिकाणीं ठार मारिलें तर

त्यांत मी मोठें समाधान मानीन.' त्या समाजांत बंडांत सामील असलेले जे कांहीं लोक होते त्यांनींच फक्त वरील भाषणांतील अनुसंधान ओळखून ते कांहींसे मनांत चरकले.

त्या नंतर इंडिपेंडन्सहॉलची बाहेरील जागा पाहत पाहत चित्रविचित्र रंगीत कापडांचा सुंदर जयध्वज कळसावर फडकत होता तिकडे अब्राहाम त्वरेनें गेला. या जयध्वजाकडे पाहून बरेच लोक आनंदानें जयघोष करीत होते, व कांहीं संस्थानांतील लोक या जयध्वजाकडे तिरस्कार व द्वेष बुद्धीनें अवलोकन करीत होते. जो महात्मा स्वातंत्र्या प्रीत्यर्थ मुठींत प्राण घेऊन उभा होता आणि ज्याचा निश्चय आजन्म ढळला नाहीं त्याच सत्पुरुषानें हा स्वातंत्र्याचा भव्य कीर्तिध्वज उभारला होता.

थोड्या अवधीनंतर अब्राहाम यानें हॅरिसबर्ग येथें कायदे करणाऱ्या मंडळींत भाषण केलें त्यांत वरील कीर्तिध्वजासंबंधी उल्लेख करितांना तो म्हणाला:—' आमच्या मित्र मंडळींनें देशासाठीं एक भव्य ध्वज तयार केला असून तो तेथें माझ्या हातून उभारविला व त्याच्या सन्मानार्थ त्यांहीं मोठा समारंभ केला. हा ध्वज जेव्हां मी उभारिला तेव्हां तो एका क्षणांत इमारतीच्या शिरखाजवळ गेला व मी स्वतःच्या बाहुबळानें तो उभा केला हें पाहून पाहून मला

अत्यानंद झाला. । प्रसादचिन्हानि पुरः फलानि । ह्मणजे कोण त्याही इष्ट कार्यांत यश यावयाचें असलें ह्मणजे त्या द्दल सुचिन्हें अगोदर पासूनच व्हावयास प्रारंभ होतो; या ह्मणी प्रमाणें कीर्तिध्वज उभारण्यांत कांहीं एक प्रत्यवाय न येतां तो वायूच्या आनंद लहरींत फडकू लागला. जयध्वज मी स्वतः तयार केला नसून सर्व लोकांनीं अत्यंत श्रम घेऊन तो तयार केला आणि तो उभारण्याचा जो समारंभ झाला त्यांतही मी कांहींच मदत केली नाहीं. हें सर्व श्रेय तेथील लोकांस आहे. मी एक बाहुल्याप्रमाणं असून लोक जसे नाचवितिल तसा खुशाल व निःशंकपणें परमेश्वरावर हवाला ठेऊन नाचलों. असेंच ऐक्य व असेंच औदार्य जर सदैव जागृत राहील तर स्वातंत्र्याचा तो कीर्तिध्वज अखंड या भूमंडळावर नांदेल. '

जेव्हां अब्राहाम लिंकन याचें हॅरिसबर्ग येथें स्वागत झालें त्यावेळीं संयुक्त संस्थानांस जरूर पडल्यास प्रसंगोपात् कांहीं फौजेची मदत पेन्सिल्व्हेनिया कडून मिळेल किंवा कसें याबद्दल तो कांहीं बोलला; त्यानें धारल्याप्रमाणें त्याला त्या संस्थानाकडून गर्भित रितीनें वचन मिळालें पण दक्षिणेकडील लोकांशीं युद्ध प्रसंग होण्याचा संभव आहे असें मात्र त्यानें त्यावेळीं दिसू दिलें नाहीं, व स्पष्टता न करण्याबद्दल त्यानें लोकांपाशीं क्षमा मागितली. संस्थानच्या राजधानींत तो जें बोलला त्यांतील सारांश

खालीं लिहिल्याप्रमाणें :—" प्रसंग पडलाच तर पेन्सिल्व्हेनिया येथील स्वतंत्र लोकांनीं संयुक्त संस्थानांतील आपल्या देशबांधवांस फौजेच्या कामीं होईल तेवढी मदत करण्या संबंधांत मी जे दोन शब्द बोललों त्याबद्दल आज थोडें मला कळविणें आहे; कारण माझें सांगण्यांत व आपले ऐकण्यांत कोणतेही प्रकारची चूक अगर गैरसमजूत होऊं नये अशी माझी इच्छा आहे; तसा प्रसंग देशावर पडावा आणि मी तुमच्या जवळ फौजेच्या मदतीसाठीं मागणी करावी अशी मला हौस नाहीं व त्यांत मी आनंदही मानीत नाहीं. या ठिकाणीं तुमच्या फौजेची रचना, टापटीप व एकंदर व्यवस्था पाहून मला मोठें समाधान वाटलें आणि या फौजेचा देशकार्यासाठीं प्रसंगोपात् उपयोग करण्याचें मला तुमच्या कडून जें वचन मिळालें आहे त्यामुळें मी तुमचा सदैव ऋणी आहे. मला तुमच्याजवळ फौजेची कुमुक मागणें भाग पडावें, तुह्मीं देशभक्तांनीं स्वातंत्र्यासाठीं आपल्या देशबांधवांस ठार मारण्यास सिद्ध व्हावें आणि त्यांचे रक्ताचा या भूमीवर सडा पडून भूमातेनें थरथर कांपावें, परमेश्वर करो व असा बिकट प्रसंग न येवो. मी तुम्हास शपथेवर वचन देऊन सांगतों कीं असा प्रसंग न यावा म्हणून माझ्या अंगांत जेवढें शहाणपण परमेश्वरानें दिलें आहे व त्याच्याच कृपेनें माझ्यांत जेवढें अंगसामर्थ्य आहे तें सर्व मी खर्च करीनच, पण इतकेंही असून दुर्दैवानें तसा प्रसंग आलाच तर मात्र हे माझ्या देशभक्तांनो !

मला मदतीसाठीं विनंती करावी लागेल व त्यांत माझा दोष आहे असें मात्र समजूं नका."

वॉशिंग्टन् येथें जाण्यासाठीं रात्रौ जी शेवटची गाडी निघते त्या गाडींतून बाल्टिमोरच्या रस्त्यानें अब्राहाम हा आपल्या पश्चिमेकडून आलेल्या अनुयायी मंडळीसह जाईल असें सर्वांचें साधारण अनुमान होतें. बंडखोरांची मसलत अजीबात फसावी या हेतूनें नेहमींच्या रिवाजाप्रमाणें तारेनें उघड जाहीर न करतां अब्राहाम यानें हॅरिस्बर्गहून जी लौकर गाडी निघते त्याच गाडीनें चालतें व्हावें असें खानगीरितीनें ठरून चुकलें होतें, आणि त्याप्रमाणें हॅरिसूबर्गच्या तारआफिसाशीं इतर सर्व ठिकाणच्या तारेचे संबंध तोडून ते मोकळे राहावे अशी व्यवस्था केली होती. अब्राहाम यास त्याच्या दोन तीन खास जिवलग मित्रांसहित हॅरिस्बर्गच्या स्टेशनावर नेलें आणि एका स्पेशलगाडीनें फिलाडेल्फिया येथें प्रथम जाऊन तेथून गाडींत बसून ठरलेल्या वेळेचे कांहीं तास पूर्वींच बाल्टिमोरच्या रस्त्यानें वॉशिंगटन् राजधानीकडे तो चालता झाला. अब्राहाम याच्या या अशा रितीच्या भयंकर प्रवासासंबंधांत नाना तऱ्हेच्या असंभवनीय कंड्या लोकांनीं उठविल्या होत्या. ज्याला कायदेशीर रितीनें अध्यक्ष नेमिलें त्यास संयुक्त संस्थानाच्या राजधानीस जात असतां वाटेंत त्याजवर भयंकर प्रसंग गुदरूं नये म्हणून

एखाद्या चोराप्रमाणें कांहीं तास लपून जाणें भाग पडावें हें संयुक्त संस्थानाच्या स्वतंत्र पक्षांतील सर्व लोकांस खरोखर लांछनास्पद होय.

वरील प्रकाराविषयीं कांहीं वर्षांनंतर अब्राहाम एकदा म्हणालाः—'ठरलेल्या कार्यक्रमा प्रमाणें मी रात्रींच्या शेवटच्या गाडीनेंच बाल्टिमोरच्या मार्गानें वॉशिंग्टन् येथें गेलों असतों तरी बंडखोरांनीं धारल्याप्रमाणें माझा वध केला असता असें मला त्यावेळीं तर वाटलें नाहींच व हल्लींही वाटत नाहीं परंतु विनाकारण माथ्यावर तशी जबाबदारी घेणें मला प्रशस्त वाटलें नाहीं.' इ. स. १८६१ च्या फेब्रुवारी महिन्याच्या २३ व्या तारिखेस सूर्योदयाचे वेळीं वॉशिंग्टन् येथील लोकांनीं अध्यक्षाची स्वारी सुखरूप येऊन पोंहचली आहे हें पाहतांच त्यांना अतिशय आश्चर्य वाटलें. अध्यक्ष निर्विघ्नपणें आपल्या राजधानींत आल्यानंतर त्याच्या कुटुंबांतलीं माणसेंही आलीं. त्या सर्व मंडळीस प्रथम एका लहानशा बंगल्यांत उतरण्यास जागा ठरविली असून रितीप्रमाणें अधिकार देण्याचा मोठा समारंभ एका भव्य सरकारी इमारतींत त्यानंतर व्हावयाचा होता. सामाजिक ऐक्यभावासंबंधी वॉशिंग्टन् येथील लोक एकमत नव्हते, कारण दक्षिणेकडील लोकांच्या गुलाम बाळगण्याच्या तत्वानें पुष्कळ वर्षांपासून त्यांच्यावर बराच पगडा बसविला होता.

समाजांतली पुढारी मंडळी काळ्यालोकसत्ताकस्वतंत्रपक्षाचा ( ब्लॅक्‌रिपब्लिकन् ) अतिशय तिरस्कार करीत होती. गुलामगिरी संबंधांत एक मोठा युद्ध प्रसंग होणार आहे असें ऐकून त्यांना अत्यानंद झाला व संयुक्त संस्थानांतील लोकांस ते आपली राजद्रोहात्मकबुद्धि मूर्खपणानें व्यक्त करीत होते; कित्येक द्वेषी लोकांस असें वाटत होतें कीं अब्राहाम लिंकन हा अध्यक्ष होणार नसून जिवंत राहिल्यास तो स्वतः, अगर मारला गेल्यास त्याचें प्रेत, इलिनॉइस् येथें परत जाणार. अब्राहाम, त्याच्या घरचीं माणसें, आणि त्याची मित्रमंडळी यांचे संबंधांत अशा अतिशयोक्तीच्या अनेक प्रकारच्या कंड्या या दुष्ट लोकांनीं उठवून कित्येक प्रामाणिक व सज्जन लोकांचे कान विनाकारण भ्रष्ट केले होते. या मत्सरी लोकांस वाटलें कीं अब्राहामाचे जागीं डेविस् हाच अध्यक्ष होणार आहे; परंतु हे सर्व विचारतरंग पाण्याचे बुडबुड्याप्रमाणें क्षणिक होते हे मात्र विसरतां कामा नये. इतिहासाचें खरें तत्व केव्हां तरी लोकांपुढें आल्याखेरीज राहत नाहीं. आपसांतल्या मोठ्या भयंकर युद्धाचे ( सिव्हिलवॉर ) प्रसंगीं अब्राहाम हा अध्यक्षाचे पीठावर विराजमान होऊन सर्व राज्याच्या रश्मी जेव्हां त्यानें आपल्या हातांत धरल्या त्यावेळीं सर्व लोकांची संपूर्ण खात्री होऊन सर्व प्रकारे संशय निवृत्ति झाली व जे दुष्ट व द्वेषी होते ते मनांतले मनांतच विरघळून गेले.

---

# प्रकरण १८ वें.

## अधिकार देण्याचा सभारंभ व त्यानंतरची स्थिति. मंत्रिसभा आणि तिची रचना.



इ. स. १८६१ च्या मार्च महिन्याचा ४ थ्या तारिखेस अब्राहाम लिंकन यास संयुक्त संस्थानाच्या अध्यक्षाच्या जागीं नेमल्याबद्दल सन्मानार्थ मोठा सभारंभ झाला. या मंगल कार्यास पुष्कळ मोठमोठीं मंडळीं आलीं असून अध्यक्षाचे सभोंवती या नामांकित मंडळींची एकच गर्दी झाली होती; जेम्स बुशनन् हा पश्चिमेकडून आलेल्या नवीन मनुष्याचे हातांत राज्याचें सूत्र सोंपून देत होता. संयुक्त संस्थानांतील मुख्य न्यायाधीश टॅनी ( ड्रेड्स्कॉटच्या निर्णयांत याचें नांव कायम होतें ) यानें नवीन येणाऱ्या अध्यक्षास रितीप्रमाणें शपथ घेऊन स्थानापन्न होण्यास सुचविलें. डब्ल्यु. एच. सिवर्ड ( न्यूयार्कचा गव्हर्नर आणि नंतर सिनेटर ) हा संस्थानाचा सेक्रेटरी व्हावयाचा होता आणि तो तेथें हाजर होता. समनर आणि विल्सन हे मॅसेचुसेट्स्चे सिनेटर असून नुकतेच फ्रिसॉइलर झाले होते; यांची नेमणूक सरकारी कामाकाजाचे मॅनेजरांच्या ( व्यवस्थापकांच्या ) जागीं व्हावयाची

असून तेही तेथें हाजर होते. ओहिओचा सिनेटर वेनवेड हा फ्रिसॉइलर पक्षाचा पुढारी होता; जनरल स्कॉट हा त्यावेळीं फौजेचा पुरस्कर्ता होता; अब्राहाम याचा जुना प्रतिस्पर्धी स्टिफन् ए. डोग्लस, अब्राहाम याचा अत्यंत जिवलग मित्र एडवर्ड् बेकर वगैरे प्रसिद्ध मंडळी व पुढें प्रसिद्धीस आलेल्या बऱ्याच मंडळींचीं नांवें देशाच्या ऐतिहासिक भांडारांत संग्रह करण्यासारखीं आहेत. सरकारी इमारतीच्या पूर्वभागांत एक सुशोभित उच्चस्थान मुद्दाम तयार केलें असून त्यावर अध्यक्षास यथाविधी अधिकार देण्याचा समारंभ झाला; बाहेरल्या बाजूस एका मोठ्या संगमरवरी चौकांत स्फटिकाप्रमाणें स्वच्छ पांढऱ्या दगडाचा वॉशिंग्टन् याचा पुतळा उभा केला होता. नवीन अध्यक्षास पाहण्याच्या व तो काय बोलतो हें ऐकण्याच्या उत्सुकतेनें राष्ट्रीय राजधानींत लोकांची अतिशयच गर्दी झाली होती. वॉशिंगटन येथें दर चवथ्यावर्षीं नवीन अध्यक्ष स्थानापन्न होऊन त्यास यथाविधी अधिकार देण्याचा समारंभ मोठ्या थाटानें करण्याचा क्रम चालूच होता; त्याप्रमाणें लिंकन यासही अधिकार देण्याचा समारंभ मोठ्या थाटानें झाला. त्यावेळच्या स्थितिमाना प्रमाणें बरेच लोक मोठ्या विचारांत पडले होते कारण राजद्रोह प्रत्येक ठिकाणीं डोकावून पहातच होता. राज्यांतल्या प्रत्येक खात्याच्या अंमलदाराचे व सभे-

च्या प्रमुख मंडळींचे कान बंडखोरांच्या गुप्त हेरांनीं भ्रष्ट केले होते इतकेंच नव्हे तर लष्करांतल्या व अरमारावरील बऱ्याच अमलदारांचीं मनें या दुष्ट मंडळींनीं दूषित केल्यामुळें ते सर्व त्यांना मदत करण्यास एका पायावर सिद्ध झाले होते. कित्येक क्षुद्रबुद्धीच्या मंडळींनीं तर लोकसत्ताकस्वतंत्रपक्षाच्या ( रिपब्लिकन् ) चालू नोकरीवर तिलांजुली देऊन अमेरिकेंतल्या मिलाफी संस्थानांत ( कॉनफिडरेट् स्टेटस् ) नवीन नोकऱ्या अगोदरच पत्करल्या होत्या. या बंडखोरांच्या संस्थानांस अमेरिकेंतलीं मिलाफी संस्थानें असें ह्मणत असत. लोकांचे एकमेकावरील विश्वास आजिबाद उडाले असून कोणाचा जोडा कोणाचे पायांत नाहीं अशी स्थिति सर्वत्र दिसत होती. गुप्त हेर अहोरात्र दाही दिशेला संचार करीतच होते आणि त्यामुळें नवीन अध्यक्षास ठार मारण्याविषयीं कृष्णकारस्थानासंबंधीं पदोपदीं ज्याला त्याला संशय येऊं लागले. उच्चस्थानाच्या सभोवतीं जी उत्सुक मंडळी बसली होती त्यांना अशी भीति पडली होती कीं बंडखोर अकस्मात् कोणीकडून येऊन अब्राहाम यास त्याच्या मित्रमंडळीसह संकटांत पाडतील अथवा तोफेचा गोळा कोणत्या दिशेनें एकदम येऊन अध्यक्षाची सहपरिवार आहुति घेईल याचें कांहींच प्रमाण नाहीं. तो दिवस मोठ्या महत्वाचा असून वॉशिंगटन् येथून कोणत्या प्रकारची बातमी येते इयाकडे देशांतील सर्व लोकांचें तनमन एकसारखें लागलें होते.

त्या विस्तीर्ण समाजांत अब्राहामलिंकन हा शांतवृत्ति धारण करून, मन मोठें करून, प्रसंगावधानानें, निर्भयपणानें व कांहींएक संकोच न धरितां स्वस्थ उभा राहिला होता. त्याचे नशिबाचा उदयकाळ अगदीं जवळ येऊन ठेपला होता. 'देशकार्यासाठीं प्राणाहुती जरी द्यावी लागली तरी बेहेत्तर आहे' अशी त्याची अढळ प्रतिज्ञा होती. । स्वार्थोयस्य परार्थएवसपुमानेकःसतामग्रणीः । या उक्तिप्रमाणें अब्राहाम लिंकन स्वार्थ व परार्थ एकच समजत होता. देशहितासाठीं त्यानें स्वतःच्या इस्टेटीवर व घरच्या माणसांवर पाणी सोडिलें होतें इतकेंच नव्हे तर ज्या प्राणाहून अधिक प्रिय या जगांत कांहींच नाहीं ते पंचप्राणही अर्पण करण्याचा त्याचा निश्चय झाला होता. त्याला जळीं, काष्टीं, पाषाणीं, सर्वत्र देशकार्याशिवाय कांहींएक दिसत नव्हतें. आतां राज्यसूत्रें हातीं आल्यावर आपण कोणत्या मार्गानें जाणार याचें स्पष्टीकरण तो लोकापुढें करण्याच्या अगदीं बेतांत होता आणि तें त्याला अधिकारदानसमारंभाच्या मंगलकार्याच्यावेळींच सांगावयाचें होतें. अमेरिकेंतल्या संयुक्त संस्थानाचा त्याग करून जे लोक अलग राहिले होते अशा अधमाधम कर्मचांडाळांची तो काय वाट लावणार हेंही स्पष्टकरून लोकांच्या निदर्शनास त्याला त्याचवेळीं आणावयाचें होतें. या समयीं अब्राहाम याच्या ह्या अशा खवळलेल्या भाषणांनीं बंड-

खोरांच्या कोपाग्नींत तेल टाकल्याप्रमाणें होऊन तो जास्त भडकला असतां कोणता दुर्धर प्रसंग ओढवेल या बद्दल त्याच्या खास मित्रमंडळीस मोठी काळजी लागली होती. परंतु छे: ! ही त्यांची काळजी व भीति अगदीं निरर्थक होती; कारण अब्राहम हा मोठ्या औदार्यानें, दयार्द्र अंतःकरणानें व शहाणपणानेंच भाषण करणार होता. त्याचा प्रत्येक मुद्दा प्रश्नवाचक असून त्यांत स्पष्टतेपेक्षां गर्भितपणा विशेष ठेवण्याची पद्धत त्याला फार आवडत होती. आपल्या बुद्धिबळाच्या योगानें दक्षिणेकडील लोकांच्या मागें लागून त्यांना वळविण्याचा सतत प्रयत्न चालू ठेविला तर ते लोक आपल्या स्वच्छंदी पुढाऱ्यांस सोडून संयुक्त संस्थानांतील लोकांच्या मतास खचीत मिळतील अशी त्याला व त्या वेळच्या इतर बऱ्याच मंडळीस उमेद होती. त्यांच्यांत देशाभिमानाचें स्फुरण जागृत करून त्यांच्या कडून आखेरचा निर्णय करवावा हा अब्राहाम याचा त्या वेळच्या भाषणांतलि मूळ मुद्दा होता. दक्षिणेकडील पुढारी मंडळींच्या मनाचा हिरमोड होऊन त्यांनीं हें भाषण छापवितांना त्यांतील कांहीं भाग गाळून नंतर तें छापविलें होतें.

जेथें गुलामगिरी चालू असेल तेथेंच फक्त ती खुशाल चालू राहावी अशाबद्दल दक्षिणेकडील लोकांची अब्राहम यानें आपल्या भाषणांत प्रारंभींच खातरी करून दिली होती. लोक-

सत्ताकस्वतंत्रपक्षानें गुलामगिरी ह्मणून पाडण्यासाठींच या नवीन अध्यक्षाची नेमणूक केली अशी बऱ्याच लोकांची दृढ समजूत असल्यामुळें कांहीं लोकांना मोठा धाक वाटत होता. तो कायदे करणाऱ्या मंडळीस मानवीदास्यत्वाचा उच्छेद करण्याविषयीं भाग पाडील व गुलामगिरीच्या विरुद्ध असलेल्या लोकांस तो चांगलें उत्तेजन देण्याचें धोरण ठेऊनच राज्यकारभार चालवील असा पुष्कळांचा समज झाला होता. हा त्यांचा भ्रम दूर करण्यासाठीं अब्राहाम यानें आपल्या भाषणांत कळविलें कीं:—

" लोकसत्ताकस्वतंत्रपक्षांतील लोकांनीं नवीन अध्यक्षाची नेमणूक केल्यामुळें व त्याच्याच हातांत सर्व राज्यकारभाराची लगाम असल्यामुळें दक्षिणेकडील संस्थानांतील लोकांस त्यांच्या जिवाची व मिळकतीसंबंधी मोठी भीती वाटत आहे व आपल्या सर्वांचे जीव मोठ्या धोक्यांत आहेत असें त्यांच्या मनानें खास घेतलें आहे. माझें असें म्हणणें आहे कीं इतकी भीति बाळगण्यास कांहीं योग्य कारण मजकडून घडलें असेल असें मला वाटत नाहीं. आमच्या शुद्ध व सरळ वर्तनाबद्दल व आमच्यापैकीं कोणाच्याही पोटांत पाप नसल्याबद्दल पुष्कळ सबळ पुरावे आहेत, ते जर कोणास पाहणें असतील तर सर्व द्वारें मोकळीं आहेत, त्यांनीं खुशाल पहावेत. आज पावेतों जीं जीं भाषणें मीं केलीं त्यांचें जर सिंहावलोकन केलें तर त्यांतहीं माझी अशीच सरळ बुद्धि सर्वत्र आढळून येईल. ज्या सं-

स्थानांत गुलमगिरी चालूच असेल त्या संस्थानांत प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रितीनें ढवळाढवळ करण्याचें मला मुळींच प्रयोजन नाहीं व असें करण्यास मला कांहीं कायदेशीर हक्क असेल असेंही वाटत नाहीं; हें जें पूर्वीं मी बोललों त्याचीच ही पुनरुक्ति करितों. ज्यांनीं माझी नेमणूक केली त्यांना वरील आश्वासनांची संपूर्ण माहिती होतीच व त्या आश्वासनांत यत्किंचितही मजकडून फरक होणार नाहीं अशी त्यांची बालंबाल खातरी होऊन चुकली आहे." त्या लोकांची विशेष खातरी होण्याकरतांच अब्राहाम यानें वरील उद्गार पुनःकाढिले होते; त्याच्या संशयाचें व भयाचें निरसन होऊन हरएक रितीनें दक्षिणेकडील खवळलेल्या लोकांस शांत करावें हाच त्याच्या भाषणाचा हेतू होता. गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांतून एखादा गुलाम स्वतंत्र संस्थानांत जर पळाला तर तो स्वतंत्र होऊ शकणार नाहीं हें जें नवीन जुटींत असलेल्या परिषदेचें तत्व, तें त्यानें मान्य केलें होतें; कारण कीं स्वतंत्र संस्थानांत आपखुशीनें आलेला गुलाम मात्र स्वतंत्र होऊ शकेल असें लोकसत्ताकस्वतंत्रपक्षांतील लोकांचे मत होतें. परागंदा झालेल्या गुलामासंबंधी वरील कायदा राज्यकारभारांत चालू करण्याविषयीं अब्राहाम याचें न्यायाचें धोरण पाहून राज्यव्यवस्थेंत सर्वांना सारखे हक्क देण्याची खटपट करणाऱ्या त्याच्या स्नेह्यांचें धाबें दणाणून गेलें. कोणताही स्वतंत्र मनुष्य, मग तो कोणत्याही स्थितींत असो, परंतु त्याला गुलाम या नात्यानें ताब्यांत घेतां

येणार नाहीं, हें कायदेशीर तत्व अब्राहाम हा धरून बसला होता.

संस्थानें संयुक्त कशीं झालीं त्याची मूळपीठिका अब्राहाम यानें स्पष्ट करून दाखविली आणि लोकसत्ताक स्वतंत्रपक्षांतील हा कायदा आधारभूत धरून त्यानें असें प्रतिपादन केलें कीं 'ज्यांनीं संयुक्त संस्थानाचा त्याग करून जी ही राज्याविरुद्ध बंडाळी माजविली आहे, त्यांनीं हें कायदेशीर केलें नसून यापासून कांहीं एक निष्पन्न व्हावयाचें नाहीं. कोणत्याही संस्थानांतील लोकांस आपल्या इतर संस्थानांतील लोकांच्या ( देशबांधवांच्या ) संमतिखेरीज आपआपलीं संस्थानें सोडून कधींही जातां येणार नाहीं.' अशा पद्धतीनें त्यानें आपले सर्व मुद्दे लोकांपुढें मांडिले. त्यानें शिवाय असेंही कळविलें कीं:—'या सर्व हकिगतीवरून कोणत्याही संस्थानास आपल्या स्वतःच्याच बुद्धीनें आपलें संस्थान कायदेशीर रितीनें सोडून जातां येत नाहीं हें उघड होत आहे; आणि आपल्याच हट्टानें संयुक्त संस्थानांचा त्याग करून गेलेंच तर अशा वचनभ्रष्ट व कर्तव्यपराङ्मुख झालेल्या लोकांनीं काढिलेले नियम व मसूदे कायदेशीर नसून व्यर्थ समजावयाचे आहेत. कोणत्याही एक अगर अनेक संस्थानांत संयुक्त संस्थानाच्या विरुद्ध बंड होईल अगर कोणतेंही जुलमाचें कृत्य कोणी करतील तर तें स्थितिमानाप्रमाणें राजद्रोही अगर राजक्रांति करणारें समजलें जाईल. कोणत्याही संस्थानास संयुक्त संस्थानाचा कायदे-

शीर रितीनें त्याग करितां येणार नाहीं. राज्यकारभाराच्या बळकटीस्तव व त्याच्या संरक्षणास्तव ज्या अर्थी मी शपथ घेतली आहे त्या अर्थी संयुक्तसंस्थानांतील कायद्याचा अंमल प्रामाणिकपणानें इतर संस्थानांत होतो किंवा नाहीं याची हरएक प्रकारें चौकशी करणें हें माझें कर्तव्य कर्म होय आणि जों पावेतों राजनिष्ट आणि सत्यप्रिय प्रजाजन ' असा अंमल तुह्मी करूं नका. आह्मी अनुकूल होत नाहीं ' असें स्पष्ट ह्मणणार नाहींत तों पावेतों वर कळविल्याप्रमाणें मी अंमल खास करीन. या माझ्या स्पष्ट बोलण्यानें मी कोणास दहशत घालितों असें मात्र कोणी समजूं नये. संयुक्त संस्थानांतील राज्यकारभारास चांगली बळकटी आणणारें हें तत्व मी आज तुमच्यापुढें मांडिलें आहे. याचा अंमल करण्यांत कोठें जुलूम किंवा रक्तपात न व्हावा अशी माझी सुचना आहे आणि राष्ट्रीय सत्तेच्या बळाशिवाय असा प्रकार होणार नाहीं अशी माझी संपूर्ण खातरी आहे. "

नवीन येणाऱ्या अध्यक्षाची वरील प्रतिज्ञा, स्पष्ट, दृढनिश्चयाची, आणि भारदस्तपणाची होती व त्यामुळें बंडखोरांचे पुढारी गोंधळांत पडून त्यांची एकच धांदल उडाली. अब्राहाम हा शत्रूस उदार आणि समदृष्टीनें पाहत होताच हा त्याचा मोठेपणा त्याच्या वरील संभाषणांत स्पष्ट दिसत होता. जी सत्ता त्याला प्राप्त झाली होती त्या सत्तेला अनुसरून राज्यांतलीं गांवें व

मिळकती ताब्यांत घेऊन व तेथें राहून एकनिष्ठेनें त्यांच्या संरक्षणार्थ योग्य बंदोबस्त तो करणार होता; आणि किल्ले, तोफखाने, वगैरे संयुक्त संस्थानाच्या ज्या जुन्या मिळकती होत्या त्यांत आपला हिस्सा समजून ज्यांचा त्या मिळकती ताब्यांत घेण्याचा घाट चालला होता त्यांना खरोखरच ह्यामुळें अत्यानंद झाला होता. त्यांना लढाईची अवश्यकता दिसत होती परंतु अब्राहाम ह्मणाला कीं युद्धाची अवश्यकता मुळींच न ठेवितां मी वरील मिळकती घेऊन त्याचें योग्य रक्षण करीन. भूमीवर रक्तपात वगैरे भयंकर प्रसंग घडल्याशिवाय ह्या मिळकती ताब्यांत घेतां येणार नाहींत अशी बंडखोरांच्या पुढारी मंडळीची खातरी होती आणि त्यामुळें ते युद्धास एका पायावर तयार झाले होतेच. दक्षिणेकडील लोकांस हरएक प्रकारें शांत करून त्यांच्याशीं सख्य करावें असा अब्राहाम याचा बेत होता.

उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील संस्थानांतील लोकांनीं लोकसत्ताकस्वतंत्रसंस्थानांची विभागणी करण्यास जरी संमति दिली अगर ते कबूल झाले, तरीपण वरील दोन्ही ठिकाणचीं संस्थानें अगदीं वेगळीं राहण्याचा संभव असल्याबद्दल अब्राहाम यानें आपल्या संभाषणांत स्पष्ट दर्शविलें. शिवाय तो ह्मणाला ‘ स्वाभाविक रितीनें पाहिलें तर आपणांत भिन्नभाव असूं शकणारच नाहीं; आपल्यांतल्या परस्पर शाखा वेगळ्या होऊं शकणार

नाहींत, व त्यांत मजबूत भिंतही बांधली जावयाची नाहीं. नवरा बायको अन्योन्य शरिरसंबंध तोडून दूरवर राहण्यास जाऊं शकतील, परंतु आपल्या देशांतल्या भागांची मात्र अशी स्थिति होऊं शकणार नाहीं. दोन्ही ठिकाणच्या संस्थानांतील लोकांनीं समोरासमोरच राहिले पाहिजे व अन्योन्य व्यवहारही चालू ठेविला पाहिजे.' अब्राहाम यानें लोकांवर आपली दृढश्रद्धा व संपूर्ण विश्वास आहे असें दाखवून या तंट्याचा लोकांनींच निकाल केला पाहिजे असें लिहून सांगितलें. जर लोकांनीं आपलें सद्वर्तन सदैव जागृत ठेविलें तर चार वर्षांच्या आंत कोणत्याही सरकारास सत्ता गाजवून आपली हानि करून घेण्याची वेळ येईल असें मला वाटत नाहीं, असेंही त्यानें स्पष्ट कळविलें.

अब्राहाम यास विशाळ व मोकळ्या जागेंत व्याख्यान देण्याची फार दिवसापासून संवय असल्यानें त्याचें संभाषण सर्वांस सारखें ऐकूं जात असें; त्याप्रमाणें वेळेला अनुसरून जें त्यानें वरील संभाषण केलें तें सर्व समूहांत व्यक्तिशः स्पष्ट ऐकूं गेल्यामुळें लोकांच्या प्रवृत्तींत चलबिचल होऊन बरीच चळवळ उत्पन्न झाली. ज्या ज्यावेळीं तो संयुक्तसंस्थानांविषयीं अत्यंत प्रेम व्यक्त करून दाखवीत असे त्या त्यावेळीं सर्व लोक आनंदोत्पादक टाळ्यांचा गजर मोठ्या उत्सुकतेनें करीत असत. चांगल्याची आशा प्रत्येकाला ही असतेच, त्या प्रमाणें प्रत्येक देश-

भक्तास संयुक्तसंस्थानांतील ऐक्य अढळ राहून युद्धप्रसंग येणार नाहीं असें खातरीनें वाटत होतें. मिलकतींचें संरक्षण करून राज्याची छाप व वडेजावही कायम ठेविण्याबद्दलची नवीन अध्यक्षाची प्रतिज्ञा ऐकून तर लोकांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. तो आपल्या व्याख्यानाच्या शेवटीं जें बोलला त्यांतील सारांश येणें प्रमाणें:—" हें व्याख्यान संपविण्यास मी खुशी नाहीं, परंतु तें आतां संपविलें पाहिजे; आपलें अन्योन्य नातें मित्रत्वाचें आहे शत्रुत्वाचें नाहीं आणि शत्रुत्व हें आपणांत नसलेंच पाहिजे. मनोविकार बळावले असले तरीपण आपण एकमेकास प्रेमरज्जूनें घट्ट बांधून घेतलें आहे व ती गांठ आतां सुटतां कामा नये. ज्या ज्या रणांगणांत मोठमोठ्या शूर पुरुषांनीं देशकार्यासाठीं आपले देह अर्पण केले व ज्यांची कीर्ति दिगंतरी गाजत आहे त्यापैकीं प्रत्येक रणांगणांतील युद्धवार्तेचें स्मरण झालें म्हणजे स्फुरण उत्पन्न झाल्या शिवाय राहतच नाहीं. "

दक्षिणे कडील पुढारी मंडळीच्या मनांत मात्र वरील भाषण जसें ठसावें तसें ठसलें नाहीं; त्यांनीं लढाईचा निश्चय केला असून त्यांचें फार दिवसापासून गुप्त कारस्थान चालूंच होतें. अब्राहाम याच्या गोड भाषणास त्यांनीं औपहासिकच उत्तरें दिलीं; परंतु उत्तरेकडील लोक राजनिष्ठ असल्यामुळें त्यांना मात्र वरील भाषण चांगलें पटलें व त्यांनीं मोठ्यानें जयघोष केला. स्वदेश-

हितचिंतकमंडळीनें अब्राहाम यांचें भाषण मुद्दाम लिहून घेऊन त्यांवर आपआपल्या सह्या केल्या; त्यांपैकीं एका इसमास त्याचें भाषण फार पसंत पडलें असून लोकसत्ताकस्वतंत्रराज्याचें हर-एक रितीनें संरक्षण करण्याबद्दल दृढाश्वासन ऐकून तर त्यानें वरील भाषणांतील तत्वाला अनुसरून आचरण करण्याचा निश्चय केला होता. जो डोग्लस अब्राहाम यास राजकीय विषयांत आपला प्रतिस्पर्धी समजत होता व ज्याच्या भाषणांतील वचनें ऐकून ज्याच्या ( डोग्लसच्या ) नखाची आग मस्तकाला जात होती त्याच डोग्लसानें वर कळविल्याप्रमाणें अब्राहाम याच्या भाषणांतील तत्वाला अनुसरून आचरण करण्याचा निश्चय करावा इतकेंच नव्हें तर अब्राहाम हा व्याख्यान देण्यास उभा राहिला ह्मणजे त्याच डोग्लसानें त्याची टोपी हातांत धरून त्याचे जवळ उभें राहावें ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे बरें ? हें खरोखर अब्राहाम याच्या सद्गुणांचेंच फळ होय. तात्पर्य इतकेंच कीं जो डोग्लस अब्राहाम याचा कट्टा शत्रू असून त्यास नेहेमीं पाण्यांत पाहत होता तो त्याचा आतां जिवलग मित्र झाला. अध्यक्षाचें जागीं त्याची नेमणूक झाल्याबद्दल डोग्लस यानें आनंद प्रदर्शित करून त्याचें अभिनंदन केलें. 'संयुक्त संस्थानाचे हरेक रितीनें रक्षण करण्याचे संबंधांत आणि तेथील कायदे अमलांत आणण्याचे कामीं मला तुमचा केवळ उजवा हातच समजा ' असें डोग्लस यानें शपथेवर अब्राहाम यास कळविलें. शेवटीं उभय-

तां एकमेकांस जिवलग मित्राच्या नात्यानें कडकडून भेटले आणि हा त्यांचा स्नेह संबंध आजन्म कायम राहिला.

ज्याठिकाणीं अब्राहाम यास अध्यक्षाचे अधिकार देण्याचा समारंभ झाला तेथें येतांना अगर तेथून जातांना वाटेंत त्यास कोणी ठार मारील याबद्दल सर्वत्रांस मोठी धास्ती होती. जनरल स्कॉट हा फौजेच्या एकंदर व्यवस्थेकडे होता व असलें कृष्णकारस्थान मोडून अब्राहाम याजवर कोणतें ही संकट न येऊं देण्याबद्दल त्यानें वीशेष दक्षता ठेविली होती; परंतु असें असूनही अब्राहाम लिंकन याची स्वारी मोठ्या थाटानें चालली असतां रस्त्यांतून घराचें माडीवरून अगर छपरावरून गुप्त रितीनें त्याच्यावर कोणी बंदुक झाडील अशा बद्दल कांहीं भिऱ्या मंडळीस मोठी काळजी लागली होती; जेव्हां हा समारंभ आटोपून अब्राहाम लिंकन आपल्या परिवारासह व्हाइट हौस राजवाड्यांत सुरक्षित पोंहचून रितीप्रमाणें आपलें सरकारी कामकाज पाहूं लागला तेव्हां सर्वत्रांची काळजी दूर झाली. माजी अध्यक्ष बुशनन् हा अब्राहाम याचे बरोबर राजवाड्यांत जातांना होता आणि तेथून ( व्हाइट हौस राजवाड्यांतून ) मोठ्या आदरानें त्याची परवानगी घेऊन चालता झाला. बुशनन् याच्या डोक्यावरून राज्यभार उतरल्यामुळें आपण आतां सर्व काळजींतून मुक्त झालों असें त्यास वाटलें. आपल्या जागीं या

पुढें जो येईल त्यानें कामाकाजांत गोंधळून जाऊन त्यांस फार त्रास व्हावा अशा रितीनें सर्व कामांची गुंतागुंत करून तो गेला होता व तो गेल्यामुळें लोक फारसे हळहळले नाहींत. बुशनन् यानें राज्यकारभारांत अतिशय घोटाळा केल्यामुळें सर्व कामें पुन्हा सुरळीत पद्धतीवर आणणें मोठें कठीण व अशक्य झालें होतें. अब्राहाम यानें जेव्हां राज्यसूत्रें हातांत धरिलीं त्यावेळीं राज्यरूप अफाट वृक्षाच्या सर्व शाखेंत, पानांत व मुळांत राजद्रोहाचें तीव्र विष अगदीं भिनून गेलें होतें. सैन्य व आरमार यांची चहूंकडे फांटाफुट झाली होती. राष्ट्रीय तिजोरी अगदीं रिकामी पडली असून तेथील हिशेबी कीर्दीच्या जमेबाजूस जणूं काय ओहोटीच लागली आहे असें दिसत होतें. बंडखोर लोक हातांत शस्त्रें धरून संयुक्त संस्थानांतील लोकांस मोठा धाक दाखवीत होते. दक्षिणे कडील संस्थानांतील लोकांनीं संयुक्त संस्थनास सोडून विभक्त होण्याचें धारिलेंच होतें परंतु त्यांना असें करण्यास प्रतिबंध करण्याची संयुक्त संस्थानास सत्ता असली तरी कायदेशीर हक्क आहे किंवा नाहीं अशाबद्दल विभक्त झालेल्या संस्थानांस जे लोक अनुकूल नव्हते त्यांना मोठाच गूढ विचार पडला होता. इतक्या थरावर जरी गोष्ट येऊन ठेपली होती तरीपण हातांत शस्त्रें धरून हातघाईवर येण्यापेक्षां मिथ्या भ्रमांत पडलेल्या आपल्या दक्षिणे कडील देशबांधवांस सख्य करण्याविषयीं पुनः एकदां

निक्षून सांगावें असें त्यावेळच्या पुष्कळ राजनिष्ट लोकांस वाट-लें होतें. अब्राहाम यास मात्र हें मान्य होईल किंवा नाहीं याची मोठी शंकाच होती. संयुक्त संस्थानाचें आतां कोणत्या रितीनें संरक्षण होईल, हाच गूढ प्रश्न ज्याचें त्याचें मनीं मानसीं त्यावेळीं अहोरात्र घोळत होता.

राज्यव्यवस्था सुनियंत्रित चालविण्यासाठीं एक मंत्रिसभा स्थापन करून अशा कसोटीच्यावेळीं राज्यकारभार चालविण्यासाठीं चांगली उपयोगी पडावीत अशी मंडळीं त्यांत त्यानें पसंत करून नेमिलीं होतीं तीं येणें प्रमाणें:—विल्यम सिवर्ड याची नेमणूक संस्थानाच्या सेक्रेटरीच्या जागीं झाली असून सिमन् कॅमेरॉन् यास फौजखात्याचा सेक्रेटरी केला होता. सामॅन् चेस् हा मुख्य तिजोरीचा अधिकारी झाला असून गिडिऑन वेलीस् यास आरमाराचे अधिपति नेमिले होते. मॉँटगामरी ब्लेअर हा पोष्ट खात्याचा उपरी झाला असून अंतर व्यवस्थेचा सेक्रेटरी कॉलेब्स्मिथ आणि मुख्य वकील एडवर्डबेटस्, याप्रमाणें नेमणुकी झाल्या.

इ. स. १८६० सालीं वरील मंडळींपैकीं सिवर्ड, चेस्, बेटस् आणि कॅमरॉन असे चौघे इलाख्याचे नेमणुकीसाठीं उमेदवार होते, त्याप्रमाणें अब्राहाम हाही उमेदवार होता.

इलाख्यांत आपली नेमणूक करून घेण्याबद्दल ज्यांना अतिशय हाव असे, व इ. स. १८६४ सालीं होणाऱ्या इलाख्यांतील नेमणुकीसाठीं जे नेहमीं उलाढाल करीत असत, असे लोक अब्राहाम यानें आपल्या मंत्रिसभेसाठीं सल्लागार म्हणून पसंत केलेले पाहून त्याच्या पुष्कळ स्नेही मंडळीस बरें वाटलें नाहीं. वरील मंडळीपैकीं मुख्यत्वेंकरून सिवर्ड आणि चेस् ह्या उभयतांना राजकीय कामाकाजांचा फार दिवस अनुभव असल्यामुळें ते इलाख्याच्या नेमणुकीसाठीं क्रमाक्रमानें उलाढाल करण्याचें कामीं मोठे तरबेज असणें हें अगदीं स्वाभाविक होय; अब्राहाम याची स्नेही मंडळी नाखुश होऊन त्रासल्यासारखी झाली होती आणि त्यांची अशी स्थिति होणें हें यथार्थच होतें व अब्राहाम याचें करणेंहीं रास्तच होतें. राज्यकारभार चालविणें हें कांहीं सोपें काम नव्हें, तें मोठ्या जबाबदारीचें असून सुरळीत चालण्यास आंगीं अनेक गुण असावे लागतात. त्याप्रमाणें अब्राहाम यास राज्यकारभाराचे बळकटीसाठीं निरनिराळ्या तडांतील लोकांस व संस्थानांतील राजनिष्ट व हितचिंतक मंडळीस एकत्र करून होतां होईल तों राज्यकारभार चालविणें अत्यावश्य दिसलें. फक्त एक मी. वेलिस शिवाय मंत्रिसभेंतील प्रत्येक प्रतिनिधि, आपण एक उत्तम राजकीय आश्रितवर्गापैकीं असून दूर प्रदेशांतले मोठे अनुभविक आहोत असें, दाखवित असे. अब्राहाम यानें आपल्या सल्लागा-

रांस असें सुचविलें कीं:—'बाबांनो! अतिशय हाव बाळगून उलाढाल करण्याची आणि आपआपसांत स्पर्धा करण्याची ही वेळ नव्हे बरें! थोडा दूरवर विचार करा, प्रसंग मोठा कठीण आहे.' लोकसत्ताकस्वतंत्रपक्षांतील लोकांचे जीव अशा धोक्यांत असतांना आपल्या जवळ असलेली वजनदार मंडळी अशा ऐनवेळीं स्वतांचाच उत्कर्ष होण्यासाठीं उलाढाली करण्याचे विचार मनांत आणतील असें अब्राहाम यास संभवनीय वाटलें नाहीं. तो म्हणाला:—"त्या सर्वांची मला गरज आहे, त्यांच्यावर त्यांच्या संस्थानांचा व संस्थानांतील सर्व पक्षांचा संपूर्ण विश्वास आहे व तेच राज्यव्यवस्थेस चांगली बळकटी आणतील." त्याचप्रमाणें त्यांच्या सहवासांत असलेल्या इतर सरकारी कामाकाजांतल्या मंडळीस तो म्हणाला:—"आजपर्यंत जें झालें तें विसरूं या! व एकमेकास त्याबद्दल क्षमा करूं या. आपलें अन्योन्य बंधुत्वाचें नातें आहे आणि अशा ऐक्यभावानें लोकसत्ताक स्वतंत्रपक्षास वांचवूं; यांत आपणांस यश आलें तर आपली दिगंत कीर्ति होईल व त्यामुळें आपणा सर्वांस उत्तम समाधान वाटेल."

मंत्रिसभेचा जो पुढारी असेल त्याला मुख्य प्रधान म्हणण्याचा साधारण रिवाज नव्हता, परंतु संस्थानाचा सेक्रेटरी या नात्यानें मिस्तर सिवर्ड हा राजकार्यांत मोठा कुशल असून

त्याचे अंगीं शहाणपण व योग्यता हीं अलौकिक होतीं. अब्राहाम लिंकन याच्या राज्यरूपी सृष्टीवर सिवर्ड हा जणूंकाय एक भानूच उदयास येऊन त्याची प्रभा सर्वत्र फांकली होती; संस्थानाच्या सेक्रेटरीस प्रथम प्रिमियर अथवा मुख्य प्रधान म्हणण्याचा रिवाज होता परंतु ही पदवी सरकारी कामाकाजांत प्रचारांत आणीत नव्हते. मिस्तर सिवर्ड हा न्यूयार्कच्या विस्तीर्ण संस्थानाचा गव्हर्नर असून संयुक्त संस्थानाचा सिनेटर होता. राजकार्यधुरंधर व उत्तम वक्ता या नात्यानें लोकसत्ताक स्वतंत्रपक्षांतील एकोष्यास चांगली बळकटी आणण्याचा भगीरथ प्रयत्न त्यानें केला होता. मंत्रिसभेंत मुख्य जागेवर याची झालेली नेमणूक पाहून सर्व लोकांस मोठा संतोष झाला होता.

मंत्रिसभेंत मिस्तर सिवर्ड प्रमाणें मिस्तर चेस यानें चांगला लौकिक संपादन केला होता. तो ओहिओ संस्थानाचा गव्हर्नर असून संयुक्त संस्थानाचा सिनेटर होता. इतरांपेक्षां तो बराच पुढें सरसावला असून लोकसत्ताकस्वतंत्रपक्षांत त्याची ॲबालिशनिस्ट म्हणजे खंडणकरणारा अशी ख्याति होती. इ. स. १८४८ सालीं बफेलो येथें स्वातंत्र्याप्रीत्यर्थ जी मंडळी स्थापन झाली होती तिचा मूळ उत्पादक मिस्तर चेस हाच होता तो एक मोठा निष्णात वकील असून न्यायी होता. त्याला

लोकसत्ताकस्वतंत्रपक्षाच्या हितासाठीं पुष्कळ गोष्टी करावयाच्या असून जेव्हां अब्राहाम यानें कायमची सुधारणा करण्याचें काम हातीं धरिलें त्यावेळीं अनेक पक्षांतील लोकांस तो मोठा प्रिय झाला होता. फौजखात्याचा सेक्रेटरी कॅमेरान् राज्यकार्यांत अत्यंत उपयोगी असून सर्वांचा तो पुढारी असे. त्यानें शिफारशी ऐकून आपल्या स्नेही मंडळीस चांगल्या चांगल्या हुद्याच्या जागा आपल्या अधिकारांत दिल्या, अशा कांहीं कारणांवरून तो आपल्या जागेवरून कमी होऊन त्याचे जागीं एडविन एम्. स्टॉंटन याची नेमणूक झाली. बुशनन् याची अव्यवस्थित कारकिर्द संपण्याच्या वेळीं स्टॉंटन हा त्याचा मुख्य वकील होता. प्रजासत्ताकलोकांच्या राष्ट्रीय कामाकाजांत ब्लेअर याचें घराणें मोठें वजनदार समजलें जात होतें. फ्रान्सिसब्लेअर हा एँड्र्यु जॅकसन् (अध्यक्ष) याचा जिवलग मित्र असून सार्वजनिक मतांचें 'वॉशिंगटन्ग्लोब' नांवाचें वर्तमान पत्राचा लेखक होता. मॉंटगामरी हा पोष्ट खात्याचा अधिकारी असून तो व गिडियन वेलीस या उभयतांनीं न्यूइंग्लंडचें वर्णन लिहिलें आहे. मि. कालेब् बि. स्मिथ हा इलिनाइसचा राहणारा असून मध्य प्रांताचा सेक्रेटरी होता. एडवर्ड बेटस् हा मोठा विद्वान् सभ्य गृहस्थ असून इ. स. १८६० सालीं इलिव्यांतील नेमणुकीचे वेळीं पुष्कळ लोक त्याचे लाभांत होते. हल्लीं तो मुख्य वकील असून आपल्या कामांत

मोठा प्रवीण होता, तसेंच त्यानें देशसेवाही एकनिष्ठेनें केली. हा मूळचा मिसौरीचा राहणारा असून प्रजापक्षाकडील मुख्य वकील होता. मंत्रिसभेंत आपण पसंत ठरावें ह्मणून ज्यानें त्यानें सभेच्या सभासदांपुढें आपआपल्या संस्थानाचें चांगलें वर्णन केलें होतें व वर्णन केल्याप्रमाणें त्या त्या संस्थानांतील राजनिष्ट प्रजेनें आपआपलीं सर्व कामें संतोषकारक केलीं होतीं. या संस्थानांचीं नांवें येणें प्रमाणें:—न्यूयार्क, ओहिओ, पेन्सिल्वेनिया, मेरिलँड, कॉनेक्टिकट्, व मिसौरी. फौजखात्याचा मुख्य अधिकारी मि. स्टॉटन हा ओहिओचा राहणारा होता. वरील सात नामांकित पुरुषांनीं चांगलीं चांगलीं राजकीय तत्वें राष्ट्रीय सभेपुढें मांडलीं होतीं.

कित्येक लोक मि. सिवर्ड यास चांगले ओळखत असून अब्राहाम यास ओळखतही नव्हते; अशा लोकांस सिवर्ड हाच अध्यक्ष होईल असें वाटलें, कारण कागदावर सह्या करावयाच्या, यापलीकडे अब्राहाम हा राज्यकारभारांत जास्त कांहींच पाहत नाहीं असें त्यांना वाटत होतें. अधिकार देण्याच्या मोठ्या समारंभाचे वेळीं अब्राहाम यानें केलेलें भाषण सुधारून पुनः स्वच्छ लिहिण्याचें काम मि. सिवर्ड यानें पत्करिलें होतें; नंतर राजकार्यांत कोणकोणतीं कामें कसकशीं व काय काय उपायानें करावयाचीं याचा एक स्पष्ट कार्यक्रम त्यानें तयार केला. क्रमाक्रमानें

कित्येक लोकांच्या शंका दूर झाल्या व अब्राहाम याचा दृढनिश्चय आणि उमेदपाहून संयुक्त संस्थानाचा हाच अध्यक्ष आहे अशी त्यांची संपूर्ण खातरी झाली.

---



# प्रकरण १९ वें.

## अध्यक्ष अब्राहाम लिंकन आणि राजद्रोही मंडळी. दोन शोचनीय मृत्यु.




युक्त संस्थानाच्या अध्यक्षासाठीं, राजकीय कामकाज पाहण्यास व्हाइटहौस नांवाच्या राजवाडयांत बसण्याची योजना केली होती व त्याप्रमाणें अब्राहाम लिंकन राजवाडयांत स्थानापन्न होऊन अध्यक्ष या नात्यानें कामकाज पाहूं लागला. प्रथमारंभीं राजकीय कामांत त्याला दोन शोचनीय प्रकार दिसले, ते असे कीं (१) कचेरींत जागा मिळण्यासंबंधी अर्ज्या घेऊन लोकांच्या झुंडीच्याझुंडी त्याचे सभोंवतीं जमत होत्या व (२) रणदेवता, देशांतील मोठमोठ्या वीरांच्या युद्धप्रसंगाची अगदीं वाट पहात होत्या. अशी जरी आणीबाणीची वेळ होती तरी पण त्यांत तो समाधान मानून असे; कारण कीं राजनिष्ठ संस्थानांचा पूर्ण विश्वास नसता तर इतके लोक नोकरी साठीं धांवून आले नसते असें त्याला वाटत होतें.

बूशनन् यानें राजकीय कामकाजांत इतकी गुंतागुंत करून ठेविली होती कीं अब्राहाम यास त्यांत फेरफार करण्याचें

कांहींएक सुचलें नाहीं. ' बुशनन् यानें राजकीय कामाची अशी अव्यस्थित स्थिति करून ठेविली आहे कीं त्यांत कांहीं करावयाचें नाहीं असें कांहींच नाहीं,' असें तो अनेक वेळा ह्मणत असे. बुशनन् यानें सर्व कामें जिकडे जशीं लोटतील तिकडे तशीं खुशाल लोटूं दिलीं. इकडे बंडखोर लोक आपआपल्या कृष्णकारस्थानांत निमग्न असून बंड उपस्थित करण्याचें संधान पहातच होते, परंतु त्या वेळ पावेतों त्यांच्याच्यानें फारशी ढवळाढवळ होऊं शकली नाहीं. अब्राहाम यानें शत्रूवर चाल करून जाण्यासाठीं सैन्य पाठविलें नव्हतें, कारण त्यानें घाल्या प्रमाणें शस्त्रें हातांत धरून शत्रूंशीं टकर घेईल असा धाडसी शूर योद्धा त्याला मिळाला नव्हता. संयुक्त संस्थानांतील लोकांच्या मनगटांत किती जोर आहे व त्यांचें सैन्य किती आहे याचा अंदाज विरुद्ध पक्षानें केला होताच परंतु युद्धास आरंभ करण्यास बंडखोरांना कोणतेंही निमित्त सांपडेना ह्मणून ते स्वस्थ बसले होते. त्याचप्रमाणें उत्तरेकडील पुढारी मंडळींनीं वचन दिल्याप्रमाणें त्यांचे कडूनही कांहीं एक घडलें नव्हतें.

इ. स. १८६१ च्या मार्च महिन्याच्या नवव्या तारिखेस मॉंटगामरी येथें बंडखोर मंडळीची एक सभा भरून त्यांत त्यांनीं सैन्यांतील अतर्व्यवस्था सुधारण्याच्या हेतूनें एक नियमाचा मसुदा पसार केला. बंडास प्रारंभ कसा करावा व शत्रूवर तोफेचा

भडीमार कोणीकडून कसा करावा अशाबद्दल त्या मसुद्यांत स्पष्टता केली होती. हा इतका प्रकार चालू होता तरी पण अब्राहाम यानें एक पाऊलही पुढें टाकिलें नाहीं. राजानें सूर्याप्रमाणें वेळेला अनुसरून तीव्र अथवा मृदुवृत्ति धारण केली पाहिजे हें तत्व तो चांगलें समजून होता. कांहीं दिवसानंतर अल्बामा येथील मी. फॉरसीथ व जॉर्जिया येथील मी. क्राफर्ड असे दोन कमीशनर ( गुप्तहेर ) जणूं काय परदेशाहून आलेले प्रतिनिधि अशा नात्यानें संयुक्त संस्थानाशीं तह करण्यासाठीं आले. संस्थानांतल्या एका सरकारी कचेरींत प्रथम त्यांनीं प्रवेश केला, परंतु त्यांचें सरकारी रितीनें स्वागत न झाल्यामुळें त्यांनीं अब्राहाम याजकडे अर्ज पाठविला. अब्राहाम यानें संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष या नात्यानें त्यांची समक्ष भेट घेतली नाहींच, परंतु त्यांचा अर्ज पाहून त्याची उग्रवृत्ति मात्र झाली आणि अधिकार मिळण्याच्या समारंभाचे वेळीं त्यानें जें भाषण केलें त्याची एक नकल त्यांचेकडे पाठविली. अब्राहाम याचें अशा रितीचें वर्तन पाहून ते मोठ्या गूढ विवंचनेंत पडले. संयुक्त संस्थानाच्या राज्याचें जूं झुगारून देण्याचें आमचें कृष्णकारस्थान अहोरात्र चालू असल्यामुळें आमच्यावर राजद्रोहाचा आरोप येऊन खटला होईल अशी त्यांना पक्की खातरी होतीच. उभयतां हेरांनीं कांहीं वेळ राष्ट्रीय राजधानींत हिकडे तिकडे भटकून व दक्षिणेकडील आपल्या मित्र मंडळीच्या भेटी घेऊन जी कांहीं माहिती

मिळाली तेवढीच घेतली. आपलें राहणें राजधानींत जास्त दिवस व्हावें अशा हेतूनें त्यांनीं संस्थानाचे सेक्रेटरी मिस्तर सिवर्ड यांस कळवून त्याजकडून एप्रिल मासच्या आठव्या तारिखेस आह्मांस जबाब मिळावा अशी मागणी केली, आणि त्याप्रमाणें त्यांची विनंति मान्य झाली. संयुक्त संस्थानांपैकीं कित्येक संस्थानिकांनीं रितीप्रमाणें राज्याविरुद्ध बंड करण्याची सर्व तयारी केली होतीच; बंडखोरांनी एक सभा स्थापन केली. लोकांची धांवा धांव इतकी चालू झाली कीं कोणी कोणाचीं दाद घेइनासे झालें. रितीप्रमाणें फौज व आरमारही अगदीं तयार होतेंच आणि या राष्ट्रीय राजधानींत गुप्त हेर व वकीलही पाठविण्यांत आले होते. इतक्या पंथावर जरी स्थिति येऊन पोंचली तरी पण अब्राहाम याचें मौनवृत्तींत यत्किंचित्‌ही फरक झाल्याचें चिन्ह दिसलें नाहीं.

या प्रमाणें फॉरसीथ व क्रॉफर्ड असे उभयतां वॉशिंगटन् येथें इकडून तिकडे फिरण्यांत कसातरी वेळ घालवित होते; त्या दरम्यान संयुक्त संस्थानांतील लष्करी अंमलदार लेफ्टनंट टॉलबट यास दक्षिण करोलीनापैकीं चार्लस्टन येथें अध्यक्षाने पाठविलें. चार्लस्टन् बंदरांतील समूटर किल्ल्यांत सैन्याच्या अन्नसामुग्रीची बेगमी वाटेल तशी अडचण सोसून करून ठेवण्यांत येइल अशी जाहीरात चार्लस्टन् येथलि अधिकारी वर्गास आणि

बंडाच्या सैन्याचा अधिकारी जनरल बोरगार्ड यास देण्याबद्दल अध्यक्षानें मिस्तर टॉलबट् यास कळविलें; हा सरकारी ठराव वॉशिंग्टन् येथें असलेल्या फॉरसीथ व क्रॉफर्ड यांस कळविला. मि. सिवर्ड यानें मार्चच्या पंधराव्या तारिखेस लिहिलेला जबाब तारिख ८ एप्रिल रोजीं वरील उभयता वकिलांस मिळाला. सदरहु जबाबांत संयुक्त संस्थानाच्या सरकाराकडून कोणताही करारनामा करून मिळणार नाहीं, अशा मतलबाचा रितसर मजकूर लिहिला होता. जबाब मिळण्यास विलंब लागला तरी चालेल असें जरी उभयतांनीं स्पष्ट कबूल केलें होतें तरी तारीख १५ मार्चचा जबाब तारिख ८ एप्रिल रोजीं मिळाला, यावरून त्यांना लौकर जबाब न देतां हा जो मुद्दाम विलंब झाला याचें कारण संयुक्त संस्थानाच्या सरकास युद्धाची तयारी करण्यास अवकाश मिळावा हेंच असले पाहिजे व तें उभयता वकील समजून चुकले होते. अब्राहाम यानें सम्टर किल्ल्यांत अन्नसामुग्री परिपूर्ण ठेवण्यासंबंधी जो हुकूम केला. त्याचा अर्थ उभयता वकीलांनीं असा केला कीं, एक जूट झालेल्या वेगळ्या संस्थानाविरुद्ध युद्धास आरंभ केला असें समजावें. या संगनमत्त झालेल्या संस्थानांतर्फे ते वकील या नात्यानेंच आले होते आणि हा जो पैजेचा विडा विरुद्ध पक्षानें त्यांचें पुढें ठेविला तो त्यांनीं मान्यकरून उचलिला, याप्रमाणें हकीकत घडल्या नंतर ते उभयतां आपल्या देशांत निघून गेले. संयुक्त संस्थानाच्या सर-

कारानें आपण वादी बनून त्यांना प्रतिवादी केलें असें उभयतां वकिलास वाटलें होतें. पण अब्राहाम यानें युद्धासंबंधी कोणतेंच कृत्य आपण होऊन करण्यास लोकांस परवानगी दिली नव्हती व युद्धाची पहिली तोफ शत्रूकडून केव्हां सुटते याची तो वाट पाहत होता.

चार्लस्टन शहरांत बंडखोरांचा एक मोठा समूह जमून अतिशय गर्दी झाली होती; व ही मंडळी क्रोधानें अगदीं लाल होऊन युद्धास प्रारंभ करण्यास अगदीं अधीर झाली होती. दक्षिण संस्थानाकडूनच लढाईस प्रारंभ व्हावा अशी वर्तमानपत्र-कारांची व नामांकित प्रमुखमंडळींची एकसारखी ओरड चालूच होती. जुन्यासंयुक्तसंस्थानाशीं दीर्घद्वेष करण्या-संबंधी दाक्षिणात्यांच्या मनोविकारांस जणूकाय ऊतच आला होता. अब्राहाम याच्याशीं कांहीं कपट करून त्याच्या कडूनच आपणांस युद्ध करण्यास कारण झालें असें भासविण्याचा बंडखोरांच्या पुढाऱ्यांचा प्रयत्न होता, आणि अब्राहाम याच्या पक्षांतील मंडळीनें त्याच्या उलट दृढ निश्चय केला होता कीं, कांहीं झालें तरी आपण होऊन युद्धास प्रारंभ करावयाचा नाहींच.

राजनिष्ट संस्थानांतील बरेच लोक या विलंबामुळें चिडले होते. अब्राहाम याच्या भाषणांत लोकांत प्रोत्साहन उत्पन्न

होईल अशा राजनीतीसंबंधी चांगलेंच प्रतिपादन झालेलें असून कित्येक लोकांची त्यासंबंधी व्यर्थ ओरड चालली होती. अब्राहाम यानें आतां वाट न पाहतां कांहींतरी केलेंच पाहिजे असें त्यांचें निक्षून सांगणें होतें. जाहिर व्याख्यान देणारे तसेच वर्तमानपत्रकर्ते यांचें असें मत होतें कीं बंडखोरांवर राजद्रोहाचा आरोप ठेऊन त्यांच्यावर काम चालवून त्यांना शिक्षा केलीच पाहिजे. **संयुक्त संस्थानांतील** एक लहान लष्करी तुकडी घेऊन मेजर **रॉबर्ट अंडरसन** यानें **समटर** किल्ल्यांत ठाणें दिलें होतें; उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील लोकांचें मुख्यत्वेंकरून याच किल्ल्याकडे एकसारखें लक्ष लागून राहिलें होतें. मेजर **रॉबर्ट अंडरसन** याचें त्या किल्ल्यावर ठाणें असल्यानें **चार्लस्टन** शहरास मोठा धाक आहे असें बंडखोरांस वाटत होतें; **संयुक्त संस्थानांचे** किल्ले, तोफखाने व इतर सरकारी जी मिळकत एक जूट झालेल्या संस्थानांच्या हद्दींत आहे त्या मिळकती पूर्वीं एकत्र असलेल्या व नंतर विभक्त झालेल्या संस्थानांचा ( पूर्वापार चालत असलेला ) हिस्सा आहे असें त्यांचें म्हणणें होतें. **समटर** किल्ल्याच्या रक्षणार्थ असलेले शिपाई पूर्वीं **चार्लस्टन** शहरांत राहत होते परंतु जेव्हां बंडखोर लोकांकडून अती त्रास झाला तेव्हां मेजर **रॉबर्ट अंडरसन** यानें एकदम मुक्काम उठवून एकारात्रींतून सर्वत्रांसह **समटर** किल्ल्यांत येऊन तो पोंहचला व तेथें त्यानें तळ दिला होता व यामुळें **संयुक्तसंस्थानांतील** लोकांनीं आपण

होऊन शत्रुत्व उत्पन्न केलें असें बंडखोर समजत होतें; इ. स. १८३२ सालीं ब्लॅकहॉक युद्धांत ज्यानें लष्करी खात्यांत अब्राहाम याचे हाताखालीं नोकरी करून संयुक्तसंस्थानाविषयीं राजनिष्ठा प्रगट करीन अशी शपथ वाहिली होती तोच हा लेफ्टनंट मेजर अंडरसन होय.

सम्टर किल्ला हस्तगस्त झालाच पाहिजे असा झोंक दाखविण्याच्या हेतूनें त्यावर उद्देशून बंडखोर लोकांनीं आपल्या तोफांची रांग लाविली होती व सैन्याच्या मोर्चेबंदीची व्यवस्थाहि त्याचप्रमाणें लावून ठेविली होती. इकडे अध्यक्षाजवळ जे लोक होते त्यांचें म्हणणें होतें कीं त्या किल्ल्यावर आणखी जास्त फौज ठेऊन अन्नसामुग्रीची बेगमीही वाढविली पाहिजे व अशा रितीनें त्या किल्ल्यावर बंदोवस्त असला म्हणजे तो हस्तगत होणार नाहीं. हा किल्ला रणभूमीच्या अगदीं मध्यावर असून तो सुरक्षित राहिल्यानें दक्षिणेंतील राज्यसत्ता अद्याप कायम आहे असें सर्व लोक समजत होतें. पेन्साकोलाच्या बंदरांत असलेला पिकेन्स किल्ला वाशिंग्टन येथून आलेल्या हुकुमान्वयें मोकळा झाल्यानें बंडखोरांचें पित्त अतिशयच खवळलें. हिकडे जनरल स्कॉट यानें फौजेच्या अवश्यकतेसाठीं चार्लस्टन बंदरांत असलेला किल्ला सोडून देण्याची सल्ला दिली. बंडखोरांचा तेथील लष्करी अमलदार बोरगार्ड यास सम्टर किल्ल्यांत अन्नसामुग्रीची

बेगमी लौकरच करण्यांत येईल अशी अब्राहाम यानें जाहिरात दिली. अध्यक्षाची दयार्द्रदृष्टि किती होती हें यावरून उघड दिसत आहे. किल्ल्याच्या रक्षणार्थ असलेले शिपाई अन्नपाण्यावांचून व्याकूळ होत होते. किल्ल्यांत सामुग्री ठेविण्याचें अब्राहाम याचें वर्तन बंडखोरांस विरुद्ध दिसत होतें म्हणून तें कृत्य घडण्याची ते सर्व वाट पाहत होते. त्याप्रमाणें बोरगार्ड यानें समटर किल्ला ताब्यांत सोंपण्याबद्दल अंडरसन यास तारिख १२ एप्रिल रोजीं निरोप पाठविला; परंतु अंडरसन यानें ही गोष्ट मुळींच कबूल केली नाहीं. त्यानंतर किल्ला रिकामा करण्याबद्दल पुन्हा अंडरसन यास सुचना गेली असतां त्यानें स्पष्ट कळविलें कीं, तारिख १५ पावेतों विरुद्ध हुकूम न आल्यास अगर त्या मु.तींत उत्तरेकडून हुकूम न आल्यास सदर तारिखेस किल्ला रिकामा करून देऊं. बोरगार्ड यानें इ. स. १८६१ च्या एप्रिलच्या १२ तारिखेस रात्रीं साडे तीन वाजतां अशी लेखी सुचना पाठविली कीं एक तासांत समटर किल्ल्यावर तोफांचा भडिमार चालू होईल. ठरल्याप्रमाणें पहाटेच्या साडे चार वाजतां पहिली तोफ किल्ल्यावर सुटली. विभक्त झालेल्या लोकांपैकीं रुफिन् नांवाच्या एका पोक्त मनुष्याच्या हस्तें सदरहु पहिली तोफ सोडण्याचा मुहूर्त झाला. संयुक्त संस्थानांचा अस्त होण्याची ही आतां अखेरची घंटा आहे असें त्यावेळीं कित्येक लोक म्हणत होते. समटर किल्ल्याचें रक्षण होण्याचे कामीं जे जे उपाय यो-

जिले ते ते सर्व निर्बळ दिसत होते. बुशनन याचा फौजखात्याचा सेक्रेटरी फ्लॉइड हा मोठा विश्वासघातकी असून त्यानें एक हजारापेक्षां अधिक सैन्य चार्लस्टन बंदरांतील किल्ल्याचें रक्षणार्थ नेहमीं प्रमाणें ठेवावयाचें तें न ठेवितां फक्त ६५ लोकच तेथें ठेऊन कशीतरी व्यवस्था लाविली होती. लष्करांतील बहुतेक लोकांनीं अन्नावांचून प्राण सोडिले. बंडखोर लोकांकडून एकसारखा तोफांचा भडिमार चालू होता परंतु संयुक्त संस्थानांकडील लोकांच्या अगदींच कमी तोफा सुटल्या आणि अशा अव्यवस्थेमुळें समटर किल्ल्यावरील संयुक्त संस्थानांचा जयध्वज खालीं पडला. दुसऱ्या दिवशीं म्हणजे तारीख १३ रोजीं अंडरसन यानें तह करून कांहीं शर्ती कबूल केल्या आणि लागलींच जयध्वज पुन्हां उभा करून त्याच्या सन्मानार्थ ५० तोफांची सलामी दिली. त्यानंतर सर्व शूर मंडळीसहीत एकदम चाल करून समटर किल्ला बंडखोरांनीं आपल्या ताब्यांत घेतला.

या वरील प्रकारामुळें स्वदेशाभिमानापासून उत्पन्न झालेला कोपाग्नि इतका भडकला कीं थेट उत्तरेकडे त्यानें सर्व ठिकाणीं पेट घेतला. बंडखोरांनीं लोक सत्ताक स्वतंत्रपक्षाच्या कीर्तिध्वजाला कलंक लावून त्याचा अपमान केला. राष्ट्राच्या संरक्षणार्थ ठिकठिकाणीं जें सैन्य ठेविलें होतें त्यापैकीं कांहीं लोक त्यांनीं हाकून लाविले आणि संयुक्त संस्थानांतले नागरिक लोक

ज्या राज्यसत्तेस कायदेशीर कधीं ही मानणार नाहींत अशा गैरशिस्त राज्यसत्तेचा सर्वच डंका वाजविण्याच्या हेतूनें बंडखोरांनीं त्या किल्ल्यावर एक नवीन जयध्वज उभारिला. एकादे संस्थानावर जरब ठेविण्यास राष्ट्रीय सरकारास हक्क आहे किंवा नाहीं याची त्या वेळ पावेतों पुष्कळ राजनिष्ट मंडळींस शंका होती; बुशनन्च्या अखेरच्या कारकिर्दींत ज्या तत्वांचा इतका व्यासंग पूर्वक बोध झाला होता, त्या तत्वांचे अनुयायी पुष्कळ मंडळी स्वतंत्र संस्थानांत होती. समूटर किल्ल्यावरील जयध्वज पडला त्या दिवसापर्यंत सुद्धां ' सर्वत्र गुलामगिरी चालू असणें हाच कायदेशीर मार्ग आहे सबब सर्वांनीं हा मार्ग स्विकारावा अशा धोरणावरच संयुक्त संस्थानाशीं चालू असलेल्या झटापटीचा आपसांत निकाल करून घेऊं ' असा विचार करणारी पुष्कळ वजनदार आणि राजकारस्थानी मंडळी उत्तरेकडे होती; परंतु उत्तरेकडील स्वदेशाभिमानाच्या पेटलेल्या भयंकर ज्वालेंत त्यांच्या त्या विचाराची आहुतीच पडली. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतलि लोकांचीं अंतःकरणें जयध्वज पाडण्याच्या अपमानानें पोळल्यामुळें बंडखोरांस हाकून काढून केव्हां सूड उगवूं असें त्यांना झालें होतें. त्यावेळपावेतों युद्धाची उघडपणें कांहीं एक तयारी नसून अब्राहाम यानें तत्संबंधी खानगी रितीनें व गुप्त रितीनें जे हुकूम केले होते तेवढीच कायती व्यवस्था झाली होती; कारण त्याला ठाऊक होतें कीं युद्धास

प्रारंभ करण्याची जबाबदारी बंडखोरांवर येण्याचा दिवस येत आहेच. शेवटीं अब्राहाम यानें धारिल्याप्रमाणें युद्धाच्या आरंभाची तोफ विरुद्ध पक्षाकडून प्रथम सुटली, आणि उत्तरेकडील लोक एकदम खवळले.

प्रत्येक तडाचीं वेगळीं वेगळीं बंधनें होतीं तीं सर्व मोकळीं होऊन आतां फक्त एकच तड दिसत होता आणि संयुक्त संस्थानाचें संरक्षण आणि स्वातंत्र्यप्रिय लोकांच्या अपमानांचा सूड, एवढेंच त्याचें कर्तव्य होतें. बलात्कार करणें हा शब्द गैरकायदेशीर आहे व विभक्त संस्थानांस चिडविणें ही अनीति आहे असें म्हणण्याची कोणाचीच छाती होईना. राजद्रोहाचें मूळ नाहींसें करण्या संबंधी चहूंकडे एकच ओरड चालू होती. इ. स. १८६१ च्या एप्रिल महिन्याच्या १५ व्या तारिखेस अध्यक्षानें एक जाहिरनामा काढून त्यांत ७५००० लष्करी लोकांची मागणी केली. “ बंडखोर लोक बलाढ्य असून त्यांचें सर्वत्र एक जूट झालें आहे, ते संयुक्त संस्थानांतील कायद्याच्या आड येऊन त्यास हरएक प्रकारें अडथळा आणण्याचा प्रयत्न करीत आहेत, या सर्व कारणांमुळें सर्व राजनिष्ट प्रजेस माझी अशी नम्र सुचना आहे कीं, सर्वत्रांनीं संयुक्त संस्थानांतील राष्ट्रीय ऐक्याचें संरक्षण करावें आणि आजपावेतों जीं संकटें सहन केलीं त्याबद्दल योग्य दाद माग-

ण्याचा प्रयत्न करावा " इतका मजकूर सदरहु जाहिरनाम्यांत लिहून पुढें तो ह्मणाला :—" जाहिरनाम्याप्रमाणें जें सैन्य येईल त्याची योजना बहूतकरून संयुक्त संस्थानानें जे जे किल्ले व जीं जीं ठिकाणें गमाविलीं असतील ते सर्व पुनः हस्तगत करून घेण्याचे कामीं करण्यांत येईल. हें काम करितांना देशांतल्या शहरांतील नागरिक लोकांच्या शांततेचा भंग होतां कामा नये, त्यांच्या हरएक प्रकारच्या मिळकतीचें संरक्षण झालें पाहिजे आणि त्यांच्या दररोजच्या चालू कामांत कोणताही व्यत्यय येतां कामां नये, हे सर्व अत्यंत सावधागिरीनें झाले पाहिजे. या हकीकतीवरून अब्राहाम याचे समोर जरी मोठमोठ्या समरांगणांचीं महाद्वारें मोकळीं झालीं होतीं तरीपण अशा ऐन आणीबाणीच्या व परिक्षेच्या वेळीं त्यानें शांत चित्त ठेऊन कोणासही आपण होऊन युद्ध करण्याची उत्सुकता होऊं दिली नाहीं. सदरहु जाहिरनाम्यांत बंडखोरांनीं आपआपलीं शस्त्रें खालीं ठेऊन एकदम निघून जाण्याबद्दल स्पष्टपणें बजाविलें होतें. तशीच आणीबाणीची वेळ आल्यास व्यवस्था नीट राहावी अशा हेतूनें त्यानें राष्ट्रीय सभेच्या सभासदांनीं इ. स. १८६१ च्या जुलई मासच्या ४ थ्या तारिखेस राष्ट्रीय राजधानींत एकत्र होण्याचें ठरविलें.

दक्षिणेकडील लोक युद्धाची तयारी फार दिवसापासून क-

रीत होते परंतु उत्तरेकडील संस्थानांची तशी तयारी नव्हती. बुशननच्या मंत्रिसभेंतील सभासदांनीं, त्यांना जेव्हां अनुकूलता होती तेव्हां दाक्षिणेकडील संस्थानांत हल्ला आणि बचाव करण्याचीं साधनें बरींच करून ठेविलीं होतीं परंतु त्यांचा उपयोग संयुक्त संस्थानास मात्र होऊं दिला नाहीं. उत्तरेकडे अब्राहाम यानें जी लोकांची मागणी केली त्यामुळें लोकांस उत्साहाचें भयंकर स्फुरण उत्पन्न झालें होतें. दक्षिणेकडील मंडळी उत्तरेकडील लोकांची या कामीं अतिशय थट्टा करीत होते. अब्राहाम यानें सैन्याची मागणी केल्याची हकीकत ऐकून सरहद्दीवरील संस्थानांतील लोकांनीं मात्र नाकें मुरडलीं. व्हर्जिनिया, मिसौरी, टेनिसी, मेरिलँड वगैरे कडील स्थिति पाहून अध्यक्ष आपल्या सल्लागारांसहीत मोठ्याच काळजींत पडला होता. प्रत्यक्ष लढाईस प्रारंभ झाल्यानंतर बरेच दिवस पर्यंत सरहद्दीवरील संस्थानें बंडखोरांचे जूटांत जाऊन मिसळतात अगर संयुक्त संस्थानांच्या पक्षांत येऊन मिळतात हा एक मोठ्या महत्वाचाच विषय झाला होता. जर ते बंडखोरांकडे जाऊन मिळाले तर आपली भयंकर हानि होऊन आपण सर्वस्वीं आंचवणार असें अध्यक्षास वाटत होतें. जर ते तटस्थवृत्तीनें राहिले तरी त्यांच्या मनाचा कल बंडखोराकडेसच राहील व उत्तरेकडील राजनिष्ट प्रजेशीं युद्ध करण्यासाठीं बंडखोर लोक लष्कराचा मुक्काम त्यांच्याच हद्दींत करतील असा रंग दिसत होता. ह्या

बाबतींसंबंधी आणि वॉशिंग्टन् येथील राजवाड्यावर बंडखोरांचा विजयध्वज फडकेल आणि अब्राहाम हा आपल्या सभासदासहीत परागंदा होईल अशा मतलबाचे लेख वर्तमानपत्रांतून एकसारखे येत होते.

डिलावेअर येथील गव्हर्नरानें स्वतःच्या संस्थानावर जुलूम होऊं नये ह्मणून लोकसंरक्षणार्थ फौजेची मागणी केली; राष्ट्रीय सरकाराकडून सैन्याची मागणी आल्यास त्यानें असें उत्तर देण्याचे ठरविलें कीं ' फौज तयार नाहीं, परंतु स्वखुषीनें लढाई करणारे लोक गोळा करावे ह्मणजे ते स्वदेशाचें रक्षण करून राष्ट्रीय सरकारासही मदत करतील. ' मेरिलँड येथील गव्हर्नरानें सुद्धां आपल्या संस्थानाच्या रक्षणार्थ कांहीं शिबंदी पलटणींची मागणी केली. व्हर्जिनियाच्या गव्हर्नरानें सैन्य मागवून, ' दक्षिणे कडील संस्थानें हस्तगत करण्याचा प्रयत्न करितां हें चांगलें नव्हे आणि ही तुमची राज्यकारभाराची पद्धत अगदीं गैरशिस्त आहे, ' अशी अब्राहाम यास धमकी दिली. उत्तर कॅरोलिना येथील गव्हर्नरानेंही त्याच धोरणानें चोख उत्तर पाठविलें कीं या तुमच्या युद्धांत आम्ही मुळींच सामील होणार नाहीं; केंटकीच्या गव्हर्नरानें ही त्याच नमुन्याचा जबाब दिला कीं दक्षिणेकडील आमच्या देशबांधवांस जिंकण्याचा तुमचा दुष्ट मानस आहे सबब आमच्या

संस्थानाकडून तुम्हांस कांहींएक मदत मिळणार नाहीं. टेनिसी आणि अर्कान्सस् येथील गव्हर्नरांनीं सुद्धां तसेच जबाब पाठविले; आणि मिसौरीच्या गव्हर्नरानें राष्ट्रीय सरकाराच्या विरुद्ध युद्धांत सामील होऊन स्पष्ट कळविलें कीं तुमचें हें कृत्य अगदीं गैरशिस्त असून द्वेषबुद्धीचें आहे सबब आम्ही तुम्हांस सामील होत नाहीं.

वरील संस्थानांच्या गव्हर्नरांचे वरील उद्गार खरोखरच विलक्षण प्रकारचे होते. हीं संस्थानें अमेरिकेंतल्या लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतलि असून मोठ्या महत्वाचीं होतीं; परंतु हल्लीं कालगतीनें त्यांचे दोन पंथ झाले होते. एका पंथांतले लोक गुलाम बाळगण्याच्या पुरातन पद्धतीचे अनुयायी होते आणि दुसऱ्या पंथांतले लोक ( उत्तरे कडील म्हणजे स्वतंत्र संस्थानांतील लोक ) वरील पद्धतीचे द्वेष्टे होते. या दोन्ही पंथांतली सद्य स्थिति व अन्योन्य प्रवृत्ति कशी होती हें वरील हकिकती वरून स्पष्ट कळत होतें.

उत्तरे कडील राजनिष्ट प्रजेचीं जीं उत्तरें आलीं तीं वरील गव्हर्नरांच्या उत्तरांहून अगदींच भिन्न होतीं. मॅसेचुसेट्स् येथून स्पष्ट उत्तर आलें कीं जर बंडखोरांवर हल्ला करणें असेल तर प्रथम आम्ही चाल करून जाण्यास एका पायावर सिद्ध आहोंत. जॉन. ए. ऍंड्रयु हा तेथील गव्हर्नर असून संयुक्त

संस्थानाचा एकनिष्ठ भक्त होता. अब्राहाम याच्याकडून सैन्याच्या मागणीसंबंधीचा जाहिरनामा त्याला पोंहचल्यावर त्यानें ४८ तासांत ४ पलटणी पाठवून देतों असा जबाब पाठविला. नॅथॅनियल पी. बॅंक्स हा कांहीं वर्षांपूर्वी मॅसेचुसेट्स्चा गव्हर्नर असून त्यानें पुढील भविष्य लक्षांत आणून शिबंदी लष्कराची फारच उत्तम व जैयत तयारी ठेविली होती व त्यामुळेंच हल्लींच्या आणीबाणीच्या प्रसंगीं जॉन् ऍंड्र्यु गव्हर्नर याजला वरप्रमाणें तयारीचा जबाब ताबडतोब पाठवितां आला. ऱ्होड बेटाचा गव्हर्नर विल्यमस्प्रेग यानें एक हजार पायदळ व तोफखान्याची पलटण राष्ट्रीय सरकाराकडे पाठविण्याचें ठरवून व आपण या सर्वांचा मुख्य होऊन वॉशिंग्टन् येथें एकदम चालता झाला. न्यूयॉर्क येथील गव्हर्नर मॉरगन आणि पेन्सिल्वेनिया येथील गव्हर्नर करटिन् या उभयतांनींही वर प्रमाणेंच मोठ्या दक्षतेनें राष्ट्रीय सरकारास मदत केली. बंडखोरांचें सैन्य घेरा घालण्याच्या ऐन बेतांत होतें, अशा वेळीं पेन्सिल्वेनियाची पलटण शत्रूशीं टक्कर घेऊन त्यास पादाक्रान्त करण्यास वॉशिग्टन् येथें प्रथमच येऊन थडकली. अब्राहाम याजवर वायव्य दिशेकडील प्रजेचें इतकें प्रेम होतें कीं ते त्याला देवाच्या ठिकाणीं मानीत असत. त्यांनीं संयुक्त संस्थानाच्या संरक्षणार्थ दिव्यशस्त्रास्त्रें घेऊन एका पायावर तयारी केली. ओहिओकडून तेरा हजार लष्कर सिद्ध होऊन आलें होतें. एका आठवड्यांत

त्या संस्थानाचा कडकडीत देशभक्त गव्हर्नर डेनिसन याच्या सेवेस तत्पर होण्यास ७१००० लोक तयार झाले.

उत्तरेकडील स्वतंत्र संस्थानाचे सर्व लोक विस्तवाप्रमाणें तांबडेलाल होऊन त्यांचा स्वभावही अतिशयच उग्र झाला होता. देशाप्रीत्यर्थ बाके आणि मर्द शिपाई कडेकोट सज्ज हो-ऊन आणि हिमतीचे कोट बांधून समरांगणांत धडाधड उड्या टाकण्यास सिद्ध होते; देशाप्रीत्यर्थ, कीर्तिध्वजासाठीं आणि स्वातंत्र्यासाठीं एका हातांत शिरकमल घेऊन व दुसऱ्या हातानें खड्ग उपसून शूर योद्धे प्राणांस तृणसमान मानीत होते आणि उन्मत्त झालेल्या बंडखोरांस खालीं पाडून त्यांचें हृदयावर पाय ठेविण्यास तयार होते. ह्या एकंदर हकिकतीवरून हें वर्णन अ-तिशयोक्तीचें आहे असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं.

अब्राहाम यानें ७५००० सैन्याची मागणी केली होती परंतु पांच लक्ष सैन्य मागणी होतांच शस्त्रास्त्रें घेऊन शत्रूंवर एकदम तुटून पडण्यास तयार होऊन आले होतें. लोकसत्ताकस्वतंत्र-पक्षाचे हद्दींत जीं जीं मोठीं शहरें होतीं तेथील निवडक शि-पाई या सैन्यांत होते. बाळपणापासूनच या शिपायांस स्वदेशा-भिमानाचें शिक्षण चांगलें मिळालें असल्यानें देशोन्नतीचें स्फुरण त्यांचे अंगांत स्वभावतः जागृत होतें, व हा सद्गुण आजन्म

त्यांचें आंगवळणींच पडला होता असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. लोकसत्ताक स्वतंत्र राज्याच्या स्वातंत्र्यासाठीं लढून लढून आपल्या पंच प्राणांची आहुति देण्यास सुद्धां जे डगमगले नाहींत असे थोर मनाचे शूर पुरूष व शूर स्त्रियांचीं कुलिन घराणीं तेथें होतीं आणि त्यांचेच तेजस्वी वीरपुत्र अब्राहाम याचे सैन्यांत होते. स्वातंत्र्य आणि ऐक्य हा त्यांचा खुणेचा शब्द होता. हे वीरपुत्र जेव्हां समरांगणांत जात होते तेव्हां त्यांचीं मातापितरें दुःखाश्रू ढाळीत नसून आनंदाश्रू ढाळून परमेश्वराची प्रार्थना करीत होते व "बाळांनो, विजयी होऊन या" असा आशीर्वाद देऊन त्यांची पाठ थोपटीत होते.

हिंदुस्थानाच्या इतिहासांत शिवाजी महाराज ज्यावेळीं अफझुलखानाचा वध करण्यास निघाले व इष्टदेवतेचें व मातेचें अनुमोदन घेण्यासाठीं गेले त्यावेळीं वीरमाता जिजाबाई ह्यांनीं माहाराजास आशीर्वाद दिला; ही हकीकत वाचकांस माहीत असेलच, तो आशीर्वाद खालीं लिहिल्याप्रमाणें:—॥ भो अंबे जगदंब माय ! म्हणुनी वंदूनिया देविला ॥ मातेतें नमुनी सदाशिस शिरीं तो घेउनी चालिला ॥ ( जिजाबाई म्हणाल्या ) कुंतीच्या परि धन्यतेस मजला ने राज्य हें साधुनी ॥ वीरांना उचिता अशी करि कृती जा धर्म ये मागुनी ॥ १ ॥ कुंतीच्या अजि पंगतीस

बसवी तूं शीवबा रे मला ॥ भीमें कीचक मारुनी भुजबळें कीर्तिध्वज् लाविला ॥ तैसें या समयीं करूनि सकलां कौतुक हें दाविजे ॥ अफझुला वधुनी स्वभाळिं टिकला त्या शोणितें लाविजे ॥ २ ॥. परमेश्वरा ! याच वीर माता, आणि याच वीरसूला प्रसावलेले हे वीर पुत्र, खरोखरच धन्य होत.

संयुक्त संस्थानाच्या शाश्वतास्तिव लढत असलेल्या वीरांच्या विजयार्थ प्रत्येक देऊळ ईशप्रार्थनेच्या घोषानें दणाणून गेलें होतें. सांपत्तिक दृष्टीनें निकृष्टावस्थेंत आलेल्या राष्ट्रीय सरकारासाठीं मोठमोठ्या पेढ्यांतील खजिन्यांचीं द्वारें मोकळीं केलीं होतीं. संस्थानांतल्या कायदे करणाऱ्या मंडळींनीं आणि धनिक लोकांनीं वर्गण्या काढून राष्ट्रीय सरकारास पैशाची चांगली मदत केली. समरांगणांत गेलेल्या वीरांच्या बायकापोरांच्या निर्वाहासाठीं मोठमोठ्या रकमा जमा झाल्या. शहरांतल्या गल्ल्यांत, लोकांच्या घरोघर, व प्रत्येक सार्वजनिक गमतीच्या ठिकाणीं, रणगीतें व रणवाद्यें ऐकू येत असून जो आपखुशीनें लढाईंत जाऊन मृत्युमुखीं पडण्यास सिद्ध होईल अशा शूर मूर्तीस त्यावेळीं सर्व लोक फार पूज्य मानून आपलें आराध्यदैवत समजत होते. सेनेटर, सभासद, राष्ट्रीय कामांत निपुण असलेले आणि युद्धास जाण्यास अशक्त, अशा सर्व मंडळींची गर्दी वॉशिंग्टन् येथें लोटली व तेथें सरकारी नोकरी कशा रितीनें करावी याची ते सर्व

वाटावाट करीत होते; कारण युद्धास जाण्यास या सर्व मंडळींस शस्त्रें वगैरे तात्काळ मिळालीं असतीं तर हे लोकसुद्धां मॅसेचुसेटस् येथील लोकांप्रमाणें शत्रूवर चाल करून गेले असते.

सम्टर् किल्ल्यावर तोफ सुटण्याचे पूर्वी अब्राहाम यास दिवस अतिशय उदास वाटत होते. राजनिष्ट प्रजेवर त्याची श्रद्धा कायम होतीच तरीपण अभद्र भाषणें व दुःखाचे आक्रोश चहूंकडून त्याचे कानांवर एकसारखे वज्राप्रमाणें प्रहार करीत असल्यानें त्याचें धारिष्ट किंचित् खचल्यासारखें झालें. या औदासिन्य स्थितींत सर्व माणसांच्या आक्रोशाचा एकच मोठा भयंकर ध्वनि त्याच्या कानावर तोफेच्या गोळ्यासारखा आदळला, परंतु लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतले लोक दृढनिश्चयी असल्यामुळें आणि या बंडखोरांचा बीमोड करण्याची त्यांची प्रतिज्ञा होती त्यामुळें अध्यक्षास चांगली उमेद चढली. उत्तरेकडून हजारों पावलांचे ध्वनि ऐकूं येत होते; हीं पावलें बलाढ्य सैन्यांतील लोकांची असून देशांतील दुही मोडून अपमान करण्याच्याच हेतूनें खालीं पाडलेला कीर्तिध्वज पुनः उभा होईपावेतों स्थीर व्हावयाचेंच नाहीं असा या सैन्यांतील लोकांनीं विडाच उचलला होता.

वरील प्रकारामुळें लोकांस अधिक उमेद आली व त्या

उमेदीचे भरांत वॉशिंग्टन् शहरास संकटांतून मुक्त करण्यासाठीं एक पलटण चाल करून जात असतां बाल्टिमोर येथें बंडखोरांच्या टोळीनें तीजवर तोफेचा भडिमार चालविला. ज्या पलटणीवर तोफा सोडण्यास प्रारंभ झाला ती मॅसेचुसेटस् येथील सहावी पलटण होती. या पलटणीची चाल करून जाण्याची हकीकत देशाच्या इतिहासांत संग्रहणीय आहे यांत संशय नाहीं, कारण त्यामुळें स्वदेशाभिमानाचें स्फुरण सर्वत्र व्यक्तिशः उत्पन्न झालें होतें. लोकसत्ताक स्वतंत्र संस्थानांच्या सरहद्दीवरून जाण्याचा या पलटणींतल्या लोकांचा मार्ग असल्यामुळें ठिकठिकाणीं त्यांचे प्रीत्यर्थ आनंद प्रदर्शन होऊन त्यांना उत्तम सन्मान मिळाला. आगगाडीपाशीं स्त्रियांची अतिशय गर्दी उसळली असून या तरूण योद्धे मंडळीस, बक्षिसें, जयपताका आणि वाद्यें देऊन उत्तेजक शब्दांची जणूं काय त्यांचेवर त्या वृष्टीच करीत होत्या. ही मंडळी चाल करून समरांगणांत जात आहेत ही बातमी चहूंकडे पसरतांच इतर तरूण लोकांस ही त्यांच्या प्रमाणेंच नवें स्फुरण उत्पन्न होऊन ते त्यांचे बरोबरच मिसळून जात होते. व्यापारी वर्गानीं आपआपल्या रोजकीर्दी तूर्त बंद करून ते सर्व हा हृदयंगम देखावा पाहण्यास चालते झाले. हें सैन्य चाल करून जात आहे एवढें बाल्टिमोरास समजलें मात्र तों तात्काळ जिकडे तिकडे राजद्रोहाचें स्फुरण जागृत झालें. याच बाल्टमोर शहरांत अब्राहाम यास राष्ट्रीय राजधानीस जातांना ठार मारण्याचें

कृष्णकारस्थान चाललें होतें. बंडखोरांच्या एका टोळीनें बंडाचें निशाण उभें करून अकस्मात् राहदारीच्या रस्त्यावर मॅसेचुसेट्सच्या या पलटणीस गांठून हल्ला केला आणि एप्रिलच्या १९ व्या तारिखेस त्यांतील कांहीं लोकांस यमसदनीं पाठविलें व कांहीं घायाळ केले. सर्व शहरांत एकच आकांत उडाला.

या मुळें सर्व देशभर भयंकर चळवळ उत्पन्न होऊन उत्तरेकडे तीचा अगदीं कळस झाला होता. दक्षिणेकडे सर्वत्र आनंदाचीं मंगल वाद्यें ऐकूं येऊं लागलीं. कोणत्याही लष्करी तुकडीस संस्थानाच्या सरहद्दी वरून राष्ट्रीय राजधानीच्या संरक्षणार्थ जाऊं द्यावयाचें नाहीं असा बंडखोरांनीं दृढ निश्चय केला होता. मेरिलँड् हें गुलाम बाळगणाऱ्या संस्थानांपैकीं एक संस्थान असून तेथील गव्हर्नर मिस्तर हिक्स् याची तर भीतीनें अगदीं गाळणच उडाली व बाल्टिमोरच्या रस्त्यानें आतां तरी कृपाकरून लष्करी लोक येऊं नयेत अशी त्यानें अध्यक्षास विनंति केली; आणि या पुढें जर तुम्हीं नेलेंत तर मी या बद्दल मुळींच जबाबदार नाहीं असें त्यानें चोख कळविलें. वॉशिंगटन् येथें इंग्रजांचे कारभारी लॉर्ड लियॉन्स यांना सरपंच नेमून उत्तर व दक्षिण यांचे मधील तंटा त्यांचे मताप्रमाणें मिटवावा अशी ही त्यानें अध्यक्षास सुचना केली. बॉल्टिमोर मधून लष्कर नेण्यासंबंधी अब्राहाम यानें फारसा आग्रह धरिला नाहीं आणि शह-

राच्या बाजूनें लष्कर नेण्याची जनरल स्कॉट यानें युक्ति काढिल्यामुळें या संबंधांत त्याचे वरच सर्व भरंवसा ठेविला. सरपंच नेमून तंट्याचा निकाल करण्याचे संबंधांत अब्राहाम यानें आपल्या नेहमींच्या शहाणपणास अनुसरून गव्हर्नर हिक्स् याचे सुचने संबंधी सेक्रेटरी याजकडे लिहून पाठविलें. सेक्रेटरी सिवर्ड यानें, मागें एकदां इंग्रज सरकारांनीं इ. स. १८१२ चे लढाईत मेरिलँड्ची राजधानी जाळून टाकिली होती त्या बद्दल, उल्लेख करितानां गव्हर्नर हिक्स् यास कळविलें कीं ' अमेरिकेंतल्या संयुक्तसंस्थानाचा जनरल, राजधानीचें रक्षण करण्यासाठीं सैन्य घेऊन आला होता त्यावेळीं मेरिलँड् येथें कोठें ही त्याची अप्रतिष्ठा झालेली नाहीं, अशीही वेळ एकदां मागें गेली आहे, ' शिवाय तो असें ही म्हणाला कीं ' मेरिलँड् येथील लोकांचें सर्व औदार्य नाहींसें झालें असलें तरी त्यांचा एकादा गुण तरी राहील असें वाटतें आणि तो हा कीं, आपआपसांतील तंटा परकीय लोकांपाशीं कधींच नेऊं नये आणि निदान युरोपियन एक राजसत्तेकडे तर मुळींच नेऊं नये. '

मॅसेचुसेटस् येथील सहाव्या पलटणीवर हल्ला करून तिची अगदीं दुर्दशा उडविल्या नंतर उत्तरेकडील व पश्चिमेकडील संस्थानें आणि बाल्टिमोर या दोहोंच्या हद्दींमधील पूल शत्रूनीं पाडून त्याचा विध्वंस केला. राष्ट्रीय राजधानी संबंधी लोकांस

कांहीं वेळ जास्त भीति उत्पन्न झाली. आपखुशीनें लढणारी राजनिष्ट सैन्याची एक तुकडी आणि त्या तुकडीचा पुढारी कर्नल चार्लस्. पी. स्टोन याचा मात्र राष्ट्रीय राजधानीस मोठा आधार होता. मशारनिल्हे कर्नल यानें पूर्वी एकदां बंड करण्यास प्रवृत्त असलेल्या मंडळीस हुडकून त्यांचीं शस्त्रें घेऊन वाताहात केल्यानें देशाची मोठी कामगिरी बजाविली होती. बंडखोरांचा उद्देश, राजधानी व तेथील मिळकत काबीज करण्याचा होता. आगगाडीचा संबंध तुटल्यामुळें सैन्यांतील लोकांस, बाल्टमोर शहरास वळसा घालून समुद्रांतून प्रवास करणें भाग पडलें. गव्हर्नर हिक्स् यानें जरी पुष्कळ आढेवेढे घतले तरी त्यास न जुमानितां मॅसेचुसेटस्चे पलटणीचा व न्यूयार्कचे सातवे पलटणीचा मुख्य पुढारी जनरल बि. एफ. बट्लर यानें मेरिलँडची राजधानी ऍनापॉलिस येथें सर्व लष्करी लोक नेले व तेथून वॉशिंगटन् शहरच्या बचावास पाठविले. एके दिवशीं रात्रींच्या वेळीं आकाश मेघानें व्याप्त होऊन जिकडे तिकडे काळोख पडला होता, वारा पाऊस मी ह्मणत होता आणि विजेचा कडकडाट चालू होता, अशा तुफानामध्यें रात्रींच्या वेळीं जनरल बट्लर यानें अकस्मात बाल्टिमोरास जाऊन तेथील किल्ल्याप्रमाणें मजबूत ‘ फिडरल्हिल् ’ नांवाची टेकडी आपल्या हस्तगत करून घेतली. बंडखोर लोक अतिशय भिऊन गर्भगळीत झाले; कित्येकांवर खटले केले आणि कित्ये-

कांना मुसक्या बांधून तुरुंगाच्या अंधार कोठड्या दाखविल्या. बंडखोरांची अशी सैरावैरा धांवपळीची अव्यवस्थित स्थिति झाल्यामुळें संयुक्तसंस्थानाचें लष्कर बाल्टिमोर मधून सुरक्षित जाऊं शकलें. मेरिलँडयेथील राजनिष्ट प्रजेनें आपली एकनिष्टा लागलींच प्रगट केलीं व संयुक्त संस्थानाच्या विरुद्ध आम्ही कोणतेंच वर्तन करणार नाहीं अशी खातरी करून हजारों लढाऊ लोक संयुक्त संस्थानाच्या मदतीस तेथील लोकांनीं दिले. हें युद्ध चालू असतांना गव्हर्नर हिक्स् याच्या सांप्रतच्या युद्धाची मुदत संपल्यामुळें तो संयुक्तसंस्थानाचा सेनेटर झाला व आमरणांत त्यानें संयुक्तसंस्थानाची एक निष्टपणें सेवा करून देशभक्ति प्रगट केली.

इ. स. १८६१ च्या एप्रिल महिन्याच्या १९ व्या तारिखेस अध्यक्ष अब्राहाम लींकन यानें एक जाहिरनामा काढिला आणि त्यांत टेक्सस्, लुइतिआना, मिसिसिपी, अल्बामा, जॉर्जिया, फ्लॉरिडा, आणि दक्षिणकॅरोलिना ह्या बंदरांची नाकेबंदी करून कोणीही त्याबंदरांशीं व्यापारी संबंध ठेऊं नये असें जाहिर केलें. युद्धांत सामील होणारीं कोणकोणतीं संस्थानें ठरलीं आहेत हें स्पष्ट समजण्यासाठीं वरील हकिकत फार महत्वाची आहे. एक आठवड्यानंतर व्हार्जीनिया आणि उत्तर कॅरोलिना या दोन्हीं संस्थानांस बंडखोरांनीं लबाडीनें आपलेंसें करून घे-

तलें आणि त्यामुळें वरील बंदरांचे यादींत वरील दोन्ही संस्थानांचीं बंदरें वाढऊन त्या सर्वांची सुद्धां नाकेबंदी केल्या बद्दल अध्यक्षानें एक पुरवणी जाहीरनामा प्रसिद्ध केला. इ. स. १८६१ च्या मे मासच्या ३ऱ्या तारीखेस अब्राहाम यानें आणखी सैन्याची मागणी केली आणि त्या मागणींत ३९ पलटणी ( पायदळ ) एक पलटण घोडे स्वरांची आणि आपखुशीनें लढणाऱ्या १८००० सैन्याची व आरमाराची जरूर आहे असें स्पष्ट दर्शविले होतें. आणखी कांहीं खुटतील ते लोक चालु लष्करासाठीं मागवून अध्यक्षानें २२७१४ सैन्य जय्यत तयार केलें. जीं संस्थानें संयुक्त संस्थानापासून भिन्न झालीं होतीं त्यांचीं बंदरें सर्व बंद करून जगाशीं त्यांचा व्यवहार बंद केला. राष्ट्रीय राजधानींत सर्व सैन्याचा तळ पडला असून सर्व सैन्यासाठीं आणि आरमारासाठीं अन्नपाण्याची बेगमी यथास्थीत करून ठेविली होती.

व्हर्जिनिया येथें सभेची बैठक झाली त्यावेळीं सभासदांनीं अध्यक्षास वकिलाबरोबर एक निरोप पाठविण्याचें ठरविलें. एकजुटांतल्या संस्थानांसंबंधी राजकीय धोरण कोणत्या रितीनें योजण्याचें त्यानें धारिलें आहे अशा आशयाचा निरोप असून तो अध्यक्षाकडे रवाना झाला. संयुक्त संस्थानाचा व्हर्जिनियाशीं कांहीं एक संबंध नसून तें अगदीं विभक्त आहे असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं असें

सभासदांचें ह्मणणें होतें. अब्राहाम याजकडे वरप्रमाणें निरोप पाठविण्याचा हा केवळ बाहाणा काढिला होता. ' मला अधिकार देण्याचे वेळीं झालेल्या समारंभाच्या माझ्या भाषणांत वरील निरोपाच्या साग्र व स्पष्ट उत्तराचा समावेश झाला आहे' असें अब्राहाम यानें रितीप्रमाणें कळविलें. ' सरकाराच्या मालमिळकतीचें यथोचित रक्षण करण्यासंबंधी व या बाबतीशिवाय अन्य कोणतेंही प्रसंगीं कोणाशींही लढाई वगैरे व्हावयाची नाहीं अशाबद्दल सर्व उल्लेख त्या माझ्या भाषणांत खुलासेवार आहे ' असें ही त्यानें निक्षून आणखी कळविलें. " सम्टर् किल्ला आणि अशाच सरकारी ज्या ज्या मिळकती बंडखोरांनीं घेतल्या असतील त्या त्या पुनः माझ्या हस्तगत होईपावेतों मी वरचेवर सैन्य जमवून यूद्ध करणार, ही गोष्ट निर्विवाद आहे. ज्याअर्थी सम्टर् किल्लयाचा कबजा बंडखोरांनीं घेतला आहे त्याअर्थी आतां संयुक्त संस्थानें व विभक्त झालेलीं संस्थानें या उभयतांचा डांकेचा संबंध तोडून टाकणें अत्यावश्य दिसत आहे. मुलकी खात्यासंबंधी जमिनीचें उत्पन्न लोकांकडून वसूल करण्यासाठीं त्यांच्याशीं लढाई करणें मला पसंत नाहीं, फक्त बंडखोरांनीं जीं जीं लष्करी ठिकाणें घेतलीं आहेत तीं तीं पुनः हस्तगत करण्याचे कामींच सैन्याचा उपयोग व्हावयाचा आहे " एवढ्या बाबती त्यानें स्पष्ट कळविल्या.

राज्यांतल्या मालमिळकतीचा हरप्रयत्नें बचाव करणें ही अब्राहाम याची राजनीतिदृष्ट्या ठरीव पद्धत होती. त्या मिळकती हस्तगत करण्याच्या कामीं सैन्य खर्चीं घालावें लागलें ही गोष्ट जर खरी आहे तर मग त्या परत हस्तगत करून त्यांचें संरक्षण करण्याचें कामीं वरचेवर सैन्य खर्चीं घातलेंच पाहिजे असें त्याचें ह्मणणें होतें. त्यावेळपावेतों अब्राहाम याचे हुकुमान्वयें सर्व पोष्टखात्याचा एक मुख्य उपरी नेमिला असून तो सर्व संस्थानांत डांकेचा व्यवहार अव्याहत चालवीत होता, परंतु राष्ट्रीय सरकार आणि एक जूट झालेलीं संस्थानें यांतील अन्योन्य व्यवहारास कांहींच अडथळा आलेला नव्हता. बंडखोरास जिंकून आपले पक्षांत घेण्यासंबंधी पुष्कळ लोकांनीं अब्राहाम यास सल्ला दिली आणि त्यानें मोठ्या धैर्यानें ती मान्य केली. जरी असा सुखाचा दिवस यावयाचा नाहीं अशी त्याची खातरी होती तरीपण त्या सल्लेचाविरुद्ध त्यानें कांहीं एक अघटित केलें नाहीं. खदिरांगारा प्रमाणें तप्त झालेले बंडखोरांचे पुढारी युद्धाचें पहिलें निशाण उभारण्यासाठीं अगदीं टपून बसले होते; अशा त्यांच्या स्थितींत म्हणजे प्रज्वलित अग्नींत तेल ओतून बंडखोरांशीं युद्ध चालविण्या संबंधी कोणतेंच कृत्य करावयाचें नाहीं, असा अध्यक्षाचा बेत होता. अब्राहाम यानें फक्त संयुक्त संस्थानाच्या हक्काचें रक्षण करणें या पलिकडे कांहीं एक करावयाचें नाहीं असा निश्चय केला होता.

अब्राहाम याच्या उत्तरास व्हर्जिनिया येथलि वकिलांनीं मुळींच गणकारिलें नाहीं. बहुमतानें व्हर्जिनिया हें संयुक्त संस्थानाहून भिन्न राहण्याचेंच ठरून मोठ्या युद्धासाठीं रणभूमि ही येथेंच कायम झाली. रिचमंड ही या संस्थानाची राजधानी असून तिला आतां एक जुटांतल्या संस्थानाची राजधानी म्हणत होते. अल्बामा येथून सर्व कचेऱ्या या शहरांत नेल्या होत्या. ता. १७ एप्रिल रोजीं लोकमत घेऊन ता. २१ मे रोजीं राजधानीचें ठिकाण बदललें. बंडखोरांनीं व्हर्जिनिया येथील हार्पर्सफेरी आणि नेव्हीयार्ड नांवाची सरहद्दीवरील महत्वाचीं बंदरें हस्तगत करून घेतलीं. ह्या हार्पर्सफेरी बंदरांत लढाईचीं हत्यारें वगैरे तयार करण्याचे कारखाने होते. हीं दोन्ही बंदरें बंडखोरांच्या अत्यंत उपयोगी पडण्यासारखीं होतीं. नेव्हियार्ड नांवाच्या बंदरांत लढाऊ हत्यारें, तोफखाने, बंदुका, तारवें, आगबोटी वगैरे सुमारें ८–१० लक्षांचें सामान सांठविलेल्या वखारी होत्या. राष्ट्रीय सरकाराच्या माजी सभासदांनीं विश्वासघात करून हीं बंदरें शत्रूंचे हातीं जाऊं दिलीं. ह्या बंदरांत युद्धास ज्या ज्या बाबती उपयोगी होत्या त्यांच्या बळावर हे बंडखोर स्वतःस अजिंक्य समजत होते. वॉशिंग्टन् येथील भव्य राजवाड्यावर स्वतःचें विजय निशाण उभारण्याबद्दल त्यांची प्रतिज्ञा होती.

इ. स. १८६१ च्या वसंत ऋतुचे आरंभीं दोन शोचनीय मृत्यु

झाले व त्यांचा अब्राहाम याच्याशीं फार निकट संबंध होता. अध्यक्षाच्या जागीं नेमणूक झाल्यावर अब्राहमयाजबरोबर इलीनाइस् येथून जे लोक आले त्यापैकीं स्प्रिंगफिल्ड् येथिल न्याय कचेरींत असलेला एक तरूण एल्मर ई. एल्स्वर्थ याच्या शौर्या मुळें हल्लींच्या प्रसंगीं एक मोठी मदत झाली होती; कारण हा शूर असून कडकडीत देशभक्त होता, व युद्धाच्या बाबतींत तो अब्राहाम याच्या फार उपयोगी पडला होता. युद्धाच्या पूर्वी एल्स्वर्थ यानें शिकागो येथील तोफा, बंदुका, सोडणाऱ्या लोकांपैकीं झुन्स् नांवाची एक मंडळी स्थापन करून आणि नाना प्रकारचे आश्चर्योत्पादक देखावे मोठया चातुर्यानें लोकांस दाखवून थक्क करून सोडिलें होतें. हल्लींच्या संयुक्तसंस्थानाच्या फौजखात्यांत त्याची दुसऱ्या लेफ्टनंटच्या जागीं नेमणूक झाली असून त्यानें न्यूयॉर्क येथें जाऊन तेथील तोफखान्यापैकीं कांहीं लोक पसंत करून तशीच एक पलटण तयार केली. ह्या पलटणीस न्यूयॉर्क येथील अकरावी पलटण ह्मणत होते. मे महिन्याच्या २३ व्या तारिखेस सांयकाळीं कर्नल एलस्वर्थ याच्या झुव्स पलटणीस पुष्कळ सैन्य बरोबर देऊन राष्ट्रीय राजधानीच्या समोरील वॉशिंग्टन् आणि अलेक्झांड्रीया येथून दिसणाऱ्या उंचटेकड्या ( लहानाकिल्ले ) हस्तगत करण्यास पाठविले. दुसऱ्या दिवशीं अलेक्झांड्रिया पैकीं मार्शल हौसच्या शिरा-

रावर जेव्हां बंडखोरांचें निशाण फडकतांना त्यानें पाहिलें तेव्हां लागलीच त्या इमारतींतून शिखरापावेतों जाऊन त्यानें तें खालीं पाडिलें आणि हातांत घरून जिन्यावरून खालीं घेऊन येत असतांना तेथील एका संत्र्यानें त्याच्यावर गोळी घालून तेथेंच त्याला ठार केलें. हातांत निशाण धरिलेलें आणि अंगांतून एक सारखें रक्त चालू असलेल्या एलस्वर्थास पाहून कोणाचे अंगावर रोमांच उभे राहणार नाहींत ? यांचेंच नांव राजनिष्ट व कडकडीत देशभक्त; अशा दृढनिश्चयी शूरांची कीर्ति या भूमंडळावर खरोखरच अजरामर राहते यांत संशय नाहीं. एलस्वर्थच्या अनुयायांपैकीं एकानें हें घोर कृत्य पाहून लागलीच त्या संत्र्याचा प्राण घेतला. त्याच्या अकालीं मरणामुळें सर्व देश हळहळत होता, व अब्राहाम यास किती दुःख झालें असेल त्याचें वर्णन करणें अशक्य होय; कारण त्याचा केवळ उजवा हातच गेल्याप्रमाणें झालें. एलूस्वर्थ याचे भावी कारकीर्दीविषयीं अब्राहाम यास मोठी आशा होती. त्याच्या अकालीं मरणानें त्यास इतकें दुःख झालें कीं तो त्याच्या प्रेतापाशीं कांहीं वेळ अश्रू ढाळीत बसला होता. एलूस्वर्थ याच्या अंगांतून वाहणाऱ्या रक्तानें बंडखोरांचें निशाण तांबडेंलाल झालें होतें, इतकेंच नव्हे तर त्यास जें सुवर्णपदक मिळालें होतें ते सुद्धां रक्तानें न्हालेंच आहे असें

दिसत होतें. या सुवर्णपदकावर असा लेख होता कीं "आपल्या एकट्यासाठींच नव्हे परंतु देशासाठीं."

स्टीफन् ॲर्नाल्ड डोग्लस हा बरेच दिवस आजारी पडून शेवटीं जून महिन्याच्या ३ ऱ्या तारिखेस मरण पावला. एप्रिल मासच्या १४ व्या तारिखेस तो अब्राहाम यास व्हाइटहौस येथें आपल्या मित्र मंडळीसह भेटला असून त्यांच्या परस्पर सल्लामसलती झाल्या होत्या. त्यावेळीं सर्व देशभर भयंकर चळवळ चालू असून फोर्ट सम्टर् किल्ल्यावर तोफांचा भडिमार चालू होता. हे दोन राजकारस्थानी पुरूष सल्ला मसलत करीत असतांना हत्यारबंद लोकांचे शब्द त्यांचे कानावर येत होते. अब्राहाम यानें या वेळ पावेतों जी मौन वृत्तीची दिशा पत्करली होती तिचे डोग्लस यानें मोठें अभिनंदन केलें व त्या बाबतींत पुष्कळ अनुभविक सुचना केल्या. डोग्लस आणि अब्राहाम याचे वरील विषयावरील झालेलें संभाषण एका स्नेह्यानें ऐकून त्यांतील तथ्यांश राजनिष्ट लोकांस कळविल्यामुळें त्यांना पूर्वीं पेक्षां दुप्पट बळ व देशाभिमान उत्पन्न झाला. डोग्लस् यास हें पसंत पडून त्याला मोठा संतोष झाला. दुसऱ्या महिन्यांत डोग्लस् यानें संयुक्त संस्थानांतल्या लोकांच्या सभा आहिओ व इलिनॉइस् येथें भरवून यथायोग्य भाषणें केलीं. मे महिन्याच्या अखेर तो बराच आजारी पडून शेवटीं जून ता. ३

रोजीं त्यानें या क्षणिक मायामोहानें व्यापिलेल्या सृष्टीस आखेरचा सलाम केला. डौग्लस यानें डोळे मिटल्यामुळें सर्व लोक अत्यंत हळहळले व अब्राहाम यास तर इतकें दुःख झालें कीं तो ढळढळां रडूं लागला, अशा वेळीं त्याच्या स्नेही मंडळीनें त्याचें सांत्वन केलें.

---



# प्रकरण २० वें.

## एकांतांतील उद्गार.

### उभयता वकिलांचा कारागृहवास व त्यांची सुटका. मोठ्या लढ्यास प्रारंभ.



जे अहोरात्र अशांत श्रम करीत आहे ते कोणासाठीं ? माझा एकट्याचाच स्वार्थ यांत कांहीं तरी आहे काय ? मी माझ्या स्थावर जंगम मिळकतीवर व मायापाशानें बद्ध झालेल्या माझ्या आप्तजनांच्या कळकळीवर तिलांजुली सोडिली इतकेंच नव्हे तर ज्याच्या पेक्षा जगांत कोणतीच गोष्ट अधिक प्रिय नाहीं अशा माझ्या पंच प्राणावर ही मी उदार झालों तो कशासाठीं या सर्वांचें एकच उत्तर होय, आणि तें हें कीं राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि ऐक्य या दोन बाबतीसाठींच मी हें साहस केलें. परमेश्वरा ! हें तूं जाणत नाहींस काय ? अरे दुष्टांचा जयजयकार आणि साधूंचा छळ तुला कसा आवडतो ? ज्या गोष्टीसाठीं मी अहोरात्र झटत आहे त्या कामीं परमेश्वरा ! तूं मला कसा रे प्रतिकूळ होतोस ? एल्स्वर्थ आणि डोग्लस माझे पाठिराखे— माझे पंचप्राण त्यांना दुष्ट काळास ओढून नेऊं दिलेंस आणि

मला या जगांत एकट्याला ठेविलेंस तरी कशाला ? मी तुला स्मरून हें परोपकाराचें काम करीत आहे आणि अशा स्तुत्य कामीं माझ्या गळ्यांत अपयशाचीच माळ घालणें असेल तर ही तलवार घे आणि माझा शिरच्छेद कर परंतु अशी अमंगळ वेळ पाहण्यासाठीं मला जिवंत ठेवूं नकोस. मी एकटा आतां या जगांत काय करूं ? प्रत्येक कामांत मनुष्य बळ पाहिजे, ऐक्य पाहिजे, तरच कार्यें चांगलीं तडीस जातात. ' या प्रमाणें अब्राहाम यानें एकांतांत उद्गार काढिले. एल्स्वर्थ आणि डोग्लस यांच्या वियोगानें तो फारच विव्हल झाला होता. ऐक्य आणि स्वातंत्र्य या प्रीत्यर्थ अब्राहाम हा जिवापाड श्रम घेत होता. आतां प्रसंग असा आला कीं ऐक्य आणि स्वातंत्र्य यांचे स्वाभाविकपणेंच रक्षण होत होतें. रणभूमीची जागा जी पश्चिमेकडे होती, ती लोकसत्ताक संयुक्त संस्थानाच्या हद्दींतल्या एका अफाट मैदानांत बदलली. जेफरसन डेव्हिस हा मोठा सुशिक्षित असून संयुक्त संस्थानांतील कवाइतीच्या शाळेंत त्यानें चांगलें शिक्षण मिळविलें होतें. याला राजनीति चांगलीच अवगत असून मोठमोठ्या लोकांशीं त्याचा चांगला परिचय होता. हा थोर कुळांतला असल्यामुळें सर्व ठिकाणीं याची चांगली प्रसिद्धि होती. याचें मत अब्राहाम याच्या विरुद्ध होतें. जरी घरचीं गरिबी होती तरी पण अब्राहाम यानें धैर्य यत्किंचित ही खचूं न देतां बाळपणापासून शरीर

संपत्ति व विद्या धन हीं अति कष्ट सोसून संपादन केलीं होतीं. डेविड आणि त्याचे अनुयायी यांनीं असें प्रतिपादन केलें कीं संस्थान हा एक राजा आहे आणि या राजसत्तेच्या खालीं ऐक्यापासून उत्पन्न झालेल्या संयुक्त संस्थानानें वागणें हेंच रास्त आहे. अब्राहाम यांचें म्हणणें होतें कीं " कोणत्याही एका संस्थानांतील लोकांनीं मानिलेले हक्क इतर सर्व हक्कांहून श्रेष्ठ समजले पाहिजेत. व सर्व संस्थानें मिळून जें राष्ट्र तयार होतें त्याचीच सत्ता सर्वतोपरी श्रेष्ठ समजणें न्यायाचें आहे. कोणत्याहीं संस्थानास संयुक्त संस्थानापासून विभक्त होतां येणार नाहीं व कदाचित् अशा रितीनें विभक्त झालें व करार तोडलाच तर त्यास राजद्रोह म्हणणें हेंच योग्य होईल. कोणत्याही संस्थानाचा राजकीय धोरणानें झालेला भाग ज्याप्रमाणें त्या संस्थापासून निराळा करितां येत नाहीं त्याप्रमाणें कोणत्याही एका संस्थानास संयुक्त स्वतंत्र संस्थानें सोडून कायदेशीर रितीनें विभक्त होतां येतच नाहीं आणि असें केलेंच तर संयुक्त संस्थानाची बलात्कारानें फाटाफूट केली असें होईल. "

स्वातंत्र्य आणि गुलामगिरी ह्या एकमेकांच्या विरुद्ध अशा दोन्ही पक्षांनीं जेव्हां आपआपल्या छावण्या समारासमोर स्थापन केल्या त्यावेळीं बंडांत सामील असलेल्या संस्थानांची लोकसंख्या

९१०३३३३ असून त्यांत ⅓ पेक्षां जास्त गुलामांची वस्ती होती, आणि राजनिष्ट स्वतंत्र संस्थानांची लोकसंख्या २२०४६४७२ होती. उभय पक्षांतल्या ह्या लोकसंख्येंत मोठा फरक पाहून कित्येक भित्र्या बंडखोरांस मोठी धास्ती पडून ते घाबरले. 'दक्षिणेकडील एक मनुष्य उत्तरेकडील पांच यांकीच्या बरोबर आहे' अशी एक त्यांच्यांत म्हण होती आणि ती मनांत आणून हे भित्रे लोक फार समाधान मानीत असत. त्यांत जे तरूण व नवशिके होते त्यांनातर या म्हणीमुळें चांगलीच हुशारी आली, परंतु त्यांचा भ्रम लौकरच दूर झाला. जेव्हां त्यांपैकीं कित्येकांस कैद करून उत्तरेकडे नेले आणि जेव्हां त्यांनीं मोठमोठ्या शहरांत राजनिष्ट लोकांचा समुदाय बराच असून ते लोक जिवावर उदार होऊन लढण्यास तयार आहेत असें पाहिलें त्यावेळीं त्यांची खात्री झाली कीं उत्तरेकडील लोकसंख्या जास्त असून त्यांचा एकोपाही बलवत्तर आहे.

दक्षिणेकडे असलेल्या गुलामांपासून आपणांस पुष्कळ बळकटी आहे अशी त्या प्रांतांतल्या लोकांची समजूत होती. गुलाम बाळगणारांची या दुर्दैवी प्राण्यांच्या अस्खलित श्रद्धेविषयीं खात्री होती आणि 'खंडन करणारे' हे उत्तरेकडे व्यापलेले केवळ राक्षसच आहेत असें ते गरिब बापड्या गुलामांस शिकवीत असत. ह्या गुलामांना जोंपावेतों त्यांच्या धन्यां-

पासून अन्न मिळत असे आणि जावत्काळ पावेतों त्यांचें रक्षण होत असे, तोंपावेतों युद्धास प्रारंभ झाला तरी पण त्यांनीं आपल्या धन्यांस सोडिलें नाहीं. उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील एकंदर लोक गुलाम ह्मणजे एक प्रकारची मिळकत आहे असें समजत असत आणि जे थोडेबहुत परागंदा झालेले सिद्दी संयुक्त संस्थानाच्या सैन्यांत आढळतील त्यांस सोडून देण्याची अधिकारी लोकांची पद्धत असे. व्हर्जिनिया येथील मनरो किल्ल्यांतील सैन्याचा अधिपति जनरल बी० एफ० बटलर यानें बंडखोर लोक या गुलामांस घोडे आणि खेचराप्रमाणें राबवीत असलेले आणि कांहींजणास फौजखान्यांत त्यांचेकडून कांहीं किरकोळ काम घेत असलेले पाहिलें; तसेंच या पुढें जे परागंदा झालेले सिद्दी सैन्यांत सांपडतील त्यांस लष्करी कायद्यानें मनाई केलेल्या व्यापाराच्या बाबतीपैकीं आहेत असें समजून तो त्यांना सोडून देत असे. हें एक नवीनच धोरण निघालें असून संयुक्त संस्थानच्या लष्करांत आफ्रिकेतल्या गुलामांस कायदेशीर रीतीनें वर्ज्य मानीत असत. परागंदा झालेल्या ह्या गुलामांस कायदेशीर रीतीनें 'वर्ज्य' हें एक नवीनच नांव दिलें असून राजनीतीचें तें एक उत्तम तत्व समजत असत. युद्धाच्या गुलाम बाळगणाऱ्यांस व बंडखोराच्या पुढाऱ्यांस या झालेल्या गुलामांमुळें अतिशय त्रास सोसावा लागला

संबंधीं त्यांना ( बंडखोरांच्या पुढाऱ्यांस ) फायदा करून तो अमलांत आणावयास सत्ता राहिली नव्हती.

जुलई महिन्याच्या १९ व्या तारिखेस बुल्रन्च्या लढाईस प्रारंभ होऊन ता० २१ रोजीं ती संपली. यांत संयुक्त संस्थानाच्या सैन्यास हार सोसावी लागली, परंतु उभयपक्षीं हानि मात्र बहुतेक सारखीच झाली होती. वॉशिंग्टन्च्या सभोंवतीं पोटोमॅक्चें सैन्य हें प्रथमच पुढें सरसावलें होतें. उभयपक्षीं लढाईची तयारी मोठ्या त्वरेनें चालू होती. बंडखोरांच्या मुख्य शहरावर संयुक्त संस्थानाच्या सैन्यानें हल्ला करण्यास एकदम पुढें सरकावें अशी उत्तरेकडील वर्तमानपत्रें ओरड करीतच होतीं. बंडखोरांनीं आपलें सैन्य हार्पर्सफेरी येथून काढून घेतलें असून हल्लीं स्वतंत्र संस्थानाच्या राजधानीवर चाल करून जाण्याचा त्यांचा विचार चालला होता. अब्राहाम यानें लष्करी लोकांची जी प्रथम मागणी केली त्यापैकीं कांहीं लोकांची मुदत तीन महिन्यांची होती, ती आतां संपत आली होती. लष्करी लोकांचें प्रोत्साहन कांहीं वेगळेंच असतें परंतु त्यांची पहिली हुरुप नाहींशी झाली होती. ते सर्व अद्यापि अशिक्षितच होते त्यामुळें लष्करी खात्याचें शिक्षण आपणांस केव्हां मिळेल असें त्यांना झालें होतें. वरेच अमलदार लोक नुकतेच लोकव्यवहारांतून सुटून आले असल्यामुळें त्यांना लष्करी शिक्षणाची

दिशा आणि खात्यांचीं कामें मुळींच माहित नसणें, हें स्वाभाविक होय. आपलें सैन्य किती व त्याची शक्ति किती आहे याची सर्वासमक्ष खात्री होण्यासाठीं सैन्यांतील लोकांनीं कांहीं तरी करून दाखविलें पाहिजे असें उत्तरेकडील लोकांस वाटत होतें. अब्राहाम यास या संबंधांत मोठीच चिंता उत्पन्न झाली असून तो म्हणे कीं आपलें सैन्य अवाढव्य दिसत आहे खरें, तरी पण तें मोठ्या युद्धांत शत्रूशीं टक्कर देईल असें मला वाटत नाहीं; आणि त्यामुळें शत्रू केव्हांतरी झडप घालतीलच असें नाना प्रकारचे तरंग त्याचे मनांत उद्भवले होते. लोकांचे सर्व मनोरथ पूर्ण करण्याचें कामीं तो हमेश तत्पर असे, कारण खऱ्या अंतःकरणापासून ते सर्व एकदिल झाल्यावांचून सैन्य टिकूं शकणार नाहीं हें तो चांगलें समजत होता. संयुक्त संस्थानाच्या लष्करानें मनरो किल्ला आणि त्याचे आसपासचा प्रदेश आपले ताब्यांत ठेविला होता, परंतु ह्या तजविजींत असतांना बिगबेथल् येथें त्यांचा पराभव झाला त्यांनीं बाल्टिमोर आणि त्या नजिकच्या कांहीं गांवांवर चांगली देखरेख ठेविली असून चंडखोरांस ते व्हार्जिनियाच्या पश्चिम प्रदेशांतून हांकून लावित होते. त्यावेळीं जनरल जॉर्ज बी. मॅक्क्लेलन् हा संयुक्त संस्थानाचा मोठा बलाढ्य पुढारी होता. आपल्या सैन्याचा मोर्चा आतां व्हार्जिनियाकडे फिरविला पाहिजे असें अब्राहाम यास वाटलें.

विरुद्ध पक्षांतील लोक पोकळ श्रद्धा आणि मिथ्याभिमान यांनीं फुगले होते. संयुक्त संस्थानच्या सैन्याप्रमाणेंच जरी बंडखोरांच्या सैन्यांतील लोक लढाईचे कामीं अशिक्षित होते, तरीपण त्यांचे पुढारी लष्करी विद्येंत मोठे प्रविण होते असें अब्राहाम यास वाटलें. बंडखोरांचे लष्करांतील अधिकारी जॉनस्टन बोरगार्ड, स्टोनवॉल जॅकसन, लाँगस्ट्रीट, कीरबी-स्मिथ, इवेल्, जुबेलअर्ली, ली, होम्स, इवॅन्स्, एल्झी-जोरडन् वगैरे होते. या सर्वांचे मुख्य सेनाधिपति जनरल बोरगार्ड आणि जनरल जोसेफ् इ. जानस्टन हे असून त्यांचे जवळ १८००० एकंदर सैन्य व ४० तोफा होत्या. संयुक्त संस्थानाच्या सेनाधिपति इर्विन् मॅकडोवेल असून त्याचे जवळ १७६७६ सैन्य व २४ तोफा होत्या. संयुक्तसंस्थानाच्या सैन्यासंबंधी सादिलवार खर्चाची व्यवस्था जनरल पॅटरसन् याजकडे असून विंचेस्टर येथील जॉनस्टनच्या देखरेखी खालीं जें सैन्य होतें तें त्यानें आपल्या ताब्यांत ठेविलें होते. प्रथम संयुक्त संस्थानास पहिल्या हल्यांत जयप्राप्ति झाली असून मागाहून बंडखोराचा विजय होऊन त्यांना अपयशाचा धक्का बसला. सर्व सैन्यांत फांटाफूट होऊन सैरा वैरा धांवपळ चालू झाली. कित्येकानीं पळतां पळतां शस्त्रें फेंकून दिलीं आणि कित्येकांनी शस्त्रें घेऊन शिस्तवार रणांतून पलायन केलें. ज्या बलाढ्य सैन्यावर अब्राहाम याची मोठी भिस्त असून

यशाची त्यास मोठी आशा होती तें सैन्य थोडक्या अवकाशांत वॉशिंगटन् शहरांत प्रवेश करून अपयशाच्या गोष्टी फुगवून सांगू लागले. राष्ट्रीय सभेचे सभासद व इतर बरीच प्रेक्षक मंडळी हें युद्ध पाहण्यास गेलीं असून या मंडळीनें सुरक्षित स्थळीं पोंहचण्याची गर्दी करून मोठाच गोंधळ करून सोडिला होता, परंतु बंडखोरांनीं त्यांचा पाठलाग केला नाहीं त्यामुळें वॉशिंगटन् शहर मात्र सुरक्षित राहिलें.

वरील लढाईच्या परिणामाची हकिकत प्रसिद्ध झाली त्यांत संयुक्त संस्थानाकडील ४६० लोक ठार झाले, ११२४ घायाळ झाले आणि १३१२ कैद केले, शिवाय कित्येकांचा तर पत्ताही लागला नाहीं. याप्रमाणे संयुक्त संस्थानाकडील एकंदर २८९६ लोकांची हानी झाली. बंडखोरांच्या सैन्यापैकीं ३८७ लोक मारले गेले, १५८२ घायाळ झाले, फक्त १३ पळाले व कांहीं जणांस कैद केले; असे एकंदर १९८२ लोकांचे नुकसान झालें, याप्रमाणें या लढाईचा परिणाम झाला.

सम्टर् किल्ल्यावरील लढाईची पाहिली तोफ सुटून लोकांची जसी स्थिति झाली त्याचप्रमाणें या लढाईमुळें राजानिष्ठ लोकांची स्थिति झाली. राष्ट्राभिमानही त्यामुळें कमी होण्याचें चिन्ह दिसूं लागलें, कारण संयुक्त संस्थानाच्या रक्षणार्थ जी ही मोठी

लढाइ चालू झाली त्यांत प्रथमारंभीच संयुक्त संस्थानास अपजय मिळाला. राजनिष्ट प्रजाजनांचीं अंतःकरणें इतकीं जरी संकटें एकामागून एक आलीं तरीपण राष्ट्राभिमानाच्या स्फुरणानें पुन्हा जागृत झालीं. अशा स्तुत्य कामीं आपखुशीनें लढाई करणारांची विशेष गर्दी उडाली होती. लष्करी अमलदार आणि त्यांचे सल्लागार लायक नसल्यामुळें लोकांचीं मनें संतप्त झालीं होतीं. शत्रूवर चाल करून जाण्यास कांहीं लोकांची ओरड चालू होती, परंतु ज्या अमलदारांनी चाल करण्यास हुकूम दिला तेच अमलदार दोषास पात्र आहेत, हे त्यांच्या गांवींही नव्हतें. जरी अशी स्थिति होती तरीपण बुलरनच्या लढाईत ज्या राजनिष्ट व दांडग्या लष्करी अमलदारांनीं संयुक्तसंस्थानाचा बचाव करण्याचे कामीं हुशारी दाखविली त्या अमलदाराबद्दल लोकमत मुळींच बदललें नव्हतें. या संकटामुळें संयुक्तसंस्थानांतील लोकांस कांहीं वेळ मोठीच भीति पडली होती, परंतु बंडखोर लोक आणि त्यांचे उत्तरेकडील अनुयायी यांना मात्र मोठें उत्तेजन मिळालें होतें. सांप्रत अधिक लष्कर आणि लढाईचें साहित्य यांची कुमक वरचेवर मिळत गेल्यानें राष्ट्राभिमानी लोकांची मुखकमलें पूर्वीं पेक्षां अधिकाधिक प्रफुल्लित दिसूं लागलीं होतीं.

बुलरन येथ अपयश मिळाल्यामुळें अब्राहाम याचा

उत्साह बराच कमी झाल्या सारखा दिसला, परंतु लोकांत देशाभिमानाची ज्योति प्रज्वलित असून त्यांची अंतःकरणपूर्वक मदत असल्याबद्दल त्याची पूर्ण खात्री असल्यामुळें त्याला मोठा धीर आला होता. राष्ट्राची सचोटी कायम राखण्यासाठीं राष्ट्राची स्थिति पूर्वीप्रमाणें सुधारली पाहिजे व ती खात्रीनें सुधरेल असें त्याला वाटत होतें. इतर दुःखांपेक्षां प्राणहानीचें दुःख मात्र त्याला अतिशय अनिवार्य होई आणि हें त्याचें कोवळें अंतःकरण त्याचे खरे स्नेही पूर्णपणें जाणत होते. परंतु प्रथमच बुलरन येथें बंडखोरांस जी जयप्राप्ति झाली त्यामुळें मात्र त्याला मोठी भीति पडली होती. आपण चुकीची दिशा पत्करली आहे असें बंडखोरांस वाटून ते संयुक्त संस्थानाशीं येऊन मिळतील अशी त्याला अद्याप आशा होती. बुलरन् येथें संयुक्तसंस्थानांतील लोकांची चांगलींच नाककट्टी झाली असें बंडखोरांस वाटून ते हर्षानें अति फुगले होते व त्यामुळें अब्राहाम याचा इष्ट हेतु साधण्याचें काम फारच लांबणीवर पडलें. अब्राहाम याचे सल्लागार व स्नेही मंडळींनीं बूलरन् येथें मिळालेल्या अपजयांतून एक समाधान मानण्यासारखी गोष्ट पाहून काढली होती, ती ही कीं जर सर्व युद्धांचें काम बूलरन् येथें संपलें असेल व आतां या पुढें मोठें युद्ध होण्याची मुळींच आशा नसेल तर गुलामगिरीचा विषय कायम राहील यांत संशय नाहीं आणि जर या पुढें मोठा

रणसंग्राम होऊन भयंकर युद्ध होईल तर मात्र गुलामगिरीची संस्था अगदींच नष्ट झाल्याप्रमाणें होईल.

जमीन आणि आरमार यावरील एकदोन मोहिमी एकदम करण्याचा बेत ठरला. उत्तरकॅरोलिनाच्या किनाऱ्यावर आलेला हॅटेरास नांवाचा किल्ला बंडखोरांचे ताब्यांतून हस्तगत करून घेतला आणि कांहीं दिवसांनीं दक्षिणकॅरोलिनाचें पोर्ट-रायल नांवाचें बंदरही संयुक्तसंस्थानांच्या ताब्यांत आलें. या दरम्यान व्हर्जिनिया येथील ब्ल्युरिज्ज ( जांभळी टेंकडी ) च्या पश्चिमभागांतून जनरल मॅक्क्लेलन यानें बंडखोरांस हाकून लाविलें. तेथील पुष्कळ रहिवाशी राजनिष्ठ असल्यामुळें त्यांनीं बंडखोरांच्या हुकुमास खो दिला व ते तावडतोब संयुक्तसंस्थानांतील लोकांशीं मिसळून गेले. त्यांनीं पश्चिम व्हर्जिनिया नांवाचें एक नवीन स्वतंत्र संस्थान करून तेथें फ्रान्सिस एच पियरपॉंट यास कामचलाऊ गव्हर्नर नेमिलें. कांहीं दिवसानंतर युद्धाच्या नियमाला अनुसरून तेथील सभेनें अशा प्रकारें विभक्त होण्याचा कायदा मंजूर केला आणि त्याप्रमाणें पश्चिमव्हर्जिनिया आज मितीपावेतों स्वतंत्र संस्थान ह्मणवीत आहे. बूलरन् येथें लढाई चालली तेव्हा जुलई महिन्याच्या ४ थ्या तारिखेस भरलेल्या राष्ट्रीय सभेचें काम तहकूब राहिलें होतें. जर संयुक्तसंस्थानाचें रक्षण करणेंच आहेतर आपसांतल्या मोठ्या युद्धांस ( सिव्हिल-

बॉर ) प्रारंभ झाला पाहिजे अशाबद्दल विचार करणें आतां लोकांच्या अगदीं अंगवळणीं पडून गेलें होतें. अब्राहाम यानें आजपावेतों ह्या युद्धासंबंधी अगदीं मौन धारण करून धैर्य धरिलें होतें, त्याचा प्रत्यय त्याला चांगला आला. सम्टर् किल्ल्यावर तोफांचा भडिमार चालू होतांच; राष्ट्रीय सभा भरवावी असें त्यास पुष्कळ लोकांनीं सूचविलें परंतु त्याचें सर्व धोरण पुढील उलगड्यावर अवलंबून होतें. आजपावेतों त्यानें लढाई संबंधांत जी हकिकत राष्ट्रीय सभेकडे पाठविली ती अतिशयोक्तीची नसून शांतपणानें थोडक्यांत मुद्देसूद लिहिली होती. त्यानें असें प्रतिपादन केलें होतें कीं बंडखोरांनीं आपण होऊन आपसांतलें प्रचंड युद्ध आरंभण्यास आह्मांस भाग पाडलें आहे. तो ह्मणाला:—

'संयुक्त संस्थानें दुर्दैवी आहेत किंवा सुदैवी आहेत याचा निर्णय या युद्धांत होणार आहे. राजनीतीला अनुसरून झालेलें लोकसत्ताक अथवा लोकसत्ताक स्वतंत्र राज्य ( लोकांनीं आपआपसांत निवडणूक करून कांहीं लोकांस राज्याचा अधिकार देणें ) स्वतःच्या विरुद्ध शत्रू उत्पन्न झाल्यास देशाची सचोटी राखूं शकेल किंवा नाहीं, ह्या एका मोठ्या महत्वाच्या प्रश्नाचा व्यक्तिमात्रास मोठा विचार पडला आहे. त्याचप्रमाणें जे कांहीं थोडेबहुत लोक या राज्यव्यवस्थेस नाराज असतील

त्यांना कायदेशीर रितीनें कोणत्याही निमित्तानें अगर कोणत्याही निमित्तावांचून राज्य सोडून विभक्त होतां येईल किंवा कसें हा एक दुसरा प्रश्न उद्भवत आहे. दौर्बल्य सर्व स्वतंत्र राज्यांत परंपरेनेंच चालत आलें आहे कीं काय, याचाहि विचार करणें भाग आहे. स्वतःच्या प्रजेस स्वातंत्र्यसुख देण्यासाठीं राज्याची व्यवस्था पायाशुद्ध असणें जरूरीचें आहे किंवा कसें ? '

अब्राहाम यानें राष्ट्रीय सभेकडे जी वरील हकिकत पाठविली त्यावरून स्वराज्याविषयीं आजपावेतों जीं जीं तत्वें तो प्रतिपादन करीत आला त्याच धोरणाला अनुसरून त्यानें हा वरील निरोप राष्ट्रीय सभेस पाठविला होता हें उघड दिसत आहे. युद्धाचें काम बहुतेक संपल्यानंतर कांहीं वर्षांनीं त्यानें गेटिस्वर्ग येथील रणभूमीवर एक मोठें सुरस जाहीर व्याख्यान दिलें, त्याचें बीजही वरील हकीकतींत आहे. तिऱ्हाइतपणाचा बहाणा पत्करण्याचा केंटकीचा जो प्रयत्न होता त्या संबंधांत अब्राहाम यानें पुनः एकदां चांगल्या युक्तीची योजना केली; जे लोक त्याच्या विचारसरणीस ओळखून होते त्यांना या युक्तीची माहिती असणें हें अगदीं स्वाभाविक होय. सरहद्दीवरील ज्या ज्या संस्थानांनीं तिऱ्हाइतपणाचा बहाणा केला होता, त्यांचें म्हणणें ' कोणतेंही सैन्य त्यांच्या हद्दींतून जाऊं द्यावयाचें नाहीं '

असें होतें व हें त्यांचें ह्मणणें अब्राहाम यास ग्राह्य नव्हतें. तो ह्मणालाः—

" विभागणीच्या हद्दीवर एक दुर्गम भिंत बांधणें हें उचित खरें परंतु ती अतिशय दुर्गम नसावयाचीच, कारण तिऱ्हाइतपणाचा बाहाणा केल्यानें संयुक्त संस्थानांतील लोकांचे हात बांधले जाणार आणि त्यांच्याकडून बंडखोराकडे पुरवठ्यासाठीं सामुग्री मोकळ्या रितीनें जाऊं शकणार. उघड शत्रूला मात्र असा प्रकार चालणार नाहीं. तसा प्रकार झाल्यास बाहेरून काय नाकेबंदी वगैरे व्हावयाची असेल ती होईल, परंतु आंतल्याआंत तें बंडखोरांचे सर्व संकट एका झटक्यांत दूर करतील.

या निरोपामुळें देशांतील लोकांस मोठें समाधान वाटलें, त्यांत मुख्यत्वें करून एक जूट संस्थानाचा अध्यक्ष जेफरसन् डव्हिस याच्या कावेबाजपणाच्या लिहिण्यास अब्राहाम यानें जें प्रत्युत्तर ह्मणून वरील निरोपांत लिहिलें होतें तें वाचून सर्वत्रांस अत्यंत समाधान वाटलें. लोकांच्या स्वातंत्र्याचें रक्षण करणारे या नात्यानें अमेरिकेंतील या नागरिक लोकांस प्रसंगोपात विभक्त होऊन लढाई करण्याचा हक्क आहे, या प्रमाणें डव्हिस यानें प्रतिपादन केलें होतें. संयुक्तसंस्थानाचा शांतपणें त्याग करणें हें राजनीतीला अनुसरून बरोबर आहे असा जो डेविस

यानें बहाणा काढिला तो अगदीं अयोग्यच ह्मटला पाहिजे, असें अब्राहाम याचें ह्मणणें होतें. या त्याच्या बाहाण्याची अब्राहाम यानें जी व्याख्या केली आहे ती खालीं लिहिल्याप्रमाणें:—

' संयुक्त संस्थानापैकीं कोणतेंही संस्थान, राष्ट्रीय राज्यकारभाराचें मागलें पुढलें धोरण राखून अर्थात अव्याहत कायदेशीर रितीनें संयुक्तसंस्थानाच्या कोणत्याही संस्थानाच्या संमती शिवाय संयुक्त संस्थानाच्या ऐक्यभावांतून आपलें अंग काढून घेऊं शकेल; या मानिलेल्या हकाचा अंमल कधींही अकारणीं व्हावयाचा नाहीं ह्मणजे हा एक लहानसा बहाणाच ह्मटला तरी चालेल, कारण आपला न्याय निवडावयास आपणच न्यायाधीश बनण्यांत जेवढें महत्व आहे तेवढेंच वरील तत्वांत आहे. अशा रीतीनें ॥ मधु तिष्ठति जिव्हाग्रे ऱ्हदये तु हलाहलं ॥ या उक्ती प्रमाणे साखर पसरून एक बंड उभें केलें आहे. या प्रमाणे लोकमत वळवून सभा भरविल्या व त्यांत संयुक्तसंस्थानाचा त्याग करून विभक्त होण्याच्या हास्यास्पद सोंगाबद्दल विवेचन केलें आणि त्यामुळें जेव्हां अखेर पुष्कळ लोक त्यांनीं धारिल्याप्रमाणें राज्याविरुद्ध शस्त्रें घेऊन उभे राहिले तेव्हां त्यांचा हर्ष गगनांत मावेनासा झाला. संयुक्त संस्थानावर अशा रितीनें पुर्वीं कोणीही व कधींही गदा उचलली नाहीं.

अब्राहाम यानें सैन्यासाठीं माणसें आणि पैसा या संबंधी ज्या ज्या मागण्या केल्या त्या त्या सर्व राष्ट्रीय सभेनें मोठ्या औदार्यानें तावडतोब मंजूर केल्या. हल्लीं त्यानें चार अब्ज डालर्सची आणि चार लक्ष लष्कराची मागणी केली होती. राष्ट्रीय सभेनें पांच अब्ज डालर्सची त्याचेसाठीं तजवीज करून पांच लक्ष लष्कर मागविण्याचा त्याला पूर्ण अधिकार दिला. हें युद्ध बरेंच दिवस लांबेल असें सर्व राष्ट्रांतील लोकांस वाटू लागलें होतें. नव्या शिपायांचा भरणा करण्याचें काम एक सारखें चाललें असून सर्व देशांतील लोक युद्धासाठीं अगदीं सिद्ध होत होते उत्तरे कडील संस्थानांच्या प्रत्येक खेडयापाडयांतून सुधारलेल्या-मंडळीचे समाज संयुक्त संस्थानास खऱ्या दिलानें मदत करण्यास एक्या पायावर तयार होते. सर्व स्त्रीपुरुषांनीं आपआपले नित्य व्यवसाय सोडून जेणें करून बंडाचा विध्वंस होईल अशीं साधने पाहण्यांत सर्व मग्न झालेले जिकडे तिकडे दिसत होते. त्या वेळी ज्याचें त्याचें तोंडीं ' बाबा, अब्राहामा सहा लक्ष निवडक लष्कर घेऊन आम्ही येत आहोंत ' अशा अर्थाचीं युद्धगीतें सर्व ठिकाणीं चालू होतीं.

संयुक्त संस्थानाचें राज्य आणि बंडखोरांचे एक जूट या दोन्ही पक्षांचा निर्णय करण्यासाठीं परकीय राष्ट्रास दरम्यानगिरी करण्याची वेळ यावी ही उभयपक्षीं मोठा विचार करण्याजोगी

महत्वाची गोष्ट होय. राष्ट्रीय सरकारानें तर दक्षिणे कडील सर्व बंदरांची नाके बंदी केल्याबद्दल उघड रीतीनें जाहीर केलें होतें. बंडखोरांजवळ आरमार मुळींच नव्हतें, परंतु राष्ट्रीय सरकाराजवळ मात्र ल्हानसें आरमार असून त्यांत हळूं हळूं भर पडत चालली होती. राष्ट्रीय सरकारानें जी नाकेबंदी केली ती इतर राष्ट्रें मान्य करितील काय ? अथवा तीं राष्ट्रें अशा नाके बंदीस झुगारून देऊन आपआपलीं गलबतें नजीकच्या बंदरांत, जणूं काय नाकेबंदी मुळींच नव्हती असें समजून, नेतील काय ? बंडखोरांच्या एकजुटास जर राष्ट्र असें मानून चाललें तर बलाढ्य आरमाराच्या सहाय्यानें सर्व बंदरांचा व्यवहार प्रत्यक्ष बंद करून नाके बंदी केली आहे, असें संयुक्तसंस्थानाच्या सरकारास सिद्ध करून दाखविणें भाग पडेल. नाहींतर इतर राष्ट्रें आपल्या सत्तेच्या बळावर एक जूट संस्थानांस मान्यता देऊन बंदरांत गलबतें पाठवितील आणि अशा बंदरांतून बंडखोरांस मग पाहिजे तसा पुरवठा मिळूं शकेल. अध्यक्ष अब्राहाम लिंकन यास लढाईच्या-प्रारंभीं लौकरच या संबंधात मोठी चिंता उत्पन्न झाली होती पुढें लौकरच जसजसें परस्परांत वैमनस्य बळावत चाललें तसतसें इंग्लंड आणि फ्रान्स ह्या दोहों ठिंकाणच्या सरकारांनीं बंडखोरांचे एकजुटास युद्ध चालविणारी सत्ता या नात्यानें मान्य करून एखाद्या स्वतंत्र राष्ट्रास जसे पाण्यावर व जमिनीवर सारखे हक्क असतात तसें त्यांनीं बंडखोर लोकांचे सर्व हक्क मंजूर के-

विलें. यामुळें संयुक्त संस्थानास आणि तेथील एकंदर राज्य कारभारास एक मोठा धक्का बसला यांत कांहीं संशय नाहीं.

उत्तर प्रांत आणि दक्षिण प्रांत या दोहोंमध्यें जी नाकेबंदी झाली ती कागदावर आणण्याबद्दल वाटाघाट चालू होती, त्या दरम्यान, बंडखोरांनीं जेम्स एम मेसन, आणि जॉन स्लिडेल या दोघांस वकील या नात्यानें युरोपांत पाठविले. हे उभयतां संयुक्त संस्थानाच्या सेनेटमधील सभासद असून युद्धाचे प्रारं-भींच त्यांनीं आपल्या संस्थानांची बाजू संभाळण्यासाठीं वॉशिंग-टन सोडिलें. बंडखोरांनीं मेसन यास इंग्लडास पाठविलें व स्लिडेल यास फ्रान्स मध्यें पाठविलें इंग्लंड व फ्रान्स हीं कांहीं लहान सहान राष्ट्रें नसून मोठीं बलाढ्य व सत्ताधीश होतीं. या दोन्हीं राष्ट्रांनीं बंडखोरांच्या जुटास राष्ट्र समजून आपली मान्यता द्यावी अशा संबंधांत वरील दोन्ही वकीलांस मुद्दाम पाठवून त्यांचीं मनें वळविण्याचा बंडखोरांचा प्रयत्न होता. प्रथम दोघे हि वकील क्यूबा येथें गेले आणि तेथून इंग्रजांच्या ट्रेंट नांवाच्या आगबोटीनें ब्रिटिश बंदर सेंटथॉमस येथें रवाना होऊन तेथून पुढें इंग्लंदास जाण्याचा त्यांचा बेत ठरला. ही हकिकत इ. स. १८६१ नोवेंम्बर ता. ७ रोजीं घडली. दुसऱ्या दिवशीं सॅनजॅ सिंटो नांवाच्या संयुक्त संस्थानांतील एका लढाऊ आरमारानें ही आगबोट शोधून पाहून कप्तान विलक्स यानें

आगबोटीच्या बाजूनें तोफेचा गोळा जाईल अशा नेमानें एक तोफ सोडली; अशा रितीनें आगबोटीस प्रतिबंध करून एक बोट पाठवून मशार निल्हे दोघे वकील आणि उभयतांचे दोघे सेक्रेटरी यांस कबजांत घेऊन बोस्टन येथें पाठवून दिलें, व तेथून वॉरन नांवाच्या किल्ल्यांत दोघांस ही प्रतिबंधांत ठेविलें.

या हकिकती मुळें सर्व देशांत प्रत्येकाचें अंगांत आवेश व उत्साह यांचें स्फुरण विशेष चढून चहूंकडे भयंकर चळवळ उत्पन्न झाली. इंग्लंद व फ्रान्स या दोन्ही देशांची कृति पाहून लोक अतिशय खवळले आणि वरील दोन्ही वकिलांस वॉरन येथें कैदेंत ठेविल्यामुळें त्या दोन्हीं परकीय राष्ट्रांस एका प्रकारचें हें दहशतीचें योग्य उत्तर मिळालें अशी कित्येकांची समजूत होती. बंडखोरांच्या वकिलांस कारागृहवास घडल्या कारणानें संयुक्त संस्थानांत चहूंकडे जणूं काय आनंदाचा ऊतच आला होता. जेथें इंग्रज सरकाराचें निशाण फडकत होतें. तेथून ट्रेंट आगबोटीच्या कप्तानानें निषेध केला असून हि ज्या अर्थी दोघां वकिलांस धरून प्रतिबंधांत ठेविलें त्या अर्थी त्यांची तावडतोब सुटका होऊन ते परत ताब्यांत दिले पाहिजेत अशी इंग्रज सरकारानें सुचना पाठविल्यावरून इतर लोक फारच खवळले व त्यांची सुटका होऊन ते परत ताब्यांत कधीं हि

दिले जाणार नाहींत अशी सर्वत्र ओरड करूं लागले. ह्या वरील हकिकती वरून बंडखोरांस एका अर्थी बराच संतोष झाला. इंग्लंद आणि संयुक्त संस्थानें यांत आतां वैमनस्य पडून भयंकर युद्ध प्रसंग होईल व या दोघांच्या भांडणांत आपल्या एक जुटास स्वतंत्रता प्राप्त होईल असें त्यांना खास वाटलें. संयुक्त संस्थानां विषयीं उघड रितीनें कळकळ प्रगट करणारे लोक इंग्लंडांत फारच थोडे होते. मेसन आणि स्लिडेल या दोघां वकिलांस कैद केलें हें मोठ्या धमकीचें व अपमानाचें कृत्य तेथील लोक समजत होते. आतां भयंकर युद्ध होणार असें लंदन येथील सर्व वर्तमान पत्रांतून प्रसिद्ध झालें होतें; ब्रिटिश सरकार दक्षिणेकडील लोकांचा पक्ष खास स्विकारील व त्यामुळें दक्षिणेकडील व उत्तरेकडील संस्थानें असे दोन कायमचे विभाग होतील, असें सर्व म्हणूं लागले.

संयुक्त संस्थानांतील राजनिष्ट लोकांच्या मनाची या वरील हकीकती मुळें तिळमात्रही चलबिचल झाली नव्हती. उभयता वकिलांस सोडावयाचे नाहींच असा त्यांचा कृत संकल्प होता. कप्तान विलक्स याचे अत्यंत आभार मानिले पाहिजेत असें राष्ट्रीय सभेनें मत दिलें. आरमाराचे सेक्रेटरी मिस्तर गिडिअनवेलीस यानें विलक्स यास मुद्दाम पत्र लिहून त्यानें केलेल्या देश सेवेबद्दल त्याचें अभिनंदन केलें; आणि मि स्टॉटन नंतर मि कॅमे_

रॉन युद्धाचा सेक्रेटरी झाला त्यानें सुद्धां बंडखोरांच्या वकिलांस कैद केल्याबद्दल स्वतःची संमति मोठ्या आनंदानें दर्शविली. संयुक्त संस्थानाचा सेक्रेटरी मि. सिवर्ड यानें ही इंग्रज सरकाराचें ह्मणणें याबाबतींत मुळींच कबूल करूं नये असें स्पष्ट कळविलें.

या सर्व हकीकतीमुळें अब्राहाम याचें डोक्यांत पुष्कळ विचार घोळत होते. या वेळीं तो जरी चिंताक्रांत दिसत होता तरी पण तो निग्रही असल्या कारणानें यत्किंचितही डगमगला नाहीं. उभयता वकिलांस कैद केले ही गोष्ट कायदेशीर आहे किंवा नाहीं याची त्याला प्रथम पासून मोठी शंका होती आणि जेव्हां त्यानें या एकंदर कामाच्या अंतःस्वरूपाचें यथायोग्य दृष्टीनें व संपूर्णपणें मनन केलें तेव्हां त्याला स्पष्ट कळून आलें कीं, उभयता वकिलांस न्यायदृष्टीनें पाहिलें तर सोडून देणें हेंच रास्त होय. अब्राहाम याच्या शीलास अनुसरून पाहिलें तर लोकांना हें त्याचें धोरण न्यायाचें व मोठ्या शहाणपणाचें दिसत होतें परंतु त्यावेळीं कित्येकांस हें त्याचें कृत्य भ्याडपणाचें दिसत होतें तरी पण अशा स्थितींत अब्राहाम याच्या धैर्याचें व सचोटीचें खरोखर वर्णन करावें तेवढें थोडेंच. लोक खुशाल कोलाहल करोत अथवा त्यांचा कोपाग्नि हवा तेवढा भडको, परंतु आपण आपलें शील सोडावयाचें नाहींच असा त्याचा दृढ निश्चय झाला

होता. त्या वेळीं कित्येक लोक हातांत शस्त्रें धरून इंग्रजसरका-राशीं टक्कर घेण्यास अगदीं एका पायावर तयार होतें. परंतु अब्राहाम ह्मणाला कीं ' कॅप्टन विलक्स यानें जें कृत्य केलें तशाच एका बाबतीवरून एकदां आपला इंग्रजांशीं युद्ध प्रसंग झाला होताच. जर इंग्रज सरकार हल्लींच्या या कृत्याविरुद्ध असतील व वकिलांची सुटका करा असें ह्मणत असतील तर आपल्यास इ. स. १८१२ सालच्या आपल्या मुद्यास अनु-सरून चाललेंच पाहिजे. आपणांस या दोघा कैद्यांस सोडून दिलें पाहिजे; शिवाय एक मोठा युद्ध प्रसंग होणार आहे तेवढा पुरे आहे '

अब्राहाम याचे वरील निश्चयात्मक उद्गार ऐकून सर्व लोक अगदीं भीतीनें गांगरून जाऊन त्यांची एकच त्रेधा उडाली. ' बंडखोरांच्या वकिलांस सोडून द्यावें. ! ' हा विचार तर निवळ वेडेपणाचा होय; अब्राहाम याचे शिवाय जर हे उद्गार दुसऱ्या कोणाचे असते तर त्याचा सर्व लोकांत हशा उडून खरोखरच फटफजिती झाली असती. राज्यकारभारांत ज्यांनीं आपलें बहु-तेक आयुष्य खर्चिलें होतें अशी अनुभविक राजनीति जाणणारीं मंडळी यामुळें अध्यक्षाच्या विरुद्ध झाली. ' लोकांचा कंठशोष चालू आहे, लोक भयंकर वणव्यांत सांपडले आहेत ' अशा त्या-च्या शोचनीय स्थितींत जर अशा राजकार्य धुरंधरानें ( अध्यक्षानें )

त्यांच्या करुणालापाकडे दुर्लक्ष केलें तर खरोखरच या अधिकाधिक पेटत चाललेल्या वणव्यांत गरिबबिचारे देशाभिमानी लोक वांसरांप्रमाणें तडफडून प्राण सोडतील व हे त्यांचे तळतळाट अध्यक्षास भोंवल्या शिवाय राहणार नाहींत " याप्रमाणें जॉन पी. हाले ( न्युहॅम्पशायरचा सेनेटर ) याचें ह्मणणें होतें. मोठा झंझावात सुटला तरी पर्वत यत्किंचित्‌ही हालत नाहीं तद्वत लोकांचे हे उद्गार जरी हृदयद्रावक होते तरी पण अब्राहाम त्याप्रसंगीं मुळींच हालचाल न करितां स्वस्थ बसला व ह्मणाला " कांहीं असो मी खऱ्या मार्गानें जाणार; न्यायाच्या विन्मुख मी कालत्रयीं होणार नाहीं व त्या साठीं मी दुरवर विचार करून सांगतों कीं इंग्रज सरकारच्या रास्त हक्कांबद्दल विचार केलाच पाहिजे व त्या दोघांही वकिलांस एकदम सोडून दिलेंच पाहिजे." सिवर्ड सेक्रेटरी हा अब्राहाम याची प्रकृति आणि त्याचे दूरदर्शीपणाचे विचार चांगले ओळखून होता ह्मणून त्यानें अध्यक्षाचा हुकूम मान्य करून इंग्रज सरकारास योग्य उत्तर लिहून पाठवून त्यां उभयता वकिलांस सोडून दिलें; व त्यामुळें इंग्रजासारख्या बलिष्ट राष्ट्राशीं होणारा भयंकर युद्ध प्रसंग टळला.

अध्याक्षाच्या या कृतीमुळें बंडखोर लोक मिथ्याभिमानें फुगले व त्यांनीं या बद्दल सर्व ठिकाणीं उपहास चालविला. या हकिकतीमुळें उत्तरेकडील बरेच राजानिष्ट लोक अतिशय रागा-

वळे व अध्यक्षाची निंदा करूं लागले. इकडे बंडखोरांकडील सत्ताधीशांस परकीय राष्ट्रांची मदत व मान्यता अवश्यमेव पाहिजे होती परंतु अब्राहाम याच्या न्यायी व शहाणपणाच्या स्वभावामुळें त्यांनीं धारल्याप्रमाणें कांहीं एक न झाल्या मुळे तेही अतिशय संतापले व कांहीं अंशीं स्याले ही होते. आणि अब्राहाम याचा ते अतिशय धिक्कार करूं लागले. अब्राहाम याचे विषयीं ज्यांचीं मनें शुद्ध नव्हतीं ते तर त्याचा अतिशय द्वेष करूं लागले. आपण या महत्वाच्या कामीं जी बाजू पत्करली ती किती वळकटीची आहे हें लक्षांत आणून तो स्वस्थ होता, आणि आपण धारिलेल्या मार्गांत किती दूरदर्शीपणा आहे हें लोकांच्या प्रत्ययास आणण्याची संधि तो पाहात बसला होता.

त्यावेळच्या स्थितीकडे पाहिलें तर युरोपांतील राष्ट्रांचें सर्व धोरण संयुक्तसंस्थानांच्या अगदीं विरुद्ध होतें. " आपसांतल्या युद्धांत परकीय राष्ट्रांचा संबंध मुळींच नसावा आणि परकीय राष्ट्रांनीं दरम्यानगिरी केलीच तर तो घरगुती कज्जा समजावयाचा या पलीकडे जास्त त्याची किंमत नाहीं " असें संयुक्तसंस्थानाचें ह्मणणें असल्याबदल उभयता वकीलांनीं इंग्रज सरकाराची संपूर्ण खातरी केली. विनाकारण लढाई करण्याची घाई न करण्याबदल संयुक्तसंस्थानांतील लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचें मन वळवून त्यांना दाबांत ठेविण्याचें कामीं अब्राहामकिं-

कन यास आपला सर्व मोठेपणा व शहाणपणा खर्ची घालावा लागला. परकीय राष्ट्रांत अमेरिकन लोकांचा पदोपदीं अपमान झाला आहे व त्या मुळें अमेरिकन लोक इंग्रजांचा आणि युरोपांतील राष्ट्रांचा धिक्कार करीत होते, परंतु अध्यक्ष या नात्यानें अब्राहाम याची मात्र प्रवृति तशी नव्हती. त्यानें आपला सरळ राजनीतीचा मार्ग सोडला नाहींच; अध्यक्षाच्या जागेवर जो कोणी असेल त्याचें अंगीं दया, क्षमा आणि शांति हे तीन गूण अवश्यमेव लागतातच व हे तिन्ही गूण अब्राहाम याचें अंगीं अगदीं संपूर्ण रितीनें वास्तव्य करीत होते. जे कुलिन असतात ते आपलें शील कधींही सोडित नाहींत, इतकेंच नव्हें तर त्यांच्यावर कितीही दुर्धर प्रसंग आले तरीपण ते न डगमगतां आपलें कर्तव्य यथोचित् बजावितात.



# प्रकरण २१ वें.

## गुलामगिरीचा प्रश्न; राष्ट्रोन्नतीच्या रविचा अभ्यूदय आणि अजरामर जाहिरनामा.



धैर्य आणि शहाणपणा या दोहोंस कसोटीला लावण्याची मात्र आतां खरीवेळ आली होती. गुलामगिरीचा प्रश्न आतां दडपून राहण्या सारखा नसून तो आतां लांबणीवर टाकण्याची ही वेळ नव्हती. जनरल मॅकामिलन आणि फ्रिमाँट या दोघांनीं हा प्रश्न हातीं घेतला. मॅकक्लेलन यानें पश्चिम व्हर्जिनीयाकडे जय संपादन करून व शौर्यतेज दाखवून लोकांस अगदीं आपलेंसे करून घेतले होते; शिवाय युद्ध कलेंत हा अतिशय निपूण व शूर असल्याबद्दल लोकांचा उत्तम ग्रह झाला होता व त्यामुळें हाच बंडखोरांस पादाक्रांत करील अशी सर्वांची पूर्ण खातरी झाली होती. बंडांचा उद्भव झाल्याची हकिकत कानीं येतांच फ्रिमाँट हा युरोपांतून आला आणि संयुक्तसंस्थानाच्या बचावासाठीं मोठ्या उत्साहानें युद्धांत जाऊन मिसळला इ. स. १८६१ च्या जुलई महिन्यांत फ्रिमाँट याची, मेजर जनरलच्या जागीं नेमणूक झाली

आणि मॅकक्लेलन यास पोटोमॅकच्या सैन्याचे अधिपती नेमिलें; या वेळीं पोटोमॅक येथील सैन्य दोन लक्ष होतें. सेंटलुई ही मुख्य राहण्याची जागा ठरवून फ्रिमाँट यास पश्चिमेकडील शाखेचे प्रमुखत्व सोपिलें. मिसौरी येथें तर अतिशय अव्यवस्था असून निवळ यादवास्थळींच माजली होती. खून, शेजारपाजारचे तंटे, कत्तली, गुप्त आणि भयंकर गुन्हे, आणि बळात्कार यांचा तर तेथें मुळींच हिशेब नव्हता. तेथील संस्थानिकानें अद्याप संयुक्त संस्थानाचा आम्ही त्याग करून वेगळे झालोंत असें जाहीर केलें नव्हतें तरी पण तेथें बंडखोरांचा सुळसुळाट असल्यानें तें संस्थान, संयुक्त संस्थानाशीं सामील करून घ्यावें किंवा नाहीं या बद्दल कांहींच निर्णय झाला नव्हता.

जनरल फ्रिमाँट यानें आगष्ट महिन्याचे ३१ वे तारिखेस एक जाहिरनामा प्रसिद्ध केला त्यांतील मतलब असा होता कीं " मिसौरी येथें लष्करी कायदा अमलांत आणिला असून सैन्याची हद्दही ठरविली आहे, म्हणून लोकांस जाहीर करण्यांत येतें कीं (१) त्या हद्दींतील लोकांपाशीं शस्त्रें जर सांपडलीं व तीं संयुक्त संस्थानाचे बचावासाठीं नसलीं तर त्या सर्व लोकांस फांशी देण्यांत येईल; (२) संयुक्त संस्थानाच्या सत्तेविरुद्ध झालेल्या बंडखोरांच्या संस्थानांत लोकांची जी जी मिळकत सांपडेल ती ती सर्व ताब्यांत घेऊन एकदम फरोक्त केली जाई-

ल आणि ( ३ ) तेथील लोकांच्या ताब्यांत जे जे गुलाम सांपडतील त्या सर्वांस या जाहिरनाम्याच्या आधारें एकदम मोकळे करण्यांत येईल असें समजावें. "

वरील जाहिरनाम्यामुळें संयुक्त संस्थानांतले लोक फार आश्चर्यचकीत झाले. बंडखोरांची मिळकत फरोक्त व्हावी व त्यांच्या ताब्यांतील गुलाम बंदमुक्त करावे एवढाच सदर जाहिरनाम्यांतील इत्यर्थ होता. गुलामगिरीच्या संस्थेस मोठा धक्का बसेल हा विचार मनांत येऊन राजनिष्ठ संस्थानांतले लोकांस मोठा हर्ष झाला होता. इकडे बंडखोर लोकांस तर संताप वायूचा झटका होऊन ते अगदीं वेड्यासारखे झाले होते. त्या काळांत गुलाम ही एक मिळकत समजली जात असून जे ही मिळकत बाळगून होते त्यांस त्यावेळीं मोठा मान मिळत असे; लष्करांतल्या मोठ्या अमलदारानें तर वर प्रमाणें बंधविमोचनाचा जाहिरनामा प्रसिद्ध केला होता. ही स्थिति पाहून कांहीं वेळ पावेतों सर्व लोक दम धरून काय होतें याची वाट पहात बसले होते; परंतु अब्राहाम लिंकन याचे या संबंधांत काय म्हणणें होतें तें पाहू.

अब्राहाम यास वरील जाहिरनामा मंजूर नव्हता त्याचीं पुष्कळ कारणें होतीं. ज्या मिळकतीचा बंडाकडे उपयोग होत होता

सी मिळकत एकदम फरोक्त करण्याबद्दल सभेनें नियामांचा मसुदा मंजूर केला होता. गुलाम म्हणजे एक मिळकतच हा विचार आतां बहुतेक लोकांच्या अगदीं अंगवळणींच पडला होता आणि जे गुलाम युद्धाचे कामीं लाविले असतील ते सर्व फरोक्त करून टाकितां येतील अशी त्यांची समजूत होती. अब्राहाम याचें धोरण कांहीं वेगळेंच होतें; सरहद्दीवरील संस्थानांतील लोकांचा राग तो शांत करीत होता आणि त्यांच्या चित्तास जी अस्वस्थता वाटत होती ती तो मोडीत होता. तसेंच संयुक्त संस्थानांशी आखेर पावेतों राजनिष्ठ राहण्याबद्दल त्यांचें मन वळवीतच होता आणि हळूं हळूं आपण गुलामांचे बंध विमोचन करूं असें त्यांना निक्षून सांगत होता; परंतु फ्रिमाँट याचा हुकूम अकस्मात् जाहिर झाल्यामुळें अब्राहाम यास आपला इष्ट हेतु साधणें मोठें दुरापास्त झालें होतें. संयुक्त संस्थानाच्या लाभांत ज्यांचा कल नसेल अशा सशस्त्र लोकांस गोळी घालून ठार करण्यात येईल या बद्दल सूड उगाविण्यासाठीं बंडखोर लोक अतिशय चिडून संधि पाहत होते आणि फ्रिमाँट याचावरील जाहिरनामा बाहेर पडतांच बंडखो-रांचा सेनापती जे टॉमसन याने सदर जाहिरनाम्यास प्रत्युत्तर असा त्याचे उलट दुसरा एक जाहिरनामा प्रसिद्ध केला त्यांत मतलब असा होता कीं ' एकजुटांतल्या लष्करी शिपायांस वरील जाहिनाम्या अन्वयें फांशी देण्यांत येईल तर अब्राहाम लिंकन याचे जे नाकाचे बाल असतील त्यांस फांशीवर चढवून खाली

ओढून नंतर त्यांस सोडून देण्यांत येईल, त्याचा इत्यर्थ असा कीं संयुक्त संस्थानाशीं जे लोक इमानानें राहतील त्यांची वर लिहिल्याप्रमाणें व्यवस्था करण्यांत येईल.

फ्रिमाँट हा पश्चिम भागांत मोठा लोकप्रीय झाला असून सर्व लोक त्याला चांगलेच ओळखून होते आणि हा शूर असून स्वातंत्र्याचा कट्टा अभिमानी आहे अशी हीं बहुतेक लोकांची पूर्ण खातरी होती. कोणतेंही जबाबदारीचें काम एकदां हातीं धरिलें ह्मणजे त्यांतून स्वल्प रस्ता कसा निघेल हें त्याला तावडतोब सुचत असे, शिवाय तो एक उत्तम शोधकही होता; या त्याच्या अवर्णनीय गुणांस लुब्ध होऊन लोक त्याच्या इतके वश्यपी होते कीं तो जें जें प्रतिपादन करीत असे तें तें सर्व मोठ्या खुशीनें मान्य करीत असत. अब्राहाम यास असें वाटलें कीं फ्रिमाँट हा ताबेदार असून त्यानें आपल्या मुखत्यारीनें असें धाडस करणें ( जाहिरनामा प्रसिद्ध करणें ) हें त्याला अगदीं शोभत नाहीं; फ्रिमाँट हा बंड शमविण्याचें कामीं अत्यंत उपयोगी आहे ह्मणून अशा शूरास दोष देण्याची पाळी यावी हें चांगलें नाहीं ह्मणून अब्राहाम हा अंतर्यामीं फारच खिन्न झाला होता; परंतु फ्रिमाँट यास बोलावून सदर जाहिरनाम्यांत कांहीं फेरफार करण्यास सांगण्याचा त्यानें संकल्प केला. त्यानें लागलीच फ्रिमाँट यास एक पत्र लिहून तें मुद्दाम खानगी दूतबरोबर

त्याजकडे रवाना केलें; त्या पत्रांत आशय इतकाच होता कीं सभेनें केलेल्या नियमांस अनुसरून त्यानें जाहिरनाम्यांत फेरफार करावेत; फेरफार काय करावेत याबद्दल त्यानें थोडक्यांत फ्रिमाँट यास असें लिहून कळविलें होतें कीं ' तुमच्या जाहिरनाम्याप्रमाणें जर तुह्मी बंडखोरांस गोळी घालून ठार कराल तर आपल्यापैकीं जे चांगले चांगले लोक त्यांचे ताब्यांत आहेत त्यांस खरोखरच ठार करून बंडखोर सूड उगविल्यावांचून राहणार नाहींत हें संपूर्ण लक्षांत असावें, ह्मणून हुकूम करण्यांत येत आहे कीं प्रथम माझी मंजुरी अगर संमति घेतल्याशिवाय तुह्मी कोणासही गोळी घालून ठार करूं नये.' फ्रिमाँट यानें दुसरा मुद्दा प्रगट केला होता त्याबद्दल अब्राहाम याचें मत होतें. कीं "गुलाम बाळगणाऱ्या राजद्रोही लोकांच्या ताब्यांतील गुलामांस मोकळे करून मिळकत फरोक्त केलीतर त्याचा मोठा भयंकर परिणाम होईल असें मला वाटतें; कारण कीं त्यामुळें दक्षिणेकडे जे आपले हितचिंतक स्नेही आहेत त्यांना वाईट वाटून ते आपल्यावर उठतील." त्यानें फ्रिमाँट यास स्वतः होऊन कळविलें कीं युद्धासंबंधी सभेनें जे कांहीं नियम व कायदे केले आहेत त्याला अनुसरून जाहिरनाम्यांत फेरफार करावा अब्राहाम याचें जाहिरनाम्यांत फेरफार करण्याबद्दल पत्र प्रसिद्ध झालें तेव्हां बऱ्याच लोकांस असें वाटलें कीं या फेरफारामुळें लौकिक चर्चा व निंदा

वगैरे होऊन फ्रिमाँट याचें डोक्यावर अपयशाचें खापर फुटेल आणि आपण निर्दोषी राहूं असा अब्राहाम याचा हेतू असेल, कदाचित् फ्रिमाँट यासही असें वाटणें स्वाभाविक आहे; परंतु अब्राहाम याचें दयार्द्र अंतःकरण पाहून फ्रिमाँट यास जें अड-कित्यांत सांपडल्यासारखें झालें होतें त्याजबद्दल त्याला कांहीं एक वाटलें नाहीं. फ्रिमाँट हा निश्चयी स्वभावाचा असल्यामुळें त्यानें या बाबतींत स्वतःच्या मनाची व मताची मुळींच चल-बिचल होऊं दिली नाहीं आणि हा जो जाहिरनामा त्यानें प्रसिद्ध केला होता त्यांत यत्किंचित्ही आपण होऊन त्यानें फेरफार केला नाहीं. अब्राहाम यानें ता. ११ सपटेंबर सन १८६१ रोजीं स्वतः एक हुकूम लिहून सभेच्या नियमांस बाध येणार नाहीं अशा रितीनें त्या जाहिरनाम्यांत फेरफार केला. नंतर जनरल फ्रिमाँट यानें मिसौरी येथील बंडखोरांच्या एका अमलदारास लिहून कळविलें कीं ‘ सदरहू जाहिरनाम्यांत कैद्यांस गोळी घालून ठार करण्यासंबंधी जी हकिकत आहे ती रणांतल्या युद्धांत सामील असलेल्यापैकीं कोणास ही लागू करण्याचा हेतू नसून घायाळ लोकांसंबंधी भूतदया दाखवि-ण्याचा हक्क नाहिसा करण्याचा ही हेतु नाहीं. ’

दक्षिणेकडील फौजखात्याचा अमलदार जनरल डेविड-हंटर यानें ही फ्रिमाँट प्रमाणेंच गुलामांना सोडून देण्यासंबंधी

मे महिन्यांत एक जाहिरनामा प्रसिद्ध केला. जनरल डेविड-हंटर यानें आपलें मुख्य राहण्याचें सरकारी ठिकाण हिल्टन हेड ( दक्षिणटोंक ) येथें ठेविलें होतें. ह्या जाहिरनाम्यांत त्यानें, जार्जिया, फ्लॉरिडा आणि दक्षिण करोलिना या संस्थानांत लष्करी कायदा अमलांत आणिल्याबद्दल जाहीर केलें होतें; आणि वरील तिन्ही संस्थानांत यापुढें गुलाम म्हणून जे बाळगले जातील ते बंधनांतून कायमचे मोकळे होतील वगैरे त्यांत दर्शविलें होतें. या विलक्षण जाहिरनाम्याची नक्कल अब्राहाम यानें मुद्दाम तपासून पाहण्यासाठीं ताबडतोब मागविली आणि त्यांतील मजकुराचें मनन करून त्यानें आपल्याशीं असें ठरविलें कीं फ्रिमॉंट याचे हातून जो गैरशिस्त प्रकार घडला व त्या अपराधाबद्दल त्यास जी क्षमा केली त्यापेक्षां हंटरडेविडयाचा अपराध मोठा असून त्यास क्षमा करून उपयोग नाहीं. अब्राहाम यानें लागलींच एक मोठा जाहिरनामा प्रसिद्ध केला व त्यांत सर्वत्रांस स्पष्ट कळविलें कीं:—

" जनरल हंटर अगर कोणताही लष्करी अमलदार अगर कोणीही सामान्य मनुष्य यापैकीं कोणासही कोणत्याही संस्थानांतील गुलामांस मोकळे करण्यास संयुक्त संस्थानाच्या सरकारानें अधिकार दिलेला नाहीं आणि ह्मणून हल्लींचा जाहिरनामा कसाही असला तरी सर्वतोपरी रद्द केला आहे असें समजावें. "

शिवाय त्यानें असेंही जाहीर केलें कीं:—" संयुक्त संस्थानाच्या
बचावासाठीं जरूर दिसेल त्याप्रमाणें गुलामांस बंधमुक्त कर-
ण्याची सत्ता व तसें करण्याचा कायदेशीर हक्क फक्त अध्यक्षास
आहे, परंतु अशी सत्ता अगर हक्क समरांगणांत लढणाऱ्या
कोणत्याही लष्करी अंमलदारास कोणत्याही प्रसंगीं देतां येणार
नाहीं."

जरी अब्राहाम यानें सभेच्या नियमाचा उल्लेख केला होता
तरीपण गुलामांस मोकळे करण्याची वेळ आल्याशिवाय त्यांस
मोकळे करावे असें त्यांत नव्हतें. मात्र बंडखोरांची मिळकत
फरोक्त करण्याबद्दल त्यांत स्पष्ट लिहिलें होतें, म्हणून गुलामांस
बंध मुक्त करण्यास त्यानें परवानगी दिली नाहीं. प्रथमपासून
त्यानें ताडलें होतें कीं गुलामांस मोकळे करून त्यांना स्वतंत्रता
दिल्यानें बंडाचा परिणाम लागल्या सारखेंच होणार. परंतु
वेळ आली म्हणजे मात्र उघडपणें जाहिर करण्याचा हक्क त्यानें
आपलेकडेसच ठेऊन घेतला होता. अब्राहाम यानें असेंही प्रति-
पादन केलें होतें कीं जों पावेतों राज्यव्यवस्थेच्या नियमांस अनु-
सरून गुलामगिरी अस्तित्वांत असावी असें ठरलें आहे तोंपावेतों
परागंदा झालेल्या कोणत्याही गुलामास पुनः गुलामगिरी पत्क-
रण्यास कायदेशीर हक्क आहे. सरहद्दीवरील सर्वसंस्थानें संयुक्त
संस्थानाच्या पक्षांत वळवून घेण्याचा अब्राहाम याचा मानस

होता आणि म्हणूनच कांहीं कमजास्त प्रकार झाला तर ते लोक बिथरतील हें मनांत घोळत असल्याकारणानें तो पुढें पाऊल टाकीत नव्हता. त्याला गुलामगिरीचा अतिशय तिटकारा होताच परंतु संयुक्त संस्थानांतील ऐक्यभाव कायम ठेवणें हें त्याचें प्रथम कर्तव्यकर्म होतें, म्हणजे गुलामगिरीची पद्धत चालू राहो अगर तिचा नायनाट होवो परंतु संयुक्त संस्थानाचा हरएक प्रयत्नानें बचाव करणें हें त्याचें कर्तव्यकर्म तो समजत असे.

वर कळविल्याप्रमाणें राज्यकारभाराचें धोरण लक्षांत ठेवून दक्षिणेकडील संस्थानाच्या खानगी संस्थेंत कांहींएक फेरफार करण्याचें त्यानें योजिलें नाहीं अशी खातरी युरोपांतील राष्ट्रांची करण्याबद्दल संस्थानाच्या सेक्रेटरीस सुचना पाठविली. स्वदेशांत आणि परदेशांत ज्यांचीं ज्याचीं मतें अब्राहाम याच्या संयुक्त संस्थानाच्या ऐक्यभावाविरुद्ध होतीं त्या सर्वांस असें वाटत होतें कीं गुलामगिरीचा नाश करण्याच्या हेतूनेंच हें युद्ध उद्भवलें असून हे लोक संयुक्त संस्थानांतील लष्करी शिपायांस व अंमलदारांस ' खंडन करणारे मजूरदार भाडेकरी ' असें म्हणत असत. जनरल मॅक्क्लेलन् हा अशा उखाळ्यापाखाळ्यामुळें फार चिडत असे आणि त्यानें अध्यक्षास जें पत्र लिहिलें त्यांत असें स्पष्ट दर्शाविलें कीं खासगत संस्थेचे संरक्षणार्थ संयुक्त संस्थानांतील सरकारानें विडा उचलिला पाहिजे. मॅक्क्लेलन् याजवर

टिकेचा भडिमार चालू होताच आणि फ्रिमॉट याचें मताविरुद्ध अब्राहाम यास हुकूमही काढावा लागला या सर्व कारणामुळें अब्राहाम हा अतिशय चिंताग्रस्त झाला. उत्तर प्रांतांत जे लोक राज्यकारभारांत त्याचे विरुद्ध होते त्यांनीं तर अब्राहाम याच्या या कृतीवर टीका करण्याचा कळसच केला होता. शिवाय त्याचे जीवश्चकंठश्च स्नेही सुद्धां त्याची अतिशय निंदा करीत होते. एकीकडून लोक ह्मणत कीं गुलामगिरीचीं पाळें मुळें उपटून टाकण्याचे कामीं अतिशय घाई होत आहे, आणि दुसरीकडून असेंही ह्मणत कीं याची त्याचकामीं अतिशय मंदगति आहे. एकंदरींत चहूंकडूनच त्याला मोठा त्रास झाला होता. युद्धाचे विरुद्ध जे होते ते त्याला ' खंडनकरणारा ' असें ह्मणत होते आणि लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतले लोक त्याला गुलामगिरी जेथें चालत असेल तेथें चालू ठेवावी परंतु यापुढें मात्र ही पद्धत नवीन कोठें चालू होतां कामा नये अशा मताचा ' लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचा पुढारी ' असेंही ह्मणत होते.

परंतु अब्राहाम यास जरी चहूंकडून गोंधळल्यासारखें झालें होतें तरी त्यानें जो मार्ग स्विकारिला होता तो मुळींच सोडिला नाहीं. त्यानें धारिल्याप्रमाणें गुलामगिरीचा नाश हळूं हळूं होण्यासाठीं जे गुलाम बाळगणारे राजनिष्ठ लोक होते त्यांना गुलामगिरी बंद झाल्यामुळें जें नुकसान होईल त्याचा कांहीं तरी

मोबदला देण्याची युक्ति योजिली. इ. स. १८६२ च्या मार्च महिन्याच्या ६ व्या तारिखेस त्यानें सभेस शिफारस केली कीं ' हळू हळू गुलामांस बंदमुक्त करण्यासंबंधांत झालेले नियम व कायदे जें संस्थान मान्य ठेवील त्या संस्थानाशीं संयुक्त संस्थानाच्या सरकारानें ऐक्यभावानें वागून सहानुभूति दाखविली पाहिजे आणि ज्यांचे गुलाम बंधमुक्त करावयाचे त्यांना मोबदला देण्यासाठीं द्रव्यद्वारा मदत दिली पाहिजे; हा सिद्धान्त जर सभेनें आणि देशांतील लोकांनीं पसंत करून मंजूर केला तर लागलींच त्याप्रमाणें सर्व संस्थानिकांना लेखी स्पष्ट सूचना ताबडतोब पाठवाव्यात म्हणजे त्यांना हें कबूल आहे किंवा नाहीं तें तात्काळ समजेल. शिवाय जर राष्ट्रीय सरकारच्या सत्तेस अडथळा करण्याचें बंद होईल तर युद्धही बंद होईल व यावरून असें समजावयाचें कीं जर युद्धाचा शेवट झाला तर गुलामगिरीचा बचाव लौकरच विनहरकत होईल; अथवा जर अडथळा चालू राहील तर युद्धही चालू राहील आणि त्यामुळें किती हानि होईल याचा अंदाज होणें मोठें दुरापास्त आहे. यावरून इतका इत्यर्थ खास निघतो कीं जर तजविजी तजविजीनें गुलामांची सुटका मोबदला देऊन होण्याचें नामंजूर झालें तर युद्ध प्रसंग जास्त दिवस चालू राहून गुलामगिरीही समूळ नाहींशी होईल.

सभेनें हा ठराव स्विकारला. ज्या सरहद्दीवरील संस्थानां-

साठीं ही तजवीज करण्याचें ठरलें होतें त्यांनीं या नियमासंबंधी विशेष बेपरवाई दाखविली नाहीं; परंतु सभेंत असलेल्या त्या संस्थानांच्या लोकांनीं मात्र या ठरावाच्या विरुद्ध मतें दिलीं. अब्राहाम या विवंचनेंत असतांना त्यानें व्हाईटहौस नांवाच्या राजवाड्यांत सरहद्दीवरील संस्थानांतील लोकांची एक सभा भरविण्याचें ठरविलें. अब्राहाम याचा विचार होत असलेल्या नुकसानीचा सर्व बोजा त्यांचेच डोक्यावर टाकण्याचा प्रसंग न येऊं देण्याबद्दल होता; परंतु मोबदला देऊन गुलामगिरी हळू हळू बंद करण्याविषयींचा त्याचा विचार त्यांनीं जर स्विकारला तर गुलामगिरीचा नाश त्यांचेच संमतीनें होईल म्हणजे सर्व कांहीं उत्तम घडेल. या सभेंतील वकील मंडळीस वाचून दाखविण्यासाठीं त्यानें मोठ्या काळजीनें एक लेख तयार करून जवळच ठेविला होता, तो त्यानें त्यांना वाचून दाखविला व त्यासंबंधीं स्पष्ट कळविलें कीं त्यानें जो विचार प्रदर्शित केला होता तो महत्वाचा असल्यामुळें त्या मंडळीनें मंजूर ठेविलाच पाहिजे. शिवाय त्यानें सभेंतील मंडळीस निक्षून सांगितलें कीं ' दक्षिण अमेरिकेंत वसाहत करण्यासाठीं जमीन विपूल असून स्वस्त आहे आणि जेव्हां सुटका झालेल्या गुलामांची संख्या वाढेल तेव्हां त्यांना आपआपसांत सोबत, करमणूक व योग्य उत्तेजन वेळोवेळीं मिळत गेलें म्हणजे ते तेथें जाऊन वसाहत करण्यास कधींही नाखुशी दाखविणार नाहींत. '

अध्यक्षाचें हें भाषण लक्षांत ठेविण्यासारखें होतें, त्यांत त्यानें ज्यापासून स्वतःस होत असलेला त्रास दुसऱ्यास व्यक्त होईल असें एकही वाक्य मुद्दाम बोलून दाखविलें नव्हतें. हंटर याच्या, गुलामांस बंधमुक्त करण्याबद्दलच्या, जाहिरनाम्यासंबंधी तो असें म्हणाला कीं ' तो जाहिरनामा नाकारल्यामुळें बरेच लोक फार असंतुष्ट झाले असून त्यांनी मला मोठा दोष दिला. ह्या लोकांचा देशास मोठा आधार आहे. ह्या बाजूसंबंधी सर्व बोजा माझ्या मस्तकावर आहे व तो दिवसानुदिवस वाढत चालला आहे. ' युद्धाचें काम लांबणीवर पडल्यामुळें देशांतले राजनिष्ठ लोक अगदीं कंटाळून गेले होते कारण त्यांना असें वाटत होतें कीं हरप्रयत्नानें गुलामागिरीचा बचाव करावयाचाच असा सरकारानें केवळ बाह्यात्कारें निश्चयाचा आव घातला आहे. अब्राहाम याच्या सरकारी कामाकाजाची पद्धत ज्या लोकांस फार पसंत होती ते ती मनापासून मान्य करीत होते. ते सर्व लोक लष्करांतल्या अमलदारांस गुलाम धरणारे आणि 'स्वकीय संस्थेचे संरक्षक' असें खोंचून बोलत असत. अध्याक्षानें सरहद्दीवरील संस्थानिकांची जी एक मोठी सभा मुद्दाम भरविली होती त्याचा निकाल पालथ्या घड्यावर पाणीओतल्याप्रमाणें झाला; कारण त्यांतील पुष्कळ लोक अब्राहाम याच्या मताविरुद्ध होते. वरील सभा इ. स. १८६२ च्या जुलई महिन्यांत भरली असून राष्ट्रीय सभेंत

काय ढवळाढवळ झाली त्याबद्दल सभेंत असलेल्या सरहद्दीवरील संथानांतील वकील मंडळीच्या कांहीं एक गांवींही नसावें हें मोठेंच आश्चर्य होय. कोलंबिया प्रांतांत गुलामगिरी नाहींशी होण्यासंबंधांत नियमाचा मसुदा त्या सभेनें मंजूर केला. राष्ट्रीय सरकाराच्या मुख्य गादीवर अध्यक्ष अब्राहामलिंकन हा स्थानापन्न होऊन ज्या नियमाच्या मसुद्याच्या आधारानें गुलामांस स्वतंत्रता मिळाली त्या मसुद्यावर सहीकरतांना तो म्हणाला 'ह्या राजधानींतून गुलामगिरी नाहींशी व्हावी असा जेव्हां विचार इ. स. १८४९ सालीं माझ्या मनांत आला त्यावेळीं इतक्या थोड्या अवधींत धारल्या प्रमाणें इष्टहेतु तडीस जाईल असें माझ्या स्वप्नींही आलें नव्हतें. ज्या मनुष्यानें १३ वर्षांपूर्वी राजधानींतून गुलामगिरी नष्ट झाली पाहिजे असें कंबर बांधून मोठ्या हिमतीनें सांगितलें व लोकांचा वकील या नात्यानें ज्यास हा नियमाचा मसुदा मान्य होईल अशी अशाही नव्हती त्याच मनुष्यास अध्यक्ष या नात्यानें त्या नियमाच्या मसुद्यावर सही करण्याचा सुयोग यावा हें एक उत्कृष्ट न्यायाचेंच उदाहरण होय.

इ. स. १८६२ सालीं मोकळे केलेल्या गुलामांस युद्धास उपयोगी पडण्यासाठीं शस्त्रें वगैरे द्यावींत किंवा कसें या प्रश्नाचा खल मोठ्या जारींनें चालू होता. असे लोक संयुक्तसंस्थानाच्या

लष्करांत पुष्कळ होते व त्या सर्वांस आचाऱ्याचें, मजूरांचे आणि गाड्या हांकण्याचें अशीं कामें करण्यास्तव नोकर ह्मणून ठेविले होते. संयुक्त संस्थानांतील लष्करी लोकांच्या छावण्यांत अशा गुलामांची गर्दी झाली असून त्या पैकीं बऱ्याच धडधाकट लोकांस युद्ध करण्यास शस्त्रें द्यावींत असें अब्राहाम याचें मनांत चांगलेंच भिंबलें. या सर्व लोकांस सरकारांतून शेर मिळत असे व त्यावर ते आपले पोट भरीत असत. अब्राहाम ह्मणाला " इतर लोकांप्रमाणें सिद्दी लोकांस ते काम करितात त्याबद्दल, त्यांना कांहीं तरी मिळण्याची आशा असणें हें अगदीं स्वाभाविक होय; जर आपण त्यांच्यासाठीं कांहींएक न केलें तर त्यांनीं तरी आपल्या साठीं कोणतेंही काम काय ह्मणून करावें ? जर ते आपल्यासाठीं स्वतःचे प्राण सुद्धां खर्चीं घालण्यास मागें पुढें पाहत नाहींत तर आपणांसही त्यांचे सर्व मनोरथ ( स्वातंत्र्य मिळण्याबद्दल सुद्धां ) परिपूर्ण केले पाहिजेत. स्वातंत्र्य देण्याबद्दल त्यांना आपण वचन दिलेंच आहे व तें वचन परिपूर्ण करणें हें आपलें मुख्य कर्तव्य कर्म होय. मोकळे केलेल्या गुलामांस युद्धासाठीं शस्त्रें देण्यांत अब्राहाम याचा दुसरा एक हेतु होता, तो असा कीं ह्या मोकळ्या केलेल्या सिद्दी लोकांनीं त्यांच्या मालकांस जे करार लिहून दिले होते त्या करारांतून त्यांना मुक्त करण्याचें होतें. करार मुक्त झाल्यावर लढाईचे कामीं त्यांची बरीच मदत मिळणार असून जेव्हां

या संबधांत कांहीं दिवसानंतर कायदा होऊन तो मंजूर झाला त्यांत एक कलम वरील मजकुराचें होतें, आणि त्यामुळें हे सर्व सिद्दीगुलाम आपल्या बायका पोरांसुद्धां करारांतून सुटून अगदीं सर्व रितीनें मोकळे झाले.

अद्याप युद्धाचें काम अर्धवटच पडलें होतें. किरकोळ लढाया पुष्कळ ठिकाणीं चालू होत्या परंतु त्या पासून कांहीं एक निष्पन्न झालेलें दिसून आलें नाहीं. पोटोमॅक येथील सैन्याचा पुढारी मॅकक्लेन हा आपल्या फौजेसुद्धां वॉशिंगटन् येथें स्वस्थ बसला होता. लष्करी लोक हरएक प्रकारें गोळा करणें व लोकांवर लाद-लेले नवीन व त्रासदायक कर वसूल करणें हीं कामें मोठ्या झपा-ट्यानें चालूं असल्यामुळें लोकांत असंतोष मात्र वाढत चालला होता. ' युद्धाचा निकाल लागला नसून विभक्त झालेल्या संस्था-नांत संयुक्त संस्थानाच्या सरकाराची सत्ताही गाजत नाहीं मग विनाकारण द्रव्याचा हा अवाढव्य व्यय कां होत आहे हें समजत नाहीं ' असें जें लोक कुरकुरत होते तें अगदीं यथार्थ होतें. या असंतोषाचा परिणाम असा झाला कीं अब्राहाम हा अद्याप सर्व ठिकाणीं गुलामगिरीचा नायनाट होण्याबद्दल जाहिरनामा कां प्रसिद्ध करीत नाहीं अशा बद्दल लोक निकरानें भांडूं लागले. सभेनें मंजूर केलेल्या काय-द्याच्या मसूद्या अन्वयें फक्त कोलंबिया प्रांतांतच गुलामगिरी

नाहींशी झाली होती परंतु दुसऱ्या एका मसुद्या अन्वयें संयुक्त संस्थानांतील सर्व भागांत ती कायदेशीर आहे असें ठरविण्यांत आलें होतें. गुलामांस बंधमुक्त करण्यासंबंधी सर्व साधारण जाहिरनामा लौकर प्रसिद्ध करण्याबद्दल अब्राहाम याच्या स्नेही मंडळी कडून त्यास फार तगादा चालू होता, व त्या संबंधांत त्याच्या स्नेह्यानें त्यास एक पत्र पाठविले असून तें होरेसग्रीले नांवाच्या न्यूयार्क ट्रिब्यून वर्तमान पत्राच्या लेखकानें आपल्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केलें होतें. अब्राहाम याचें पत्र अशा रितीनें जें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें त्यांतील भाषा शैली प्रकाशकानें आपल्या मुखत्यारीनें अपरिमित आणि हट्टवाद्या प्रमाणें छापिली होती. आपणास लिहिलेल्या पत्राचें उत्तर म्हणून अब्राहाम यानें लिहिलेलें पत्र प्रसिद्ध झालेलें पाहून त्याच्या स्नेह्यास मोठें आश्चर्य वाटलें. अब्राहाम, वरील बाबती संबंधांत एक सर्व साधारण जाहिरनामा प्रसिद्ध करण्यासाठीं संधी शोधितच होता व पुढें त्यानें त्या प्रमाणें केलें. इ. स. १८६२ च्या आगष्ट महिन्याच्या २२ व्या तारिखेस त्यानें मी. ग्रीले ह्यास एक पत्र पाठविलें होतें तें महत्वाचें असून त्यांत त्यांची सुबोध व सोज्वळ भाषाशैली आणि त्याचा स्वभावाचा मोकळेपणा व साधेपणा स्पष्ट रितीनें व्यक्त होत आहे. त्या पत्रातील उतरा येणें प्रमाणें:—

नामदार होरेसग्रीले, प्रिय मित्र यांसी,

( १ ) तुम्ही आपल्या ता. १९ मिनहूच्या न्यूयार्क ट्रिब्यूनच्या अंकांत मला एक स्नेह्यानें पाठविलेलें पत्र प्रसिद्ध केलेंत तें मी नुकतेंच साग्र वाचून पाहिलें ( २ ) जर त्यांत कांहीं खऱ्या गोष्टी प्रमाणसिद्ध असून मी त्या चुकीच्या मानिलेल्या असतील आणि त्या चुकीच्या आहेत असें कदाचित् मला माहित ही असलें तरीपण त्या संबंधांत तोंडास तोंड देऊन वादविवाद करण्याची माझी इच्छा नाहीं ( ३ ) जर त्यांत कांहीं मजकूर अधीर वृत्तीचा आणि हट्टवादीपणाचा असला तरीपण तो माझ्या एका अनुभविक न्यायी व जुन्या स्नेह्याकडून मला मिळाल्यामुळें तो मला मान्य आहे. ( ४ ) तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें माझी राज्यकारभार चालविण्याची पद्धत एकदां हातीं धरलेल्या कामाचा पिच्छा पुरविण्याची असून कोणासही संशयित न ठेविण्याची आहे. मी संयुक्त संस्थानाचें संरक्षण करीन आणि तें राज्यव्यवस्थेच्या स्वरूपाला अनुसरूनच अगदीं स्वल्पमार्गानेंच करीन ( ५ ) राष्ट्रीय सत्तेस जसजसे लौकर पूर्वरूप प्राप्त होईल तसतसें ऐक्यभावास ही लौकरच पूर्वस्वरूप प्राप्त होईल ( ६ ) ज्यांना संयुक्त संस्थानांचा बचाव करणें नसेल त्यांनीं त्याच वेळीं गुलामगिरीचा तरी बचाव केला पाहिजे, या पैकीं कोणता तरी एक निर्णय लागल्या खेरी-

ज मी आपली संमति कधीं ही देणार नाहीं (७) संयुक्त संस्थानांचा बचाव केला तरी गुलामगिरीचा नायानाट झालाच पाहिजे या पैकीं कोणता तरी एक निर्णय ठरल्या खेरीज मी आपली संमति कोणास देऊं इच्छित नाहीं. (८) खऱ्या अंतःकरणापासून माझा मूळ हेतू संयुक्त संस्थानांचा हरप्रयत्नें बचाव करण्याचा आहे मग गुलामगिरीचा बचाव होवो अगर ती समूळ लयास जावो त्या बद्दल मला इतकी काळजी नाहीं (९) कोणत्या ही गुलामास मोकळा केल्याशिवाय जर सयुक्त संस्थानांचे रक्षण माझे कडून झालें तर मी तें करीन; आणि कित्येक गुलामांस मोकळे करावें आणि कित्येकांस तसेंच बंधनांत एकटे पडूं द्यावें अशा पद्धतीनें जर संयुक्त संस्थानांचें रक्षण होत असेल तरीपण मी तें करीन (१०) सिद्दि लोकांसाठीं गुलामगिरीच्या बाबतींत जे माझे प्रयत्न चालू आहेत त्याचें कारण इतकेंच कीं त्यापासून संयुक्त संस्थानांचा बचाव होण्याजोगा आहे असें मला वाटतें आणि मी जी गम खातों त्याचें कारण इतकेंच कीं त्यामुळें संयुक्त संस्थानांचा बचाव होईल असें मला वाटत नाहीं (११) मी जें करीत आहे त्यामुळें माझ्या मूळ हेतूला बाध येईल असें जेव्हां मला आढळून येईल तेव्हां मी जें करीन तें कमीच करीन आणि माझें करणें माझ्या मूळ हेतूला बळकटी आणीत आहे असें जेव्हां जेव्हां मला दिसून येईल त्या त्या वेळीं मी तें ज्यास्तच करीन (१२) मला ज्या वेळीं

कोणी माझ्या चुक्या दाखवील त्याच वेळीं त्या मी सुधारीन आणि जीं धोरणें मी लागू करणार आहे तीं जर मला खरीं दिसलीं तरच तीं मी लागू करीन ( ३ ) माझे विचार व माझी धोरणें सरकारी नात्यानें येथें मी स्पष्ट लिहिलीं आहेत आणि सर्व मनुष्यांस सर्व ठिकाणीं स्वातंत्र्य सुख मिळावें ही जी माझी स्वतःची खास इच्छा मीं वारंवार दर्शविली आहे त्यांत कोणताही व किंचित् सुद्धां फेरफार मी करूं इच्छित नाहीं.

आपला

अब्राहाम लिंकन

वरील हकीकत घडली त्या दरम्यान बंडखोरांच्या सैन्याचा पुढारी जनरल ली यानें कांहीं कांहीं महत्वाच्या ठि-काणीं यश संपादन केलें. कोणत्याही कामांत यश प्राप्ति झाली म्हणजे आनंद होणें हें अगदीं स्वाभाविक आहे त्याप्रमाणें जन-रल ली याच्या आनंदास जणूं काय उतच आला होता. संयुक्त-संस्थानांशीं एक निष्ठेणे वागत असलेल्या एका सरहद्दीवरील संस्थानावर त्यानें स्वारी केल्याबद्दलची बातमी चहूंकडे पसरतांच सर्व देशांतील लोकांच्या अंतःकरणांत एक प्रकारची धडकीच बसली; अब्राहाम याच्या पोटांतही ही बातमी ऐकतांच धस्स

झालें. कारण तो गुलामांस बंधमुक्त करण्याचा जाहिरनामा प्रसिद्ध करण्याच्या विचारांत असून त्यानें त्यासंबंधी एक मसुदाही तयार करून ठेविला होता. लोकांनीं त्याला जाहिरनामा प्रसिद्ध करण्याबद्दल अतिशयच आग्रह करावा व त्यानें त्यांच्याशीं उलट वाद करावा असें चाललें होतें त्यामुळें त्याला यासंबंधी निर्बळ मुद्दे कोणते हें स्पष्ट कळून आलें. जाहिरनामा प्रसिद्ध करण्यास त्याचें मन कांकूं करीतच होतें, परंतु मेरिलँडवर बंडखोर चाल करून गेले व राष्ट्रीय राजधानी ही मोठ्या धोक्यांत सांपडली असून तेथील लोकांच्या अगदीं प्राणांवर येऊन बेतली असें जेव्हां त्याला कळलें तेव्हां अब्राहाम यानें ईश्वराचें स्मरण करून अशी शपथेवर प्रतिज्ञा केली कीं ' चाल करून जाणाऱ्या शत्रूंस हांकून लावल्यानंतर सदरहु जाहिरनामा मी प्रसिद्ध करीन. ' सौथमौंटनची लढाई सप्टेंबरच्या १४ व्या तारिखेस झाली व त्याच महिन्याच्या १७ व्या तारिखेस ऍंटिएटम्‌ची लढाई झाली. बंडखोरांस चाबुकानें फोडून काढलें व कित्येकांच्या पाठीवर कोरडे ओढले; अशा रितीनें यथेच्छ चोप बसल्यावर ज्याप्रमाणें वाऱ्यानें मेघ वितळून जातात तद्वत् त्यांच्यांत फांटाफूट होऊन सर्व चहूंकडे विस्कटून पळाले. ते पोटोमॅक ओलांडून माघारे फिरले परंतु त्याच्या हातून कांहींएक झाले नाहीं आणि मेरिलँड व पेन्सिल्वेनिया याचा चांगला बचाव झाला. इ. स. १८६२ च्या सप्टेंबरच्या २२ व्या तारिखेस अध्यक्ष अब्राहाम

लिंकन यानें स्वतःचा अजरामर जाहिरनामा प्रसिद्ध केला आणि त्यांत करारबद्ध झालेल्या गुलामांस स्वातंत्र्य दिल्याचा स्पष्ट उल्लेख केला होता. या जाहिरनाम्याचा सारांश या भागाच्या शेवटीं दिला आहे.

॥ यशः पुण्यैरवाप्यते ॥ याउक्तीप्रमाणें अध्यक्ष अब्राहाम लिंकन विजयी झाला व त्याबद्दल यशाच्या नौबती सर्व देशभर झडूं लागल्या. स्वतंत्र संस्थानांतील सर्व लोक अध्यक्ष अब्राहाम यास चिरायू चिंतून अहोरात्र परमेश्वराजवळ त्याचें अभिष्टचिंतन करूं लागले. सार्वजनिक आनंदप्रदर्शनार्थ ठिकठिकाणीं तिकडील रिवाजाप्रमाणें अग्नि प्रज्वलित करून अब्राहाम लिंकन यशस्वी झाल्याबद्दल लोक पोवाडे गात होते. सर्व ठिकाणीं दीपोत्सव, सन्मानार्थ तोफेच्या सलाम्या, लोकांचीं संमेलनें वगैरे अनेक रितीनें सर्व नागरिक जन विजयोत्सव करूं लागले. 'गुलामगिरीचा उच्छेद '! 'गुलामगिरीचा नायनाट '! गुलामगिरी कायमची रसातळास गेली ' असें ह्मणून लोकांनीं कडकडून बोटें मोडलीं. ' स्वातंत्र्याचा विजय '! 'स्वातंत्र्यसौख्यमातेचा अभ्युदय' स्वातंत्र्यप्रिय असे वीरपुत्र व वीरांगना चिरकाल या भूमंडलावर नांदोत '! अशा रीतीनें सर्व देशभक्तांनीं जयघोष करून या सर्वांस कारणीभूत महाप्रतापी शूर वीर अध्यक्ष अब्राहाम लिंकन व त्याचे कुटुंबांतील सर्व माणसांच्या नांवानें जयजयकार केला;

अशा रीतीनें राष्ट्रोन्नतीच्या रवीचा अभ्युदय होऊन त्यानें आपला प्रकाश सर्व ठिकाणीं पाडल्यामुळें सर्वत्रांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. दुहीस अक्काबाईचीच उपमा देणें अगदीं योग्य होईल; कारण एकदां कां घरांत दुही शिरली ह्मणजे तें घर कालत्रयींही सुखानें नांदावयाचें नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांत दुही फार दिवसापांसून माजत चालल्यामुळें देशावर किती व कशीं अनिवार्य संकटें येऊन देश अधोगतीस जाऊन पोंहचला, ह्याबद्दलचा खरेपणा ज्यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन केलें आहे त्यांचे लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. अब्राहाम लिंकन यांचे हृदयांत हा ठरीव सिद्धांत चांगलाच बिंबला होता. सर्व शहरांत, गांवांत व खेड्यापाड्यांत आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनीं अध्यक्ष अब्राहाम लिंकन याचे अत्यंत अमार मानिले. संमतीचे ठराव सर्व ठिकाणीं मंजूर होऊन त्याबद्दल योग्य अभिनंदन केलें. आतां राहिलेलें कार्य तडीस नेण्याच्या कामीं असेंच अन्योन्यसहाय आम्ही खात्रीनें करूं, अशाबद्दल दृढ निश्चयाचीं वचनें लोकांकडून अब्राहाम यास मिळालीं. या पुढें रणदेवतेनें नवीनच स्वरूप धारण केलें होतें. गुलामगिरीच्या कृष्णछायेचा अतार्किंचितूही तुषार कोठें दृष्टोत्पत्तीस न येतां संयुक्त संस्थानास पूर्व स्थितीस आणणें एवढ्या संबंधीच आतां कायतें युद्ध व्हावयाचें राहिलें होतें. अब्राहाम यानें आपल्या जाहिरनाम्यांतील कलमबंदीस अनुसरून ज्या ज्या संस्थानांनीं लोकसत्ताकस्वतंत्र पक्षा-

ची राजसत्ता सर्वतोपरी मान्य केली तीं तीं संस्थानें सदरहु कलमबंदींतून कमी केलीं. अशा राजनिष्ट संस्थानांतील संस्थेस मध्यस्थी करण्याचें आपणांस कांहीं एक प्रयोजन नाहीं, हें त्याचें वचन त्यानें खरें करून दाखविल्यामुळें । बोले तैसा चाले त्यांची वंदावीं पाऊलें । या उक्ती प्रमाणें लोक अब्राहाम याची स्तुती करून त्यास पूज्य मानू लागले. इ. स. १८६३ च्या जानेवारीच्या पहिल्या तारीखेस त्यानें जो अखेरचा जाहिरनामा प्रसिद्ध केला त्यांत संयुक्त संस्थानांतून जीं जीं संस्थानें कमी केलीं ह्मणून वर कळविलें आहे त्या त्या सर्व संस्थानांचीं नांवें नमूद केलीं; परंतु हीं नांवें नमूद करण्यांत फारसा अर्थ नव्हता, कारण वास्तविक पाहतां गुलामगिरीचा सर्व ठिकाणीं नाश झाला होता. कालें करून संयुक्त संस्थानांतील सर्व देशांत स्वातंत्र्यानें आपला अंमल पूर्ण बसविला व संयुक्त संस्थानावर जो जुन्या लोकांचा अपवाद होता तो पार नाहींसा झाला.

लढत असलेल्या लोकांची मिळकत स्वाधीन करून घेऊन ती फरोक्त करण्यास हक्क प्राप्त झाला असून त्याबद्दल आतां कोणताही निर्णय होणें बाकी राहिलें नव्हतें. गुलाम ज्या अर्थी मिळकत ह्मणून ठरून चुकले होते त्या अर्थीं ते फरोक्त होण्यास पात्रच होते. लष्करी कायद्याला अनुसरून संयुक्तसंस्थानाच्या सरकारास बंडखोरांना राजद्रोही शत्रु मानण्याचा हक्क

होता ही गोष्ट निर्विवाद होय आणि संयुक्त संस्थानाचें सैन्य व आरमार यांचा मुख्य सेनापती या नात्यानें अध्यक्षानें दास्य-विमोचनाचा जो कायदा अमलांत आणिला त्या अन्वयें त्या राजद्रोही शत्रूंची सर्व सत्ता आगदीं निर्बल झाली होती आणि सुधारलेल्या राष्ट्रांतील कायद्यास व पूर्वापार चालत आलेल्या वहिवाटीस अनुसरून हें अगदीं रास्तच झालें होतें. कालें करून राष्ट्रीय सभेनें लोकसत्ताकस्वतंत्र संस्थानांतून गुलामगिरीचा समूळ अस्त झाल्या बदल दिवाणी सत्ता अशा रितीनें चालविण्यास प्रारंभ केला कीं त्यामुळें अध्यक्षास स्वतः केलेल्या कायद्याच्या अंमलबजावणी बद्दल मुळींच शंका राहिली नव्हती.

अध्यक्षाच्या मंत्रिसभेंतल्या सभासदांनीं प्रसिद्ध केलेला जाहिरनामा अंतःकरणपूर्वक मान्य केला इतकेंच नव्हेंतर प्रत्येकानें त्या बाबतींत आपआपलें कर्तव्य संपूर्ण रितीनें बजाविलें. अब्राहाम यानें सदरहु जाहिरनामा तयार करून ठेविलाच होता आणि तो जुलई मासांत प्रसिद्ध करणार होता, परंतु हा विषय जेव्हां मंत्रिसभेपुढें अखेर मंजुरी साठीं ठेवला, त्यावेळीं सेक्रटरी सिवर्ड यानें कळविलें कीं आणखी थोडे दिवस हा जाहिरनामा प्रसिद्ध करणें बरोबर होणार नाहीं. त्यावेळीं बंडखोरांचा पुढारी जनरल ली हा आपल्या सैन्यासह उत्तरेकडे पेन्सिल्वेनियावर चाल करून जाण्याच्या बेतांत होता. लोकसत्ताकस्वतं-

त्र पक्षाच्या फौजेस त्या वेळीं ग्रहदशेनें अगदीं वेढून टाकिलें असून सर्वांचीं तोंडें औदासिन्यानें व नाउमेदीनेंनिस्तेज दिसत होतीं. याचवेळीं सिवर्ड यानें असें प्रतिपादन केलें कीं यावेळेस जाहिरनामा प्रसिद्ध झालातर मदती साठीं चहूंकडून एकदम ओरड ऐकूं येईल. मि. सिवर्ड यानें जेव्हां इतकें निक्षून सांगितलें तेव्हां अब्राहाम यानें जाहिरनामा प्रसिद्ध करण्याचें तहकूब ठेऊन असें ठरविलें कीं ईश्वरकृपेनें जनरल ली यास हांकून लाविल्यानंतर तो जाहिरनामा प्रसिद्ध करावा. सदरहु जाहिरनाम्यांतील एका कलमांत ‘ संरक्षण ’ एवढा शब्द वाढविण्या बद्दल सिवर्ड यानें अध्यक्षास सूचना केली होती व त्या प्रमाणें तें कलम सुधारलें तें येणें प्रमाणें:—

‘ निर्दिष्ट केलेल्या संस्थानांत आणि त्याच्या सर्व भागांत जे जे गुलाम ह्मणून धरिले असतील त्यांना या पुढें अगदीं मोकळें केलें आहे असें खास समजावें आणि संयुक्तसंस्थानांतले फौज व आरमाराचे अंमलदार व सत्ता चालविणारे अधिकारी अशा मोकळे झालेल्या इसमांचें स्वातंत्र्य मान्य ठेऊन त्यांचें अव्याहत संरक्षण करितील. ’ खजिन्याचे सेक्रेटरी मि. चेस यानें सदरहु जाहिरनाम्यांतील शेवटलें कलम कांहींसें वाढवून अध्यक्षापुढें मंजुरीस्तव ठेवलें तें येणें प्रमाणें:— ‘ प्रामाणिक बुद्धिनें न्यायदेवतेस स्मरून हा कायदा केला आहे. युद्ध प्रसंगीं

जरूर पडल्यास हा कायदा अमलांत आणण्याबद्दल सरकारानें आपली खातरी दिली आहे. परमेश्वराची या संबंधांत कृपादृष्टि असावी आणि मनुष्यमात्रानें या संबंधांत निर्णयात्मक पूज्यबुद्धि ठेवावी अशी माझी प्रभुचरणीं विनंति आहे.' या अजरामर जाहिरनाम्यांतील शेवटल्या कलमांत 'युद्धप्रसंगीं जरूर पडल्यास' एवढा मजकूर अध्यक्ष अब्राहाम लिंकन यानें स्वतः वाढविला होता.

संयुक्त संस्थानांतील लोकसत्ताकस्वतंत्र पक्षाच्या सर्व राज्यांतून गुलामगिरीचा अखेर अस्त झालाच याबद्दल परकीय देशांतील लोकांनीं ( त्यांत मुख्यत्वेंकरून इंग्रज लोकांनीं ) अटलांटिक् महासागराच्या पैल तीराकडे अभिनंदनीय पत्रांचा जणूं काय वर्षावच चालूं केला होता. अब्राहाम याचेसंनिध जे त्याचे निकट ऋणानुबंधी ( लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतले ) स्नेही होते त्यांनीं सुद्धां त्याची खातरी केली कीं इंग्रज लोकांस हा विश्वव्यापक स्वातंत्र्याचा रवी उदयास आलेला पाहून अत्यंत समाधान होईल यांत कांहीं संशय नाहीं; अशा प्रकारें जरी त्यांनीं खातरी केली तरी अब्राहाम याचे मनाचा विरस झाला असें दिसलें. इंग्रज सरकाराचा परकीय राष्ट्रांसंबंधी कामकाज पाहणारा सेक्रेटरी लार्ड जॉन् रसेल् यानें वॉशिंग्टन् येथील आपल्या वकिलास पत्र पाठवून त्यांत सदरहू जाहिरनाम्यासंबंधांत

अतिशय खोंचून मजकूर लिहिला होता. त्यानें कळविलें कीं 'गुलामांस बंधमुक्त करण्याच्या जाहिरनाम्यांतील कलमें गुलाम बाळगणारांना सूड उगविण्यास कारणीभूत होणार असून ते कोणत्या वेळीं काय प्रसंग आणतील याचा नेम नाहीं, करितां सदरहु जाहिरनाम्याचा अंमल होणें रास्त आहे किंवा कसें हा मोठा प्रश्न उद्भवतो.' लॉर्ड् जॉन् रसेल् याचा दुष्ट स्वभाव सर्वत्रांस माहीत असून त्याला प्रत्येक बाबतींत दोष काढण्याची मोठी विलक्षण खोड असे. या त्याच्या स्वभावास अनुसरून तो म्हणाला:—

" संयुक्त संस्थानांतले सत्ताधीश ज्या ठिकाणीं गुलामांचें बंधविमोचनाचें खरें स्वरूप अस्तित्वांत आणितां येत नाहीं त्या ठिकाणीं गुलामांचें बंधविमोचन करण्याचा पोकळ डौल घालतात व बंधविमोचनाचा हुकूम अमलांत आणणें जेथें संभवनीय आहे तेथें तसा प्रयत्न करीत नसल्यानें कोणाचेंच बंधविमोचन होत नाहीं." अमेरिकेंतल्या लोकसत्ताकस्वतंत्र संस्थानांच्या प्रत्येक भागांत सदरहु हुकुमाचा अंमल पूर्णपणें होत आहे असें प्रत्यक्ष पाहण्यासाठीं लार्ड् रसेल् फार दिवस वांचले नाहींत हें त्यांचें खरोखरच दुर्दैव होय. संयुक्त संस्थानांच्या सरकाराशीं इतर राज्यें उघड रितीनें जरी वांकडीं झालीं होतीं तरीपण गुलामगिरी कोणी स्विकारूं नये अशा अर्थाच्या राष्ट्रीय सरकाराच्या हुकुमाची मजल सर्व देशभर जाऊन पोंहचली होती. ज्याठिकाणीं या गुलामगिरीचीं मुळें खोलपावेतों जमिनींत शिरलीं होती तीं तशीच कुजत जाऊन

अखेर पार नाहींशीं झालीं. ज्या भूमातेच्या शूर पुत्राच्या अंतःकरणांत अमेरिकेंतल्या कल्पनाशक्तीचें तेज संपूर्ण फांकलें होतें आणि ज्या शूर रणाग्रणीचीं सर्व अवयवें ऐन तारुण्यांतल्या कल्पनाशक्तीनें अगदीं रसरसलीं होतीं त्या महाभागाचा हात ह्या विश्वस्वातंत्र्याच्या अजरामर हुकुमास लागला होता.

इ. स. १८६२ च्या सप्टेंबर मासच्या २२ व्या तारखेचा प्राथमिक जाहिरनामा व इ. स. १८६३ तारिख १ जानेवारीचा अखेरचा जाहिरनामा या दोहोंतील हकिकत खालीं लिहिल्याप्रमाणें:—

१. अमेरिकेंतल्या संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष आणि तेथील सैन्य व आरमाराचा सेनापती मी अब्राहाम लिंकन या लेखानें जाहिर करून स्पष्ट कळवितों कीं—संयुक्त संस्थानें आणि ज्या संस्थानाचे राज्यकारभारासंबंधी दळणवळण संयुक्त संस्थानाशीं तहकूब राहिलें असेल अगर त्याला बाध आला असेल असें प्रत्येक संस्थान आणि तेथील लोक या दोहोंतल्या राज्यकारभाराच्या संबंधाचें पुनरुज्जीवन होण्यासाठींच युद्ध चालविणें आहे.

२. माझा हेतू असा आहे कीं येत्या राष्ट्रीय सभेच्या बैठकींत गुलामगिरीचीं जीं संस्थानें आहेत तेथील लोकांस ते संतोषानें ग्रहण करोत वा न करोत परंतु) पैशाची मदत करण्या-

संबंधी मी पुनः शिफारस करावी म्हणजे तेथील लोकांस संयुक्त संस्थानाच्या विरुद्ध बंड करण्याची प्रवृत्ति होणार नाहीं; त्या लोकांनीं आपआपल्या हद्दींत तावडतोब गुलामगिरी बंद केली नसल्यास या पुढें ते बंद करतील आणि त्या वेळेच्या तेथील सरकाराच्या संमतीनें या खंडांत अगर इतर ठिकाणीं आफ्रिकन् जातीच्या लोकांची वसाहत करण्याचा प्रयत्न चालू राहील.

३. इ. स. १८६३ च्या जानेवारी महिन्याच्या पहिल्या तारीखेस प्रत्येक संस्थानांत, ज्यांना ज्यांना गुलाम म्हणून बाळगिले असतील ते अथवा ज्या संस्थानांतील लोकांनीं संयुक्त संस्थानाचे विरुद्ध बंड उपस्थित केलें असेल अशा वरील संस्थानाच्या कोणत्याही भागांत ज्यांना गुलाम म्हणून वागवित असतील ते सर्व सदर तारखेस व त्यापुढें अक्षयी स्वतंत्र आहेत असें समजावें आणि संयुक्त संस्थानाची राजसत्ता चालविणारे ( म्हणजे फौज व आरमार खात्यांतील अधिकारी सुद्धां ) अशा लोकांचें स्वातंत्र मान्य करून त्यांचें संरक्षण करतील; अशा लोकांवर दाब राहील असें कोणतेंही कृत्य अथवा कृत्यें ते करणार नाहींत आणि त्यांच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ ते कोणतेही प्रयत्न करतील तर सरकार त्यांचे आड येणार नाहींत.

४. सदर सालच्या जानेवारीच्या १ ल्या तारिखेस संयुक्त संस्थानांतील अधिकारी एक जाहिरनामा प्रसिद्ध करून त्यांत ज्या संस्थानांतील अगर त्यांच्या कोणत्याही भागांतील लोक संयुक्त संस्थानांचे विरुद्ध उठले असतील अशा संस्थानांचीं नांवें मुकरर करितील; आणि कोणत्याही संस्थानाचें नांव अगर त्यांतील लोकांचीं नांवें ( ज्या संस्थानांत लायक मत देणारांची संख्या जास्त असून त्यांनीं त्यांत उत्तम लक्ष घातलें आहे अशा ) मत देणारांकडून निवडणूक झालेल्या सभासदांनीं शुद्धबुद्धीनें संयुक्त संस्थानाच्या राष्ट्रीय सभेपुढें मांडिलीं असतील तें संस्थान अगर त्यांतील लोक सबळ पुराव्याच्या अभावीं अशा निर्णयात्मक शाबितीस प्राप्त होतील कीं तें संस्थान व त्यांतील लोक संयुक्त संस्थानाच्या विरुद्ध बंड करणार नाहींत.

५. युद्धासाठीं विशेष बाब करण्याचा कायदा इ. स. १८६२ च्या मार्च महिन्याच्या तेराव्या तारिखेस राष्ट्रीय सभेनें पसंत केला तो लोकांनीं लक्ष पूर्वक वाचून मनन करण्यासाठीं अक्षरशः या खालीं दिला आहे.

' एकत्र झालेल्या राष्ट्रीय सभेच्या बैठकींत अमेरिकेंतल्या संयुक्त संस्थानाचे प्रतिनिधि आणि सिनेट यांनीं असा कायदा केला आहे कीं खालीं दर्शविलेली युद्धासाठीं विशेष बाब संयुक्त संस्थानाच्या

सैन्याची व्यवस्था चालविण्यास्तव प्रसिद्ध केली आहे त्याप्रमाणें सर्व व्यवस्था चालावी.

बाब:—ज्याच्या कडून नोकरी अथवा मोलमजूरी घेण्यास ज्यास हक्क आहे अशा इसमाचे ताब्यांतून जे लोक पळून गेले असतील त्यानां ( नोकरी वरून अथवा मोलमजुरी करून परत पाठविण्याच्या हेतूनें ) कामावर ठेवण्यास संयुक्त संस्थानाच्या फौजेच्या आणि आरमाराकडील सर्व अंमलदारांस व इसमांस मनाई आहे; आणि जो कोणी अंमलदार या कलमाचें उल्लंघन करून विरुद्ध वर्तन करील तो नोकरींतून कमी होईल व तो गुन्हेगार आहे असें समजून त्याच्यावर सैन्यांतल्या अदालतींत काम चालेल.

कलम २ रें. हा कायदा मंजुर झाल्यानंतर याचा अंमल होईल असें ठरविलें आहे. या शिवाय राजद्रोह आणि बंड मिटविणें, तसेंच बंडखोरांस आणि राजद्रोही लोकांस शिक्षा करणें, बंडखोरांची मिळकत ताब्यांत घेणें, ती फरोक्त करणें आणि इतर बाबतींसाठीं कायदा इ. स. १८६२ च्या जुलईच्या १७ व्या तारखेस मंजूर झाला आहे, त्यांतील ९ आणि १० अशीं दोन कलमें अक्षरशः खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

कलम ९ वें:—असें ठरविलें आहे कीं—संयुक्त संस्थानाच्या सरकारा विरुद्ध उद्भवलेल्या बंडांत जे गुलाम यापुढें राहतील

अथवा त्या बंडास मदत करून त्यांत उपयोगी पडतील, मालकाच्या कबजांतून जे गुलाम पळून जाऊन सैन्याचे आश्रयास येऊन राहतील, मालकांकडून कबजांत घेतलेले अथवा त्यांनीं टाकलेले जे गुलाम संयुक्त संस्थानाच्या हुकुमतींत येतील, बंडखोरांच्या सैन्यानें ताब्यांत घेतल्यानंतर संयुक्तसंस्थानाच्या लष्करानें हस्तगत करून घेतलेल्या कोणत्याही ठिकाणीं जे गुलाम आढळून येतील अथवा राहिलेले सापडतील, ते सर्व गुलाम युद्धांत धरिलेले कैदी आहेत असें ठरून गुलामगिरींतून कायमचे मुक्त होतील व त्यांस गुलाम ह्मणून पुनः कधींही बाळगतां येणार नाहीं.

कलम १०-वें असें ठरविलें आहे कीं कोणताही गुलाम कोणत्याही संस्थानांत, देशांत, अथवा कोलंबियाच्या कोणत्याही प्रांतांत, कोणत्याही इतर संस्थानांतून पळून येईल त्यास पुनः पाठवितां येणार नाहीं, अथवा त्याचें स्वातंत्र्यास कोणत्याही रितीचा व्यत्यय अगर बाध आणितां येणार नाहीं; मात्र त्यानें जर कांहीं गुन्हा केला असेल अगर कायद्याविरुद्ध कोणतेंही वर्तन केलें असेल त्यास हें लागू नाहीं, आणि परागंदा झाल्याबद्दल जो गुलाम हक्क दाखवीत असेल त्यानें प्रथम अशी शपथ घेतली पाहिजे कीं ज्या इसमाचें ताब्यांत राहून नोकरी अगर मोलमजूरी केली असेल तो त्याचा कायदेशीर मालक असून हल्लींचे

बंडांत संयुक्तसंस्थानाचे विरुद्ध त्यानें शस्त्र उचलिलें नाहीं अगर मदतही केली नाहीं अथवा त्यांत अन्य रितीनें उपयोगी पडला नाहीं; आणि संयुक्तसंस्थानाच्या फौजेच्या अगर आरमाराच्या नोकरींत राहिलेल्या कोणत्याही इसमास कोणताही बहाणा काढून व दुसऱ्या इसमाच्या हक्काची बळकटी पुढें करून कोणाच्याही ताब्यांत नोकरीस्तव अगर मोल मजुरी साठीं सोंपता येणार नाहीं; अथवा नोकरातून कमी झाल्यामुळें होत असलेल्या दुःखाची सबब सांगून कोणत्याही अशा हक्कदारास कबजांत कोणास देतां येणार नाहीं—

आणि या वरील कलमान्वयें संयुक्तसंस्थानाच्या फौजेंत अगर आरमारांत नोकरीवर असलेल्या सर्व लोकांस मी बजावून सांगतों आणि हुकूम करितों कीं त्या सर्वांनीं वरील कलमें लक्ष पूर्वक वाचून व व्यक्तीशः आप आपल्या नोकरीच्या धोरणांतील आज्ञा मान्य कराव्यात व त्या संपूर्ण रितीनें अमलांत आणाव्यात—

आणि राजसत्ता चालविणाऱ्या अधिकाऱ्या कडून योग्य वेळीं शिफारस होईल कीं बंडाच्या प्रारंभा पासून शेवट पावेतों संयुक्तसंस्थानांतील जे सर्व नागरिक लोक राजनिष्ट राहिले असतील त्यांस सर्व प्रकारच्या नुकसानीचे ( गुलामांच्या नुकसानीसह ) बदलयांत संयुक्तसंस्थानाच्या कायद्या अन्वयें योग्य मो-

बदला मिळेल. ( संयुक्तसंस्थानें आणि त्यांतील पोट संस्थानें व लोक यांचें दळणवळण तहकूब राहिलें असेल अगर त्यांस कांहीं बाध आला असेल तर तो नाहींसा होऊन राज्य कारभारास पुनः पूर्व स्वरूप प्राप्त झाल्या नंतर ) + +

मु. वाशिंग्टन्.

( सही ) विल्यम एच. सिवर्ड.

संस्थानाचे सेक्रेटरी. ( सही ) अब्राहाम लिंकन.

---

" ज्या अर्थीं इ. स. १८६२ च्या सप्टेंबर महिन्याच्या २२ व्या तारिखेस संयुक्तसंस्थानाच्या अध्यक्षानें एक जाहिरनामा प्रसिद्ध केला आहे त्या अर्थीं त्यांत इतर बाबतीसह खालील मजकूर सर्वांनीं लक्षांत घेण्या साठीं नमूद केला आहे.

इ. स. १८६३ च्या जानेवारी मासच्या पहिल्या तारिखेस कोणत्याही संस्थानांत अथवा त्याच्या ठरीव कोणत्याही भागांत लोकांनीं संयुक्तसंस्थानाच्या विरूद्ध त्या वेळीं बंड उठविलें असेल अशा सर्व ठिकाणीं जे गुलाम ह्मणून ताब्यांत ठेविले असतील ते सर्व त्या वेळीं आणि त्या नंतर कायमचे मोकळे झाले आहेत असें समजावें; संयुक्तसंस्थानाची राजसत्ता चालविणारे सरकार ( फौज व आरमार खात्यांतील अधिकारी सुद्धां) अशा लोकांचें स्वातंत्र्य मान्य करून त्यांचें रक्षण करतील व अशा

लोकांवर कोणताही दाव राहील असें कोणतेंही कृत्य अगर कृत्यें ते करणार नाहींत; आणि स्वतःच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ ते कोणतेही प्रयत्न करतील तर सरकार त्यांत ढवळाढवळ करणार नाहींत.

सदर सालच्या जानेवारी मासच्या पहिल्या तारिखेस सत्ता चालविणारे अधिकारी एक जाहिरनामा प्रसिद्ध करून त्यांत ज्या संस्थानांतील अगर त्यांच्या कोणत्याही भागांतील लोक त्या वेळीं संयुक्त संस्थानाचे विरुद्ध व्यक्तिशः उठले असतील अशा संस्थानांचीं नांवे मुकरर करतील; आणि कोणत्याही संस्थानांचें नांव अगर त्यांतील लोकांचीं नांवें ( ज्या संस्थानांत लायक मतें देणारांची संख्या जास्त असून त्यांनीं त्यांत उत्तम लक्ष घातलें आहे अशा ) मत देणारांकडून निवडणूक झालेल्या सभासदांनीं शुद्धबुद्धीनें संयुक्त संस्थानाच्या राष्ट्रीय सभेपुढें मांडलीं असतील तें संस्थान अगर त्यांतील लोक सबळ पुराव्याच्या अभावीं अशा निर्णयात्मक शाबितीस पात्र होतील कीं तें संस्थान आणि त्यांतील लोक संयुक्त संस्थानाचे विरुद्ध बंड करणार नाहींत.

संयुक्त संस्थानांतील फौज व आरमार खात्यांचा सेनापती या नात्यानें जी सत्ता मला प्राप्त झाली आहे त्याअन्वयें मी संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष अब्राहाम लिंकन इ. स. १८६३ च्या ता. १ जानेवारी रोजीं, संयुक्त संस्थानांच्या सत्तेविरुद्ध

हातांत शस्त्रें घेऊन लोक बंड करतील अशावेळीं सदर० बंड शमविणें हा अत्यावश्य व योग्य उपाय जाणून सदर तारिख १ जानेवारी सन १८६३ पासून १०० दिवसांच्या पूर्ण मुदती साठीं जाहिर रितीनें प्रसिद्ध करण्याचा माझा हेतू असल्या प्रमाणें कळवितों आणि संयुक्त संस्थानाच्या विरुद्ध व्यक्तिशः बंड करणारे लोक ज्या संस्थानांत आणि संस्थानाच्या भागांत आहेत तीं तीं संस्थानें व त्यांचे भाग ठरवितों तें खालीं लिहिल्या प्रमाणें सर्वांनीं लक्ष पूर्वक वाचावेत.

अर्कान्सस्, टक्सस्, लुइसिआना, (सेंट बर्नॉर्ड, फ्रेंकमाइन्स् जेफरसन्, सेंटजान्, सेंटचार्लस्, सेंटजेम्स्, असेन्शन्, असम्प्शन्, टेरेबोनी, लाफोर्के, सेंटमेरि, सेंटमारटिन्, आणि ऑार्लियन्स व न्यूआार्लियन्स शहर इतकीं खेडी गांवें वर्जून) मिसिसिपी, अलबामा, फ्लारिडा, जार्जिया, साथकॅरोलिना आणि व्हर्जिनिया (वेस्ट व्हर्जिनियाचे ४८ परगणे आहेत ते सोडून आणि बर्कले, आकोमॅक, नॉर्थम्प्टन्, इलिझाबेथ, शहर यॉर्क, प्रिन्सिसएॅन आणि नॉर्फक् आणि पोर्टसमौथ शहरा सुद्धां हीं सर्व वर्जून) आणि हा जाहिरनामा प्रसिद्ध केला नसतां तर जे जे सोडिले असते ते ते सर्व हल्लीं सोडिले आहेत.

आणि मला जो अधिकार प्राप्त झाला आहे त्या अन्वयें

आणि पूर्वी कळविलेल्या कारणांस्तव मी असा हुकूम करितों व स्पष्ट कळवितों कीं वर कळविलेल्या ठरीव संस्थानांत आणि त्यांतील भागांत जे गुलाम धरिले असतील ते सर्व मोकळे केले आहेत व यापुढें मोकळे होतील असें समजावें; आणि संयुक्त संस्थानाची सत्ता चालविणारे अधिकारी ( फौज आणि आरमार या दोन्ही खात्यांतील आधिकारी सुद्धां ) वरील इसमांचें स्वातंत्र्य मान्य ठेऊन त्यांचें रक्षण करतील.

' आणि अशा रितीनें मोकळे झालेले जे लोक आहेत त्यांना मी बजाऊन असें सांगतों कीं फक्त प्रसंगोपात् आत्मसंरक्षणाच्या प्रसंगाशिवाय कोणत्याही वेळीं त्यांनीं जुलूम करूं नये, शिवाय मी त्यांना अशी शिफारस करितों कीं जेव्हां परवानगी मिळेल तेव्हां सर्व कामांत त्यांनीं योग्य दाम घेऊन इमानें इतबारें मोलमजूरी करावी. '

' मी आणखी स्पष्टपणें कळवून जाहीर करितों कीं:—अशा योग्य स्थितीच्या इसमांस संयुक्त संस्थानासाठीं हातांत शस्त्रें घेऊन लढणाऱ्या लष्करी लोकांत, किल्ल्याच्या व जागेच्या संरक्षणार्थ, ठाणीं व इतर ठिकाणें संभाळण्यास आणि गलबतांत माणसें भरण्याच्या कामासाठीं नोकर ह्मणून ठेवावेत.

प्रामाणिक बुद्धीनें व न्यायदृष्टीनें मान्य झालेल्या युद्धाचे

प्रसंगीं अवश्यकता दिसल्यास संयुक्त संस्थानाच्या सरकारानें हमीं दिलेल्या या कायद्याचा अंमल चांगल्या रितीनें व्हावा आणि मनुष्य मात्रानें हा सद्बुद्धीनें मान्य करावा या साठीं मी, त्या कृपाळु व सर्वव्यापक परमेश्वराची नम्रपणानें प्रार्थना करितों.

मु. वाशिंग्ट्न ता. १ जानेवारी इ. स. १८६३ } **अब्राहाम लिंकन.**

---



# प्रकरण २२ वें.

## अब्राहाम लिंकन आणि जनरल मॅक्क्लेलन्. फौजखात्यासंबंधी कठीण स्थिति.



गुलामांच्या बंधविमोचनाचा जाहिरनामा प्रसिद्ध करण्यासाठीं इलाज घेत असतांना आणि फौजखात्याची व्यवस्था करितांना अब्राहाम याजवर जीं संकटें आलीं, त्याला ज्या अडचणी आल्या, त्या दुस्सह झाल्या मुळें त्याचें डोकें अगदीं भणभणून गेलें होतें. युद्ध आणि राजकीय कामें या संबंधी महत्वाची बातमी कळण्याचें मुख्य ठिकाण वॉशिंग्टन् येथें असल्या कारणानें तिकडे बहुतेक लोकांचे डोळे लागले होते. देशाच्या आसपास इतर ठिकाणीं जें कांहीं युद्धाचें काम चालत होतें त्या पेक्षां राष्ट्रीय राजधानी सभोंवतीं चालत असलेलें युद्धाचें काम विशेष महत्वाचें होतें. जनरल मॅक्क्लेलन् हा हल्लीं अतिशयच लोकप्रिय झाला असून त्याची कीर्तीही चहूंकडे पसरली होती. तो अद्याप तरूण असून त्याची नुकतीच कोठें छत्तीशी उलटली होती; इतक्या लहान वयांत लष्करी लोकांत व इतर सर्व ठिकाणीं लोकप्रीति संपादन करणें हें त्यास खरोखरच विशेष भूषणास्पद होय;

आणि अब्राहाम याचे प्रथम पासूनच हें पाहणें होतें कीं लढाईंत खात्रीनें जय मिळवितील व लोकांचा विश्वास व श्रद्धा चांगलीच संपादन करतील असे शूर लष्करी अंमलदार मिळाले पाहिजेत. असे शूर वीर मिळणें हें कांहीं सोपें काम नव्हें. लढाईसाठीं जे बरेच लोक मिळण्यासारखे होते त्यांच्यांत युद्धा-संबंधीं जी एक विशेष प्रकारची बुद्धि लागते व डावपेचही लागत असतात त्यांचा अभावच दिसत होता. मेक्सिकोच्या लढाईंतल्या चांगल्या अनुभविक लोकांपैकीं जनरलस्कॉट आणि जनरलवुल हे दोघे बरेच वयोवृद्ध झालेले होते. पश्चिम टोंकाकडे राहून ह्या तरूण होतकरू लोकांनीं लष्करी शिक्षण मिळविलें होतें; तरी पण ते युद्ध कलेंत अद्याप चांगले निष्णात झाले नव्हते; एकंदरींत फौजखात्याच्या व्यवस्थेंत बराच घोटाळा असल्यामुळें स्थिति मोठीच कठीण होती.

गृहस्थाश्रमांतून मुक्त झालेल्या अशा नवीन अनुभवाच्या मंडळी पैकीं कोणास मेजर ( फौजखात्यांतील एक महत्वाची पदवी ) नेमिलें आणि कोणास ब्रिगेडियरजनरल नेमिले होते, त्यापैकीं कित्येक लष्करी शिपायांत हुशार निवडले व कित्येक नालायक ठरले. या लोकांस लष्करी शिक्षण देण्याचे कामीं जो खर्च झाला तो फुकट गेल्यामुळें नुकसानही बरेच झालें. मॅक्क्ले-लन् यानें समरांगणांत अनेक वेळा यश संपादन केलें होतें

आणि जेव्हां त्याला इ. स. १८६१ च्या उन्हाळ्याचे दिवसांत पोटोमॅक्चे सैन्याचा अधिकार मिळाला तेव्हां त्याचे जवळ ५०,००० निवडक उत्तम लढाऊ लोक असून तो आल्यानें चांगली सुधारणा होईल अशी आशा धरून कित्येक लोक त्याची वाट पाहत बसले होते.

इ. स. १८६१ च्या आक्टोबर मासच्या २७ व्या तारिखेस जनरल मॅक्क्लेलन् यानें फौजखात्याच्या सेक्रेटरीस लिहून पाठविलें कीं 'माझे जवळ १,४७,६९५ जय्यत लष्कर असून, नवीन येत आहे, असेंच जर नवीन येत गेलें, तर ही संख्या लौकरच वाढून १,६८,३१८ जवळ जाईल. हा सर्व सेनासमुच्चय अब्राहाम यानें गोळा केला असून त्यानें या संबंधांत संयुक्त संस्थानाचा व आरमाराचा सेनापती या नात्यानें हुकूम सोडिले होते. अशा रितीनें एक मोठें सैन्य जमा करावें व त्यांतून चांगली निवड करून संयुक्तसंस्थानाच्या बचावासाठीं एक मोठी बलाढ्य फौज तयार करावी असा त्याचा हेतू होता.

आपल्या संपूर्ण खातरीच्या सल्लागारांशीं अत्यंत काळजी-पूर्वक वाटाघाट केल्यानंतर जी त्यानें एक साधारण योजना अमलांत आणण्याचें धारिलें होतें ती येणें प्रमाणें:—बंडखोरां-च्या संस्थानांतील एकंदर बंदरांच्या किनाऱ्यावर नाकेबंदी करावी;

सरहद्दीवरील संस्थानें लष्करानें व्यापिलीं म्हणजे संयुक्त संस्थानाचें रक्षण होईल व शत्रू चाल करून आल्यास त्यास हटवितां येईल; मिसिसिपी नदींत बंडखोरांचे जे अडथळे येत असतील ते समूळ काढून टाकिले म्हणजे बंडखोरांचें एकजूट, आणि पश्चिम भाग हीं दोन्ही अगदीं भिन्न होतील; वाशिंग्टन् आणि रिचमंड यांच्या दरम्यान जें बंडखोरांचें सैन्य आहे त्याचा नाश करून त्यांची राजधानी हस्तगत करून घेतली पाहीजे. वेळोंवेळीं जसजशी अवश्यकता त्याला दिसली तसतशा ह्या योजना अब्राहम यानें आपल्या मनाशीं ठरवून घेतल्या. जसजशी ह्या योजना अमलांत येण्यासंबंधी सिद्धता होत चालली तसतसा त्यावर त्याचा अधिकाधिक विचार होऊं लागला. त्या वेळीं गुलामांचें बंधविमोचन आणि बंडखोरांची मिळकत फरोक्त करणें ह्या बाबतीचाहि विचार चालूच होता. सरकारचा परकीय राष्ट्रांशीं असलेला संबंध बराच नेट करीत असून तिजोरींतील पैसाही पाण्यासारखा खर्च होत होता; ह्या गोष्टी मनांत वारंवार घोळत असल्यामुळें तो अतीशय चिंताग्रस्त दिसत असून व्हाइटहौसराजवाड्याच्या दालनांतून पंचपंचउष:काळीं हिकडून तिकडे एकसारखा त्याच विचारांत मग्न होऊन फिरत होता. जनरलस्कॉट् हा संयुक्त संस्थानांतील सैन्याचा मुख्य सत्ताधीश होता, अशा स्थितींत नोवेंबर महिन्यांत जनरल मॅक्क्लेलन् यानें त्यास दुखावलियामुळें त्यानें मोठ्या नेटानें चालू केलें असलेलें

स्वतःचें लष्करी काम सोडून राजीनामा पाठविला व नोकरींतून मुक्त झालेल्या इलमांचे यादींत आपलें नांव घालण्याची इच्छा दर्शविली; त्याचा राजीनामा मंजूर झाल्यानंतर अब्राहमलिंकन यानें आपल्या मंत्रिसभेंतले कांहीं सभासद बरोबर घेऊन या वयोवृद्ध शूर योद्ध्यास वॉशिंग्टन् येथील राजवाड्यांत समक्ष भेटून मोठ्या उदार बुध्दीनें व प्रेमपुरस्सर त्याच्याशीं समयाला अनुसरून उत्तम व अखेरचें भाषण केलें; त्यानंतर कॉंग्रेस-कडे ( राष्ट्रीय सभा ) जें त्यानें पत्र पाठविलें त्यांत त्यानें जनरल स्कॉट याची बरीच स्तुति करून, कळविलें कीं, त्यानें एकनिष्टपणें संयुक्त संस्थानाची जी सेवा बजाविली त्याचे मोबदल्यांत राष्ट्रीय सरकार जेवढें त्याला बक्षीस देण्याचें धारीत असेल तेवढें थोडेंच म्हटले पाहिजे, कारण कितीही त्याला मोठी देणगी दिली तरी, त्यानें देशाभिमानाचें स्फुरण जागृत ठेऊन यथोचित आपलें कर्तव्य बजाविलें त्यामानानें त्याचे उपकार कधींही न फिटतां राष्ट्र सदैव त्याचे ऋणांतच राहील, अशा बद्दल त्यांत स्पष्ट मजकूर लिहिला होता. त्यानंतर त्यानें संयुक्त संस्थानांतील संपूर्ण लष्करी सत्ता जनरल मक्क्लेलन् यास सोंपली.

अब्राहम लिंकन याची पश्चिम प्रांताकडे स्वाभाविक प्रवृत्ती असल्या कारणानें मिसिसिपी नदीचा नाला ताबडतोब मोकळा करण्याची त्याला अतिशय अवश्यकता दिसली. युद्धाच्या

विरुद्ध मोठी बलाढ्य अशी पुष्कळ मंडळी पाश्चिम प्रांतांत होती आणि फार दिवस लढाई चालल्यामुळें लोकांस जीं दुःखें सोसावीं लागलीं त्या संबंधी त्यांच्या बऱ्याच तक्रारी होत्या; पण पूर्वेकडील संस्थानांपक्षां त्यांना त्यांचा विशेष परिणाम भोगावा लागत असलेला दिसत होता कारण पूर्वेकडे ह्या अडचणी व दुःखें कमी भासत होतीं, किंबहुना तीं खरी होतीं किंवा कसें याबद्दल शंकाच वाटत होती. अब्राहाम हा ह्या संबंधी मोठी काळजी करीत होता परंतू तिकडे पूर्वेकडील लोकांनीं मुळींच लक्ष दिलें नाहीं. तसेंच वॉशिंगटन् येथें जे लष्करी अंमलदार व राजनितींत निपूण असे लोक गोळा झाले होते त्यांनाही त्याबद्दल मुळींच कांहीं वाटलें नव्हतें. पुढें थोड्या अवधीनें मिसिसिपीचा नाला जेव्हां मोकळा झाला तेव्हां अब्राहाम यास अत्यंत समाधान वाटलें, आणि जेव्हां जेव्हां त्याची त्याला आठवण होई त्यात्यावेळीं त्याला अत्यानंद होत असे. मिसिसिपी नदींत तोफा ठेविलेल्या होड्या निर्भयपणानें फिरत आहेत अशा बद्दल त्यानें कॉंग्रेसला सुद्धां लिहून कळविलें होतें. अब्राहाम याचें असें वर्तन पाहून त्याबद्दल कांहीं खोडकर आणि टवाळ लोकांनीं त्याला दूषण देऊन त्याची फार चर्चा केली.

जनरल यु. एस्. ग्रांट यानें आपल्या कार्यक्रमांत ठरल्या प्रमाणें मिसिसिपी नदीच्या किनाऱ्यावर बेलमॉंट येथें बंड

खोरांच्या लष्करी साहित्याच्या वखारीवर हल्ला करून सर्व लष्करी साहित्याचा विध्वंस करून टाकिला. जनरल ग्रांट हा हळू हळू लोकांत पुढें सरसावत चालला होता; जनरल गारफिल्ड यानें केंटकी प्रांतांत मिडलक्रीक येथें हंफ्रेमार्शल् याचा पराभव केला आणि जनरल ऑजिएचटॉमस यानें त्याच संस्थानांत आलेल्या मिलस्प्रिंग येथें जनरल झोलिकोफर आणि जनरल क्रिटेन्डन् या दोघांस पादाक्रांत करून टाकिलें. या दोन्हीं ठिकाणीं चांगली जयप्राप्ति झाल्याकारणानें बंडखोर लोक विभक्त झालेल्या संस्थानांच्या हद्दींत हां हुं करू लागले व त्यामुळें ते बलहीन होऊन अगदीं पंगू झाले होते. त्यानंतर लागलींच बंडखोरांचा टेनिसी येथील फोर्ट हेनेरी नांवाचा किल्ला संयुक्त संस्थानाच्या हस्तगत झाल्यामुळें व कंबर्लँड नदीवरील डोनेल्सन् किल्ल्यावर सुद्धां त्यांचाच जयध्वज फडकूं लागल्यामुळें तर त्यांचे हातपाय अगदींच गळाले. जमिनीवरील सैन्याचा अधिपती ज. ग्रांट व आरमारांचा मुख्य ॲडमिरल् फूट यांनीं दोन्ही किल्ले ताब्यांत घेऊन नदींतले मार्ग मोकळे केले. ज. बकनेर व फ्लॉइड् हे दोघे डोनेलसन् किल्ल्यावरील बंडखोरांच्या सैन्याचे पुढारी होते; ह्या उभयतांनीं ज. ग्रांट याशीं सल्ल्याचें बोलणें लावून कायकाय शर्तींवर तुह्मी तह करण्यास कबूल आहांत असें विचारलें. ह्यास जनरल ग्रांट यानें प्रत्युत्तर दिलें कीं:—'कोणत्याही शर्तीं शिवाय तुह्मी आमच्या हस्तगत व्हावें, या

पलीकडे कोणतीच गोष्ट आह्मांस मान्य नाहीं. ' ग्रांट, याच्या ह्या भाषणामुळें त्याला ' बिनशर्तीनें हस्तगत करणारा ग्रांट अशी पदवी मिळाली होती. बंडखोरांनी मुळींच वाट पाहिली नाहीं. फ्लॉइड यास स्वतः केलेल्या कृष्णकारस्थानाच्या अपराधाचें चांगलें स्मरण होऊन त्यानें एका लहानशा सैन्याचे तुकडीनिशी रातोरात पवबारा केला. बक्नेर हा दातीं तृण धरून शरण आल्यामुळें १२००० युद्धांतल्या कैद्यांसह व कांहीं युद्धाच्या सामुग्रीसह त्यास हस्तगत करून घेतले.

इ. स. १८६२ च्या फेब्रुवारी महिन्यांत ही हाकिकत घडली. केंटकीमधून बंडखोर अगदीं नाहींसें झाले असून टेनिसी येथें संयुक्त संस्थानांतील लष्करी लोक ठेविले होते. मार्च महिन्याच्या प्रारंभीं जनरल एस. आर. कर्टिस हा पी रिज्ज येथील लढाईंत विजयी झाला आणि अर्कान्सस् संस्थानांत संयुक्त संस्थानांचा जयध्वज पुनः एकदां फडकूं लागला.

कांहीं दिवसांनंतर जनरल जॉनपोप हा मिसिसिपीच्या खिंडींत पुढें सरकला आणि लागोपाठ जय मिळवीत जाऊन अखेर बंडखोर हातांत शस्त्रें घेऊन सामना करण्यास आले तरीपण त्यांना न गांठतां त्यानें त्यांचा अगदीं पराभव केला; यामुळें संयुक्तसंस्थानांतील सैन्याच्या लढाऊ

आगबोटी नदींतून फिरण्यास अडचण राहिली नाहीं. इ. स. १८६२ च्या एप्रिल महिन्याचे सहावे तारिखेस शिलोह येथें जो घोर रणसंग्राम झाला तो इतका भयंकर होता कीं उभय पक्षांतील लोकांची कत्तल उडून जणुं काय रक्ताच्या नद्याच वाहूं लागल्या आहेत असें दिसत होतें. या मोठ्या लढाईंत बरेच रणशूर योद्धे व लष्करी अंमलदार ठार झाले आणि बंडखोरांचा जनरल अलबर्टसिडने जॉन्स्टन् नांवाचा महाप्रतापी सेनापती याच लढाईंत पडला. ज्या बंडखोरांचा पराभव झाला त्या सर्वांस कॉरिंथ मिस् नांवाच्या त्यांच्या किल्लयाकडे पाठविले. कॉरिंथ किल्लया नजीक येऊन पोंहचतांच जनरल हॅलेक् त्यांच्यावर एकदम तुटून पडला व त्यांना किल्लयांत शिरूं न देतां तेथून हांकून काढून त्यांची सर्व युद्धसामुग्री त्यानें लुटून घेतली. या प्रमाणें इ. स. १८६२ च्या मे, मास अखेर मिसौरी, अर्कान्सस, केंटकी आणि टेनिसी इतक्या संस्थानांस बंडखोर कायमचे मुकले व पुनः हस्तगत केलेल्या ह्या सर्व संस्थानांत संयुक्तसंस्थानाच्या विजयोत्सवाच्या नौबदीं झडूं लागल्या.

ॲटलांटिक् महासागराच्या किनाऱ्यावर बंडखोरांच्या ताब्यातलीं जीं बंदरें होतीं त्यांची नाकेबंदी करून तीं हस्तगत करण्याबद्दल कार्यक्रमांत ठरलेंच होतें व ते ही गोष्ट

विसरलेही नव्हते. इ. स. १८६२ च्या मार्च आणि एप्रिल या महिन्यांत ॲड्मिरल् गोल्डसबरो व जनरल बर्नसाइड् यांनीं उत्तरेकडील रोनोकबेट हस्तगत करून घेतलें. या कामीं त्यांना लढाऊं हत्यारें आणि तोफा बऱ्याच मिळाल्या व पुष्कळांना त्यांनीं कैद केले होते. त्यानंतर त्याच किनाऱ्यावर असलेले न्यूबर्न, पुलास्की आणि मॅकन् हे किल्ले एका मागून त्यांचे ताब्यांत आले. इ. स. १८६१ च्या पावसाळ्यांत न्यूऑर्लियन्स आणि मोबिली यांचे दरम्यान मेक्सिकोच्या आखातांत शीप् बेट येथें जनरल बी. एफ बट्लर् आपल्या आरमारासहीत उतरला. त्याच्यामागून ॲड्मिरल् फॅरगेट् हा हत्यारांनीं भरलेल्या लढाऊ गलबतासह येऊस पोंहचला आणि १७ एप्रिल रोजीं न्यूऑर्लियन्स शहरासभोंवती रक्षणार्थ जे किल्ले होते तेथें त्यानें जाऊन तळ दिला. कांहीं दिवस तेथेंच मुक्काम करून न्यूआर्लियन्स शहरावर कशा रितीनें चाल करावी त्याबद्दल त्यानें उत्तम युक्तया योजून ठेविल्या होत्या; आणि थोडक्याच दिवसांत बंडखोरांच्या आरमारांचा विध्वंस करून किल्ले ओलांडून व मिसिसिपी नदी उतरून तो न्यूआर्लियन्स शहरानजीक येऊन पहोंचला. ॲड्मिरल् फॅरगेट या शहरानजीक येऊन पोंहचलेला पाहून लोकांस मोठेंच आश्चर्य वाटलें. लुइशयानाची राजधानी बेटन्रोग ही लौकरच हस्तगत झाली आणि तारिख १२ मे रोजीं नाचेझ् हें ताब्यांत आल्यामुळें उत्तरेकडे

व्हिक्सबर्ग पावेतों मिसिसिपीचा मार्ग मोकळा झाला. व्हिक्सबर्ग शहराचे सभोंवतीं मजबूत किल्ल्याची तटबंदी होती, आणि सुरक्षितपणानें नौकापर्यटण करण्यास आतां तेवढाच कायतो अडथळा राहिला होता.

इ. स. १८६१ च्या नोवेंबर महिन्यांत ग्रांट हा बेलमंट्च्या लढाईंत विजयी झाला. इ. स. १८६२ च्या मे महिन्यांत न्याचेझ् पावेतों मिसिसिपीचा मार्ग मोकळा झालाच होता. हिंवाळ्याच्या दिवसांतही बऱ्याच लढाया होऊन संयुक्त संस्थानांची सरशी होत गेली. परंतु इ. स. १८६२ च्या मे महिन्यांत वॉशिंग्टन् संबंधांत मॅक्क्लेलन् हा कांहीं एक तजवीज न करतां अगदीं स्वस्थ बसला होता. पोटोमॅक्च्या सैन्याचें प्रमुखत्व मॅक्क्लेलन् याजकडे असून पुढें सरसावण्याचे कामीं त्याचा चेंगटपणा, हयगय आणि सैन्याप्रीत्यर्थ होणारा अवाढव्य खर्च पाहून अब्राहाम अगदीं कंटाळून गेला होता. जनरल मॅक्क्लेलन् याचें राहण्याचें ठिकाण वॉशिंग्टन् शहरांत असून अमेरिकेंतलीं परकीय राष्ट्रांतलीं मोठमोठीं नामांकित मंडळी आपल्या सभोंवतीं गोळा करून तेथें तो मोठ्या थाटानें राहिला होता; त्यानें युद्धाचा मोठा आव घातला होता, परंतु प्रत्यक्ष लढाई वगैरे कांहीं एक चालू नसून सर्व ठिकाणीं सामसूम दिसत होती. वॉशिंग्टन् येथें राजकारभारांत निपुण असे पुष्कळ

लोक होते. ज. मॅक्क्लेलन् यानें पुर्वी जे जय संपादन केले होते त्यावरून पुष्कळांना असें वाटलें कीं तो इलाख्यासाठीं उमेदवार होऊं शकेल व मशारनिल्हे जनरल याचे स्वतःचे मनांतही पूर्वी हा विचार घोळत होता. बंधविमोचनाच्या विषयासंबंधी चहूकडे चर्चा चालू होतीच. ज. मॅक्क्लेलन् हा कॉनसर्व्हेटिव्ह ( राजसत्ताक पक्षाचा ) असल्यामुळें बंध-विमोचनाच्या बाबती विरुद्ध त्याचें मत असणें स्वाभाविकच होतें. गुलामगिरी ही एक मोठी पवित्र संस्था आहे असें तो समजत होता आणि त्या साठीं अशा संस्थेंत ढवळाढवळ करणें रास्त होणार नाहीं, असेंही त्याला वाटत होतें. या सर्व हकिकतती वरून डेमोक्रॅटिक मुत्सद्दी मंडळीस तो विशेष प्रिय असणें हे अगदीं स्वाभाविक होय.

मॅक्क्लेलन्चे ठायीं जी लोकांची श्रद्धा होती ती पुष्कळ दिवसांनीं नाहींशी झाली. त्यानें स्वतःच्या अगदीं अल्प वयांत व्हर्जिनियाच्या पश्चिम भागांत मोहिमी केल्या आणि एकदां पुढें सरकण्याचा निश्चय झाला म्हणजे तो रिचमंडवर ( बंडखोरांची राजधानी ) चाल करून जाण्यासही डगमगणार नाहीं, अशा बद्दल लोक मोठ्या फुशारकीनें गप्पा मारीत होते; दरम्यान स्वतःच्या सैन्याची पूर्तता करण्यासाठीं पुष्कळ बाबतींची त्याला अवश्यकता होती, आणि

त्या त्याला मिळाल्यावर बाकीच्या उणीवा असतील त्या भरून काढितां येतील, असें त्याला, वाटत होतें. लोकांस असें वाटत होतें कीं ज्याची त्याला अवश्यकता असते तें त्याला सरकारांतून वेळेवर मिळत नसल्या कारणानेंच तो स्वस्थ बसला होता व त्यामुळेंच लोकांत असंतोष उत्पन्न झाला. ' रिचमंडवर चाल करून जा' याप्रमाणें उत्तरेकडील वर्तमान पत्रकारांची, व राजकारस्थानी मंडळींची एक सारखी ओरड चालू होती. वॉशिंगूटन् हे राजधानीचें शहर अगदीं मध्यावर असल्यामुळें सर्व युद्धाचें मुख्य धोरण तिकडे होतें. युद्धाचें काम चालू असतांना प्रत्येक मनुष्य वॉशिंग्टन् शहरांत केव्हां तरी एकदां येऊन जाई. राष्ट्रीय राजधानी ही एक विशाळ लष्करी छावणी दिसत होती इतकेंच नव्हे तर तेथें सरकारी कामकाजही चालत होतें पूर्वेकडील अगर पश्चिमेकडील सैन्यांत जे लोक होते त्यांचें आप्त आणि मित्र कुशल विचारण्या साठींही तेथेंच जमत होते. युद्धांत चांगलें काम केल्याबद्दल कोणास बक्षिसें वगैरे देण्याचीं तींही येथेंच देत असत. राजधानी म्हटली म्हणजे अठरापगड जातींतील सर्व लोकांचा ओढा तिकडे असून पुष्कळ लोक तथ एकत्र जमावयाचेच, हा ठरीव सिद्धांत होय. कॉंग्रेस मधील लोक, परकीय देशांतील मंत्रिमंडळ, वर्तमान पत्रांचे बातमीदार आणि सार्वजनिक बाबतींचा उहापोह करणारे असे पुष्कळ प्रकारचे लोक तेथें

जमले होते. ह्या सर्वांत राजनिष्ठ संस्थानांतील कोण कोणते लोक होते हें स्पष्ट कळून येण्या जोगें होतें. वॉशिंग्टन् शहराच्या समोर पोटोमॅक् नदीच्या कांठीं अवाढव्य सैन्याची सर्व रचना फारच जय्यत दिसत असून, त्यांत समसमान पोशाखाचे लष्करी अमलदार मोठे भव्य दिसत होते. हें सर्व सैन्य आतांच चाल करून जात आहे कीं काय, अशी सर्वत्र तयारी बाह्यात्कारें दिसत होती, परंतु गाडें कां अडलें होतें त्याचें कारण समजत नव्हतें.

राजधानींत जे लष्करी लोक व अंमलदार एकत्र झाले होते ते व ज. मॅक्लेलन् यांच्याशीं अब्राहाम याच्या वरचेवर सल्ला मसलती चालूच होत्या. मनुष्य दृढाभ्यासेंकरून जेवढें ज्ञान संपादन करूं शकेल तेवढें ज्ञान संपादन करण्याची अब्राहाम यास अतिशय हाव असे. युद्धकला आणि ( सैन्यांतील ) व्यूहरचना, या दोन्ही विषयांवर जेवढीं ह्मणून पुस्तकें त्यावेळीं उपलब्ध होतीं तेवढीं सर्व त्यानें चांगल्याच रितीनें वाचलीं होतीं आणि त्यांतून ज्या ज्या गोष्टी शिकावयाच्या होत्या त्या त्या सर्व त्यानें शिकून अगदीं जिव्हाग्रीं ठेविल्या होत्या. मध्यरात्रीं जेवढी शांतता असते तेवढी बहुतकरून केव्हांच नसते; अशावेळीं सर्व ठिकाणीं सामसूम असून दिवसास कामधंदा करून थकल्या भागल्यास गाढ झोंप लागली असते; रात्रीचा

किर्र शब्द सारखा चालूच असतो अशा शांत वेळीं सर्व लोक विश्रांति घेतात तरीपण अब्राहाम यास मुळींच झोंप येत नव्हती. मध्यरात्रीच्या सुमारास कोणी ही त्याचे भेटीस येवो, त्याचा त्या वेळचा व्यवसाय ह्मणजे, वरील पुस्तकांचें वाचन, मनन, नकाशे पाहणें, युध्दासंबंधी योजना, वेढा कसा घालावा आणि युद्धकलेची फारच बारीक माहिती स्पष्ट दिली असेल असे ग्रंथ लक्ष पूर्वक वाचणें, याप्रमाणें चालू असावयाचा. लहान वयांत त्याचा असाच व्यवसाय चालू होता आणि हल्लींच्या त्याच्या व्यवसायामुळें युध्दकलेंत तो अतिशयच निष्णात झाला होता. अब्राहाम याचा हा सर्व व्यवसाय पाहून मॅक्क्लेलन् याच्या अंतःकरणांत कांहींशीं तिरस्कारबुद्धि उत्पन्न झाली. अब्राहाम हा मला केव्हां कसा काय प्रश्न करील, काय काय सूचना करील, कोणत्या वेळीं मला भेटेल, हे विचार मॅक्क्लेलन् याच्या मनांत वारंवार येऊन या संबंधांत तो मोठा अधीर झाला होता. हिकडे अब्राहाम यास असें वाटत होतें कीं लष्करी अंमलदारांची भेट घेतल्यानें विनाकारण त्यांचा अमुल्य वेळ फुकट जाईल ह्मणून तो बहूतकरून त्यांच्या भेटी संबंधात टाळाटाळीच करीत होता. वॉशिंग्टन् शहरांत त्याच्या मुक्कामीं अध्यक्ष मोठ्या सभ्य रितीनें एकदां गेला असतां ' सध्यां मी माझ्या कामांत अतिशय गुंतलों आहे, करितां भेटण्यास सवड नाहीं ' असें उत्तर जनरल कडून त्याला मि-

झालें; मॅक्क्लेलन् हा हाताखालच्या अंमलदारांसह भोजन करीत होता हें त्याला कळलें होतें. हाताखालच्या नोकराकडून जरी असें उत्तर मिळालें तरी अब्राहाम यानें इतकी शांतवृत्ति व सहनशीलता ठेविली होती कीं, यत्किंचित्‌ही रागाची अथवा मनाचा विरस झाल्याबद्दलची झुळूक त्यानें आपल्या मुखावर दिसू दिली नाहीं. अब्राहाम जितका सहनशीळ होता तितकाच गंभीर प्रकृतीचाही होता; त्यानें मोठ्या धैर्यानें जेणं करून मॅक्क्लेलन् विशेष चर्चा न करितां आपल्या लष्करी लोकांसह एकदम चाल करून जाईल असे पुष्कळ यत्न केले परंतु मशारनिल्हे जनरल हे इतके खंबीर व वज्र देही होते कीं त्यांनीं स्वतःचें व्रत मोडलें नाहीं; पोटोमॅक् नदीचे कांठीं लष्कर अगदीं जय्यत होतें; खावें, प्यावें, हिंडावें, सणावाराच्या दिवशीं यथेच्छ चैन करावी वगैरे सर्व प्रकार त्यानें चालूच ठेविले होते. शेवटीं अब्राहाम यानें पाहिलें कीं सैन्याची हाल चाल होत नाहीं तेव्हा तो फक्त इतकेंच बोलला कीं, 'जनरल् मॅक्क्लेलन् यास पोटोमॅक्‌चे सैन्याचा उपयोग नसेल तर त्यानें थोडा वेळ तें मला दिलें असतां मोठा संतोष होईल.'

इ. स. १८६२ च्या जानेवारी अखेर अब्राहामलिंकन यानें एक हुकूम काढिला त्यांत मुख्यत्वेंकरून अशी हकीकत होती कीं, ' मनसस् जंक्शन्‌च्या ( जेथून आग-

गाडीचे रस्ते फुटतात व जेथें ते मिळतात त्या स्टेशनास जंकशन् म्हणतात ) नैऋत्यदिशेस आगगाडीच्या रस्त्यावर एक ठिकाण योजून तेथें ठाणें देऊन बसण्यासाठीं तिकडे पोटोमॅक्च्या सैन्यानें मोर्चा फिरवावा. ' या हुकुमाचा अंमल होण्यांत ज. मॅक्क्लेलन् हा आडवा आला आणि त्यानें फौजखात्याच्या सेक्रेटरीस लिहून कळविलें कीं, ' या ऋतूंत रस्ते चांगले नसतात त्यामूळें व अशाच कांहीं अनेक अडचणीस्तव सदरहु हुकुमाचा अंमल होणें रास्त नाहीं; आणि जर हुकुमाप्रमाणें लष्कर नेणेंच असेल तर मार्ग बदलून रॅपॅहॅनॉक्च्या खालच्या भागानें न्यावें अशी माझी विनंति आहे.' अध्यक्षानें या संबंधांत मॅक्क्लेलन् यास कळविलें कीं तुम्ही ह्मणतां तसें आम्हीं करूं परंतु त्यापूर्वी माझ्या प्रश्नांचीं उत्तरें तुम्ही द्यावींत.

अब्राहाम यानें मॅक्क्लेलन् यास पांच बाबतींचा खुलासा विचारिला होता. त्यांत पहिली बाबत अशी होती कीं त्याचे योजनेपेक्षा मॅक्क्लेलन् याची योजना अमलांत आणिल्यानें पैसा आणि वेळ ह्या दोहींचाही जास्त व्यय होणार; दुसरी बाबत त्याच्या योजनेपेक्षां अब्राहाम याच्या योजनेंत यशाची विशेष खातरी होती.

तिसरी बावत—जनरलपेक्षा अध्यक्षाच्या योजनेनें जो जय होईल याची किंमत जास्त होती. चौथी बावत—जनरलच्या ह्मणण्याप्रमाणें केलें तर शत्रूचा अन्योन्य होणारा व्यवहार तोड. तां आला नसता ह्मणून जनरलच्या योजनेंत कांहीं अर्थ नव्हता. पांचवी बावत-संकटकाळीं जर रणभूमीस पाठ दाखविण्याची वेळ दुर्दैवानें आलीच तर मागें फिरणें जनरलच्या योजने-प्रमाणें अतिशयच कठीणच जाणार. येणेंप्रमाणें पांच मुद्दे अध्यक्षानें ज. मॅक्क्लेलन् यास विचारिले होते; परंतु फौज-खात्यासंबंधी टिका करणाऱ्या लोकांच्या थट्टेस मात्र ते पात्र झाले होते. इतर मंडळीची अशी खातरी झाली होती कीं अध्यक्षाचीं धोरणें कधींही चुकीचीं नसावयाचींच. जनरल साहेबांचे उत्तर यावेळीं समाधान कारक नसल्याकारणानें अध्यक्षानें बारा निस्पृही अमलदार, युद्धाच्या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं पंच नेमून, त्यांचे पुढें उभयतांच्या योजना मांडिल्या. पंचानें जनरल मॅक्क्लेलन् याच्या तर्फे निर्णय केला, त्यामुळें अध्यक्षास मुकाट्यानें आपली संमति देऊन सर्व कबूल करावे लागलें. बंडखोरांस ह्या वादविवादाची बातमी पोंहचतांच ते सर्व मॅनसास् सोडून रॅपॅहॅा-नाकच्या बाजूस पुढें सरकले आणि त्यामुळें सदरहु योजना निष्फळ झाल्या. अध्यक्षानें जो हुकूम सर्व लष्करानें एकदम कूच करण्यासंबंधी काढिला होता त्यास दोन आठवडे होऊन गेले होते.

शत्रूंनीं मॅनसास् सोडून पलायन केल्यानंतर मॅक्क्लेलन् हा वॉशिंगटन् नजीक पोटोमॅक् नदीच्या कांठीं आपल्या मोर्चाचें ठिकाण आलेक्झांड्रिया येथें गेला व तेथें आल्यावर त्याला असें कळलें कीं बंडखोरांची अंतर्व्यवस्था सर्व पोकळ असून त्यांनीं बाहेरूनच मोठा आंव घातला होता. त्यावेळीं बंडखोर लोक मॅनसास् नजीक सेंट्रीविली येथें असून त्यांनीं बचावासाठीं लांकडी तोफा रचून ठेविल्या होत्या. या प्रमाणें निर्बळ झालेल्या बंडखोरांनीं बहुतेक सर्व हिंवाळा तेथें काढला परंतु शत्रूची उडी कोठ पावेतों येणार हें जनरल मॅक्क्लेलन् यास चांगलें माहित असल्यानें तो पोटोमॅक्च्या किनाऱ्यावर स्वस्थ बसला होता.

। घृष्टं घृष्टं पुनरपिपुनः चंदनं चारुगंधम् । छिन्नं छिन्नं पुनरपिपुनः स्वादु चैवेक्षुदण्डम् । दग्धं दग्धं पुनरपिपुनः कांचनं कांतवर्णम् । न प्राणान्ते प्रकृतिविकृतिर्जायते चोत्तमानाम् ॥

या सुभाषितांतील उक्ती प्रमाणें अब्राहामलिंकन याची हल्लीं स्थिति झाली होती; जे उत्तम पुरूष असतात त्यांचे प्राणावर जरी येऊन बेतली तरी त्यांचे प्रकृतींत मुळींच फरक पडत नाहीं. युद्धाच्या अशा आणिबाणीच्या प्रसंगीं अब्राहाम यास घरगुती संकटानें अगदीं ग्रासून टाकिलें होतें. खरोखर ही वेळ

मोठ्या कसोटीचीच होती. व्हुइली आणि टॉमस् ( यास टॉड असेंही ह्मणत असत ) ह्या त्याच्या दोन्ही लहान मुलांस भयंकर व्याधीनें गांठलें. दोघांपैकीं लहान मुलगा टॉड यास औषधोपचार पुष्कळ केले आणि शेवटीं तो चांगला झाला परंतु चंचल आणि सुस्वरूप ११ वर्षांचा सुंदर मुलगा व्हुइली यास मात्र निर्दय काळानें ओढून नेलें. पुत्र शोकासारखें दुसरें कठिण दुःखच नाहीं; त्यांतून अब्राहाम याच्या अशा उत्तर वयांत त्याच्यावर पुत्रशोकासारखा दुःखाचा पर्वत कोसळला हें खरोखरच दुःसह होय. प्रालब्धांत जें असेल तें भोगलेंच पाहिजे व परमेश्वर ठेवील तसें राहिलेंच पाहिजे, हें तो पूर्णपणें जाणून होता, परंतु हा पुत्रशोकाचा मोठाच धक्का बसल्याकारणानें त्याची खरोखरच हिंमत अगदीं खचली आणि चालू युद्धाच्या बाबतींत विचार करण्यास त्याला कांहींच सुचेनासें झालें.

जरनल मॅक्क्लेलन् हा समरांगणांत असून ता. ११ मार्च रोजीं फौजखात्यांतील इतर शाखेचीं जीं महत्वाचीं कामें त्याजकडे होतीं त्यांतून तो मोकळा झाला आणि फक्त पोटोमॅक् येथील सैन्याचेंच प्रमुखत्व त्याजकडे राहिलें. आतां त्याला असें वाटत होतें कीं ' खरें सैन्य कोणतें ' असा कोणी प्रश्न केला तर ' पोटोमॅक्चेंच सैन्य खरें ' असें उत्तर त्याला द्यावें लागेल, कारण त्या

सैन्यांत युद्धांत लागणाऱ्या हरएक तऱ्हेच्या वस्तू फारच उत्तम असून लष्करी लोक चांगलेच तयार झालेले दिसत होते व त्यांचे जवळ शस्त्रास्त्रें अति उत्कृष्ट असून लष्करी सत्ता चालविणारे अंमलदारही जसे पाहिजेत तसेच तरबेज होते.

बंडखोरांनीं आपला मोर्चा बदलल्यामुळें संयुक्त संस्थानाच्या सैन्यासही आपला मोर्चा फिरावणें भाग पडलें. अध्यक्षाच्या सुचनेवरून युद्धाच्या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं जें कौन्सिल् ( पंच ) भरलें होतें त्यांनीं असें ठरविलें कीं चेसेफिक् उपसागराच्या मुखाजवळ मनरो नांवाच्या किल्ल्यांत नवीन योजने प्रमाणें व्यवस्था करावी. या बाबतींत जी नवीन योजना ठरली होती त्यांत बंडखोरांचें सूत्र, आपल्या हातांत राहील अशाच कांहीं बाबती होत्या; शिवाय वॉशिंग्टन्च्या बचावासाठीं मनसास येथें एक सैन्याची तुकडी ठेवावी असेंही त्यांत ठरविलें होतें. ठरलेल्या योजनेंत कांहीं फेरफार होऊन जरूर पडल्यास मॅक्क्लेलन्साठीं एक मोठें आरमार तयार केलें होतें. वॉशिंग्टन् नजीक रक्षणार्थ जी फौज ठेविली होती तेवढी पुरणार नाहीं असें वाटल्यामुळें लोकांस मोठी भीति पडली होती, परंतु मॅक्क्लेलन् हा चाल करून जाण्यासाठीं एक बलाढ्य सैन्य जमविण्याच्या विवंचनेंत असल्यामुळें वॉशिंग्टन् नजीक असलेल्या फौजेंत भर घालण्यास त्याचे जवळ मुळींच

सवड नव्हती. यॉर्क् आणि जेम्स् या दोन्ही नद्यामुळें जें एक द्वीपकल्प झालें होतें तेथें समरांगण करण्याचा त्याचा प्रथम विचार होता. मॅक्क्लेलन्‌च्या सैन्याच्या शेवटच्या रांगेचा जो मोर्चा होता त्याचे पाठीमागें द्वीपकल्पाच्या पलीकडे शत्रूचें सैन्य होतें आणि या दोहोंचे दरम्यान यॉर्क्‌टौन् हें शहर होतें. जनरल् मॅक्क्लेलन् हा आतां चाल करून जाण्याचे कामीं विनाकारण विलंब करीत होता. एप्रिल महिन्याच्या ३ ऱ्या तारिखेस अध्यक्षानें फौज खात्याच्या सेक्रेटरीस असा एक हुकूम सोडिला कीं ' ज. मॅक्क्लेलन् यास एकदम हल्ला करण्यास निक्षून सांगावें ' परंतु मॅक्क्लेलन् यानें तें मान्य न करितां अध्यक्षास कळविलें कीं ' शत्रूचें सैन्य फार मोठें आहे सबब जास्त लष्करीं माणसें मला मिळाल्याशिवाय चाल करून जाण्यांत अर्थ नाहीं, तशीच वेळ आल्यास येथूनच मी शत्रूशीं सामना करीन. '

मॅक्क्लेलन्‌च्या अशा विलंबामुळें अब्राहाम फारच त्रासल्या सारखा होऊन अगदीं निराश झाला होता. शत्रूचें सैन्य फार मोठें असल्या बद्दल जनरल् याचें अतिशयोक्तीचें सांगणें अब्राहाम हा संपूर्णपणें जाणून होता, आणि यासाठीं त्यानें सेक्रेटरी स्टॅंटन यास पुनः कळविलें कीं ' संयुक्त संस्थानाच्या सैन्यास एकदम चाल करून जाण्यासाठीं जी जी मदत लागेल

ती ती मिळेल असें जनरल मॅक्क्लेलन् यास त्वरित कळवावें.' पुढें असें कळलें कीं शत्रूकडे निवळ लढाऊ लष्करी लोक असे फक्त ९३०० आहेत. बंडखोरांचा जनरल् मॅग्रुडर यानें रिचमंड येथील सरकाराकडे जी कैफियत पाठविली त्यांत असा मजकूर होता कीं '५०००लष्करी लोक व शिवाय तटबंदीस्तव ठेविलेले लोक, एवढ्या फौजेच्या बळावर संयुक्त संस्थानाचे १००००० लोक आम्ही आपल्या काबूंत ठेविले आहेत आणि जनरल मॅक्क्लेलन् हा एक एक दिवस हल्ला केल्याशिवाय फुकट दवडीत आहे याचें आम्हांस खरोखरच मोठें आश्चर्य वाटतें.'

बंडखोर लोक जी हद्द धरून बसले होते ती तेरा मैल लांबीची होती. या हद्दीचे मागें जे त्यांचे लष्करी लोक होते ते सर्व सैन्याच्या मागील भागाच्या संरक्षणार्थ चहू बाजूस फिरत होते. ज. मॅक्क्लेलन् यानें आपल्या एकलक्ष सैन्यासही मोठ्या हुशारीनें हत्यार वगैरे देऊन वेढा घालण्यास प्रारंभ केला. इ. स. १८६२ च्या एप्रिल महिन्याच्या नवव्या तारिखेस अब्राहाम यानें जनरल् यास प्रेमपुरस्सर सौम्य रितीनें एक पत्र लिहून पाठविलें व त्यांतच चाल करून जाण्यास त्याची विनाकारण इच्छा नसल्याबद्दल थोडीशी कानउघाडणी करून दोन गोष्टी लिहिल्या होत्या.

अब्राहाम याचें वर्तन किती नम्र होतें व त्याचा सुस्वभाव असल्या बद्दल लोक त्याची किती बूज करीत होते हें सदरहु पत्रांतील खालील उताऱ्यावरून सहज लक्षांत येईल.

'जें सैन्य तुमच्याकडे रवाना झालें आहे तें आज तुमच्या जवळ जय्यत आहे असें मला वाटतें आणि हें जर खरें आहे तर शत्रूवर घाला घालण्यास ही तुम्हास योग्य संधि आहे. इतकेंही असून आतां जर तुम्ही विलंब कराल तर मग शत्रूपुढें तुमचें कांहीं एक चालणार नाहीं व तुमचा खचीत पराजय होईल. मला आणखी एक वेळ तुम्हास सांगितल्यावाचून राहवतच नाहीं कीं हल्लींच तुम्ही शत्रूवर तुटून पडणें अत्यावश्य आहे. मॅनसास् नजीक युद्ध करण्याचें सोडून उपसागराच्या खालच्या भागांत समरांगण हुडकीत बसणें म्हणजे संकट निवारण होणें एकीकडे राहून तें दुसरीकडे ओढवण्याप्रमाणें आहें, असें मी वारंवार आग्रह पूर्वक तुम्हास कळवीत आलों याचें तुम्हांस स्मरण असावें. तुम्ही न्यायी अहांत असें मी समजतों.'

\+ × × +

' सांप्रत शत्रुवर चाल करून जाण्याचे कामीं तुम्ही जो विलंब करितां हें मॅनसास् येथील हकिकतीची पुनरुक्ति केल्या प्रमाणें आहे असें मीच काय पण सर्व लोक सुद्धां सांगतील. तुम्ही अमूकच करावें असें आग्रह पूर्वक व नम्रतेनें मी तुम्हास

कधींही लिहिलें नाहीं, म्हणून हल्लीं मी जें सुचवीत आहे तें तुम्हास करणें प्राप्त आहे.'

जनरल् मॅक्क्लेलन् याचें जास्त लष्करी मदत मागणें हें जरी चेंगट व लोंचटपणाचें कृत्य होतें तरीपण अध्यक्षानें तें कांहीं एक अशा वेळीं मनांत न आणितां जनरल फ्रँक्लिन् याची लष्करी तुकडी जास्त मदत म्हणून मॅक्क्लेलन् याजकडे पाठविली. ही तुकडी रिचमंड आणि वॉशिंग्टन् याचे मध्य भागीं बचावासाठीं ठेविली होती. या सर्व हकिकती वरून पाहतां ता. १३ एप्रिल रोजीं जनरल मॅक्क्लेलन् याजपाशीं १३०३७८ लष्करी लोक जमले त्यांत ११२३९२ अगदीं निवडक सैन्य होतें. फौजखात्याकडे जनरल् मॅक्क्लेलन् याचा जो पत्रव्यवहार चालू होता त्यावरून परिणाम काय होणार हें तो चांगलें जाणून होता, त्यामुळें मोठमोठाल्या तोफा व हरएक प्रकारचीं युद्धाचीं शस्त्रें वगैरेची व्यवस्था पाहण्यास त्यानें झपाट्यानें प्रारंभ केला; तरीपण पावसाची मुसळधार व बिकट रस्ते यासंबंधी त्याची कुरकूर चालूच होती. त्यानें आपला क्रम चालू ठेवून लौकरच शत्रूला गांठण्याचें ठरविलें. इतकेंही असून त्यानें आणखी मोठ्या तोफा पाठविण्याबद्दल अध्यक्षास लिहिलेंच. हें पाहून अध्यक्षास अतिशय आश्चर्य वाटलें व तारीख १ मे रोजीं जनरल् यास स्पष्ट कळविलें कीं 'तुम्हीं जास्त तोफा वॉशिंग्टनहून मागवितां हें वाचून मला

मोठी भीति वाटते. माझ्या भीतिचें मुख्य कारण तुमचा विलंब, या शिवाय कांहीं एक नाहीं; आतां तुम्हांस करणें तरी काय आहे?'

मे महिन्याच्या २५ व्या तारखेस अब्राहाम यानें मॅक्क्लेलन् यास तारेनें असें कळविलें कीं एक तर त्यानें रिच्मंडवर एकदम हल्ला करावा अथवा त्यानें सर्व काम एकदम सोडून देऊन वॉशिंग्टन्च्या संरक्षणार्थ यावें. दरम्यान बंडखोर लोकांवर हल्ला करण्यासाठीं नवीन लष्कर येऊन पोंहचल्यामुळें ते अगदींच गोंधळून गेले होते आणि शत्रूकडून हल्ला कोणत्या वेळीं येईल याचें आतां प्रमाण राहिलें नाहीं अशी त्यांना मोठी भीति पडली होती. त्यामुळें द्वीपकल्पाच्या पलीकडील बाजू सोडून देऊन ते स्वतःच्या दुसऱ्या हद्दीकडे परत फिरले. जून महिन्याच्या २१ व्या तारखेस ज. मॅक्क्लेलन् यानें आपल्या छावणींतून अब्राहाम यास एक पत्र लिहिलें कीं 'देशांतील फौजखात्याच्या कामाकाजाच्या स्थितीबद्दल व्याख्यान रूपानें दोन शब्द मला आपल्याशी बोलण्याची परवानगी असावी.' अध्यक्ष सुशील असल्यामुळें त्यानें आपल्या शीलास स्मरून मॅक्क्लेलन् यास उत्तर दिलें कीं 'माझ्या हाताखालीं जें सैन्य आहे त्याच्या व्यवस्थेच्या कामांतून वेळ मिळाल्यास व त्याकामीं कांहीं व्यत्यय येत नसल्यास तुमचे व्याख्यान मी मोठ्या खुशीनें ऐकेन.

जनरल् मॅक्क्लेलन् याच्या पसंतप्रमाणें पोटोमॅक्च्या सैन्याची विभागणी झाली नव्हती, हें अब्राहाम याचे ज. मॅक्क्लेलनशीं न जमण्यास दुसरें कारण होतें. जनरल् यानें फौजखात्याच्या सेक्रेटरीस झालेली विभागणी रद्द करण्याविषयीं लिहून नवीन सुधारणा करण्याबद्दल परवानगी मागितली. सम्नर, हेंटझेल्मन् आणि कीझ् असे त्रिवर्ग तिन्ही भागांचे स्वतंत्र पुढारी होते. त्यांचे आणि मॅक्क्लेलन् याचे अगदींच जुळत नव्हतें; ह्मणून या त्रिवर्गांकडून सत्ता काढून घ्यावी असें जनरल मॅक्क्लेलन् याचें धोरण होतें. या संबंधांत अब्राहाम यानें त्यास मोकळ्यामनानें व स्नेहभावानें पत्र लिहिलें होतें आणि त्यांत मॅक्क्लेलन् याच्या नवीन योजने संबंधात स्वतःचा अभिप्राय लिहून कळविला होता त्याचा सारांश या खालीं दिला आहे.

" सैन्याची विभागणी करण्याबद्दल मी जो हुकूम सोडला होता त्यास फक्त एक तुमच्या खेरीज करून फौजखात्यांतील सर्व लष्करी मनुष्यांनीं अनुकूल मतें दिलीं होतीं आणि युद्धकलेच्या प्राचीन ग्रंथाच्या आधारावरूनच मी ती योजना केली होती, अर्थात् मी माझ्या स्वतंत्र बुद्धीनें तें काम केलें नव्हतें; आतां त्या हुकुमाविरुद्ध तुमचें जें ह्मणणें असेल तें सर्वत्रांस कळवून सर्वांना तें मान्य आहे किंवा नाहीं हें तुह्मीं ताडून पाहिलेंच पाहिजे, कारण सर्वांचें जें ह्मणणें असेल तें आह्मांस सर्व-

थैव अमान्य करितां येणार नाहीं. एक अगर दोघे जे नाकाचे बाल असतील त्यांना यथेच्छ खाऊ पिऊ घालून माजवावें आणि त्यांचे प्रतिस्पर्धी असतील त्यांच्या हुद्याला कमीपणा आणून त्यांच्यावर खटले करावे, अशा प्रकारचा हा प्रयत्न झालेला दिसत आहे. सम्नर, हेंटझेलमन, आणि कीझ् या त्रिवर्गी- कडून अद्याप मला कांहींएक कळलें नाहीं. ह्या विभागणीवर सत्ता चालविणारे जे अधिकारी तुमच्यांजवळ आहेत ते मोठ्या पैकींच लष्करी अंमलदार आहेत; परंतु माझ्या कानावर नेहमीं असें येत आहेकीं तुम्ही त्या अंमलदारांची सल्ला घेत नसून त्यांच्याशीं कोणताच पत्रव्यवहारही करीत नाहीं. तुह्मास ( सल्ला घेणें झाल्यास अगर) पत्रव्यवहार करणें झाल्यास फक्त फिटझ्- जॉन्पोर्टर आणि जनरल फ्रँक्लिन् या दोघांशींच करीत असतां. ह्या तक्रारी खऱ्या व न्यायाच्याच आहेत असें माझें मुळींच ह्मणणें नाहीं; परंतु त्या कशाही असल्या तरी त्यांची तुह्मास माहितीमात्र चांगलीच असणें इष्ट आहे."

सदरहु पत्र मॅक्क्लेलन् यास पोंहचल्यावर त्यानें स्वतःच्या इच्छे प्रमाणें जी सुधारणा करण्याचें धारिलें होतें त्यांत कांहीं एक फेरफार करावयाचाच नाहीं असा त्यानें निश्चय केला. त्यानें विशेष उपयोगासाठीं सैन्याचे आणखी दोन जास्त भाग केले, पैकीं एका भागाचा पुढारी फिटझ्जॉन पोर्टर यास

करून दुसऱ्या भागाचा पुढारी फ्रँक्लीन् यास नेमिले. ह्या उभ-तां जनरलांस ' खाऊ पिऊ घालून पुष्ट केलेले ' असें अब्राहाम यानें वर ह्मटलेंच आहे.

अब्राहामलिंकन याचा कांहीं दिवस मन्‌रो किल्ल्यांत मुक्काम असतांना तेथें एक हृदयद्रावक हकिकत घडली. एके दिवशीं त्याचा वेळ जाईना ह्मणून करमणूकीस्तव त्यानें स्वतःचीं प्रिय पुस्तकें शेक्स्‌पियरकृत् हॅमलेट आणि मॅकबेथ अशीं दोन्हीं काढून त्यांतून कांहीं भाग वाचीत बसला होता; आणि कर्नल कॅनन् ( ज. वूल यास साह्य करणारा ) हा ऐकत होता. किंग-जॉनचा तिसरा अंक वाचल्यानंतर त्यानें एकाएकीं पुस्तक मिटलें व त्यापैकीं 'कॉन्स्टन्स हिचा आपल्या प्रियपुत्रासाठीं विलाप ' या प्रसंगाचें त्याला स्मरण होऊन त्याचें हृदय भरून आलें. तो प्रसंग खालीं लिहिल्या प्रमाणेंः—ती ह्मणालीः—"अहो गुरूजी! अहो आचार्य महाराज! ' स्वर्गांत आपण आपल्या इष्ट मित्रांस भेटूं व त्यांना ओळखूं ' असें तुम्ही उपदेश करितांना बोलला, हें जर खरें असेल तर मग माझा प्रिय पुत्र मला पुनः भेटेलच हें उघड आहे." अब्राहाम लिंकन यास वरील प्रसंगाचें स्मरण होऊन त्यालाही वाटलें कीं आपण आपल्या स्वर्गस्थ मुलास अनेक वेळां स्वप्नांत पाहिलें आहे; परंतु किती ही झालें तरी तें स्वप्नच अशी त्याची खात्री

होती तरी पण स्वर्गस्थ पुत्राची प्रत्यक्ष मूर्ति त्याचे समोर उभी आहे असें त्याला भासून सद्गदित होऊन त्यानें ढसढसा एखाद्या लहान मुलाप्रमाणें रुदन केलें. एकंदरींत पूत्रशोकासारखें दुःखच नाहीं असें जें म्हणतात तें खरें होय.

**नॉ**रफक् हें बंडखोरांच्या स्वाधीन असल्यामुळें **सं**युक्तसंस्थानाच्या आरमारास **जे**म्स नदीचा मार्ग उपयोगांत येण्याजोगा नव्हता. त्यावेळीं **नॉ**रफक् हस्तगत करून घेण्याची **सं**युक्तसंस्थानास फारच अवश्यकता होती. अध्यक्षानें ताबडतोब **म**नरो किल्ल्यांत जाऊन तेथील लष्करी अंमलदार जनरल् **वू**ल याच्या सल्ल्यानें **नॉ**रफक् हस्तगत करून घेण्यासाठीं एक मोठी मोहिम करण्याचें ठरविलें. सदरहु मोहिमे संबंधी जनरल **गा**रफिल्ड यानें जी हकीकत लिहून ठेविली ती खालीं लिहिल्या प्रमाणें:—

**अ**ब्राहाम म्हणाला:—**नॉ**रफक् स्वाधीन करून घेण्यासाठीं मी गेलों त्या वेळीं माझ्या बरोबर **चे**स्, **स्टॅ**टन् आणि जनरल **वू**ल असे त्रिवर्ग असून या मोहिमेची सर्व जबाबदारी केवळ आमच्यावरच होती. आम्ही **म**नरो किल्ल्या पावेतों **चे**स् याच्या लढाऊ गलबतांतून गेलों आणि उत्तर किनाऱ्यावर उतरल्यावर आठ मैल कूच करून कोणत्या स्वल्प उपायानें **नॉ**रफक् हस्तगत करून घेता येईल या बद्दल **ऍ**डमिरल् **गो**ल्डस्बरोची सल्ला घेतली. **ऍ**डमिरल यानें कळविलें कीं त्या किनाऱ्यावर

उतरण्याची सोय नाहीं म्हणून बंदरास प्रदक्षिणा घालून दक्षिणेकडून त्या ठिकाणीं जावें लागणार; परंतु ही मुशाफरी फार लांबच्या प्रवासाची असून अतिशय त्रासदायक होती. ' उतरण्याची तिकडे सोय नाहीं म्हणून म्हणतां परंतु त्या संबंधी तुम्ही कधीं प्रयत्न केला आहे काय ? ' असा मी त्यास प्रश्न केल्यावरून त्यानें 'नाहीं ' असें उत्तर दिलें; नंतर मी त्याला इलिनॉईस येथील एका वकिलाचें उदाहरण दिलें. त्या वकिलानें कायद्याचा फक्त अभ्यास केला होता, परंतु वकील या नात्यानें काम कसें चालवावें हें त्याला मुळींच माहित नसल्यामुळें एका कामांत त्याची फार फजिती झाली. असो आतां माझें असें ह्मणणें आहे कीं जर उत्तरेकडे उतरण्याची सोय नाहीं तर तुम्ही स्वतः जाऊन त्याचा एकदां शोध घ्यावा. ॲडमिरल् यानें माझी सूचना मोठ्या खुशीनें मान्य केली आणि चेस, बूल आणि एक दोन नावाडी ह्यांना बरोबर घेऊन ते शोधार्थ निघून गेले आणि मी स्टँटनसाहित मनरो किल्ल्यांत राहिलो. रात्रीं आह्मीं आंथरुणावर पडून राहिलों, कारण रात्रभर आह्मांस झोंप कशी ती माहित नाहीं. आमचें सर्व तनमन शोधार्थ गेलेल्या त्या दोघांकडे एकसारखें लागलें होतें. दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं दोहोंच्या सुमारास बूल हा जिना चढून वर येत आहे असें मी त्याच्या पावलांवरून ओळखिलें. आह्मीं सर्व एका खोलींत बसलों आणि बूलनें घेऊन मोठ्या उमेदीनें

कळविलें कीं, आह्मांस किनाऱ्यावर उतरण्याची जागा सांपडली आणि नॉरफक् हस्तगत करून घेतलें. ”

इ. स. १८६२ च्या जून महिन्यांत बरेच दिवस जनरल मॅक्क्लेलन् याचें सैन्य लढत होतें, पुढें सरसावत होतें, आणि पाठीमागेंही फिरत होतें; परंतु कांहीं एक निष्पन्न झालें नव्हतें. कधीं कधीं तर असें होत असे की जनरल मॅक्क्लेलन् याच्या सैन्याची तुकडी रिचमंडपासून चार मैलांचे आंत असली तर शत्रूकडील सैन्य मुळींच दृष्टोत्पत्तीस येत नसे. ज्या सैन्याची वॉशिंग्टन् येथील लोकांस मोठी दहशत होती, त्या सैन्यास मदत करण्यास बंडखोरांनीं आपल्या लष्करी तुकड्या पाठविण्याचा क्रम चालू ठेविला होता. द्वीपकल्पावर घातलेला हा मोठा आंव पाहून बंडखोर लोक भ्याले व जास्त लष्कर जमवून जनरल मॅक्क्लेलन् यास त्रासवून सोडण्याच्या उद्योगास लागले; परंतु मॅक्क्लेलन् हा एकदम चाल करून गेला नसल्यामुळें या बाबतींत कोणताच उलगडा झाला नव्हता. जून महिन्याच्या २७ व्या तारिखेस जेम्स नदीकडे मागें फिरण्याची त्याची प्रवृत्ति दिसली आणि फौजखात्याच्या सेक्रेटरीस त्यानें एक विलक्षण पत्र लिहिलें कीं ‘ जर मी लष्कराचा बचाव केला तर त्याचे अगर वॉशिंग्टन् येथील कोणाचेही उपकार मानावयाचे मला

प्रयोजन राहिलें नाहीं. ह्या लष्कराचा नाश करण्यासाठीं तुह्मीं होईल तेवढा दीर्घ प्रयत्न केला आहे.'

मॅक्क्लेलन् याची ही विलक्षण भाषाशैली वाचून अब्राहाम याची जी शांत वृत्ति होती ती पार नाहींशी होऊन त्याचें चित्त अतिशयच व्यग्र झालें व तसें होणें ही अगदीं स्वाभाविकच होतें; कारण मॅक्क्लेलन् याच्या मागणीचा अध्यक्षानें कधींच अनादर केला नव्हता. तो ज्या ज्या वेळीं जें जें मागेल तें तें सर्व त्याला पोंहचत होतें असें असून अध्यक्षास त्यानें असें अपमानसूचक लिहिणें हें खरोखरच मॅक्क्लेलन् यांस लांछनास्पद होय; शिवाय त्यानें पोटोमॅक्च्या सैन्यासंबंधीं कांहींएक विशेष न करणें हेंही त्यास भूषणास्पद नव्हतें. बंडखोरांच्या सैन्याकडून पोटोमॅक्च्या सैन्यास एकसारखा त्रास होत होताच. त्यामुळें तें सर्व सैन्य माल्वर्नहिल येथें परत आलें आणि अशाप्रकारें या मोहिमेंत कांहींएक निष्पन्न झालें नसून त्यासंबंधी सर्व अपयश व दूषण मॅक्क्लेलन् यासच लागू होतें.

उत्तर संस्थानाकडील राज्यकारभारांत निपुण असलेल्या मंडळीस ह्यावेळ पावेतों असें वाटत होतें कीं त्यावेळच्या बंधविमोचनाच्या नियमासंबंधांत आणि युद्धाच्या बाबतींत जे असंतुष्ट होते अशा प्रजापक्षी मंडळींतला जनरल मॅक्क्लेलन् हा

उमेदवार होता. हॅरिसिन्सलॅन्डींग येथून जुलै महिन्याच्या ७ व्या तारिखेस मॅक्क्लेलन् यानें अध्यक्षास युद्धाच्या संबंधांत आणि एकंदर राज्यकारभाराच्या व्यवस्थेविषयीं एक लांबलचक पत्र लिहून पाठविलें. जनरल मॅक्क्लेलन् हा तरुण असून त्याची कोठें नुकती छातिशी उलटली होती हें विसरतां कामा नये. पश्चिम व्हर्जिनियाकडे त्यानें कांहीं कांहीं लहान मोहिमी केल्या परंतु तेवढ्यावरून युद्धकलेचा त्याला चांगलाच अनुभव झाला होता असें मात्र ह्मणतां यावयाचें नाहीं; त्यानें फौजखात्यांत इंजिनियरच्या जागेचें काम मात्र कांहीं दिवस केलें होतें तेवढ्या- वरून त्याला राजकार्यांत अगर युद्धाचे विषयांत तो मोठा मुत्सद्दी होता असें ह्मणतां येणार नाहीं; त्यापेक्षां आगगाड्या चालविणाऱ्या कंपनीचा तो अध्यक्ष होता असें म्हटलें तरी चालेल. परंतु हल्लीं त्यानें मोठ्या धीटाईनें अब्राहामलिंकन सारख्या अध्यक्षास योग्य सल्ला आणि सूचना देण्याचें धाडस केलें, त्याचप्रमाणें राजमंत्रिसभेंतील सभासदांसही तोच सल्ला देण्यास तयार होता. अब्राहाम आणि त्याच्या मंत्रिसभेंतील सभासद यांना सल्ला देणें हें कांहीं सोपें काम नव्हें. राज्य- कारभारांतील डावपेंच समजण्यास जगांतल्या मोठमोठ्या श- हाण्या मुत्सद्यांसही तपें घालवावी लागतात. जनरल मॅक्क्लेलन् सारख्या किंचिज्ञ आणि अनभिज्ञ मनुष्यानें जेम्स नदीच्या तीरीं आपल्या लष्करी छावणींत बसून मोठमोठे राजकीय प्रश्न

अब्राहामासारख्यास विचारणें अगर त्यास सल्ला देणें ह्मणजे लहान तोंडी मोठा घांस घेण्याप्रमाणें होय.

अब्राहाम लिंकन यास त्यानें लिहिलें कीं:—' प्रत्येक संस्थानांतल्या लोकांवर कायद्याचा अमल सारख्या रितीनें चालू करण्याचा जो तुमचा सिद्धांत आहे त्यांत यत्किंचितही फेरफार करूं नका, मग तसें करितांना सैन्यावर एखादें संकट येऊन पडो, राजकीय तड पडोत अगर परकीय राष्ट्रांशीं युद्धप्रसग होवो; नंतर युद्ध कसें चालवावें याबद्दल त्यास दान सल्लयाच्या गोष्टी लिहिल्या नंतर जनरलानें पुनः लिहिलें कीं:— 'मिळकत फरोक्त करणें, लोकांस देहदंड करणें, संस्थानांची व त्यांतील पोटभागांची सुधारणा करणें आणि बलात्कारानें गुलामगिरीचा विध्वंस करणें, या सर्व बाबतीसंबंधानें तुम्ही एकाच वेळीं विचार करूं नये.' इतकें लिहिणें झाल्यानंतर जणूं काय त्याला दहशत घालूनच लिहीत आहे अशा झोंकानें जनरलानें लिहिलें कीं:—' हे विचार लोकांस माहीत होऊन त्यांनीं ते मान्य केल्याशिवाय लष्करी लोक मिळविण्याचा कसाही प्रयत्न केला तरी तो अगदीं व्यर्थ जाणार. आपले स्वाभाविक विचार व त्यांत मुख्यत्वेंकरून गुलामगिरीसंबंधी विचार उघड कळविल्यानें आपल्या हल्लींच्या सैन्यांत तावडतोब फांटाफूट होईल.'

जनरल यानें अध्यक्षाशीं हा जो आश्चर्योत्पादक पत्रव्यवहार केला त्यामुळें चाल करून जाणाऱ्या सैन्यावर सत्ता गाजविण्यास त्याची केवळ नालायकी व्यक्त झाली होती, परंतु अध्यक्षाचा स्वभाव शांत, गंभीर आणि सहनशील असल्यानें व त्याचे विचार उदात्त असल्याकारणानें त्याला त्याच्या अशा वर्तनाचा राग आला नव्हता. मात्र त्याचें धैर्य खचल्यासारखें होऊन तो कांहींसा नाउमेद झाला होता. अशा प्रसंगीं जर त्यानें मॅक्क्लेलन् यास नोकरीवरून दूर केलें असतें तर कांहीं अशक्य नव्हतें, कारण मॅक्क्लेलन् यानें बंडखोरांच्या सैन्यावर आणि त्यांच्या मुख्य राजधानीवर हल्ला करण्याचे कामीं जो विलंब केला त्यामुळें सर्व लोकांची अगदीं अधीरवृत्ति झाली होती. या सर्व बाबतींचा पुष्कळ लोकांनीं दूरवर विचार करून अध्यक्षास तसें न करण्याबद्दल आग्रह केला. आपल्या सैन्याची कशी काय हालहवाल आहे हें स्वतः पाहण्याच्या हेतूनें हॅरिसन्स लॅन्डिंग् येथें जनरल मॅक्क्लेलन् याच्या छावणींत जून महिन्याच्या ७ व्या तारिखेस अध्यक्षाची स्वारी गेली. ज. मॅक्क्लेलन् यानें पुढें राहून लष्करी लोकांचे पट, लष्करांतील पोटतुकड्यांच्या पुढाऱ्यांच्या कैफियती आणि जनरलच्या हुकूमान्वयें सैन्यानें कसकशी अंमलबजावणी केली आहे त्याबद्दलचे सर्व कागद अध्यक्षास दाखविले व अध्यक्षानें ते स्वतः तपासून पाहिले. या प्रमाणें तपासणी झाल्यानंतर वॉशिंग्टन् येथें सैन्य पुनः आणवि-

ण्याबद्दल अध्यक्षाचा विचार ठरला आणि त्यास लष्करांतल्या पोटतुकड्यांच्या पुढाऱ्यांनीं अनुमोदनही दिलें, मात्र या बाबतींत जनरल मॅक्क्लेलन् आडवा आला. मोहिम शुभ मुहूर्तावर आरंभिली होती पण जनरल याच्या पाजीपणामुळें तिचा शेवट चांगला झाला नव्हताच, तरीपण जनरल साहेबाची इच्छा ती सोडण्याबद्दल होईना. उत्तर करोलिनाकडे काम करीत असलेलें बर्नसाइड् याचें सैन्य त्याला पाहिजे होतें आणि अशा रितीनें एक टोलेजंग सैन्य तयार केलें म्हणजे खातरीनें यश मिळेल अशी त्याची समजूत होती. रिचमंड्वर चाल करून जाण्यासंबंधांत अनेक प्रसंगीं वेळचेवेळीं त्याला जे पाहिजे ते सर्व मिळत होते, तरीपण त्यानें त्यावेळीं काय दिवे लाविले हें उघड दिसत होतेंच. यावरून ' जसें ज्याचें शील तद्वत् त्याचें वर्तन ' असें जें म्हणतात त्याचें हें एक उदाहरणच होय.

लिंकन् हा वॉशिंग्टन् येथें परत आला आणि मॅक्क्लेलन् याजकडे वेळोवेळीं त्याच्या मागणीप्रमाणें जें सैन्य त्यानें पाठविलें त्यासंबंधी त्यानें दफतरखान्यांतील सर्व कागदपत्र बारीक रितीनें तपासून पाहिले तेव्हां मॅक्क्लेलन्पाशीं आज १६०००० लष्करी लोक असले पाहिजेत असें त्याला स्पष्ट कळून आलें. ही हकिगत त्यानें जनरल यास कळविली आणि कांहीं दिवसांपूर्वीं तो जेव्हां जनरल यास भेटण्यासाठीं गेला होता त्यावेळीं फक्त

८६००० निवडक लष्करी लोक कामावर होते असें त्याला आढळून आलें, हेंही त्यानें त्याला कळविलें. स्वाभाविक रितीनें, रोगानें आणि लढतांना जे जे मृत्युमुखीं पडले ते, व कांहीं आजारी व कांहीं घायाळ झालेले असे सर्व सढळ रितीनें हिशेबांत धरिले तरी ५०००० लष्करी लोक अद्याप पाहिजेत ते कोठें आहेत असेंही त्यानें स्पष्ट विचारिलें. ३८२५० माझे हुकमानें गैरहाजर होते असें जनरल मॅक्क्लेलन् यानें कळविलें. इतकेंही असून लष्करी लोक अद्याप पाहिजेत ही त्याची ओरड चालू होतीच, शिवाय लोकसत्ताक संस्थानांच्या लांबलांब पल्ल्यावरील प्रदेशांत काम करीत असलेले बर्नसाइडचें अगर दुसऱ्या एखाद्या जनरलाचे सैन्य मिळत नव्हतें, त्याबद्दलही तो कुरकुर करीत होताच.

लष्करी खात्यासंबंधानें विचारपुस करण्यास एखादा चांगला अनुभविक सल्लागार नेहमीं जवळ असावा असें अब्राहाम यास वाटलें म्हणून त्यानें जुलई महिन्याच्या ३१ व्या तारिखेस जनरल एच. डब्ल्यु. हॅलेक् यास वॉशिंग्टन् येथें बोलावून घेतलें आणि त्याला जनरल्–इन्–चीफ् ( मुख्य जनरल् ) असा हुद्दा दिला. दुसरा जनरल जॉन् पोप् यास पश्चिमेकडून पूर्व देशांत बोलाविलें होतें; यानें मिसिसिपीच्या खिंडींत अनेक वेळां यश संपादन केल्याकारणानें त्याची कीर्ति बरीच पसरली

होती. जनरल **फ्रि**मॉंट, जनरल **बँ**क्स् व जनरल **मॅ**क्डोवेल् या त्रिवर्गांच्या स्वाधीन ज्या तीन लष्करी तुकड्या (**व्ह**र्जीनियाचें सैन्य) होत्या त्या तिन्ही तुकड्यांचे नवीन व्यवस्थेप्रमाणें मुख्य लष्करी अंमलदार जनरल **पो**प् यास नेमिलें होते. ह्या नवीन योजनेमुळें जनरल **मॅ**क्क्लेलन् व त्याचे अनुयायी यांस बरें वाटलें नसून त्याचा परिणाम असा झाला कीं हीं मंडळी या नवीन सैन्याचा द्वेष करूं लागली; त्यांत **पो**प् यानें एकंदर सैन्याची व्यवस्था आपल्याकडे सोंपून घेते वेळीं जें भाषण केलें त्यामुळें तर वरील मंडळीच्या द्वेषबुद्धीचा कळस झाला; कारण '**पो**टोमॅक्च्या सैन्याची व्यवस्था बरोबर न राहिल्यानें अनेक वेळां अपयश मिळालें आणि ह्या मुळें ज्या उणीवा दृष्टोत्पत्तीस येऊं लागल्या आहेत त्या सर्व भरून काढून **पो**टोमॅक्च्या सैन्याची सुधारणाही उत्तम करितो' अशा मतलबाचें त्याचें सर्व भाषण गर्वोक्तीचें होतें. ह्या मुळें **पो**टोमॅक्च्या लष्करी अंमलदारांत अतिशय वैमनस्य उत्पन्न होऊन **अ**ब्राहाम याचे मनाचा मोठा विरस झाला. **पो**प्च्या अशा भाषणानें **अ**ब्राहाम यास अशी भीति पडली कीं त्याला शत्रू उत्पन्न होऊन शेवटीं आपसांत वैमनस्य वाढेल व त्यामुळें परिणाम चांगला होणार नाहीं. *इ. स. १७६१ मध्यें हिंदुस्थानांत पानिपत येथें **आ**फ्गाण् आणि **म**राठे यांच्यांत मोठा

* ना. वि. बापट कृत पानिपताची मोहिम पहा.

रणसंग्राम झाला; त्या वेळीं शिंदे, होळकर, गायकवाड, भोंसले वगैरे मोठेमोठे बलाढ्य व रणशूर योद्धे होते, पण श्रीमंत पेशवे यांचें वर्तन ह्या शूर योध्यांशीं चांगलें नसल्यानें आपसांत वैमनस्य वाढलें व त्यामुळें पानिपत येथें मराठ्यांचा पराभव होऊन त्यांस उतरती कळा लागली; ही हकिगत हिंदुस्थानच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेच. आपसांत वैमनस्य वाढलें म्हणजे यश खातरीनें मिळत नाहीं हें अब्राहाम चांगलें जाणून होता आणि आपसांत वैमनस्य अथवा दुही माजल्या मुळें मोठमोठाली राष्ट्रें धुळीस मिळालीं, हें ही त्यास पूर्णपणें माहित होतें.

इ. स. १८६२ च्या जून महिन्याचे २८ वे तारिखेस अल्टूना ( पेन्सिलवॅनिआ, ) येथें गव्हर्नरांची एक मोठी सभा भरली होती. सतरा संस्थानांच्या गव्हर्नरांची ही सभा असून युद्ध चालविण्याचे कामीं अध्यक्षास मदत करण्यास कोणकोणते चांगले उपाय योजावेत या बद्दलचा निर्णय करण्याचा ह्या सभेचा हेतू होता. वरील सतरा संस्थानांचे गव्हर्नर राजनिष्ट होते; त्यांनीं एकमत होऊन, ज्या ज्या वेळीं जास्त सैन्याची अवश्यकता लागेल व ज्या घटकेस लष्करी लोकांची मागणी येईल, त्या त्या वेळीं हीं सतराही संस्थानें आपआपले लष्करी लोक पाठविण्यास अगदीं सिद्ध असल्याबद्दल अध्यक्षास खातरीनें कळविलें. त्यावरून अध्यक्षानें ३००००० लष्करी लोकांची

मागणी केली. युद्धांत कितीही अपजय मिळोत, सैन्याची कशी ही उलटापालट होवो, कसाही विलंब अगर हयगय होवो, परंतु स्वदेशाभिमानी लोकांच्या हृदयांतली स्वातंत्र्याच्या स्फुरणाची जोत मंद न होतां ती विशेष प्रज्वलित होऊं लागली. कोठें कोठें अशी स्थिति दृष्टोत्पत्तीस येते कीं कोणतेंही कामांत कोणास प्रथम अपयश मिळालें ह्मणजे त्यास पुनः तें काम करण्याची उमेद न राहून त्याचे हातपाय गळाल्या सारखे होतात, परंतु संयुक्तसंस्थानांतल्या देशभक्तांची प्रकृति तशी नव्हती; त्यांचा युद्धांत पराजय झाला ह्मणजे पुनः युद्ध करण्यास त्यांस ज्यास्त हुरूप येत होती. हल्लींच्या प्रसंगीं संयुक्त संस्थानांतल्या राजनिष्ट बहाद्दरांनीं जिवावर उदार होऊन प्रतिज्ञा केली होती कीं " उन्मत्त झालेल्या रिपूंस समरांगणांत दडपून त्यांचीं उरें फोडूं; गुलामगिरीला रसातळास नेऊन गुलामांच्या बायका पोरांचे तळतळाट मिटवूं; स्वातंत्र्याच्या अजरामर संस्था जागच्या जागीं स्थापन करूं आणि संयुक्त संस्थानांतील संघशक्तीचें रक्षण करूं, तेव्हांच हीं शस्त्रें हातांतून खालीं ठेऊं, ह्याहींपेक्षां कधीं ही खालीं ठेविणार नाहीं. "

पोप् हा ३८००० लष्करी लोकांवर सत्ता चालविण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेऊन सर्व सैन्यासहित वॉशिंग्टन् शहराचे संरक्षणार्थ राहिला होता आणि त्याच्याशीं टक्कर

घेण्यास बंडखोरांच्या लष्कराचा अधिपति जनरल **ली** हा आपल्या फौजेसहित पुढें सरसावतच होता. पोप याची शेनॅंडोहच्या खिंडीवर देखरेख असून तेथें बंडखोरांच्या लष्करी तुकड्यांची कवाईत चालू होती. अशा संधींत जर मॅक्क्लेलन् यानें ( जेम्स्वर मुकाम होता तेथून ) मोठ्या हिकमतीनें रिचमंड्वर हल्ला केला असतां तर **ली** याचें पोप्कडे अनायासेंच दुर्लक्ष होऊन तो आपली बाजू संभाळून राहता; तरीपण जनरल मॅक्क्लेलन् यानें तशी कांहींएक हालचाल न करितां पूर्वक्रम चालू ठेविलाच होता. पोटोमॅक्च्या सैन्यास पोप् याजकडे मदतीसाठीं जाण्याचें एकदम ठरल्या प्रमाणें हुकूम झाला. हा सर्व प्रकार मोठा भयंकर असून जोखमीचा होता. **ली** याचें सैन्य वॉशिंग्टन् येथून जेवढ्या अंतरावर होतें त्या पेक्षां ज. मॅक्क्लेलन् याचें व्हर्जिनियांत असलेलें सैन्य वॉशिंग्टन्हून विशेष लांब होतें. मॅक्क्लेलन् याचें सैन्य पोप्च्या सैन्यास मदती साठीं येऊन पोंहचण्यापूर्वीं त्याच्या ( पोप्च्या ) सैन्याचा पराभव करावा असा **ली** याचा झोंक दिसत होता. मॅक्क्लेलन् याच्या मागें घाई करण्या विषयीं त्याचा लकडा लागलाच होता; परंतु ऐकतो कोण? चैन करून अळंटळं करण्याचा त्याचा आपला क्रम चालूच होता; या वरून तो हुकूमाची अमान्यता करीत होता असें स्पष्ट दिसून आलें होतें. जुलई महिन्याच्या १३ व्या तारिखेस त्यानें आपला क्रम एकदम सोडून पोटोमॅक्कडे

परत येण्याची तयारी करावी असा हुकूम त्याला मिळाला; आणि आगष्ट महिन्याच्या ३ ऱ्या तारिखेस वॉशिंग्टन्च्या खालच्या बाजूस पोटोमॅक् नदीस ऍक्वियया क्रीक नांवाचा जो झरा जाऊन मिळतो तेथें सैन्यानिशीं एकदम जाण्याची त्याला सुचना मिळाली. त्यावर मॅक्क्लेलन् यानें असें उत्तर दिलें कीं 'जशी वेळ अनुकूळ पडेल तसा आपल्या हुकुमाचा अंमल मजकडून होईल'. शिवाय तारिख ९ मिनहुरोजीं अध्यक्षाच्या सांगण्यावरून जनरल हॅलेक् यानें मॅक्क्लेलन् यास पोप् हा मोठ्या भयंकर प्रसंगांत पडला असून त्याचे मदतीस त्यानें त्वरित गेलेच पाहिजे अशाबद्दल योग्य ताकिद देऊन त्याचे चांगलेच कान उघडले. हें झाल्यावर दुसऱ्या दिवशीं हॅलेक् यानें लागलीच मॅक्क्लेलन् यास तारेनें कळविलें कीं 'रॅपिडन् ओलांडून बंडखोर लोक पोप् याजवर हल्ला करीत आहेत म्हणून आतां विलंब करणें अगदीं उपयोगी नाहीं;' तरीपण जनरल मॅक्क्लेलन् हल्लीं इतका सुस्त झाला होता कीं त्यानें हॅलेक्च्या ह्या सांगण्याकडे अगदींच कानाडोळा केला. शेवटीं तो आगष्ट महिन्याच्या २३ व्या तारिखेस मनरो किल्ल्यांतून निघून जलमार्गानें दुसऱ्या दिवशीं ऍक्वियाक्रीक येथें आला आणि तेथून तारिख २७ रोजीं अलेक्झांड्रिआ येथें येऊन पोंहचला, म्हणजे त्याला हुकूम पोंहचल्या नंतर सुमारें एक महिन्यानें त्या हुकुमाचा अंमल झाला.

हिकडे बंडखोरांचा पुढारी जॅकसन्, तसेंच लाँगस्ट्रीग् आणि ली अशा त्रिवर्गांनीं क्रमाक्रमानें पोप्वर हल्ला करून त्याला वॉशिंग्टन्कडे हटविलें. ज. मॅक्क्लेलन् याच्या हाताखालचे व मर्जीतले लष्करी अंमलदार ( लेफ्टेनन्ट् ) नजीकच होते, परंतु त्यांपैकीं एकही पोप्च्या मदतीस गेला नव्हता. फिट्झ् जॉन पोर्टर यानें पोप्च्या लष्करावर चालू असलेल्या तोफांच्या भडिमाराचा गडगडाट ऐकिला व हा बंडखोरांचाच हल्ला आहे असें ही त्याला माहीत असून त्यानें पोप्च्या मदतीस जाण्यास स्वच्छ ना सांगितली; त्याच प्रमाणें व्हर्जिनिया येथील सैन्याचा दुर्दशा तो पाहत असून तीकडेही मदतीस गेला नाहीं. या बाबतीवरून लष्करी खात्यांतल्या अदालतींत त्याच्यावर काम चालून गुन्हा शाबीत झाल्यानें सैन्यांतून एकदम कमी करण्याची त्याला शिक्षा झाली व ही शिक्षा अध्यक्षानें मंजूर केली.

जनरल पोप् यास वॉशिंग्टन्कडे हटविलें होतेंच; त्याचा गर्व अगदीं खंडन झाल्याकारणानें तो अगदीं दीन झाला होता. त्याच्या सैन्यांत कलहरूपी अक्काबाईचा फेरा आल्यानें जिकडे तिकडे तड पडून कारस्थानें चालू झालीं होतीं; कॉंग्रेसमध्यें आणि देशांतही फूटाफूट माजली असून व्हर्जिनिया आणि वॉशिंग्टन् यांच्या सभोंवतीं सर्व लष्करी छावण्या-

त ह्या फुटाफुटीची लाट जाऊन पोंहचली होती. समरांगणांत संकटें आणि अपजय यांचा इतका सुळसुळाट चालू झाला होता कीं पाहणारांची छाती दडपून जात असे. कॉंग्रेसमध्यें सुद्धां युद्धाच्या विरुद्ध विवेचन चालत असून बंडखोरांशीं तह करावा अशाबद्दल शिफारशी चालू होत्या. एकंदरींत इतका मोठा विकट प्रसंग गुदरला होता तरी अब्राहाम लिंकन याची परमेश्वरावर पूर्ण श्रद्धा असल्यामुळें संयुक्त संस्थानांचाच अखेर जय होऊन गुलाम बाळगणाऱ्या बंडखोरांचा पराजय करण्याची लोकांत शक्ति असल्याबद्दल त्याची संपूर्ण खातरी होती म्हणून त्यानें आपला दृढ निश्चय ढळू दिला नाहीं; तशा भयंकर स्थितींत जे अब्राहाम याच्या धैर्यास, बळास आणि धारिष्टास चांगले ओळखून होते, त्या सर्वांस याबद्दल मोठें आश्चर्य वाटून ते त्याची अत्यंत स्तुति करूं लागले.

जनरल मॅक्क्लेलन् याचे ग्रहमान चांगले असल्यामुळें त्याला विजय संपादन करण्याची उत्तम संधि मिळाली होती. कोणत्याही मनुष्यास चहूंकडून ग्रहदशेनें एकदम वेढलें म्हणजे त्याला भांबावल्या सारखें होत असतें, त्या प्रमाणें त्यावेळीं अब्राहाम याची स्थिति झाली होती. फौज खात्यांतल्या एकंदर स्थितीचा विचार केला असतां एका नवीन सैन्याचा

पुढाकार जनरल मॅक्क्लेलन् यास दिल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें असें अध्यक्षास वाटलें आणि त्याप्रमाणें त्यानें एका नवीन सैन्याचा त्याला मुख्य नेमिलें. त्याच्या देखरेखीखालीं पोटोमॅक्चें सैन्य, पोपच्या व्हर्जिनिया येथील सैन्यांतील बाकी राहिलेले लष्करी लोक आणि उत्तर कॅरोलिना येथून जनरल बर्नसाईड याजकडून आणिलेलें सैन्य, हीं सर्व मिळून दोन लक्ष लष्करी लोकांची एक मोठी फौज तयार झाली होती; इतकें मोठें सैन्य स्वतःची सत्ता गाजविण्यास त्याच्याजवळ कधींच एकत्र जमलें नव्हतें. अशा वेळीं येवढ्या मोठ्या बलाढ्य सेनानायकास इंद्रपद घेऊन यशाची माळ स्वतःच्या गळ्यांत पडण्याची इच्छा झाली असती तर खरोखरच अशक्य नव्हतें व ती संधीही मोठी चांगलीच होती, परंतु आमच्या जनरल मॅक्क्लेलन् साहेबांची तेवढ्यानें तृप्ति झाली नव्हती; त्याला तर हल्लीं दीड बोट स्वर्ग उरलें असून असें वाटे कीं, ज्याच्या ज्याच्या स्वाधीन लहान अगर मोठ्या लष्करी तुकड्या असतील त्या त्या सर्व माझ्या एकट्याच्या हाताखालीं असाव्यात; असें झालें असतें म्हणजें त्याचें संपूर्ण समाधान होऊन त्याची झालेली अधीरवृत्तिही नाहींशी झाली असती. त्याची विशेष इच्छा अशी होती कीं वॉशिंग्टनूच्या संरक्षणार्थ जी फौज ठेविली आहे ती त्याचेकडे पाठवावी, कारण, एक वॉशिंग्टन् शहर शत्रूच्या हातांत गेलें तर त्याची मोठीशी किंमत त्याला

वाटत नव्हती. परंतु पोटोमॅक्च्या बलाढ्य सैन्यास मात्र अपयश येतां कामा नये, असें त्याचें म्हणणें होतें. बंडखोरांनीं आपला मोर्चा हार्पर्फेरीकडे फिरविला होता, हें जनरल साहेबास माहीत असून त्यानें तेथून १२००० लष्करी लोक पाठविण्याबद्दल लिहीलें होतें. अंतःस्थिति कशी काय होती हें तो पूर्णपणें जाणून होता. अखेर हार्पर्फेरी ता. १५ सपटेंबर रोजीं शत्रूनीं जिंकून घेतलें. शत्रूचें सैन्य ठिकठिकाणीं अव्यवस्थित रितीनें निराळे झालेलें दिसत होतें, हें तो पाहत असून स्वस्थ बसला त्याचा हा परिणाम झाला.

बंडखोरांचा पुढारी 'ली' हा आपल्या सैन्यासहित मेरिलँड्वर चाल करून जाण्याच्या बेतांत होता, अशा वेळीं त्यास मागें फिरविणें फार आवश्यक होतें. अखेर मॅक्क्लेलन् याच्या डोळ्यावरील सुस्ती उडून तो जागा झाला व जनरल ली याजवर त्यानें एकदम हल्ला केला सपटेंबर महिन्याच्या १७ व्या तारिखेस एँटिएँटम् येथें उभयसैन्यांत घोर संग्राम होऊन बंडखोरांचा पराभव झाला. बंडखोरांपैकीं पुष्कळांना चाबुकांचा यथेच्छ मार मिळाला व ते पोटोमॅक् ओलांडून परत हटूं लागले. मॅक्क्लेलन् यानें शत्रूचा पाठलाग करावयाचा तो केला नाहीं व एक लष्करी तुकडी शिल्लक असूनही जास्त लष्कराची मागणी करूं लागला, हें पाहून अध्यक्ष चकित झाला व सैन्याची व्यवस्था पाहण्यासाठीं स्वतः

गेला. वॉशिंगटन् येथें परत येऊन इ. स. १८६२ च्या अक्टोबरच्या ६ व्या तारिखेस अध्यक्षानें जनरल हॅलेक् याच्या मारफतीनें हुकूम सोडला कीं मॅक्क्लेलन् यानें पोटोमॅक् ओलांडून शत्रूशीं एकदम युद्ध चालू करावें अगर त्यांना दक्षिणकडे हांकून लावावे. हा हुकूम मान्य करण्याबद्दल मॅक्क्लेलन् यानें नाकारिलें. तारिख १० मिनहू रोजीं बंडखोरांच्या एका लष्करी तुकडीचा जे. इ. बी. स्टुअर्ट नांवाचा एक अंमलदार पोटोमॅक् ओलांडून चेंबर्सबर्ग पावेतों झपाट्यानें गेला.

जनरल मॅक्क्लेलन् यानें आपल्याशीं असें खातरीनें ताडिलें कीं स्टुअर्ट्‌ची सर्व सत्ता गुंडाळून ठेवण्यास मुळीच वेळ लागणार नाहीं. इकडे अध्यक्षानें त्याला स्नेहबुद्धीनें असें लिहून कळविलें' कीं त्यानें एकदम पुढें सरकावें, परंतु तो मुळींच हालला नाहीं. घोडे अतिशय थकले असून त्यांना मुखरोग झाल्यामुळें त्याचा उपाय नाहीं अशी त्यानें तक्रार केली. अब्राहाम यानें प्रत्युत्तर दिलें कीं 'जर ऍंटीऍटम्‌च्या लढाई नंतर कांहीं एक घडलें नाहीं, तर घोडे थकून जाऊन त्यांना मुखरोग होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.' अध्यक्षाचा असा अविश्वास पाहून मॅक्क्लेलन् यास राग आला; त्यामुळें अध्यक्षानें त्याला असें कळविलें कीं "जर कांहीं अन्यायाचें लिहिलें गेलें असेल तर त्याबद्दल मला मोठी खिन्नता वाटेत. आज पांच आठवडे झाले सैन्य जागचें

हालले नसून त्यांत हमेश नवीन घोड्यांची भर पडतच आहे. असे एकंदर ७९१८ घोडे पाठविले असून सर्व थकून जाऊन पुढें सरकण्यास असमर्थ झाले असें तुमचें म्हणणें आहे तर या पुढें आतां जयाची अशा सोडिलीच पाहिजे. शिवाय आतां हिवाळ्याचे दिवस येऊन ठेपले; अशा थंडीच्या दिवसांत लष्करासंबंधी धांवाधांवीचें काम तुम्हास झेंपणें कठीण दिसत आहे."

इ. स. १८६२ च्या नोवेंबर महिन्याच्या ५ व्या तारिखेस सैन्य पोटोमॅक् ओलांडून एकदांचें पलिकडे रवाना झालें. ॲंटिऍटम् येथें बंडखोरांस हार खावी लागली होतीच, परंतु सर्व व्यवस्था करून ते पुनः युद्ध करण्यास तयार झाले होते. ज. मॅक्क्लेलन् हा पोटोमॅक्च्या सैन्याच्या नोकरींतून तारिख ५ नोवेंबर रोजीं अगदीं मुक्त झाला असून न्यूजर्सी परगण्यांतील ट्रेंटन् येथें जाण्यास त्याला सुचना झाली होती. त्यानें फौजखात्याचा सर्व कारभार अगदीं सोडून दिला आणि इ. स. १८६४ सालीं प्रजापक्षी लोकाकडून इलाख्यासाठीं तो उमेदवार झाला त्यावेळपावेतों त्याचे संबंधी विशेष कांहींएक लिहिण्या जोगें नव्हतें.

या प्रकरणांत फौजखात्यासंबंधी सर्व हकीकत दिली आहे. अब्राहाम लिंकन याचें धैर्य, सहन शीलता, आणि शहाणपण या तिन्ही गुणांची यांत चांगली माहिती असल्या मुळें हें प्रकरण

फारच महत्वाचें म्हटलें पाहिजे. जनरल मॅक्क्लेलन् यानें वेळोवेळीं अध्यक्षाचे हुकूम मान्य केले नाहींत म्हणून या त्याच्या अपराधाबद्दल त्यास धरून आणून त्याच्यावर फौजखात्याच्या अदालतींत खटला करावा, असें तेथील बऱ्याच तापटस्वभावाच्या मंडळींनीं अध्यक्षास वारंवार आग्रह पूर्वक कळविलें; शिवाय कित्येकांनीं मशारनिल्हे जनरल साहेबास फौजेच्या अधिकारावरून तरी दूर करावें अशीही सल्ला दिली; परंतु जनरल मॅक्क्लेलन् याच्या हाताखालील लष्करी अंमलदारांचा ग्रह युद्धकलेंत त्याची अलौकिक बुद्धी असल्या विषयीं व मोठमोठाले जय मिळविण्याचे कामीं त्याच्या अचाट शक्तीसंबंधी अति उत्तम होता. त्यांनीं जनरलचा हुकूम अमलांत आणण्यांत कदाचित् निरुत्साह जर दाखविला असेल तर दुसऱ्या कोणत्याही अंमलदाराच्या कामींही दाखविलाच असता. लष्करी खात्यांत जसें सक्तपणाचें शिक्षण युरोपांतील संस्थानांत आहे तसें संयुक्तसंस्थानाच्या फौजखात्यांत त्यावेळीं मुळींच नव्हतें. गांवांत जशी चार मंडळी एकत्र जमली ह्मणजे त्याला सभा म्हणतात तशाच सभा बहुतकरून संयुक्तसंस्थानाच्या फौजखात्यांत भरत होत्या. ज्यानें युद्धाच्या प्रारंभीं पश्चिम व्हर्जीनियाचे भागांत चांगलें यश मिळविलें, आणि स्वतःही चांगलें नांव मिळवून लोकांनाही चांगलें म्हणविलें, त्याच्याठायीं देशांतल्या लोकांची असलेली श्रद्धा एकाएकीं कशी कमी व्हावी? जनरल मॅक्क्ले-

लन् यास नोकरींतून कमी करून लोकांत वैमनस्य आणि बेदिली उत्पन्न करणें हें अब्राहाम यास आवडलें नाहीं. एकंदर लष्करी लोकांचा व देशांतील सर्वत्रांचा दृढविश्वास आपले ठायीं असावा अशा रितीनें त्यानें आपलें वर्तन ठेविलें होतें कारण ॥ लोके गुरुत्वं विपरीततां वा स्वचेष्टितान्येव नरं नयन्ति ॥ हें वाक्य त्यानें आपल्या हृत्पटलावर खोदूनच ठेविलें होतें. जनरल मॅक्-क्लन् याच्या अब्रूस बट्टा लागल्या नंतरच त्याला त्यानें नोकरींतून कमी केलें होतें. अब्राहाम लिंकन याच्या आंगीं जे अप्रतिमगुण होते, तशा गुणांचें थोडक्यांत वर्णन एका श्लोकांत वामन पंडितांनीं केलेलें आढळतें. श्लोकः—हिंसात्याग अलोभता परधनीं सत्यत्व संभाषणीं । तृष्णाच्छेद परांगनाविमुखता भूतानुकंपामनीं ॥ दान प्रश्रय भाव सद्गुरुकुळीं सन्मार्ग सर्वांसहा। संसाराब्धि तरावया स्मृतिशतीं कीं बोलिजेला पथा ॥ १ ॥



# प्रकरण २३ वें.

## बंडखोरांचा मोड आणि राष्ट्रिय महोत्सव.



जनरल अंब्रोझइबर्नसाइड् हा मॅक्क्लेलन्च्या नंतर पोटॉमॅक्च्या सैन्याचा अधिकारी झाला. जनरल बर्नसाइड यानें संयुक्त संस्थानांतल्या लष्करी विद्यालयांत पदवी मिळविली होती, परंतु बंड-खोरांशीं युद्ध प्रारंभ होण्याचे पूर्वी माजी जनरलाप्रमाणें फौज-खात्याच्या नोकरी शिवाय इतर व्यवसायांत तो गुंतला होता. लष्करी खात्यांतल्या शिपायांचें शरीर ज्या मापाचें असावें लागतें त्याप्रमाणें तो पूर्ण मापाचा असून मोठा देखणा होता. चातुर्य, चांगुलपणा, राजनिष्ठा आणि स्वदेशाभिमान, हे सर्व गुण त्याच्या अंगीं वास्तव्य करीत होते. जनरल मॅक्क्लेलन् याचें फौजखात्याचें सर्व काम त्यानें साशंक वृत्तीनें सोंपून घेतलें होतें. ज. मॅक्क्लेलन् याच्या संपूर्ण लोभातलें जे अमलदार होते, त्यांचें मन याच्या विषयीं शुद्ध नसणें हें स्वाभाविक होय. एँटीएम्च्या लढाईत ज्या प्रमाणें माजी जनरलानें आपण मोठे युद्धकलाविशारद असल्याबद्दल ख्याति मिळविली, त्याप्रमाणें सैन्य स्वतःकडे सोंपून घेतांना जनरल बर्नसाइड् यानें आपण युद्धकलेंत मोठे

निपुण आहोंत असें ह्मणवून घेतलें, तरीपण पोटोमॅक्च्या सैन्याची एकंदर व्यवस्था त्यानें मोठ्या साशंक वृत्तीनें व संकोचानें सोंपून घेतली. शस्त्रांचा उपयोग करण्याचे कामीं आपलें सोबती चांगली मदत करतील अशी त्यानें पूर्ण खातरी करून घेतली आणि नोवेंबरच्या ९ व्या तारिखेस लष्करी खात्याचा संपूर्ण अधिकार त्याला प्राप्त झाला.

प्रथमारंभींच बर्नसाइड्, हॅलेक् आणि अब्राहाम या त्रिवर्गांत बंडखोरांवर कोणत्या दिशेनें चाल करून जावें या संबंधांत मतभेद उत्पन्न झाला. फ्रेडरिक्सबर्गच्या वाटेनें रिचमंड्कडे एकदम चाल करून जावें असें बर्नसाइड याचें मत पडलें. हॅलेक् यानें असा अभिप्राय दिला कीं थेट पश्चिमेकडे गोर्डोन्स्‌विलच्या रस्त्यानें जावें आणि या दोन्ही मतांचा निर्णय करण्याचें काम अब्राहाम याजकडेस आलें होतें. जनरल बर्नसाइड् याची योजना शत्रूवर चाल करून जाण्याची असल्यानें तीच लिंकन यानें मान्य केली. हॅलेक् यास बरोबर घेऊन अध्यक्ष आपल्या मंत्रिसमाजांत आला आणि त्यानें बर्नसाइड यास लिहून कळविलें कीं ' हॅलेक् यानें फ्रेडरिक्सबर्गचा मार्ग पसंत केला परंतु त्यानें ( बर्नसाइड् यानें ) मात्र ताबडतोब चाल करून गेलें पाहिजे, नाहींपेक्षां तो मार्ग सोईवार पडणार नाहीं. ' बर्नसाइडच्या सैन्यास फ्रेडरिक्सबर्गकडे कूच करण्याचा

सूचना झाली होती; नदी उतरून जाण्यासाठीं पूल बांधण्याच्या नावांची फारच अवश्यकता असून त्या लौकर न मिळूं शकल्या कारणानें सैन्यास कूच करण्यास बराच विलंब झाला. त्या दरम्यान बंडखोरांचा पुढारी **ली** यानें शहराच्या वरल्या बाजूस आलेल्या उंच टेकड्या हस्तगत करून घेऊन तेथें चांगली तटबंदी केली. **बर्नसाइड्** हा नांवाचा पूल बांधून नदी उतरून येण्याचे पूर्वींच जनरल **ली** हा आपलें सैन्य घेऊन समोर आला. तारिख १९ नोवेंबर रोजीं रॅपॅहॅनॅक्च्या उत्तर बाजूस **फा**लमौथ येथें **बर्न**साइड् येऊन पोंहचला होता, परंतु तारिख २९ पावेतों पूल बांधण्यासाठीं नावा येऊन पोंहचल्या नव्हत्या. शेवटीं अशा कठिण स्थितींत तारिख १५ डिसेंबर रोजीं अगदीं निराश होऊन शत्रूशीं टक्कर देणें त्याला भाग पडलें. **ली** यानें **फ्रे**डारिक्सबर्ग्च्या वरल्या बाजूच्या टेकड्या स्वाधीन करून घेतल्याच होत्या आणि नदी पलीकडून शत्रू चाल करून आल्यास त्यानें तोफखानाही अगदीं जय्यत ठेविला होता. शेवटीं दोन्ही लष्करांचा भयंकर सामना झाला आणि युद्धाविषयीं कित्येक हताश झालेल्या मोठ्या शोधक गुणवेत्त्यांनीं भविष्य केल्याप्रमाणें **पो**टोमॅक्चें सैन्य मागें हटून त्यांत भयंकर कत्तल चालू झाली. ह्या भयंकर प्रसंगामुळें लोकांस डोक्यांवर आकाश कोसळल्याप्रमाणें झालें होतें. **वा**शिंग्टन् येथें घायाळ माणसांची गर्दी उडाली असून कोणी कन्हत कुंथत होते, कोणी

पाणी मागत होते आणि कित्येक तर अखेरच्या पंथालाही लागले होते. ह्यापैकीं कित्येकांस दवाखान्यांत नेले, कित्येकांना सार्वजनिक इमारतींत आणि कित्येकांस देवळांत पाठविलें; शिवाय अखेरच्या पंथास लागलेल्यांनीं राम म्हणतांच त्यांना मूठ माती देण्याची व्यवस्था झाली. कॉंग्रेसची बैठक त्यावेळीं बंद असल्या कारणानें राजकार्यदक्ष मंडळी कडून, वरील स्थिति संबंधांत अध्यक्षानें, कॉंग्रेसच्या सभासदांनीं आणि देशाभिमानी लोकांनीं अवश्य विचार केला पाहिजे, अशी सुचना झाली होती.

हें सर्व वर्ष मोठेंच कठीण गेलें. बंडखोरांच्या मुख्य ठिकाणा पासून कांहीं मैल अंतरावर मॅक्क्लेलन् हा राहत असतांना त्याला रिचमंडहून एकदां बंडखोरांनीं त्राहि त्राहि करून सोडिलें होतें. बर्न्साइड् हा पोटोमॅक्च्या सैन्याचा पुढारी असतांना बंडखोरांनीं त्या सैन्याची अतिशय दाणादाण करून सोडल्यामुळें भयंकर हाना झाली. स्टोन्वॉल् जॅक्सन् हा शॅन-डोहच्या खिंडींतून निघून गेला आणि मॅक्डोवेल् व फ्रिमॉंट यांचा डोळा चुकवून पोटोमॅक् नदी उतरून चालता झाला. पश्चिमेकडील सैन्याचें धोरणही मोठेसें आशा बाळगण्यासारखे नव्हतें. ब्बुएल् यास केंटकीकडे मागें हटविलें आणि बंडखोरांचा पुढारी ब्रॅग्यानें त्या संस्थानांत शिरून केंटकीची राजधानी फ्रॅंक्फर्ट येथें चालू कामासाठीं एक कचेरी नवीन

पद्धतीस अनुसरून स्थापन केली. बंडखोरलोकांच्या म्हणण्याचें तत्व सरहद्दीवरील संस्थानिकांच्या आणि उत्तरेकडील संयुक्त संस्थानांच्या विरुद्ध जे लोक होते त्यांच्या हृदयांत बिंबवून त्यांना चांगलें उत्तेजन द्यावें हाच त्यांचा मुख्य हेतू होता. लुइविली ( कँटकी ) आणि सिनसिन्नाटी, (ओहिओ ) या शहरांतील लोकांस बंडखोरांनीं मोठीच दहशत घातली होती म्हणून त्या शहरांस तटबंदी करणें फार आवश्यक होतें. डिसेंबर मास अखेर जनरल शर्मन आणि जनरल मॅक्क्लॅरनंड् या उभयता संयुक्त संस्थानांच्या पुढाऱ्यांनीं व्हिक्सबर्गच्या संरक्षणार्थ असलेल्या बंडखोरांवर मोठा हल्ला केला, परंतु त्यांची मोठी हानी झाल्यामुळें त्यांना परत हटावें लागलें. सालअखेर रोझ्क्रॅन्स् यानें स्टोनरिव्हरच्या लढाईत बंडखोरांचा पराभव केला, परंतु बंडखोरांचा अधिपती जनरल ब्रॅग याचें बळ यत्किंचित्‌ही कमी झालें नसून तो आपल्या सैन्यासहित दक्षिणेंकडे निघून गेला.

त्या सुमारास एक नवीनच पक्ष उत्पन्न होत असून तो पुढें सरसावण्याचा रंग दिसत होता. या पक्षांतील लोकांचा मूळ हेतू बंडखोरांचा नाश करून त्यांना शिक्षा करण्यासंबंधी नसून कांहीं स्वतंत्र शर्ती योजून बंडखोर आणि संयुक्त संस्थानांचे लोक या उभयतांत चालू असलेल्या लढायांची कांहीं आपसांत तोड काढून सख्य करावा असा होता. युद्धांत जय संपादन हो-

ऊन संयुक्त संस्थानांचा जयध्वज फडकू लागला ह्मणजे हे नूतन उद्भवलेल्या पक्षांतले लोक अगदीं मुकाट्यानें बसत असत आणि युद्धांत बंडखोर विजयी होण्याचा रंग दिसू लागला ह्मणजे युद्ध व लढाईत होत असलेली प्राणहानि बंद करण्याबद्दल जिकडे तिकडे भयंकर ओरड ही मंडळी चालू करीत असत. अब्राहाम याची स्थिति 'इकडे आड तिकडे विहीर' या ह्मणीप्रमाणें झाली होती. एकीकडे फौजखात्यांत पुनः मॅक्क्लेलन् यास घेऊन युद्ध चालवावें असें कित्येक लोकांचें ह्मणणें होतें; आणि दुसरीकडे अमूक अमूक शर्तीवर तह करावा असेंही पुष्कळांचें ह्मणणें होतें. कांहीं मंडळींचें असें ह्मणणें होतें कीं युद्धांत असलेले हल्लींचे जनरल बदलून त्याचे ऐवजीं युद्धकलाविशारद रणाग्रणी बोलवावेत. पोटोमॅक् येथील सैन्यांत लोकप्रिय झालेले जनरल बँक्स् यास कित्येकांनीं पुढें केलें. तह करविणारी प्रजापक्षी मंडळी गुलामगिरीच्या पद्धतीस यत्किंचितही न छेडतां तह कोणत्या शर्तीवर करून हा तंटा मिटवावा या विचारांत मग्न झाली होती.

अब्राहाम लिंकन आणि न्यूयार्कचा मेयॉर् फरनँडो वूड या परस्परांत इ. स. १८६२ अखेर झालेला पत्रव्यवहार फारच चित्तवेधक होता. अब्राहाम लिंकन याची प्रथम अध्यक्षाच्या जागेसाठीं निवडणूक झाली त्यावेळीं न्यूयॉर्क येथील लोकांनीं

स्वतंत्र राहून युद्ध चालविण्याचे कामीं अगदीं तटस्थ वृत्ति धारण करावी असें ज्यानें ठरविलें होतें तोच हा वूड होय. दक्षिणेकडील संस्थानें दोषमुक्त असल्या बद्दल जर जाहीर होत असेल तर तेथील लोक आपआपला जुना संबंध चालू ठेऊन काँग्रेसमध्यें वकील पाठविणार आहेत असें वूड यानें अब्राहाम लिंकन यास खातरी पूर्वक लिहून कळविलें; परंतु अब्राहाम यानें त्यास स्पष्टपणें कळविलें कीं ' आपण कळविलेली हकिकत पायाशुद्ध नसल्या कारणानें तिला महत्व कसें देतां येईल ? कारण ती बातमी पायाशुद्ध नसल्याबद्दल मला संपूर्ण संशय येत आहे. '

तो म्हणाला 'तरीपण तुम्हीं हीं बातमी मला कळविल्याबद्दल मी तुमचा अत्यंत ऋणी आहे. दक्षिणे कडील संस्थानें आपआपले प्रतिनिधि काँग्रेसच्या येत्या बैठकीस पाठवितील असें जें तुम्ही लिहिलें आहे त्याचा अक्षरशः व तात्विक दृष्टीनें जर असा अर्थ होत असेल कीं:--दक्षिणेकडील संस्थानांतील लोक संयुक्त संस्थानाच्या हद्दींत राष्ट्रीयसरकारच्या सत्तेस अडथळा करणार नाहींत, राष्ट्रीय राज्याचें प्रतिष्ठापन कबूल करतील, तेथील राज्यसत्तेच्या आधीन होतील आणि राष्ट्रीय सत्तेचो शाश्वती मान्य ठेवितील तर माझ्या मतें संयुक्त संस्थानाच्या सरकारास युद्ध चालू ठेविण्याचें कारणच राहत नाहीं

आणि असें झालें तर त्यांचे सर्व अपराध क्षमा केल्या बद्दल जाहिर करण्यास कांहींएक प्रत्यवाय नाहीं असें मला वाटतें.'

अब्राहाम लिंकन यानें स्थानापन्न होण्याचे समारंभाचे वेळीं जें भाषण केलें होतें त्यांतील बऱ्याच भागाचा वूड यानें आपल्या पत्रांत उल्लेख केला होता; त्याचप्रमाणें दाक्षिणेकडील राजनिष्ठ लोकांचे हेतू प्रमाणासाठीं पुढे करण्याचे उद्देशानें त्यानें पुष्कळ मुद्दे प्रतिपादन केलें होते. अब्राहाम हा त्याचें लक्षपूर्वक मनन करीत असतांना स्वतःच्या भाषणांत केलेला उल्लेख त्याचे अवलोकनांत आला त्यावेळीं त्याला असें वाटलें कीं, वूड यानें दक्षिणेकडील संस्थानास सर्व अपराध क्षमा केल्याबद्दल जाहिर करण्यासाठीं जें कळविलें तें याच आधारानें कळविलें असावें व तो आधार वास्तविक दिसत आहे. अब्राहाम यानें याबद्दल दुरवर विचार करून कळविलें कीं 'बंडखोर लोक संयुक्त संस्थानांच्या राष्ट्रीय सत्तेस जुमानित नसून वेळोवेळीं आडवे येतात, हा प्रकार प्रथम एकदम बंद झाला पाहिजे म्हणजे दाक्षिणेकडील संस्थानें निर्दोषी ठरलीं आहेत असें जाहिर रितीनें कळवितां येईल, त्यापूर्वीं मात्र तसें कळवितां येणार नाहीं.' 'अब्राहाम यानें पाहिजे असल्यास बंडखोर लोक तह करण्यास कबूल आहेत अशाबद्दल वाटेल तशी खात्री करून द्यावी आणि दाक्षिणेकडील पुढाऱ्यांशीं जरी या संबंधांत पत्रव्यवार केला तरी

हें उघड रीतीनें कळून येणार आहे. या शिवाय दुसरा मार्ग नाहीं; परंतु त्या दरम्यान युद्धासंबंधी हरएक प्रकारचें काम बंद राहिलेंच पाहिजे ' असें वूड यानें अब्राहाम यास आग्रहपूर्वक कळविलें. यासंबंधांत अब्राहाम यानें वुड यास फक्त एकच वाक्यांत उत्तर दिलें कीं " बंडखोर लोक तह करणार आहेत अशा केवळ पोकळ अश्वासनावर भरंवसा ठेऊन युद्धाचें काम बंद ठेविण्याची ही वेळ नव्हे. प्रजापक्षी लोकही तह व्हावा अशासाठीं पुष्कळ झटत होते. ' आतां वैमनस्य वाढवूं नये, तें बंद करावें, ' असा मला ते एक सारखा आग्रहही करीत होते; परंतु सर्व युद्ध संपत आलें तरी त्यांचा आपला तो क्रम चालू होता."

काँग्रेसच्या सभासदांत द्वैत उत्पन्न होऊन तड पडले. मंत्रिसभेच्या सभासदांतही बरेंच द्वैत माजलें होतें. देशांतल्या वर्तमानपत्रांचे चालक राजनिष्ठ होते खरे, परंतु त्यावेळीं त्यांनीं राज्यकारभाराविरुद्ध अतिशय गर्वोक्तीनें टीका करण्यास प्रारंभ केला होता. परकीय राष्ट्रांच्या मध्यस्थीपणानें काम चांगलें होईल असेंही मि. ग्रीले यानें प्रतिपादन केलें आणि अध्यक्षाशीं खानगी रितीनें संभाषण करितानां त्यानें कळविलें कीं चेस हा माझ्या लोभांतला मोठा मुत्सद्दी सेक्रटरी असून त्यास पोटोमॅकच्या सैन्याचा अधिकार सोंपला नव्हता, ही

मोठ्या खेदाची गोष्ट होय. त्या सैन्यांतील बहुतेक लोक अगदीं असंतुष्ट होते. जनरल हूकर यानें बर्नसाइड यास खाटीक म्हणून त्याचा उघड रितीनें चार चौघांत उपहास केला. सैन्यांतील कित्येक मंडळी असें म्हणूं लागली कीं स्वदेशाच्या बचावार्थ एका चांगल्या पुढारी शूर योध्याची फारच आवश्यकता आहे. सैन्यांतील एका वृद्ध अंमलदारानें कांहीं कुत्सित शब्द उघड रितीनें बोलून दाखविल्या वरून त्याच्यावर फौजदारी अदालतींत खटला झाला होता. अशा बलबलपुरीच्या व उद्वेगजनक स्थितींत फक्त एक अब्राहाम मात्र स्वस्थ बसला होता; युद्ध चालविण्याचे त्याचे प्रयत्न अव्याहत चालू होते. कित्येक प्रसंगीं त्यास अपयश ही आलें तरी त्यानें आपली हिंमत मुळींच खचूं दिली नाहीं. एखाद्या निकट ऋणानुबंधी मित्रानें त्याला मोठ्या उत्सुकतेनें विचारावें कीं ' कां अध्यक्ष महाराज, युद्धाच्या संबंधांत कसें काय चाललें आहे? तेव्हां त्यानें मोठ्या समाधान वृत्तीनें उत्तर द्यावें कीं ' होय ! युद्धाचें काम मी मोठ्या हुशारीनें चालविलें आहे ? " चहूंकडून आशा सुटली होती तरी त्यानें सहनशीलता कायम ठेऊन सुदैवानें यश मिळविलें व कालेंकरून सर्व युद्ध प्रकरण संपल्यानंतर त्याचें अभिनंदन एका स्नेह्यानें मोठ्या कौतुकानें केलें त्यावेळीं तो ह्मणाला ' तेथें आणखी कांहीं करणें बाकी होतें असें मला वाटत नाहीं.'

इ. स. १८६३ च्या जानेवारीच्या २६ व्या तारिखेस अब्राहाम यानें जनरल हूकर यास एक खुबीदार व लाक्षणिक पत्र लिहिलें तें येणेंप्रमाणें:—

मु. वॉशिंग्टन्, राजवाडा,
काम करण्याची कचेरी,
जानेवारी ता. २६ सन १८६३.

मेजर जनरल हूकर यांसी,

जनरल साहेब! पोटोमॅक्च्या सैन्याचा सर्व अधिकार मी आपणास सोंपलाच आहे. असें करण्याबद्दल, अर्थात् योग्य कारणें आहेतच, परंतु मी आपणास मोकळ्या मनानें कळवितों कीं आपणाविषयीं मला कांहीं कांहीं बाबतींत मात्र संतोष वाटला नाहीं; आपण एक मोठे चतुर आणि शूर योद्धे आहांत अशाबद्दल खरोखरच माझी संपूर्ण खात्री झाली आहे व त्यामुळें माझी तुमच्या संबंधांत मोठी पूज्यबुद्धि आहे हें निर्विवाद होय. आपण राजनीतिच्या कामाशीं स्वतःच्या खानगी व्यवसायाच्या कामांचा अगदीं संबंध ठेवित नाहीं असें मला वाटतें, आणि ही तुमची पद्धत योग्य आहे अशी माझी खास समजूत आहे. तुम्ही आत्मप्रत्ययी आहांतच ह्मणजे तुम्हीं जें जें मनांत धारितां त्याबद्दल तुमची नेहमीं संपूर्ण खात्री असते व त्यासंबंधी तुमचे साशंकवृत्ति मुळींच नसतें, आणि खरोखर मनुष्यानें

( आत्मप्रत्ययी असणें ) हा सद्गुण कायम ठेविलास तर त्याच्या सद्गुणाला मोलच नाहीं असें माझें स्वतःचें मत आहे. तुम्ही महत्वाकांक्षी आहांत व ही महत्वाकांक्षा मर्यादित असली ह्मणजे त्यापासून फायदाच होईल, नुकसान कधींही होणार नाहीं; परंतु मला वाटतें कीं, जनरल बर्न्साइड् याची सत्ता लष्करांत चालू असतांना तुम्ही आपल्या महत्वाकांक्षेस कांहींशी विशेष गति दिल्यामुळें, जनरल बर्न्साइड् यास मोठी दहशत पडली; तात्पर्य इतकेंच कीं, यामुळें सद्गुणी, अब्रुदार आणि आपल्यास केवळ बंधूप्रमाणें मानणाऱ्या एका मोठ्या लष्करी अमलदाराचें तुम्ही मन दुखविलें आणि शिवाय स्वदेशाचें नुकसान करून घेतलें हें निराळें. मी नुकतेंच असें ऐकिलें कीं, राजकीय आणि फौजेच्या कामासाठीं एक चांगला अधिकारी असावा असें तुमचें म्हणणें आहे, ह्या तुमच्या म्हणण्याप्रमाणें मलाही वाटतें व म्हणूनच तुम्हांस संपूर्ण हुकमत दिली आहे. फक्त जे जनरल यशस्वी होतील तेच चांगले अधिकारी होऊं शकतील; या साठीं माझें तुह्मास निक्षून सांगणें इतकेंच आहे कीं तुम्ही युद्धांत विजयी होऊन यावें म्हणजे तुम्हास चांगले अधिकाऱ्याचे जागीं नेमण्याची सर्व जबाबदारी मी आपले डोक्यावर पत्करतों; फौजेवर सत्ता चालविणाऱ्या सर्व अमलदारांस सरकारानें आजपावेतों चांगली मदत केली आहे व करतील व त्याच प्रमाणें सरकार तुम्हासही या कामीं संपूर्ण मदत करतील, अशी माझी बालं-

बाल खात्री आहे. सैन्यांतील लोकांनीं आपल्या उपरी अंमलदारांवर टीका करावी आणि त्यामुळें अंमलदारांच्या अविश्वासास पात्र व्हावें असा जो कित्ता तुम्ही सैन्यांतील लोकांस घालून दिला आहे, त्यामुळें तुमच्या तंगड्या आतां तुमच्याच गळ्यांत येतील कीं काय याचीच मला मोठी भीति पडली आहे; आणि असें झालें म्हणजे गुरूची विद्या गुरूलाच फळली म्हणावयाची अथवा तुम्ही त्यांना दिलेल्या मंत्राचा प्रयोग ते तुम्हावरच करणार. असो, अशी वेळ जर कदाचित् आलीच तर या कामीं मी तुम्हास वाटेल तशी मदत करण्यास मुळींच मागें पुढें पाहणार नाहीं ही मात्र खातरी असावी. सैन्यांत वरील प्रकार चालू असला तर त्यापासून चांगला परिणाम कधींच निष्पन्न होणार नाहीं. आतां तुम्ही हूडपणा, अविचार आणि घाई या तिहींवर पाणी सोडा व सावध व्हा आणि आपलें शौर्य व उत्साह जागृत ठेऊन व पुढें सरसावून पदोपदीं विजय प्राप्ति होईल असें करा.

आपला.

अ. लिंकन.

सदरील बंधुप्रेमानें लिहून पाठविलेल्या पत्राची योग्यता जेव्हां पत्र वाचणारानें जाणली त्यावेळीं तें प्रसंगोचित् असून त्यांत लिहिलेल्या मजकुरास मुख्यत्वेंकरून तो पात्र असेल असें त्याला वाटलें नाहीं. चान्सेलर्सविली येथील लढाईच्या

पूर्वी जेव्हां अब्राहाम हा स्वतःच्या खास मित्रमंडळीसह पोटोमॅक्च्या लष्करी छावणींत आला त्यावेळीं जनरल हूकर यानें मध्यरात्रींच्या सुमारास स्वतःचे खास तंबूत एकांतीं आपल्या मंडळी पैकीं एकास म्हटलें ' मला वाटतें अब्राहाम यानें मला लिहिलेलें पत्र अथवा त्याची नकल तुम्ही वाचली असेल;' होय वाचली' असें उत्तर त्या इसमाकडून लागलींच मिळालें. नंतर हूकर यानें आपल्या नेहमीच्या ऐटींत म्हटलें 'मी आतां रिचमंडास गेलों म्हणजे हें पत्र वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करणार आहे, म्हणजे मोठी गंमत उडेल, ' हें जेव्हां अब्राहाम यास समजलें तेव्हां तो मोठा दुःखी होऊन म्हणालाः—'हूकर हा अगदींच कोडगा आहे, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें'.

पोटोमॅक्चें सैन्य तावडतोब चाल करून जाण्यास तयार असल्याबद्दल अध्यक्षास हकिगत कळली. लष्करी लोकांचे पट तपासतां अध्यक्षास असें कळून आलें कीं ' २१६७१८ लोक कामावर रुजू असून त्यांत १६००० लोक निरनिराळ्या ठिकाणीं नोकरीवर पाठविले होते. १३६७२० लोक चालू कामावर रुजू असून १७७१ हुकुमाशिवाय गैर हाजर होते. २६००० आजारी असून १४६८०० मात्र अगदी जय्यत व युद्धाच्या कामीं तावडतोब उपयोगांत येण्याजोगे होते. बाहेरच्या इतर छावणींतून आणखी लष्करी लोक मागविले तर वरील १४६०८०

च्या संख्येंत भरपडून ती १६९००० पावेतों सहज वाढवितां येईल.' याप्रमाणें अध्यक्षानें एक आठवड्यांत पोटोमॅक्च्या सैन्याचें सर्व फेरतपासणीचें काम संपूर्ण केलें. ही फेरतपासणी चालू असतांना अध्यक्ष, त्याचा सर्वांत लहान मुलगा टॉड आणि जनरल हूकर असे त्रिवर्ग घोड्यावर बसून चहूकडे फिरत असत. टॉडच्या तैनातींत एक खानगी स्वतंत्र घोडेस्वार दिला होता. टॉड यास घोड्यावर उत्तम बसतां येत असून तो शीघ्र गतीनें घोडा चालवीत असे. आपला मुलगा अगदीं निर्भयपणें घोड्यावर बसून मोठ्या वेगानें चालला आहे हें वरचेवर मोठ्या उत्साहानें अब्राहाम पाहत असून त्याला मोठा संतोष वाटत होता.

चान्सेलर्सविलीच्या लढाईमुळें अब्राहाम याजवर मोठें संकट ओढवलें आणि त्यामुळें तो अगदीं त्रासून गेला होता. कांहीं वेळपावेतों सैन्यांतील कामाची व्यवस्था साधारणपणें बरी चालली होती, परंतु ठरलेल्या जागीं सैन्य येऊन पोंहचतांच मोहिमेचें स्वरूप अगदींच बदलून जाऊन कांहींएक निष्पन्न झालें नाहीं. सैन्यास मागें हटणें भाग पडलें व त्यामुळें मोहिमेचें सर्व काम संपल्याप्रमाणेंच झालें. लष्करी लोक मागें हटल्यानंतर रॅपहॅनॉक्च्या उत्तर किनाऱ्याकडे परत जाण्यास त्यांना बराच विलंब झाला. वॉशिंग्टन् येथें कांहींएक बातमी समजली नव्हती आणि ओढवलेल्या संकटाचें निवारण जनरल हूकर याजकडून खातरीनें

होईल अशी सर्वत्रांस मोठी आशा होती, त्यांत अब्राहाम याची तर त्याबद्दल विशेष खातरी होती; परंतु मे महिन्याच्या ६ व्या तारिखेस हूकर याच्या तुकडीपैकीं जनरल बटरफिल्ड याजकडून ' पोटोमॅक्चें सैन्य रॅपॅहॅनॉक् नदी सुरक्षितपणें पुनः उतरून पूर्वस्थळीं येऊन पोंहचलें,' असें लिहून आल्यामुळें त्यास अतिशय वाईट वाटलें व तो अगदीं निराश झाला.

त्यानंतर एक तासाचे आंत एकाएकीं मोठा सोसाट्याचा वारा सुटून भयंकर मेघगर्जना आणि पावसाची मुसळधार चालू झाली. येवढें मोठें तुफान चालू होतें तरीपण अब्राहाम यानें वॉशिंग्टनच्या आरमारापैकीं एक लहानशी आगबोट घेऊन जनरल हॅलॅक् याच्यासहित ऍक्वियाक्रीकच्या मार्गानें सैन्याकडील रस्ता धरिला. राजधानींत चहूंकडे विलक्षण कंड्या पिकल्या होत्या. कोणी म्हणे फौजखात्याच्या सेक्रेटरीनें राजीनामा दिला आणि अध्यक्ष हा हॅलेक् यास बरोबर घेऊन सैन्याचें अधिपत्य त्यास सोंपण्याच्या हेतूनें सैन्याकडे रवाना झाला. वास्तविक पाहिलें तर यापैकीं कांहीं एक खरें नव्हतेंच. पोटोमॅक्च्या सैन्याची जरी अशी अव्यवस्था झाली होती आणि त्यापैकीं कित्येक लोक घायाळ होऊन पडले होते तरीपण त्यांत जास्त लष्करी लोकांची भर न घालितां तशाच स्थितींत पुनः एकदां युद्ध चालू करावें असें अध्यक्षाचें मनानें घेतलें. त्यावेळीं राष्ट्रीय सरकारास खर्च अति-

शय झाला होता; त्यांत सुमारें दहा हजार लोक बळी पडल्यामुळें सर्व राजनिष्ठ लोक असंतुष्ट झाले असून त्यांच्या मनाचा अगदीं हिरमोड झाला होता. प्रत्येक लष्करी छावणींतील लोकांच्या मुखावर टवटवी मुळींच दिसत नसून ती म्लान आणि उदास झालेलीं दिसत होतीं; द्रव्यहानि आणि मनुष्यहानि या दोन्हींमुळें लोक अगदीं गांगरून जाऊन नाउमेद झाले होते. लढाईचे कामीं द्रव्यबळ आणि मनुष्यबळ ह्या दोन गोष्टी प्राधान्य असून दोहींची उणीव दिसूं लागल्यामुळें सर्व लोकांच्या तोंडचें पाणी पळालें होतें.

संयुक्त संस्थानांतून जेवढें उपयोगी सैन्य मिळूं शकेल तेवढें एकत्र जमविण्याची हल्लीं फारच अवश्यकता होती. ह्या- साठीं कायद्याचा एक मसुदा तयार झाला परंतु कॉंग्रेसमध्यें असलेले प्रजापक्षी लोक त्या मसुद्याच्या अगदीं विरुद्ध होते. ' हॅबियस्कॉर्पस्‌च्या कायद्याला अनुसरून झालेल्या सनदेंत नमूद केलेले हक्क अध्यक्षानें कांहीं दिवस बंद केले होते. सदर कायद्याअन्वयें ज्या नागरिक लोकांचें स्वातंत्र्य नष्ट झालें असेल त्यांस वरिष्ट न्यायकचेरींत त्या संबंधांत विवाद रुजू करून दाद मागतां येत असे. अध्यक्षानें लष्करी कायदा अमलांत आणण्याबद्दल त्याचवेळीं जाहीर केलें. या लष्करी कायद्याच्या आधारानें संयुक्त संस्थानांची अब्रू, मोठेपणा, आणि शांतता यांचें विरुद्ध

वर्तन करणारास गुन्हेगार समजून त्याजवर खटला होत असे व अशा रितीनें शिक्षा झालेल्या अपराध्यानें विवादाच्या मार्गानें राजदरबारीं दाद मागितल्यास ती ऐकत असत. लोकांत त्यावेळीं वरील दोन्ही कायद्यासंबंधांत अतिशय चर्चा चालू झाली, परंतु संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष या नात्यानें फौजखात्याचे जे अधिकार अब्राहाम लिंकन यास मिळाले होते त्याअन्वयें व राजनीतीच्या तत्वाला अनुसरून वरील दोन्हीही कायदे अगदीं रास्त आहेत असें ठरलें होतें. कायद्याचे मसुद्यांत ठरल्या प्रमाणें लष्करांत भरती करण्याचें काम व्हावयाचें होतें. सरकारी कामा काजांत ढवळाढवळ करणारे व कायद्याचे मसुद्यास अडथळा आणणारे राजद्रोही आणि इतर प्रकारचा उपद्रव करणारावर लष्करी कायद्या अन्वयें काम चालवून त्यांना शिक्षा करण्याचें ठरलें होतें. हॅबियस्‌कॉर्पस् आक्टा अन्वयें लोकांचे हक्क बंद केले असल्यामुळें वरील लष्करी कायद्याचा अंमल करण्यास कोणतीच हरकत नव्हती. कॉंग्रेसच्या हुकुमा अन्वयें बंडखोरांची मिळकत फरोक्त करण्याचें ठरलें असल्यानें बंडखोरांचे हातपाय गळल्या सारखे झाले असून सरहद्दीवरील त्यांच्या शुभ चिंतकावरही उत्तम दाब राहिला होता. सिद्दी लोकांस लष्करी शिपाई करण्यासंबंधी आणखी एक महत्वाचा कायदा अमलांत येण्याचें ठरलें होतें. जेवढे लोक या युद्धाच्या विरुद्ध होते तेवढे सर्व कायद्याच्या अंमलबजावणीच्याही

विरुद्ध होते. बंधमुक्त झालेल्या गुलामांस संयुक्त संस्थानांतल्या लष्करी लोकांप्रमाणें एकाच जातीचा ठरीव पोशाख व शस्त्रें देऊन युद्धासाठीं तयार करण्याचें ठरलें होतें; या संबंधी उत्तर व दक्षिणेकडील लोक बाह्यात्कारें अभिनंदन करीत होते, परंतु अंतर्यामीं त्यांचा कोपाग्नि इतका भडकला होता कीं ते संयुक्त संस्थानांतील लोकांस शिव्याश्राप देऊन त्यांना उद्देशून कडकडून बोटें मोडीत असत. पुढें जेव्हां असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं काळे सिद्दी लोक जरी अशिक्षित ठरले होते तरीपण शस्त्रें हातांत धरून युद्ध करण्याचे कामीं गोऱ्या लोकांप्रमाणें त्यांची लायकी होती, तेव्हां सिद्दी लोकांस लढाईच्या कामीं उपयोगांत न आणण्या संबंधी जी एक सारखी ओरड चालू झाली होती ती अगदीं नाहींशी झाली, आणि काळ्या सिद्दी लोकांची संख्या लष्करांतल्या हाजरी पटावर १७८९७५ होती असें स्पष्ट कळलें.

कॉंग्रेसनें जे नियम केले होते त्यांतील एका कलमान्वयें तिजोरी कडील सेक्रेटरीस युद्धासाठीं पैसे कर्जाऊ काढण्याचा अधिकार मिळाला असून नऊ कोट डॉलर कर्ज काढण्याची तजवीज त्यानें चालविली होती. लष्करी शिपाई, खलाशी वगैरे लोकांच्या बऱ्याच बाकया देणें चढल्यामुळें निदान तेवढी वेळ मारून नेण्यापुरती म्हणजे एक कोट डॉलर्सच्या संयुक्त

संस्थानाच्या तिजोरीच्या नोटा (हुंड्या) काढण्याची ताबडतोब व्यवस्था झाली. सदरहु नियमावर अध्यक्षानें आपली सही लागलीच करून कॉंग्रेसला लिहून कळविलें कीं 'राष्ट्रीय पेढ्या स्थापन कराव्या, संयुक्त संस्थानांतील नाण्याप्रमाणें तेथें नाणें चालू करावें आणि रकमा जमा करण्याची पद्धत चालू करवी;' मात्र कागदाच्या नोटा जास्त काढण्याची वेळ येणार हें पाहून लिंकन यास अतिशय दुःख झालें व तसें त्यानें कॉंग्रेसलाही लिहून कळविलें. राज्यांतल्या वसुला संबंधी अशा प्रकारच्या अध्यक्षाकडून आलेल्या उपयुक्त सुचना हिशेबी खात्याचे आणि मुलकी खात्याचे वसुलाचे अधिकारी वर्गास पसंत पडून त्यांनीं त्या सर्व सूचना विशेष लक्षांत घेतल्या. राज्यांतल्या वसुलाची स्थिति संतोषकारक नव्हती. अन्योन्य व्यवहारांत सोन्या रुप्याचा अगदीं अस्त झाला असून कोणास त्याचा विटाळही होत नव्हता असें दिसलें. किरकोळ पैशाच्या दररोजच्या व्यवहारांत सुद्धां कागदाच्या नोटा शिवाय इतर नाणीं दृष्टोत्पत्तीस येत नव्हतीं. प्रथम पोष्टाचीं तिकिटें किरकोळ नाण्याऐवजीं चालत होतीं, परंतु नंतर रक्कम लहान असो अगर मोठी असो, पैशाच्या ऐवजीं पोष्टाचीं तिकिटेंच सर्व ठिकाणीं चालू झालीं. तिजोरींतून पैशाच्या अंशा ऐवजीं कागदाचे तुकडे (नाण्या ऐवजीं) मिळत असत. जे लोक युद्धाच्या विरुद्ध होते ते राष्ट्राच्या नांवलौकिकाचें

वाटोळें करण्यास अगदीं टपून बसले होते; आणि 'कागदांचे तुकडे नाण्याऐवजीं देतात' असें म्हणून चार चौघांत निंदा व उपहास करणें आणि राष्ट्रीय सरकारावरील लोकांचा विश्वास ऊडून अश्रद्धा उत्पन्न होईल असे प्रयत्न करणें हे अशा विघ्नसंतोषी लोकांचे व्यवसाय होते.

देशांत हरएक प्रकारच्या वस्तूवर महागाईनें आपला अंमल इतका बसविला. कीं लोकांस चरितार्थ चालविण्याची मोठी मारामार पडूं लागली. इकडे राजकारस्थानी मंडळींनीं लोकांत असंतोष वाढविण्याचा क्रम चालविला होता आणि कोणत्याही संकटाची ते कल्पना करोत अगर ते प्रत्यक्ष येवो त्याला कारणीभूत चालू असलेलें युद्धच होय हा त्यांचा एक ठरीव सिद्धांत होता. लष्करी लोकांनीं आपल्या ऐवजीं दुसरीं माणसें आणून तीं लष्करांत रुजूं करणें अगर ३०० डॉलर दंड भरून लष्करांत या नोकरीस अखेरचा रामराम ठोकणें, अशा संबंधी अनुभव पाहण्यासाठीं जो कायदा अमलांत आणण्याचें घाटत होतें त्यामुळें जे पैशानें गब्बर होते त्यांना कांहींच अडचण नव्हती पण जे कफल्लक होते त्यांच्यावर मात्र जुलूम होत होता. हा गवगवा सर्व देशभर पसरत जाऊन जागोजागीं लोकांच्या सभा भरूं लागल्या व त्यांत राजद्रोहाची खलबतें चालू झाली. पश्चिमेकडील संस्थानांत गुप्तमंडळ्या एकत्र जमून कोणी राजसत्तेविरुद्ध मसलत करण्यांत

सामील होत आहे किंवा कसें याची गुप्त चौकशी होऊं लागली व जे अशा रितीनें सामील होण्यास तयार होत असत त्यांना योग्य उत्तेजन मिळूं लागलें. एकंदरींत कठीण प्रसंग पुन: येऊन ठेपला असून ' हा राजद्रोही आहे किंवा राजनिष्ठ आहे ' अशाबद्दल लोक आपआपसांत शंका घेऊं लागले.

युद्धाच्या विरुद्ध जे लोक होते त्यापैकीं क्लेमंट एल. वॉलन् डिगहॅम हा एक इसम असून तो ओहिओहून प्रतिनिधी या नात्यानें कॉंग्रेसमध्यें आला होता. कॉंग्रेसच्या बैठकींत अध्यक्षास योग्य वेळीं चालू युद्धाचे कामीं उत्तम मदत करण्यासाठीं जी वाटाघाट चालली होती त्या विरुद्ध वॉलन् डिंगहॅम हा भाषणें करीत होता; व त्यामुळें लोकांत अतिशय असंतोष वाढला. त्याचा मुख्य हेतू राष्ट्रीय सरकारचें बळ कमी करण्याविषयीं असून व ' राष्ट्रीय सरकारचे सर्व करणें गैर आहे ' असा सर्वांस उपदेश करून तो लोकांचीं मनें दूषित करीत होता.

संयुक्त संस्थानांतील लष्कराचा जनरल बर्डसाइड् (ओहिओ-संस्थानावरही याचीच देखरेख होती.) यानें असा एक हुकूम काढून जाहिरात दिली कीं ' लष्करापैकीं कोणीही प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रितीनें शत्रूला मदत करितांना आढळल्यास त्या

राजद्रोही आणि गुप्त हेर समजून त्याच्यावर अदालतींत काम चालेल व गुन्हा शाबीत झाल्यास त्यास देहान्त शासन होईल. व्हॉलन् डिगहॅम यानें सदर जाहिराती विरुद्ध मोठ्या आवेशानें भाषण करून त्यांत सदरहु हुकुमाचा अंमल न करण्याबद्दल लोकांस उत्तेजन दिलें; त्यावरून त्याचवर फौजदारींत खटला होऊन गुन्हा शाबीत झाला आणि जनरल बर्नसाइड् यानें ठरविल्या-प्रमाणें संयुक्त संस्थानाच्या हद्दींतील बोस्टन बंदरावरील वॉरन किल्ल्यांत त्यांस कैद केलें.

हें जुलूमी कृत्य असून अब्रूस काळिमा आणणारें आहे अशी लोकांनीं ओरड करून अध्यक्षाच्या भोंवतीं गराडा घातला; यामुळें सर्व देशभर मोठी चळवळ चालू होऊन जागजागीं सभा भरूं लागल्या होत्या. अध्यक्षानें त्यास झालेली शिक्षा फिरवून त्याला हद्दपार करण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें त्यास संयुक्त संस्थानाच्या हद्दीबाहेर बंडखोरांच्या संस्थानांत हांकून काढिलें. जातांना त्याचे बरोबर एक पहारा दिला होता. बंडखोरांपैकीं त्याच्या मित्रमंडळीनें त्याचा मोठा सत्कार करून सर्व जागीं फिरण्याबद्दल त्यास मोकळीक दिली आणि त्याप्रमाणें तो कानडा येथें जाऊन प्रगट झाला. कानडा हं संस्थान त्यावेळीं सर्व प्रकारच्या परागंदा झालेल्या लोकांस आश्रय मिळण्याचें ठिकाण ठरलें होतें.

वॉलंडिगहॅम् यास हद्दपार करण्याचे विरुद्ध गावांत आणि शहरांत पुष्कळ सभा भरत होत्या. ओहिओ येथील प्रजासत्ताक लोकांनीं वॉलंडिगहॅम् याची त्या संस्थानाच्या गव्हर्नराच्या जागीं नेमणूक करून त्यास पुनः बोलविण्या संबंधी अध्यक्षाकडे मागणी केली. या मागणीस लिंकन (अध्यक्ष) याजकडून प्रत्युत्तर मिळालें तें येणें प्रमाणें:— 'कायद्याचा मसुदा अमलांत येण्याचे कामीं तुम्हीं अडथळा केलात त्यामुळें, आणि अशाच इतर बाबतीमुळें त्यास हद्दपार करण्यास तुम्हीच कारणीभूत आहात; कारण तुमच्या अशा वर्तनामुळेंच लोक आडमार्गास जाण्यास प्रवृत्त झाले व होतात, या साठीं कायद्याच्या अमल बजावणीचे कामीं आणि अशाच सर्व प्रकारच्या कामांत योग्य मदत देण्यास तुम्ही लोकांस चांगका कित्ता घालून दिला पाहिजे; वॉलंडिगहॅम् यास जें हद्दपार केलें आहे तें त्याच्या अशा वर्तनामुळेंच केलें. त्यास मुद्दाम शिक्षा करण्याचा माझा मानस मुळींच नव्हता. वास्तविक पाहिलें तर जनरल बर्न्साइड् यानें त्याला कैदेतच ठेविण्याचें ठरविलें होतें, परंतु त्याला मुद्दाम शिक्षा द्यावी असा माझा हेतूच नसल्या मुळें मी तो हुकूम फिरवून त्यास हद्दपार करण्याचें ठरविलें. वॉलंडिगहॅम् हा राज्यकारभारांत कांहीं ढवळाढवळ करीत नव्हता; परंतु त्याच्या अशा वर्तनानें सैन्यांत अव्यवस्था मात्र दिसूं लागली आणि

ज्या अर्थी सैन्याच्या चांगल्या व्यवस्थेवरच राष्ट्राचें हित अवलंबून असतें त्याअर्थीं हें त्याचें करणें अगदींच अप्रशस्त दिसल्याकारणानें तसा प्रसंग त्याच्यावर आला. एका सरळ मनाच्या लष्करी शिपायाचे मुलास, एक दुसरा मनुष्य संयुक्त संस्थानांतून निघून जाण्यास उत्तेजन देत आहे आणि त्यामुळेंच तो मुलगा राष्ट्र सोडून जाण्यास प्रवृत्त झाला आहे, अशा स्थितींत मी त्या मुलावर गोळी घालावी, किंवा त्याला जो उत्तेजन देत होता त्यावर गोळी घालावी? मला तर या बाबतींत असें वाटतें कीं उत्तेजन देणारांचेंच तोंड बंद करून त्या मुलांस वांचवावें व हेंच खऱ्या राजनितिज्ञास आणि दयार्द्र अंतःकरणाच्या मनुष्यास उचित दिसेल.

कालेंकरून वॉलंडिग्हॅम् हा गुप्त रितिनें संयुक्त संस्थानाच्या हद्दींत आला आणि पुनः आपल्यावर खटला होईल कीं काय या भितीमुळें तो गुप्त रितीनें विलक्षण प्रकारची पूसतपास करूं लागला, परंतु लोकमताची स्थिति त्यावेळीं चहुंकडे विशेष समाधानकारक असल्यामुळें त्याचें हातून कांहींएक कमी जास्तीं होऊं शकलें नाहीं; शिवाय ओहिओ येथील त्याच्या अनुयायी मंडळीच्या पक्षास उतरतीकळा लागली असून लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाची चांगली सरशी होती व तो अगदीं निर्बल झाल्याकारणानें त्याजकडे सरकारानें ही अगदीं दुर्लक्ष केलें होतें.

इ. स. १८६३ च्या जुलई महिन्यांत बंडखोरांची दैवगती फिरण्यास प्रारंभ झाला; त्या महिन्यांत विक्सबर्ग हस्तगत झाल्यामुळें मिसिसिपी नदींतला मार्ग मोकळा झाला. गेटिसबर्ग येथील लढाईच्याच महिन्यांत होऊन बंडखोर लोक अतिशय कावरेबावरे झाले, व उत्तरेकडे अखेरची चाल करून जाण्याचा त्यांचा बेत फसल्या कारणानें सर्व रितीनें त्यांची अगदीं निराशा झाली.

इ. स. १८६२ च्या अखेरीस जनरल ग्रांट याजकडे संयुक्त संस्थानांतल्या सर्व राजनिष्ट व रणाग्रणी मंडळीचे एक सारखें लक्ष लागलें होतें, कारण सर्व देशभक्तांची अशी संपूर्ण खात्री होती कीं जनरल ग्रांट हा चांगलाच उदयाला येईल व त्यामुळें संयुक्त संस्थानाच्या सैन्यास जयप्राप्ति होईल; परंतु यावेळीं मानहानि जणूं काय त्याची कसोटी पाहण्यास त्याचे पुढें हात जोडून उभीच होती, कारण कीं बरेच लोक त्याचे नांवानें खडे फोडीत असून त्याची पदोपदीं मानखंडना करूं लागले होते; इ. स. १८६३ च्या फेब्रुवारी महिन्यांत विक्सबर्ग शहर ताब्यांत घेण्याच्या हेतूनें जनरल ग्रांट हा पुढें सरकला व त्यावेळीं तो जरी निरुत्साही दिसत होता तरी त्यानें संयुक्त संस्थानाच्या बलाढ्य आरमाराच्या सहायानें बंडखोरांच्या आरमारांचा विध्वंस करून टाकला

आणि ता. ४ जुलई रोजीं विक्स्बर्ग् शहरावर संयुक्त संस्थानाची संपूर्ण सत्ता स्थापन केली. यांत ६०००० मनुष्यांस पुरेल इतकी युद्ध सामुग्री त्याला सांपडून लष्कर ही बरेंच याच्या ताब्यांत आलें. या जय प्राप्तिमुळें देशांतील बरेच लोक अगदीं थक्क होऊन गेले, आणि बंडखोरांचें जें एक जूट होतें त्याचीं दुफळी झाली.

विक्स्बर्ग् यास पश्चिमे कडील आंजिक्य किल्ला असें ह्मणत असत, हें बिकट व आंजिक्य शहर संयुक्त संस्थानाच्या हातांत सांपडल्यमुळें उत्तरे कडील राजनिष्ट लोकांच्या हर्षाच्या लहरी वेगानें उसळूं लागल्या. विक्स्बर्ग् ताब्यांत आसल्यामुळें सर्व लोकांस आतां असें वाटूं लागले कीं युद्धाचा शेवट लौकर लागेल, आणि त्या प्रीत्यर्थ लोकांनीं परस्पराचें मोठ्या प्रेमानें अभिनंदन केलें. जनरल ग्रांट यानें आपलें कर्तव्य यथायोग्य बजाविलें म्हणून त्या संबंधांत अध्यक्षानें त्यास प्रेमानें एक पत्र लिहिलें तें येणें प्रमाणें: —

प्रिय जनरल साहेब यांसी:—तुमची व माझी समक्ष भेट होण्याचा योग कधीं आला असेल असें मला स्मरत नाहीं. तुम्हीं देशसेवा करून आपलें कर्तव्य थयोचित् बजाविल्यामुळें मी तुमचा अत्यंत ऋणी आहे व याबद्दल तुमचें अभिनंदन कर-

ण्या साठीं हें मी आज तुम्हास मुद्दाम लिहित आहे; शिवाय थोडें. विशेष लिहिण्याची माझी इच्छा आहे तें हें कीं, विक्सबर्ग शहरा जवळ जेव्हां प्रथम तुम्ही येऊन पोहचला त्यावेळीं माझ्या मनांत अमुक एक योजना तुम्ही केली पाहिजे असें आलें व शेवटीं त्याच प्रमाणें तुम्ही अगदीं केलेंत; तुम्ही जेव्हां एकदम कूच करून पोर्टगिब्सन्, ग्रांडगल्फ् वगैरे हस्तगत केलें त्या वेळीं मला असें वाटलें कीं तुम्ही नदीकडे जाऊन जनरल बँक्स यास मिळावें आणि जेव्हां तुम्ही आपला मोर्चा उत्तरेकडे फिरविला तेव्हां मला वाटलें कीं ही तुम्ही मोठी चूक केली, परंतु हल्लीं मी मोठ्या खुशीनें कबूल करितों कीं तो माझा विचार चुकीचा असून तुम्ही केलें तेंच यथायोग्य होय.

ज. ली याचा प्रयत्न लढाई चालूच ठेविण्याचा असल्यामुळें गेटीसबर्ग् येथें मोठा रणसंग्राम झाला. रॅपहॅनॉक् नदी ओलांडून आणि अलिघनी पर्वताच्या पूर्वेकडून गोळा करवेल तेवढें लष्कर एकत्र जमवून बंडखोरांचा मुख्य वॉशिंगटन्च्या पश्चिमेस रवाना झाला व पोटोमॅक्च्या पलिकडील किनाऱ्याचे भागांत लष्करी तुकड्या हल्ले करण्यासाठीं पाठऊं लागला; त्यानें मेरिलँड् पैकीं डॅन्सविली येथें प्रथम प्रवेश केला. कित्येक लष्करी लोकांच्या तुकड्यांनीं पेन्सिल्व्हेनियावर चाल केली. बाल्टिमोरच्या उत्तर व पश्चिम दिशेकडील व्यवहार अगदीं

तोडून टाकून फिलाडेल्फियाजवळ कोठें तरी शत्रुशीं भयंकर सामना करावा, असा **ली** यानें उघडपणें आपला हेतू प्रदर्शित केला होता. जून महिन्याच्या २७ व्या तारखेस बंडखोरांचा जनरल इवेल हा एका लष्करी तुकडीनिशीं **कार्लाइल्** पावेतों येऊन पोंहचला आणि त्याचे वातमदार **हॅरिस्बर्ग्** राजधानींत टेहलत होतेच त्यामुळें तेथील लोकांनींही हल्ला करण्याची तयारी केली; जनरल **ली** याचे घाट, **हूकर** यास कळले नसल्यामुळें **वॉ-शिंग्टन्** येथील सत्ताधीशांचें पित्त खवळून जाऊन त्यांनीं **हूक-रचे** जागीं **पोटोमॅकच्या** सैन्याचा अधिकार जनरल **जॉर्ज जी. मीड** यास सोंपला. **मीड** याची योजना अशी होती कीं **सस्की-हाना** ओलांडतांना बंडखोरांच्या लष्करास अडथळा करून **बा-ल्टिमोर** येथें शत्रूस गांठावें; या योजनेला अनुसरून त्यानें उ-त्तरेकडे **सस्कीहाना** व दक्षिणेकडे **पोटोमॅक्ची** खिंड आपले ताब्यांत राहील अशी सैन्याची सर्व व्यवस्था उत्तम ठेविली होती; परंतु त्याला असें आढळून आलें कीं आपण हल्लीं आहोंत त्याचे पश्चिमेस आणि उत्तरेस **गेटिस्बर्ग्** येथें बंडखोरां-चें लष्कर एकत्र जमून राहिलें आहे.

ज्या जागीं बंडखोरांचें लष्कर एकत्र जमून राहिलें तीच जागा जनरल **मीड** यानें आपल्या सैन्यासाठीं खास योजून ठे-विली होती. **मीड** यानें आपलें सैन्य त्याच जागीं एकत्र करण्याचा

प्रयत्न केल्यानें परस्परांत सामना होण्याचा पुष्कळ संभव होता. त्या गांवाच्या पश्चिमेस विलोबीरन आणि पूर्व बाजूस रॉक्क्रीक असे दोन झरे वाहत असून त्या दरम्यान रणभूमिची योजना झाली होती. शहराच्या वायव्य दिशेस ओकहिल, सेमिनरी हिल. वगैरे लहान लहान टेंकड्या असून उत्तर व दक्षिणे कडे पसरलेल्या सेमिनरीहिलकडे लढाई होण्याचा संभव दिसत होता. आग्नेयी कोनास सेमिटरी हिल, राउंडटॉप वगैरे लहानशी पर्वतांची रांग असून थेट पूर्वेकडेस व दक्षिणेस कल्पहिल व पावर्सहिल अशा पर्वतांच्या दोन रांगा होत्या.

वर लहान लहान पर्वतांची जी रचना कळविली आहे, त्यामुळें सर्व मार्ग एककेंद्राभिमुख झाले असल्यानें उत्तर व पश्चिम या दोन्ही दिशेकडून लष्करी लोकांस कूच करण्यास चांगलें सोईवार झालें होतें. सदरहू दिशेकडूनच जनरल ली याचें सैन्य चाल करून येणार होतें व याच मार्गानें मेरिलँड आणि पेन्सिल्व्हेनिया या दोन्ही शहरांवर आपण सहज हल्ला करूं शकूं असें त्याचे मनानें घेतलें होतें. गांवास तीन फाटकें असून सात रस्ते गांवामधून जात होते. चाल करून जाणाऱ्या लष्कराच्या तीव्र गतीस अवरोध करण्यासाठीं कोणती तरी उत्तम योजना या जागीं करणें फारच अवश्यक होतें. जेथें बंडखोर लोक होते त्या देशांतील सांपत्तिक स्थिति चांगली

आहे असें पाहून आणि बऱ्याच लढाया झाल्यानें स्वतःच्या देशाची झालेली विपन्नावस्था लक्षांत आणून बंडखोर लोक तोंडांत बोट घालून अतिशय चकित झाले होते.

जुलई महिन्याच्या पहिल्या तारिखेस युद्धास प्रारंभ झाला; हें युद्धाचें संकट केवळ दैवयोगानेंच कोसळलें असून युद्धाच्या प्रारंभीच संयुक्त संस्थानाच्या सैन्याचा जनरल रे-नॉल्डस् हा रणांत ठार झाला. बंडखोरांचें सैन्य जरी पुष्कळ होते तरी त्यांच्या सैन्याचा जमाव अद्याप चांगला झाला नव्हता. दिवसभर तुमुलयुद्ध चालल्यानंतर बंडखोर लोक शत्रूला टक्कर देऊन वर कळविलेल्या पर्वतांच्या रांगेंतून आपला रस्ता काढीत होते. रात्र पडली तरी लढाईचा निकाल लागला नसून दुसऱ्या दिवशीं घोर संग्राम करण्याची कडेकोट सिद्धता झाल्याप्रमाणें भयंकर लढाई तर झालीच पण कोणत्याहि पक्षाची सरशी झाली नाहीं. संयुक्त संस्थानाचे सैन्याचा बराच नाश झाला. लढाईंत पडलेले, जखमी झालेले व कैद केलेले अशा लोकांची संख्या वीस हजारापेक्षां जास्त होती. दुसरे दिवशीं युद्ध चालू करावें किंवा कसें याबद्दल रात्रीं सभा भरून युद्धास प्रारंभ करण्याचें ठरलें. तारिख ३ जुलई रोजीं बंडखोरांस दुर्दैवानें मागें हटण्या-ची वेळ आली. या तीन दिवसांच्या युद्धांत जनरल मीड या-चेजवळ जय्यत फौज ८२ पासून ८४ हजार पावेतों असून

३०० लढाऊ तोफा होत्या, आणि जनरल ली याचे जवळ सैन्य ८० हजार पावेतों असून २५० तोफा होत्या. या युद्धांत उभय पक्षीं सारखीच हानि झाली; कित्येक रणांत पडले, कित्येक घायाळ झाले आणि कित्येकांचा पत्ता लागला नाहीं अशा एकंदर लोकांची संख्या ४६००० पावेतों होती. संयुक्त संस्थानाचे तीस जनरल कोठें गेले त्याचा मागमूस ही लागला नाहीं आणि सहा योद्धे रण देवतेस बळी पडले. बंडखोरांच्या सैन्यापैकीं १७ जनरलांचा पत्ता लागला नाहीं, ३ ठार झाले, १३ घायाळ झाले आणि एकास कैद केलें. या युद्धांत बंडखोरांच्या लष्करी लोकांनीं पोटॉमॅक् नदी ओलांडून पवबारा केला तेव्हां त्यांपैकीं कित्येक लोकांस संयुक्त संस्थानाच्या सैन्यानें वेढून टाकिलें.

जनरल मीड याचे सैन्यानें बंडखोरांच्या लष्करी लोकांभोंवतीं वेढा घातल्यामुळें, ते आतां पळून जाणें असंभवनीय आहे असें त्याला वाटलें होतें; या अवधींत त्यानें आठ दहा दिवस पावेतों आपल्या सैन्याची व्यवस्था करून तें पाहिल्या स्थितीवर आणिलें आणि पुनः शत्रूवर चाल करून जाण्याची त्यानें तयारी केली. लिंकन अतिशय उत्कंठित झाला असून आतां विलंब होतां कामा नये असें त्याला वाटलें होतें. जनरल ली याचीं काय काय धोरणें आहेत तीं जनरल हुकर यास न समजल्या कारणानेंच

त्याचे जागीं जनरल **मीड** याची **पोटोमॅक्**च्या सैन्याचा मुख्य आधिकारी ह्मणून नेमणूक झाली होती. उत्तर संस्थानाकडे जनरल **ली** यानें आपल्या सैन्याचा मोर्चा फिरविला. अशा प्रकारच्या अनेक कंड्या लागलींच ता ४ जून रोजीं सर्व **वॉ**शिंग्टन् शहरभर पसरल्या; **अब्राहाम** यास हें तात्काल समजलें, परंतु त्यांत मोठेसें नवल नव्हतें, कारण बंडखोर लोकांचा हल्ला येणार अशीच कल्पना सर्वत्रांची होणें अगदीं साहजिक होतें. **पो**टोमॅक् ओलांडून जनरल **ली** कोणत्या रितीनें पळून जावें याबद्दल साधनें शोधीत होता, परंतु जनरल **मीड** याचा असा उत्तम बंदोबस्त होता कीं ज. **ली** याच्या लष्करी लोकांपैकीं कोणीही पळून जाण्याच्या हेतूनें उठून उभा राहिला कीं जनरल **मीड** याजकडील लोकांनीं त्याला उचलून बगलेंत मारावें; तात्पर्य कोणासही निसटतां येइना; आणि **अब्राहाम** तर आतां विलंब न होऊं देण्याबद्दल आधिकाधिक उत्कंठित होऊं लागला. जनरल **ली** हा **पो**टोमॅक् उतरून जाऊं लागल्या बद्दलच्या खबरा **वॉ**शिंग्टन् येथें पोंहचतांच **अब्राहाम** याच्या हुकुमान्वयें **है**लेक् यानें जनरल **मीड** यास सदरील बातमी कळवून विशेष जागृत केलें; सावध राहण्याबद्दल अशा वरचेवर सुचना मिळाल्यामुळें जनरल **मीड** याचे मनाचा कांहींसा विरस झाला, कारण झालेल्या हुकमांत एकवेळ सर्व स्पष्ट लिहिल्याप्रमाणें ज्या त्या तुकड्यांचे अंमलदाररांस कळविलें असतां पुनः वरचेवर

अशा सुचना पाठविण्याचें कारण काय असें त्याला वाटलें; इतकेंही असून नावांच्या पुलाच्या सहायानें जनरल ली हा आपल्या सैन्यानिशीं सुरक्षितपणें उतरला व मेरिलँडच्या मार्गानें व्हर्जिनियांत त्यानें प्रवेश केला. इकडे पोटोमॅकचें सैन्य गजगतीनें येत होतें त्यास, जनरल ली यानें पिछाडी संभाळण्यासाठीं ठेविलेली एक लष्करी तुकडी हस्तगत करून घेण्यास चांगली संधी सांपडली, परंतु असा जरी प्रकार घडला तरी उत्तरेकडील राजनिष्ठ प्रजा आनंदात मग्न होती. व्हिक्स्बर्ग् हातांत आल्यानें बंडखोरांची मोठीच हानि झाली व आतां युद्धाचें सर्व प्रकरण संपलें असें त्यांना वाटलें होतें.

गेटिस्बर्गच्या लढाईंत विजय संपादन करून पोटोमॅकच्या सैन्यानें चांगला सन्मान मिळविल्याबद्दल संक्षिप्त रितीनें आणि मोठ्या आनंदानें संयुक्त संस्थानांतील सर्व लोकांस अब्राहाम लिंकन यानें ता ४ जुलई रोजीं जाहिर रितीनें कळविलें, व शेवटीं तो ह्मणाला कीं:—' माझी मनापासून अशी इच्छा आहे कीं परमेश्वराच्या इच्छेनुरूप सर्व गोष्टी घडतात त्या अर्थीं परमेश्वरानें आपणावर केलेली कृपा आपण ध्यानांत ठेऊन त्याचें भक्तिपूर्वक आभार मानावेत'. त्या दिवशीं सायंकाळीं अध्यक्षाचें योग्य अभिनंदन करण्याच्या हेतूनें लोकांचे थवेच्या थवे प्रसन्न चित्तानें व्हाइट् हौस राजवाड्याच्या समोर दिसत होते.

आनंद प्रदर्शनार्थ नाना प्रकारचीं स्वदेशभक्ति सूचक मंगलवाद्यें हीं राजवाड्या समोर वाजत होतीं. पुष्कळ दिवसपावेतों संयुक्त संस्थानाच्या लोकांनीं असा आनंदाचा दिवस पाहिला नव्हता म्हणून सर्वांनीं अशा प्रकारें आनंद प्रदर्शित करणें अगदीं स्वाभाविक होतें. व्हाइटहौस राजवाड्याच्या एका मोठ्या भव्य सुशोभित खिडकींत अध्यक्ष उभा राहिला व तेथून वेळेला अनुसरून त्यानें एक सुंदर व चटकदार भाषण केलें.

तो म्हणाला:—'आज माझेसमोर हा जो जनसमूह जमला आहे त्यांत प्रत्येकाच्या मुखावर दिसत असलेली टवटवी पाहून माझा हर्ष गगनांत मावेनासा झाला आहे व या सर्व गोष्टींचें श्रेय त्या जगन्नियंत्या परमेश्वरासच आहे, कारण या जगाची उत्पात, स्थिति आणि लय हीं सर्व त्याचे हातांत असून सर्व कांहीं त्याच्याच आज्ञेनें होत आहे'. नंतर त्यानें स्वातंत्र्य–प्रतिज्ञालेखाचा त्या दिवशीं वाढदिवस असल्याबद्दल लोकांस कळवून त्यांत ज्या वज्रलेप प्रतिज्ञा केल्या होत्या त्यांचा उल्लेख करून दाखविला, कारण त्या वज्रलेप प्रतिज्ञा म्हणजे त्याच्या सर्व राजकीय कारभाराचा आदिपाया असून त्याजवर राज्यव्यवस्थेची भव्य इमारत उभारली होती; आणि इमारतीचा पाया मजबूत असला म्हणजे त्या इमारतीस भीति नसून ती पुष्कळ दिवस टिकते अशी संपूर्ण खात्री असल्यामुळें जेणें करून पायास

जास्त बळकटी येईल असेच त्याचे सतत उद्योग चालू होते. त्यानें कळविलें कीः—'ऐंशी वर्षापूर्वी तारिख ४ जुलई रोजीं या जगाच्या मोठ्या इतिहासांत प्रथमतःच या राष्ट्रांतील प्रमुख मंडळींनीं एकत्र जमून असें उघड रितीनें ठरविलें आहे कीं ज्याअर्थी परमेश्वरानें सर्वांस सारखेंच उत्पन्न केलें आहे त्या अर्थी सुख व दुःख हीं आपल्याप्रमाणेंच सर्वांस असतात व अशी ज्यांची समदृष्टी असते तेच खरे सत्पुरुष होत'. श्रीकृष्णानें अर्जुनासही भगवद्गीतेंत हेंच तत्व कळविलें आहे ॥ आत्मौपम्येन सर्वत्र समंपश्यति योऽर्जुन ॥ सुखं वा यदिवा दुःखं स योगी परमो मतः ॥ अ. ६ श्लो ३२ ॥ म्हणून अमेरिकेंतील संयुक्त संस्थानाचाच तो वाढदिवस असें म्हटलें असतां विशेष श्रयेस्कर होईल. इ. स. १७७६ सालीं स्वातंत्र्य प्रतिज्ञा लेखांत मनुष्यास राजकीय दृष्टीनें स्वातंत्र्य देण्यासंबंधी जे विचार प्रदर्शित केले होते आणि ज्याचा परिणाम स्वदेशाभिमानी अमेरिकन लोकांच्या मनावर उत्कृष्ट रितीचा झाला त्याहीपेक्षां हल्लीच्या स्वातंत्र्यप्रतिज्ञालेखाचा परिणाम अब्राहाम याचे मनावर अधिक बलवत्तर झाला होता; राष्ट्रहितासंबंधी कित्येक महत्वाच्या ऐतिहासिक बाबती लोकांस कळविल्यावर तो म्हणाला 'परमेश्वरानें सर्व मनुष्यें सारखींच निर्माण केलीं आहेत, ह्या सोन्यासारख्या तत्वाविरुद्ध हलीं एक मोठें बंड उपस्थित झालें आहे, परंतु ईश्वराच्या कृपेनें बंडवाल्यांचीं बरींच

महत्वाचीं गांवें, किल्ले, शहरें, लष्कर वगैरे आपल्या हस्तगत झालीं आहेत.' व्हिक्सबर्ग हातांत आल्यामुळें आणि पेन्सिल्व्हेनिया येथील जयप्राप्तीमुळें स्वातंत्र्यप्रतिज्ञालेखाच्या विरुद्ध असलेल्यांस कुऱ्हाडीच्या घावाप्रमाणें मोठाच धक्का बसून संयुक्त संस्थानानें त्यांच्यावर स्वतःची चांगली छाप बसविली. 'लिंकनच्या राजकीय कारकीर्दीतलें पहिलें सत्कृत्य असें होतें कीं विजय संपादनाप्रीत्यर्थ आणि राष्ट्रांतील सर्व देशभक्तांचे अत्यन्त आभारपूर्वक अभिनंदन करण्यासाठीं त्यानें जाहिरनामा प्रसिद्ध केला त्यांतील सारांश येणें प्रमाणें:—" संकटकाळीं सर्वव्यापक परमेश्वराचा एकसारखा धांवा करीत असलेल्या दीनजनांची हृदयद्रावक हांक त्या दीनवत्सल प्रभूनें ऐकून त्यांच्यावर कृपा केली. संयुक्त संस्थानांतील लष्करी लोक आणि आरमार यांनीं विजय संपादन केलें आणि त्याप्रीत्यर्थ सर्वत्र यशदुंदुभीचे मंगल स्वर ऐकू येऊं लागले ही सर्व कृपा त्या जगत्पालकाचीच होय. संयुक्त संस्थानांत आज जी संघशक्ति वास्तव्य करीत आहे त्याबद्दल लोकांची श्रद्धा दिवसानुदिवसत वृद्धिंगत होत असून राजनीतीच्या स्वरूपास कायमचें अस्तित्व प्राप्त होण्यास सर्व लोक प्रयत्न करीत आहेत आणि राज्यांत शांतता आणि अभ्युदय हीं पूर्ववत् शाश्वत स्थितीस आणण्यास एकसारखे झटत आहेत, हें सर्व त्याच्याच कृपेचें फळ होय. विजय संपादन करण्याप्रीत्यर्थ लक्षावधी नरूण स्त्रियांच्या सौभाग्यमंदिरास अग्नि लागला आणि पुष्कळ वीर-

बहाद्दरांनीं आपले पंचप्राण खर्ची घातले आहेत, अशा शूरांच्या अवर्णनीय गुणांचे हृदयद्रावक पोवाडे कोण गाणार नाहीं ? परमेश्वर आपणांस सुखांत ठेवो अगर दुःखांत ठेवो, तो ज्या स्थितींत आपणास ठेविल त्या स्थितींत आपणांस राहिलें पाहिजे. प्राणिमात्रांच्या सुखदुःखांचे ठायीं त्याची सत्ता सारखीच आहे."

त्यानंतर तारिख ६ आगष्ट रोजीं त्यानें सर्व मंडळीस ईशस्तवनासाठीं एकत्र जमण्याबद्दल विनंति केली व त्याप्रमाणें सर्व समूह जमल्यानंतर ईश्वराचे गुणानुवाद गाऊन त्याची प्रेमळ स्तुति केली. त्यांतील तात्पर्य खालीं लिहिल्याप्रमाणेः —

'राज्याच्या हितासाठीं परमेश्वरानें ज्या अपूर्व व तोंडांत बोट घालण्यासारख्या चमत्कारिक गोष्टी घडवून आणिल्या त्याबद्दल ईशस्तुति करून त्याचे गुणानुवाद गाणें हें प्रत्येकाचें कर्तव्य होय. दुष्ट बंडखोरांच्या कृष्णकारस्थानामुळें सर्वत्रांस निरर्थक त्रास व अनेक प्रकारचीं दुःखें सहन करावीं लागलीं आणि त्यामुळें जो मनक्षोभ व संताप अंतर्यामीं उत्पन्न झाला आहे तो शांत करण्यासाठीं व आजपावेतों झालेल्या एकंदर श्रमाचा परिहार होण्यासाठीं ईश्वराचा धांवा करणें हेंच सुखावह होय. त्या प्रभूजवळ हें मागणें आहे कीं सरकाराच्या विरुद्ध उठलेल्या बंडखोरांच्या दुष्टवासना नष्ट व्हाव्यात, राष्ट्रावर आणीबाणीचा प्रसंग

गुदरला असतां राजकीय कारभारांत सल्लामसलत देणाऱ्या मंडळींनीं मोठ्या शहाणपणानें व दक्षतेनें आपआपलीं कामें करावींत, ज्यांना मोहिमा वगैरे करण्याचे कामीं भयंकर संकटें सहन करावीं लागलीं त्या सर्वांस धीर देऊन उत्तेजन मिळावें, या सत्कार्यांत कोणाकडून चुका वगैरे झाल्या असतील त्याबद्दल परमेश्वराजवळ क्षमा मागून संयुक्त संस्थानांत संघशक्ति आणि शांतता कायमची राहण्यासाठीं सर्वत्रांनीं सतत झटत असावें,

त्यावर्षीं लिंकन यानें राष्ट्राच्या हितासाठीं ईश्वराची कृतज्ञतापूर्वक सर्वांनीं स्तुति करण्याबद्दल कायमचा महोत्सव करण्याचें योजून दरसाल नोवेंबर महिन्याचा शेवटला गुरूवार सदरहु राष्ट्रीय महोत्सव साजरा करण्याचा दिवस ठरविला. अध्यक्ष लिंकन यानें कित्ता घालून दिल्याप्रमाणें हा महोत्सव अजूनपावेतों अव्याहत चालत आहे.

जुलई महिन्यांत संयुक्त संस्थानास पुष्कळवेळां जयप्राप्ति झाली ही गोष्ट निर्विवाद होय, परंतु त्यानंतर लागलींच न्यूयार्कमध्यें बंडाळी उत्पन्न झाल्याबद्दल भयंकर हाकाटी पडली. लष्करी लोकांचीं नांवें पटांत घालण्यासंबंधी कांहीं कायदे अमलांत आणण्याचें ठरल्यामुळें ही बंडाळी उपस्थित झाली होती. परकीय राष्ट्रांतून जे लोक येऊन राहिले होते ते युद्धाच्या विरुद्ध असून

त्यांच्या पोटांतील द्वैतभाव दिवसानुदिवस वाढत चालला होता; तरीपण त्यांपैकीं कित्येक, युद्धांत आपखुशीनें मदत करणारे, स्वदेशाभिमानी अमलदार, शिपाई वगैरे, लोकसत्ताक संस्थानाचे कायमचे नागरिकच आहेत असें ठरलें होतें. वरील कायद्याचा मसुदा जेव्हां न्यूयार्क येथें अमलांत आणण्याची अवश्यकता दिसली तेव्हां जे लोक विरुद्ध होते ते अगदीं उघड रितीनें द्वेष करू लागले. ज्या इमारतींत, सदरील कायद्याच्या मसुद्यासंबंधी वाटाघाट चालत होती त्या इमारतीस, विरुद्ध मंडळींपैकीं कित्येकांनीं आग लाविली. आग विझविण्यासाठीं कित्येक लोक धांवले परंतु दुष्ट बंडखोरांनीं त्यांस तसें करण्यास प्रतिबंध केल्यामुळें अग्नीच्या ज्वाला विशेष भडकून मोठी हानि झाली. कांहीं दिवस खून, लूटफाट, आगी लाविणें वगैरे प्रकार बंडांत इतके चालू झाले होते कीं पोलीस लोकांच्या बंदोबस्ताचा कांहींएक उपयोग झाला नाहीं.

बंडखोरांचा त्वेषाचा सर्व रोंख मुख्यत्वेंकरून सिद्दी लोकांच्या विरुद्ध दिसत होता. ह्या दुष्टांनीं गरीब बिचाऱ्या सिद्दी लोकांच्या अनाथ बालकाश्रमास आग लावून दिल्यामुळें त्यांत असलेलीं लहान व दीन झालेलीं पोरें आपले प्राण वांचविण्यास्तव जीव मुठींत घेऊन गल्लोगल्लीं सैरावैरा धांवपळ करू लागलीं. जेथें जेथें सिद्दी आढळेल तेथेंच त्याला धरून त्याच्यावर जुलूम

करून त्याचा अनेक तऱ्हेनें छळ करावा आणि कधीं कधीं तर त्यास एखाद्या झाडावर उलटा टांगून अगर कंदिलाच्या खांबा-वर चढवून निर्दयपणानें फांशी द्यावा ! शहराच्या वरील भागांत हा क्रूरपणा अतिशय चालला होता, त्यामुळें असें वाटे कीं ज्वालामुखी पर्वताचें कवच एकदम जोरानें फुटून आंतून ज्वाला निघत आहेत कीं काय ? जनरल किलपॅट्रीक हा संयुक्त संस्थानाच्या लष्करांतील एक शूर अंमलदार असून त्याचें वर्तन युद्धाच्या कामीं केवळ एखाद्या धसकनंदनाप्रमाणेंच होतें आणि त्यामुळें त्याच्या फक्त नांवाच्या दराऱ्यानें बंडखोरांचें धाबें दणाणून जाऊन ते पळ काढतील अशी अध्यक्षाची संपूर्ण खातरी असल्यामुळें त्यास प्रथम बंडखोरांच्या टोळीचा चांगला समाचार घेण्याच्या हेतूनें पाठविलें. संस्थानाचा गव्हर्नर होरेशियो सिमोर यानें बंडखोरांच्या समूहांत एक अलंकारिक व कानाला गोड लागेल असें 'माझ्या मित्रांनो' अशा रितीनें प्रारंभ करून चटकदार भाषण केलें; त्यांत बंडखोरांची चालू असलेलीं क्रूर कृत्यें एकदम त्यांनीं बंद करून चालतें व्हावें असा विषय त्यानें मोठ्या खुशीनें प्रतिपादन केला होता; परंतु पालथ्या घड्यावर पाण्याप्रमाणें त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. बंडखोरांचा हा निर्दय प्रकार बंद होण्यासाठीं विशेष कडक उपाय योजण्याची अवश्यकता दिसल्यामुळें पेन्सिलव्हेनियाहून पलटणी आणवाव्या लागल्या; त्यामुळें बंडखोरांचें बळ अगदीं कमी होऊन

एकदम पळतां पळतां त्यांचे नाकीं नव आले. याप्रमाणें बंडखो-रांची बंडाळी मोडल्यामुळें लौकरच सर्वत्र पूर्ववत शांतता दिसू लागली.

सार्वजनिक कामाच्या स्थितीसंबंधीं विचार करण्यासाठीं आणि संयुक्त संस्थानांतील संघशक्तीचें सदैव संरक्षण होण्यास रामबाण उपायांची योजना करण्यासाठीं अब्राहाम लिंकन यास इलिनॉईस प्रांतांतील स्प्रिंगफिल्ड येथें आगष्ट महिन्यांत भर-णाऱ्या परिषदेस पाचारण झालें होतें परंतु ' कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें येववणार नाहीं ही मोठ्या खेदाची गोष्ट होय' अशा मजकुराचें एक पत्र त्यानें ता. २६ आगष्ट रोजीं त्या परिषदेस लिहून पाठविलें. सदरील पत्राच्या शेवटच्या भागांत त्यानें कांहीं अलंकारिक वाक्यें लिहिलीं होतीं त्यांतील तात्पर्य येणेंप्रमाणें:—

' शांतता पूर्वी जेवढ्या लांबच्या पल्ल्यावर दिसत होती तेवढी आतां ती दिसत नसून अगदीं जवळ आली आहे आणि लौकरच तिचा प्रवेश होऊन ती चिरकाल नांदेल अशी माझी संपूर्ण समजूत आहे; कांहीं दिवसांनीं लोकांच्या असें निदर्शनास येईल कीं स्वतंत्र लोकांस कोणतीच कुरकुर करण्यास जागा राहिली नाहीं आणि कदाचित् त्यांनीं केलीच तर त्यांत त्यानां कालत्रयीं ही यश न मिळतां उलट त्यांची सर्वस्वी हानि मात्र होईल. शिवाय मी असें ही कळवितों कीं, जे काळ्यावर्णाचे लोक आहेत

त्यांनीं मनुष्यमात्रास उत्तम मदत केली या सत्कृत्याबद्दल त्यांचीं अंतःकरणें अखेर पावेतों स्वच्छ राहतील; आणि जे गोऱ्या वर्णाचे लोक आहेत त्यांनीं स्वतःच्या हृदयांत हलाहल सांठवून आणि खोटीं नाटीं भाषणें बोलून मनुष्यमात्राच्या भावी कल्याणास हरताळ लाविण्याचा प्रयत्न केला या पातकामुळें ते आपलीं तोंडे काळीं करून अखेर मोठ्या दंडास पात्र होतील.'

इ. स. १८६३ च्या नोवेंबर महिन्याच्या १९ व्या तारिखेस गेटिस्बर्ग येथील रणभूमी, ( हल्लीं ती इतिहास प्रसिद्ध च आहे ) ज्या महात्म्यांचें देह रणांगणांत बळी पडले त्यांच्या प्रेतविधीसाठीं मोठ्या समारंभानें अर्पण केलीं. हा समारंभ मोटा असून लक्षांत ठेवण्यासारखा होता. मॅसेचुसेटस् येथील एडवर्ड इव्हरेट यानें तेथें प्रथम संभाषण केलें. हें संभाषण होण्याचे पूर्वीं कांहीं दिवस अगोदर त्यानें आपल्या संभाषणाची एक छापील प्रत अध्यक्षाकडे पाहण्यास पाठविली होती. सदरहु व्याख्यान लिंकन यानें छापून प्रसिद्ध केलें होतें; त्यांतील मजकूर असा होता कीं:—' ८७ वर्षांपूर्वीं आमच्या वाडवडिलांनीं या खंडांत एका नवीन राष्ट्राची स्थापना केली; या लोकांचें अंगांत स्वातंत्र्याचें स्फुरण जन्मापासून खिळलें असून ' सर्व प्राणीमात्रांस परमेश्वरानें सारख्या रितीनें निर्माण केलें आहे ' हा त्यांचा एक ठरीव सिद्धांत होता. हल्लीं आपण सर्व आपसांतल्या युद्धांत गुंतलों आहोंत आणि सदरहु नवीन राष्ट्रांतले लोक या तुमुल युद्धांची भयंकर-

अग्निज्वाला सहन करून त्यांतून तावून सुलाखून निघून आपलें ब्रीद कायम ठेवितात किंवा नाहीं, याबद्दल आपण त्यांचें सत्व पाहत आहोंत. राष्ट्राचें अस्तित्व कायम राहण्यासाठीं, रणदेवतेस या नवीन राष्ट्रांतल्या ज्या ज्या वीरबहाद्दरांनीं आपआपले देह बळी दिले आहेत, त्यांचे प्रेतविधि करण्यासाठीं आणि त्यांनीं चिरकाल सुखशांति घ्यावी या हेतूनें, स्मारक म्हणून ह्या रण-भूमीचा कांहीं भाग आज त्यांना अर्पण करण्यास आम्ही सिद्ध आहोंत; असें केल्यानें जन्मास येऊन आम्ही सार्थक केलें असें होईल.'

'परंतु सूक्ष्म रीतीनें विचार करून पाहिलें तर सदरहु रण-भूमीचा कांहीं भाग वर लिहिल्याप्रमाणें अर्पण करणार आम्ही कोण ? आम्हास ती सत्ता नाहीं, कारण, जे शूर रणाग्रणी या रणभूमीवर लढले, त्यांपैकीं हल्लीं जे हयात आहेत ते व इहलोक सोडून गेले ते अर्पण करून चुकलेच आहेत, त्यांत कमीजास्ती करण्याची आम्हा पामरांस आज सत्ता नाहीं; आमचा त्यांचे पुढें पाड काय ? आम्ही जें कांहीं येथें बोलूं, तें कांहीं जगाच्या फारसें लक्षांत राहणार नाहीं, परंतु ज्यांनीं प्रत्यक्ष येथें कृति करून दाखविली आहे, ती मात्र आजन्म सर्वांचे स्मरणांत राहील यांत संशय नाहीं. मरणारांनीं जीं जीं कामें अपुरीं ठेविलीं आहेत त्यांत चांगली भर घालून तीं संपूर्ण करणें, हें आमचें आतां कर्तव्यकर्म होय. कडकडीत देशाभिमानी व एकनिष्ठ

सत्पुरुष यांनीं देशासाठीं आपले प्राणसुद्धां खर्चीं घातले, त्यांचें अनुकरण आतां आपल्यास फारच उत्तम रितीनें केलें पाहिजे. त्यांनीं आपले प्राण अकारणीं फुकट खर्चीं घातले नसून सत्कार्यासाठींच त्यांनीं आपले देह अर्पण केले, असें आम्हांस वाटतें. स्वर्गस्थ झालेले शूर पुरुष परमेश्वराच्या आश्रयानें एक नवीन राष्ट्र उभारून तेथें सुद्धां स्वातंत्र्याचें स्फुरण स्वतःच्या अंगांत जागृत ठेवितील, आणि अशा महात्म्यांच्या पुण्याईनें हें लोकसत्ताक राज्य भूमंडळावर चिरकाल राहील, अशी संपूर्ण खातरी आहे. ”

हें भाषण ऐकून लोक आश्चर्यचकित झाले, इतकेंच नव्हे, परंतु कित्येकांच्या तर नेत्रांतून अश्रुधारा चालल्या होत्या. मी. इव्हरेट् हा एक अमेरिकेंतील प्रसिद्ध वक्ता असून त्याचें वाङ्माधूर्य सर्वोत्कृष्ट होतें, व त्याचें संभाषण सर्वांनीं अत्यंत पूज्यबुद्धीनें ऐकिलें. हें संभाषण लोकांनीं जेव्हां सूक्ष्म रितीनें मनन केलें, व त्यांतील सर्व मुद्दे त्यांच्या मनांत चांगल्या रितीनें जेव्हां भरले, तेव्हां तें सर्वोत्तम असून ग्राह्य आहे, अशी सर्वांची पूर्ण खातरी झाली. अब्राहाम लिंकन याची परमेश्वरावर आणि स्वधर्मावर अतिशय निष्ठा होती, हें यापुढें लिहिलेल्या उदाहरणावरून स्पष्ट होत आहे. एके दिवशीं तो सैन्याची स्थिति पाहण्यासाठीं गेला असतां त्याला असें आढ-

कून आलें कीं लष्करी लोक आणि त्यांचे अंमलदार गप्पा मारीत फुकट वेळ घालवीत आहेत, हें पाहून त्यास फार दुःख झालें, व त्यानें असा जाहिरनामा प्रसिद्ध केला कीं ‘ आठवड्यांतून एक दिवस परमेश्वराची प्रार्थना करण्यांत सर्वांनीं घालविला पाहिजे, कारण, जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं सर्व त्या प्रभूच्याच स्वाधीन आहेत. ’

पश्चिम प्रांतांत असलेल्या फौजेच्या समाधानकारक स्थितीवरून हें वर्ष चांगलें जाईल, असें सर्वांस वाटत होतें. ऑक्टोबर महिन्यांत जनरल **ग्रांट** यानें मिसिसिपीच्या भागाकडील लष्करी तुकडीच्या मुख्य अंमलदाराचें काम स्वतःकडे सोंपून घेतलें, आणि **कैंटकी**पैकीं **लुइविली** येथें लष्करांचें मुख्य ठिकाण केलें. **ओहिओ** आणि **कंबरलँड** येथील फौजेचा समावेश त्याच भागांत केला असून ह्या फौजेचा मुख्य लष्करी अंमलदार जनरल **जार्ज एच, टॉमस** हा होता. जनरल **हूकर** यास १५००० लष्करासहित पूर्वेकडून पश्चिमेकडे पाठविलें होतें; आणि जनरल **ग्रांट** याच्या या नवीन बलाढ्य लष्करांत **शेरिडन्** आणि **शर्मन्** हे दोघे त्याच्या हाताखालचे अंमलदार होते. **मिशनरि रिज्**, **लुकौटमौंटन** व **चाटानुगा** या ठिकाणीं मोठ्या लढाया होऊन अखेर बंडखोरांस **टेनिसी**च्या बाहेर घालवून दिलें. **बर्नसाइड** हा कांहीं वेळपावेतों **टेनिसी**पैकीं **नॉक्सव्हिली** येथें

निरुपायास्तव राहिला होता, त्यामुळें शर्मन् यास बर्नसाइड् याची सुटका करण्यासाठीं पाठवावें लागलें; त्यानें लागोपाठ शत्रूवर हल्लें करून बर्नसाइड् यास सोडवून बंडखोरांचा मुख्य लाँगस्ट्रीट यास, त्याच्या अनुयायासहित व्हर्जिनियांत परत हांकून लाविलें, व राजनिष्ठ लोकांस शत्रूच्या तावडींतून सोडवून टेनिसीसुद्धां त्यांना हस्तगत करून घेतलें. संयुक्त संस्थानाचा पराजय करण्याबद्दल बंडखोर लोकांचा हा भगीरथ प्रयत्न असून तो शेवटलाही होता. काळ प्रतिकूळ आला, म्हणजे हळूं हळूं अनुकूळ गोष्टी सुद्धां प्रतिकूळ होऊं लगतात.



# प्रकरण २४ वें.

## राजकीय कामांचे घोटाळे. लींकन याची अध्यक्षस्थानीं दुसऱ्या वेळीं नेमणूक आणि त्याचें अखेरचें व्याख्यान.



इ. स. १८६३–६४ सालीं हिवाळ्याचे दिवसांत कॉंग्रेसमध्यें अध्यक्ष कोणास नेमावें, याविषयीं बरीच वाटाघाट चालू झाली. ह्या वेळीं सदरहु कॉंग्रेसमध्यें राजकीय कामासंबंधीं पूर्वी प्रमाणें चकमक होईल, असें दिसत नव्हतें. प्रजापक्षी लोक ( डेमोक्रॅट् ) युद्धाच्या विरुद्ध असून त्यांची संख्याही फारच थोडी होती. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचे लोकांस पूर्वींपेक्षां राज्यकारभाराचा मोठा आधार होता, आणि त्यांचा सर्व कल तिकडे असून आतां युद्धाचें काम संपण्याची तयारी आहे, असे ते मानीत होते; शिवाय इ. स. १८६९ सालच्या मार्च महिन्याचे चवथे तारिखेस इलाख्यासाठीं निवडणूक होण्याचें ठरलें होतें, त्या मुदतीचे आंत तर निःसंशय या युद्धाचा शेवट झाला पाहिजे, अशी त्यांची खातरी होती. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षापैकीं, ज्यांना या वेळच्या निवडणूकीसाठीं अब्राहाम हा स्वाभाविक रितीनें अयोग्य वाटत होता- ते त्याच्या विरुद्ध झाले होते. सरहद्दीवरील संस्थानांतून

गुलामगिरीचा ऱ्हास लौकर व्हावा, असे उपाय लौकर योजिले पाहिजेत आणि त्यासाठीं एका विशेष शहाण्या नवीन अध्यक्षाची नेमणूक करून त्याच्या धोरणानें युद्धाचें काम अधिक उत्साहानें चालविणें इष्ट आहे, असें त्यांचें ह्मणणें होतें. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील लोकांची, तिजोरी कडील सेक्रेटरी मिस्तर चेस् याची नवीन अध्यक्षाच्या जागीं नेमणूक व्हावी, अशी इच्छा होती; आणि कित्येकांनीं तर जनरल फ्रिमाँट याची नेमणूक होण्याबद्दल खुशी दर्शविली.

अब्राहाम लिंकन यास आपली पुनः नेमणूक व्हावी, अशा बद्दल हाव नव्हती; लिंकनच्या अंगीं इतरांपेक्षां शहाणपण विशेष होतें, हें अनेक वेळां दर्शविलेंच आहे, शिवाय प्रत्येक कामाचें मूळ कोठें आहे, हें शोधून काढण्याची धारणा त्यांचे अंगीं अलौकिक होती; त्यामुळें स्वतःची पुनः नेमणूक झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी त्याची खातरी होती. आपल्या खास स्नेह्यांपैकीं एकाशीं तो एके दिवशीं एकांतीं बोलला कीं—'मी फक्त लोकांचा वकील असून केवळ त्या नात्यानें मी हें बिकट काम हातीं धरलें आहे; माझा देश, हें एक माझें कूळ आहे, असें मी समजतों आणि त्या माझ्या कुळासाठीं मी जिवापाड श्रम केले आणि यापुढें ही करीनच करीन; इतकें ही असून जर लोकांची इच्छा आपला वकील बदलावा अशीच असली, तर मग

मी त्यांना प्रतिबंध करणें रास्त नाहीं, व मी तसें करूं इच्छित नाहीं. या कामीं कोणाचीही नेमणूक होवो, परंतु मी एवढें मात्र खातरीनें सांगून ठेवितों कीं, हा होणारा फेरफार अतिशय अदूरदर्शीपणाचा होईल'. मोठ्या गमतीनें व खुबीनें दुसऱ्यांचे हृदयांत एखाद्या महत्वाच्या बाबतीचा खरेपणा बिंबवून देण्याची लिंकन यास फारदिवसापासून संवय होती; त्या संवयीस अनुसरून तो आपल्या एका स्नेहास ह्मणाला 'घोडे नदी उतरून जात आहेत, अशा वेळीं त्यांना अकस्मात् धरून त्यांच्या गतीस अवरोध करणें, हें शहाणपणाचें काम नव्हे'. शेवटीं इलाख्याच्या नेमणुकी संबंधांत कांग्रेसमध्यें बरीच वाटाघाट होऊन 'फक्त अब्राहाम लिंकनच योग्य आहे' असा विचार झाल्याबद्दल जे लोक कांग्रेसमधून परत आले त्यांनीं कळविलें.

जनरल ग्रांट यास फौजखात्यांत हल्लीं लेफ्टेनंट जनरलचा हुद्दा मिळाला असून त्या जागीं त्याची नेमणूक झाली ही गोष्ट फार महत्वाची असून लक्षांत ठेवण्याजोगी होय; कारण, मेजर जनरलच्या हुद्याची जागा लष्करांत सर्वांत मोठी समजत असत. हॅलेक् यास जनरल इन्. चीफ्चा जो हुद्दा मिळाला होता, तो थोड्या मुदतीसाठीं असून फक्त नांवाचाच होता. कॉंग्रेसनें लेफ्टेनंट जनरलच्या हुद्याची नवीन जागा जनरल ग्रांट यास देण्याच्या उद्देशानेंच काढली होती, कारण,

पश्चिम भागांत त्यानें अनेक वेळां जय संपादन केले असल्या कारणानें त्याचेच हातून इष्टकार्यसिद्धि होईल व तो चांगलें नांव मिळवून सर्व श्रेय घेईल, अशी सर्वत्रांची पूर्ण खातरी होती. संयुक्त संस्थानाच्या फौजेंत ज. ग्रांट यास नवीन हुद्दा कॉंग्रेस कडून मिळाला, हें लिंकन यास मनापासून आवडलें, आणि इलिनॉइस येथील इलिहु बी. वॉशबर्न यानें कॉंग्रेसच्या बैठकींत मोठ्या उत्कंठेनें भाषण करून आपली संमति दिली. ग्रांट हा इलिनॉईस येथील २१ व्या पलटणीचा कर्नल झाला तेव्हां पासून त्याची आणि वॉशबर्न याची अति मैत्री होती.

लेफ्टेनन्ट् जनरलचा हुद्दा जनरल ग्रांट ह्यास दिल्या बद्दल अध्यक्षानें कॉंग्रेसच्या सभासदांस इ. स. १८६४ च्या फेब्रुवारी महिन्याच्या २२ व्या तारिखेस कळवून ता. २ मार्च रोजीं त्या प्रमाणें त्याची नेमणूक केली, व नंतर त्यास तावडतोब वॉशिंग्टन् येथें बोलावून घेतलें. लष्करांतले लहान मोठ्या पदवीचे अंमलदार हरहमेश राष्ट्रीय राजधानींत खेपा घालून स्वतःस कांहीं बढती मिळावी, एतदर्थ खटपट करीत असत. सदरहु मंडळीचा जेव्हां राष्ट्रीय राजधानींत बराच सुळसुळाट होऊं लागला, तेव्हां सरकाराची योग्य परवानगी मिळविल्यावांचून कोणीही लष्करी अमलदारानें राष्ट्रीय राजधानींत

येऊं नये, असा फौज खात्यांतून हुकुम सुटला. त्यावेळपावेतों ज. ग्रांट हा वॉशिंग्टन् येथें गेला नव्हता व तशी परवानगीही त्यानें मागितली नव्हती; मात्र अध्यक्षानें जेव्हां नवीन हुद्याच्या जागेवर रुजूं होण्यास सरकारी नात्यानें त्यास बोलाविलें, तेव्हांच त्याचें वॉशिंग्टन् येथें जाणें झालें; त्या पूर्वी तो लष्करी शिपाई या नात्यानें आपलें काम बिनचूक करीत होता.

नवीन मिळालेल्या अधिकाराचें काम सोंपून घेण्यासाठीं जनरल ग्रांट हा ता. ८ मार्च रोजीं वॉशिंग्टन् येथें येऊन पोंहचला; त्या दिवशीं सायंकाळीं इलाख्यांतील मोठमोठी मंडळी व्हाइट हौस राजवाड्यांत एकत्र जमून तेथें एक मोठा दरबार भरण्याचें ठरलें होतें. मी. ग्रांट येतांच लिंकन यानें त्याचें प्रेमपुरस्सर स्वागत केलें; आणि व्हिक्सबर्ग येथें विजय मिळविलेला शूरवीर आज दरबारास आला आहे, अशी बातमी लागलींच चहूंकडे पसरून त्याला पाहण्यास लोकांची अतिशय दाटी झाली. सर्वांना सारख्या रितीनें त्या शूराचें दर्शन व्हावें ह्मणून त्याला उच्चस्थानीं मोठ्या सन्मानानें उभें केलें होतें.

अध्यक्ष, सभेंतील सभासद, आणि कांहीं खास न्सेही मंडळी, यांच्या समक्ष भेटी दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें त्यानें घेतल्या आणि नंतर अध्यक्षानें त्याला त्याचें अधिकाराचें काम सोंपून जो हुकम दिला तो येणें प्रमाणें:—

'जनरल ग्रांट! तुह्मी राष्ट्रहितार्थ पुष्कळ झटला व त्यासाठीं सर्व राष्ट्रभक्त तुमचे अहोरात्र गूण गात आहेत; आतां यापुढें चालू युद्धाचे कामीं जें करणें बाकीं राहिलें आहे तें तुह्मी खातरीनें करालच, अशी सर्व लोकांची संपूर्ण खातरी होऊन चुकली आहे. संयुक्त संस्थानाच्या फौजखात्यांत लेफटनंट् जनरलचा हुद्दा तुम्हास दिला असून आज त्या जागेचे सर्व अधिकारही तुम्हास बहुमानपूर्वक दिले आहेत. देशांतील लोकांचा भक्तिभाव तुमच्याठाईं अगदीं खिळल्या सारखा झाला आहे आणि मी परमेश्वराला स्मरून सांगतों कीं, देशांतील लोक तुम्हास सर्वतोपरी मदत करतील, इतकेंच नव्हे तर तुमच्या साठीं ते आपले प्राण सुद्धां खर्चीं घालतील.'

जनरल ग्रांट यानें मोठ्या उत्साहानें तो हुकूम मान्य करून मिळालेल्या अधिकाराबद्दल आनंद प्रदर्शित केला; आणि अध्यक्षानें कळविल्याप्रमाणें सैन्याची व देशासंबंधीं जबाबदारी आपल्या डोक्यावर घेऊन शेवटीं कळविलें कीं—' परमेश्वराच्या कृपेनें आणि त्याच्याच सत्तेनें सर्व राष्ट्र आणि त्यांतील लोक नांदत आहेत, म्हणून इष्ट हेतू परिपूर्ण करणार तो प्रभूच समर्थ होय;' नंतर तो पोटोमॅक् येथील सैन्याची स्थिति पाहण्यासाठीं गेला, त्या वेळीं त्या लष्कराचा मुख्य अंमलदार जनरल मीड हा होता. तेथील व्यवस्था लक्षपूर्वक पाहून तो लागलींच

वॉशिंगटन् येथें रवाना झाला. व्हाइटहौस राजवाड्यांत अब्राहाम याच्या बायकोनें त्या पाहुण्यास एक उत्तम मेजवानी देण्याचें ठरविलें होतें, परंतु ही हकिकत प्रथम ग्रांट यास ठाऊक नव्हती. अध्यक्षाशीं बराच वेळ चालू युद्धाचे संबंधांत संभाषण करून शेवटीं पश्चिम प्रांताकडे ताबडतोब निघून जाण्यासंबंधीं त्यानें आपली इच्छा दर्शविली; इतक्यांत अध्यक्षानें त्यास आपल्या घरीं मेजवानीचा बेत असल्याबद्दल कळवूनभोजनास निमंत्रण दिलें; परंतु ग्रांट यानें स्पष्ट व आग्रहपूर्वक कळविलें कीं 'अध्यक्ष साहेब, असल्या शिष्टाचाराच्या बाबती मी पुष्कळ पाहिल्या आहेत; मला आतां लौकरच गेलें पाहिजे; क्षमा असावी'. इतकें बोलून तो पश्चिम प्रांताकडे निघून गेला. अब्राहाम यानें ग्रांट याच्या पंगतीस बडी बडी मंडळी भोजनास बोलविली असून मोठा थाट केला होता, परंतु जनरल ग्रांट यास युद्धाचे विषयापुढें डामडौलाच्या विषयाची किंमत नव्हती. या भोजनाच्या बाबतींत त्यानें अध्यक्षाचे शब्दास मान दिला नाहीं, म्हणून अध्यक्षास त्याबद्दल वाईट वाटलें नाहीं, उलट युद्धाच्या विषया संबंधांत त्याची इतकी उत्कंठा पाहून त्याला मोठा संतोष झाला.

जनरल ग्रांट याच्या पूर्वींच्या जागेवर जनरल शर्मन याची नेमणूक होऊन त्याप्रमाणें तो मिसिसिपीकडील लष्करी तुकडीचा मुख्य अंमलदार झाला. इ. स. १८७० च्या मार्च

महिन्याच्या १७ व्या तारिखेस त्यानें संयुक्त संस्थानांतील लष्करी तुकडींचे झालेल्या हुकुमाप्रमाणें सर्व काम सोंपून घेतलें, आणि दुसरा हुकूम होई पावेतों पोटोमॅक् येथील सैन्याच्या अधिपतीचें कामही सोंपून घेतलें. अद्याप पावेतों पश्चिमेकडील आणि पूर्वेकडील लष्करी तुकड्यांच्या लढाईचें काम कशा रितीनें चालवावें, ह्याविषयीं एक विचार झालेला दिसत नव्हता. ज्या त्या लष्करी तुकडीचे अधिपति आपआपलीं कामें स्वतंत्रपणें करीत असून या दोन्ही लष्करी तुकड्यांतील लोकांत द्वेषभाव फार वाढला होता. फौजखात्यांत बढती मिळविणें व आपआपली लायकी व बुद्धिवैभव इतरापेक्षां अधिक दाखविणें, या कारणा मुळेंच सदरहु द्वेषादिप्रकार वाढले होते; परंतु हा परस्परांतला मत्सरभाव आतां यापुढें मात्र अगदीं नाहींसा व्हावयाचा होता. नांगर ओढणारी बैलाची जोडी जशी फिरते, तसें या लोकांस जोडीनें यापुढें फिरूं द्यावयाचें नाहीं, तसेंच शत्रूस विश्रांति न घेऊं देतां चहूंकडून वेढावयाचें, असें जनरल ग्रांट यानें धोरण ठेविलें होतें.

जनरल ग्रांट हा अजिंक्य शूरवीर आहे, अशी त्याची सर्वत्र ख्याति होती. ह्या पश्चिम प्रांतांतलि रणाग्रणीनें जेव्हां पोटोमॅक्च्या सैन्यासहीत रॅपिडन् नदीच्या कांठीं तंबू ठोकून तळ दिला, तेव्हां ह्या बंडखोरांच्या दैवाचें पारडें कोणतें तरी एका बाजूस

कायमचे कलांडण्याची वेळ आतां येऊन ठेपली, असें प्रत्येकास वाटलें. 'संयुक्त संस्थानांतील राजसत्तेस आणि तेथील कायद्यास सर्व तोपरी एकनिष्ठेनें मान्य करूं आणि आज पावेतों अराजनिष्ट होतों, परंतु यापुढें कायमचे राजनिष्ट झालों,' अशी खातरी बंडखोरांनीं दांतीं तृण धरून शरण येऊन केली पाहिजे, व असें जों पावेतों त्यांचे कडून घडणार नाहीं, तों पावेतों ज्याप्रमाणे सोनार ऐरणीवर हातोडयाचे घाव मारितो, त्याप्रमाणें शत्रूवर आणि त्यांच्या कृष्ण कारस्थानावर सतत घाव मारावयाचचे, अशा पद्धतीनें जनरल ग्रांट यानें युद्धाचें काम मोठया नेटानें चालविण्याचें धोरण ठेविलें होते.

बंडखोरांच्या राजधानीवरील मोहिमेस मे महिन्यांत प्रारंभ झाला. पोटोमॅक्च्या सैन्याचा मुख्य अंमलदार जनरल मीड असून त्यास नवव्या पलटणाचा अंमलदार बर्नसाइड् हा येऊन मिळाला. इतर पलटणीचे अमलदार हॅंकॉक्, वॉरन आणि सेज्विक् याप्रमाणें होते. मे महिन्याच्या ३ ऱ्या तारखेस मध्यरात्रीच्या सुमारास सैन्यानें कुच करण्यास प्रारंभ केला. याच महिन्याच्या ५ व्या व ६ व्या तारिखेस भयंकर लढाया होऊन वॉशिंग्टन् राजधानींत पुनः घायाळ माणसांची दाटी झाली; अशा आणखी बऱ्याच लढाया झाल्यानंतर बंडखोरांचा अगदीं मोड झाला, व शेवटीं त्यांना शरण येणें भाग पडलें. हल्लीं संयु-

क्त संस्थानांच्या रणशूर योद्ध्यांवर विजयश्री सदैव सुप्रसन्न होती. उभय पक्षांचा भयंकर सामना होऊन बंडखोरांस रिचमंड्कडे परत हटावें लागलें. ह्यामुळें वॉशिंगटन् शहरांत बरीच चळवळ उत्पन्न झाली. संयुक्त संस्थानाचा जेव्हां जेव्हां विजय होई, त्या त्या वेळीं सन्मानार्थ तोफा सुटत असत. जयदुंदुभि आणि तोफेचे गडगडाट ऐकूं येतांच देशाभिमानी लोक अध्यक्षाचें अभिनंदन करून वेळोवेळीं त्याचा मोठा सत्कार करीत असत व्हाइट् हौस राजवाड्याच्या एका भव्य खिडकींत अध्यक्षानें उभेंराहून मोठ्यानें सर्वत्रांस कळविलें कीं, ' ता. ११ मे रोजीं जनरल ग्रांट यांजकडून असें पत्र आलें कीं, संयुक्त संस्थानाच्या आणि शत्रूच्या लष्करांत या लढायामुळें भयंकर हानि झाली आहे, व सर्व उन्हाळा जरी येथें खर्च झाला, तरी पण लढाई चालू ठेवीन.

पश्चिम प्रांताकडील पोटोमॅक् येथील सैन्य विजयी झाल्यामुळें लोकांस मोठा आनंद झाला होता. अलिघनी पर्वताच्या पश्चिम भागांत शर्मन् यानें आपल्या मोहिमेस प्रारंभ केला होता; इकडे त्याच वेळीं जनरल ग्रांट यांनीही त्वरेनें चाल करून युद्धास प्रारंभ केला होता. बंडखोर लोकांची मिशनरिज्ज येथें मोठ्या मारामारीनें कांहीं सरशी होऊन त्यांनीं आपलें सैन्य पुनः फुगाविलें होतें, परंतु शर्मन् यानें शत्रूला चांगलीच टक्कर दिल्यामुळें उभयपक्षीं बऱ्याच

झटापटी होऊन शेवटीं शत्रूस जॉर्जिया पावेतों मागें हटावें लागलें. रेसाका, अलाटुना व केनेसा, या लढायांत विजयी झाल्यानंतर शेवटीं अटलान्टास त्यानें वेढा घालून तें जून महिन्याच्या २२ व्या तारिखेस हस्तगत करून घेतलें. लष्करी लोकांस अन्नसामुग्री वेळोवेळीं पुरविण्यास्तव आगगाडीच्या रस्त्यावर एक जागा ठरवून तेथें व्यवस्था करण्यासाठी त्यानें त्या शहरांतील लोकांस पाठविलें. बंडखोरांच्या लष्कराचा जनरल हुड आणि त्या शहराचा मेयॉर ( नगराधिकारी ) या उभयतांस सदरील कृत्य क्रूरपणाचें आहे, असें वाटल्या वरून त्यांनीं पुष्कळ आढेवेढे घेतले, परंतु ते सर्व फुकट गेले. शर्मन् यानें चोख असें उत्तर दिलें कीं:—" लढाई ही चालू राहिलीच पाहिजे; लढाई म्हणजे केवळ निर्दयपणाचा कळस होय. युद्धाचें काम जेवढें कडवें आणि जेवढें कठोर ऱ्हदयाचें आहे असें मी म्हणेन तेवढें तुम्हास कधींही ह्मणतां येणार नाहीं. लढाई ही प्रत्यक्ष निर्दयपणाची मूर्तिच म्हटलें तरी चालेल; ज्यांनीं ज्यांनीं आमच्या ह्या भूमातेवर शस्त्र उचललें आणि जे युद्धास उभे राहिले, त्या आधमाधमांस या घोरपातका बद्दल देहान्त प्रायश्चिता शिवाय दुसरें कोणतेंच प्रायश्चित्त धर्मशास्त्रांत सांगितलें नाहीं; " हे भयंकर शब्द बंडखोरांचे कानीं पडतांच त्यांना बेपरवाईची उत्तरें देण्याची आजपावेतों जी संवय लागली होती, ती पार मोडून जाऊन व आपण आतां निर्बळ झालों आहोंत, असें

खास वाटून ते येवढे जरी वज्रदेही होते, तरी पण ते सर्व अगदीं हताश होऊन गेले.

शर्मन यास उत्तरेकडे हांकून लावावें, असें हुड यास वाटत होतें, आणि या हेतूनें अटलांटा शहरास वळसा देऊन पुनः एकदा टेनिसी प्रांतात हल्ले करण्यास तो गेला. यावेळीं संयुक्त संस्थानाच्या पलटणीचे टॉमस् आणि शोफिल्ड् असे उभयतां अंमलदार असून ते नॅशविलीच्या पुढल्या भागांत आपल्या सैन्यासहित अगदीं तयार होते. उभय पक्षांत मोठी लढाई होऊन शेवटीं वंडखोर लोकांस लाजिरवाणें होऊन, अपमान सहन करून आणि अपयश पदरीं बांधून पळ काढावा लागला. बंडखोरांचे आज पावेतों जें एकजूट होतें, तें आतां बरेंच मोडलें असून त्यांचा सर्व बाबतींत विलक्षण घोटाळा झाल्या-मुळें ते अतिशय घाबरले. या खेपेस संयुक्त संस्थानाच्या लष्करी अंमलदारास युद्ध सामुग्री, तोफखाना व पुष्कळ कैदी हस्तगत करण्यास सांपडले. हूड याच्या सैन्याचा असा उच्छेद झालेला पाहून संयुक्त संस्थानाच्या राजनिष्ठ प्रजेचा आनंद गगनांत मा-वेनासा झाला. 'हूड याचें सैन्य चांगल्यापैकीं होतें आणि आम्ही सर्व त्या सैन्यास पाहून भयभीत होत होतों; परंतु लष्करी सैन्य या नात्यानें आतां त्याचा कांहीं एक उपयोग राहिला नाहीं' असें अब्राहाम बोलला.

व्हर्जिनियाचे भागांत जेम्सनदीचे किनाऱ्याजवळ फौजेची तयारी असण्याबद्दल ग्रांट याची योजना असून त्याप्रमाणें जनरल बटलर यानें जेम्स नदीच्या कांठीं सिटीपॉइंट्ला मुकाम दिला व तेथेंच ग्रांट यानें सामुग्रीचा पुरवठा करण्याची जागा ठरविली होती. बट्लर याज वर हल्ला झाल्यामुळें जेम्स आणि आपो- मॅटॉक्स यांचे दरम्यान त्याला मागें हटावें लागलें आणि तेथें बंडखोरांच्या तुकडीचा मोर्चा फिरल्यामुळें तो कोंडल्यासारखा झाला होता. ' जनरल बट्लर हा बाटलींत कोंडला गेला ' असे त्यावेळीं ग्रांट यानें उद्गार काढिले होते.

शेनंडोची खिंड शत्रूच्या ताब्यांत असून ती मोकळी करण्यास जनरल हंटर यास पाठविलें होतें, परंतु तेथें बंडखोरांचें प्राबल्य असल्यामुळें त्याला कन्हाव्याचे मार्गानें परत जावें लागलें. संयुक्त संस्थानाचा लष्करी अंमलदार ज. ल्युवॉलेस् यानें बंडखोरांच्या लष्कराचा पुढारी जनरल अर्ली याच्याशीं सामना करून कांहीं वेळ त्याला अडविलें होतें, परंतु लौकरच अर्ली- यानें त्यास मागें हटवून वॉशिंगटन्‌कडे मोर्चा फिरविला; त्यानें मेरिलँडमध्यें प्रवेश करून लूटफांट करण्यास प्रारंभ केला आणि राष्ट्रीय राजधानीपासून सात मैलांचे अंतरावर असलेलीं लोकांचीं राहतीं घरें जाळून भस्म केलीं; त्यांतच मॉंटगॉमरी- ब्लेर याचेंही राहतें घर जळून त्याची राख रांगोळी झाली

होती. नंतर बंडखोरांनीं वॉशिंग्टन् शहारावर चाल केली, परंतु जनरल ग्रांट यानें तावडतोब दोन चांगल्या लष्करी पलटणी पाठवून राष्ट्रीय राजधानीचा उत्तम बंदोबस्त केला; वॉशिंग्टन् शहरांतील लोक या गडबडीमुळें कांहीं वेळ बरेच घाबरले होते. लिंकन यानें राष्ट्रीय राजधानीचे बाहेर असलेल्या स्टिव्हन्स् किल्ल्यावरून बंडखोर लोक एकसारखे पळत सुटले आहेत असें पाहिलें.

कांहीं दिवसा नंतर ज. ग्रांट यानें आपल्या खातरीचा लेफ्टेनन्ट् शेरिडन् यास, शेनंडोच्या सुपीक प्रदेशांतून बंडखोर लोक स्वतःसाठीं सामुग्री गोळा करीत होते, तो प्रदेश व खिंड हस्तगत करून घेण्यासाठीं तावडतोब पाठविलें. इ. स. १८६४ सालच्या आगष्ट व सप्टेंबर महिन्यांत शेरिडन यानें आपणास संपूर्ण विश्वासानें सोंपलेली कामगिरी उत्तम रितीनें बजाविली. या सालच्या उन्हाळ्यांत लोकप्रवृत्तीची दिशा राजकीय कामाकाजाकडे विशेष वळलेली दृष्टोत्पत्तीस येत होती. इलाख्यासाठीं उमेदवारांच्या नेमणुका करण्यास्तव सभा भरण्याचे दिवसही जवळ येत चालले होते. सर्व पक्षांचे लोक वादविवादासाठीं कडेकोट तयारी करून मधमाशांप्रमाणें गोळा होत होते. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाच्या लोकांत लिंकन याची पुनः नेमणूक होण्यासंबंधांत दोन तट झाले होते. राजकीय कामाकाजांत

जी कांहीं व्यवस्था त्यावेळीं चालू होती ती कांहीं लोकांस पसंत नसून तेच लिंकन याच्या विरुद्ध मत देण्यास तयार झाले होते. गुलामगिरी, दक्षिणेकडील लोकांशी व्यवहार आणि सरहद्दीवरील संस्थानें, या तीन बाबतींत मुख्यत्वें करून अब्राहाम याचे राजकीय दृष्टीनें जें धोरण होतें, तें त्यांना अगदीं पसंत नव्हतें. चालू असलेलें युद्ध विशेष जारीनें चालविलें पाहिजे, असेंही त्याचें आग्रहपूर्वक म्हणणें होतें.

न्यूयॉर्क येथील ट्रिब्यून वर्तमानपत्राचा चालक होरेसग्रीली यानें लिंकन याची पुन: नेमणूक होण्यासंबंधांत पुष्कळ विरुद्ध लिहिलें होतें.लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील कांहीं मंडळींनीं लिंकनच्या विरुद्ध मत देण्याचे कामीं जें पाऊल टाकिलें होतें, त्याचे समूळ खंडन करण्यासाठीं वॉशिंगटन् येथील दरबारांत कित्येक हुशार राजनीतिज्ञ विद्वानांनीं विडा उचलला होता. लिंकन याच्या विरुद्ध असलेल्या या विघ्नसंतोषी लोकांपैकीं कित्येकांनीं तर मि. चेस् याची पुनः नेमणूक करणें आणि लिंकन याच्या विरुद्ध ज्या लोकांची प्रवृत्ति असेल तिला विशेष बळकटी आणणें, या बाबतींसंबंधांत एक गुप्त जाहिरनामा तयार केला होता.

आपल्या विरुद्ध हल्लीं जें वातावरण पसरत चाललेलें आहे,

याची लिंकन यास सर्व माहिती होती, परंतु सध्यां कांहीं एक करावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय होता. कित्येकांनीं त्याला असें सुचविलें होतें कीं, त्याच्याविरुद्ध असलेले लोक जनरल ग्रांट याचें नांव उमेदवारांच्या नेमणूकसिंबंधांत पुढें करीत आहेत, तेव्हां तो म्हणाला:—'त्याजागीं ग्रांट याची नेमणूक होऊन जर चालू असलेली बंडाळी लौकर मोडत असेल, तर मी त्या त्रासांतून अनायासेंच सुटल्याबद्दल मला मोठा संतोष होणार आहे.'

वास्तविक पाहतां, लिंकन याची लोकांवर चांगली श्रद्धा असून लोकांचीही त्याच्यावर उत्तम श्रद्धा होती आणि पुष्कळ लोक त्याला मनापासून चाहत होते. चांगल्याचा परिणाम चांगलाच व्हावयाचा या ठरीव सिद्धांताप्रमाणें वरील अन्योन्य श्रद्धेचा परिणामही चांगला व न्यायाचा झाला. इ. स. १८६४ सालीं जून महिन्याच्या ८ व्या तारिखेस लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील लोकांची राष्ट्रीयसभा बाल्टिमोर येथें भरली. यावेळ पावेतों लिंकन याचीच पुनः नेमणूक होईल अशी सर्वांची खातरी होती, कारण वरील सभेस जे जे प्रतिनिधि आले होते त्यां पैकीं कोणाचेंही मत लिंकन याच्या विरुद्ध दिसलें नव्हतें; परंतु लिंकनचें नांव सभेंत प्रथम प्रतिनिधी पुढें पसंतीस्तव कोणी आणावें, याच बाबतीचा फक्त वाद होता. ॲंड्रयुजॉनसन हा टेनिसी संस्थानाच्या फौजखात्याचा गव्हर्नर असून त्यानें लोकप्रीति आणि

चार चौघांत चांगली अब्रू संपादन केली असल्यामुळें त्यास व्हाईस् प्रेसिडेंट ( उपाध्यक्ष ) नेमिलें; ही नेमणूक कांहीं विशेष कारणास्तव झाली होती. जॉन्सन् याची जन्मभुमी गुलामगिरी चालू असलेल्या संस्थानांत असून संयुक्त संस्थानाचा तो मोठा अभिमानी होता आणि त्यामुळें तो चालू असलेल्या बंडाच्या अगदीं विरुद्ध होता. कालेंकरून तो राज्यकारभारांत चांगली सुधारणा करील, अशी लोकांची खातरी झाली होती. मिसौरी येथील जे प्रतिनिधि सभेस आले होते त्यांची वृत्ति कळसुत्री बाहुल्याप्रमाणें असून जसें नाचवावें तसेंच ते नाचत होते; अशा रितीनें दुसऱ्याच्या तंत्रानें चालणाऱ्या लोकांनीं लिंकन याचेविरुद्ध मतें दिलीं, यांत मोठेसें नवल नव्हतें.

अखेर स्वतःचीच नेमणूक झाल्याबद्दल जेव्हां लिंकन यास रितीप्रमाणें समजलें तेव्हां तो म्हणाला ' माझी जी ही नेमणूक दुसऱ्या खेपेस झाली आहे, त्या संबंधांत मी स्वतः कांहीं एक प्रयत्न केला नसून त्याचा निर्णय जाहिर रितीनें चार चौघांत झाला; पहिल्या खेपेस जी माझेवर जबाबदारी होती त्या पेक्षां हल्लीं जास्त बोजा माझे डोक्यावर आहे, असें मी समजतों. गुलामगिरी कायमची नाहींशी व्हावी या संबंधी निर्णय संयुक्त संस्थानाच्या दरबारांत होणें बाकी आहे आणि त्यासंबंधी माझें असें निक्षून सांगणें आहे कीं, संयुक्त संस्थानांतून गुलामगिरीचा कायमचा

अस्त व्हावा, अशी सुधारणा राष्ट्राच्या कायद्यांत करणे हल्लीं इष्ट असून ती झाले म्हणजे संयुक्त संस्थानांतील लोकांचा व संयुक्त संस्थानाच्या ( उत्तर दक्षिणेकडील ) अभिमानी मंडळींचा इष्ट हेतु पूर्णपणें सिद्धीस गेला असें ह्मणतां येईल; आणि असें झाल्यानेंच सर्व घोटाळा बंद होईल. स्वातंत्र्य आणि संघशक्ति या दोहोंस आतां कायदेशीर स्वरूप दिलेंच पाहिजे.'

आगष्ट महिन्यांत शिकागो येथें प्रजापक्षी लोकांची राष्ट्रीय सभेची बैठक झाली. ज्या प्रमाणें लोकसत्ताक स्वतंत्रपक्षांत दोन तड होते त्याचप्रमाणें या पक्षांतही दोन तड होते. लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांत दोन तड पडले होते, खरे परंतु त्यांत मत्सरभाव वगैरे फारसे वाढले नव्हते. प्रजापक्षी लोकांत जे दोन तड होते त्यापैकीं एकातडांतील लोकांची प्रवृत्ति युद्धाचें काम जारीनें चालविण्याकडे असून दुसऱ्या तडांतील लोकांचा कल शांतता व आपसांत समजूत करण्याकडे होता. हें युद्ध चालविणारे प्रजापक्षी लोक आणि, लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतल्या एका तडाचे युद्धार्थ प्रवृत्त झालेले लोक, असे मिळून नेमणूक होण्या संबंधी लिंकनच्या तर्फे मत देण्यास प्रवृत्त झाले होते. इ. स. १८६४ सालीं प्रजापक्षी लोकांची सभा भरली, त्यापूर्वी त्यांची स्थिति मोठी अव्यवस्थित होती; त्यास अनुसरून लिंकन एकदां ह्मणालाः— 'ज्या सभेंत शांतता आणि आपसांत समजूत होण्याची वाटा-

घाट चालत असेल तेथें युद्धप्रिय अशा उमेदवारांची नेमणूक व्हावी आणि जेथें युद्धाची वाटाघाट चालू असेल तेथें ज्यांस शांतता प्रिय असेल अशा उमेदवारांची नेमणूक व्हावी; त्यांनीं कोणतीही व्यवस्था केली तरी मी त्यांत विशेष महत्व समजत नव्हतो.'

लिंकन यानें जें शहाणपणाचें धोरण योजिलें होतें, त्याप्रमाणेंच परिणाम चांगला झाला. इलाख्यासाठीं जनरल जॉर्ज बी. मॅकक्लेलन् याची नेमणूक झाली होती आणि सभेनें असें जाहिर केलें कीं, 'सतत चार वर्षें युद्धकरूनही संयुक्त संस्थानाची व्यवस्था धारल्याप्रमाणें होत नाहीं, म्हणून आतां अन्योन्य द्वेष भाव वगैरे सर्व नाहींसे होऊन सर्व जागीं शांतता झाली पाहिजे आणि सर्वांनीं ऐक्यभावानें वागलें पाहिजे.'

बाल्टिमोर येथील सभेनें लिंकन याची नेमणूक केली असून तेथील ठरावांतील मुद्दा असा होता कीं, राष्ट्रीय राज्यकारभारांत पुढारी या नात्यानें संयुक्त संस्थानाच्या बचावा प्रीत्यर्थ युद्धाचें काम लिंकन याच्या देखरेखी खालीं जारीनें चालू करावें. शिकागो येथील सभेच्या सभासदांचा सर्व कल व त्यांचीं मतें प्रजापक्षी लोकांच्या तर्फेचीं होतीं. त्या सभेच्या ठरावाचा मुद्दा असा होता कीं, कांहीं दिवस तह करून युद्धाचें काम तहकूब ठेवावें, अन्योन्य द्वेषभाव नाहींसा व्हावा आणि आपसांत

समजूत होईल असा प्रयत्न करावा; हे सर्व हेतू तडीस जाण्यासाठीं जनरल मॅकक्लेलन्‌ची नेमणूक केली होती, परंतु जनरल या नात्यानें त्याचे हातून कांहीं एक व्हावयाचें नाहीं, असा बऱ्याच लोकांचा ग्रह झाला होता. ह्याच्या जोडीला ओहिओ येथील जार्ज पेंड्‌लूटन्‌ हा उपाध्यक्षाचे जागेस उमेदवार होता. प्रजापक्षी लोकांनीं यास वकील या नात्यानें सभेस अशा उद्देशानें पाठविलें होतें कीं, युद्धाचें काम तहकूब राहून त्याचे बळकटीसाठीं एखादा कायदा करावा. दरम्यान, जे मूळचे लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाचे खरे लोक होते त्यांनीं ओहिओ प्रांतांतील क्लीव्हलँड येथें एक सभा भरविली होती. त्या सभेचा उद्देश असा होता कीं, सर्व लोकांच्या स्वातंत्र्याला मोठा धोका पोहचण्याचा रंग आहे, करितां अध्यक्षानें एक धोरणालाच अनुसरून वागलें पाहिजे. या सभेस लिंकन यानें 'अडुल्लमची गुहा' असें नांव दिलें होतें. दुःखपीडित, कर्जबाजारी, तसेच संकटग्रस्त अथवा ज्यांना कोणतीही दाद मागणें असेल असे, हे सर्व लोक वरील सभेंत जमत असत. त्यांनीं जनरल फ्रिमाँट याची इलाख्यासाठीं नेमणूक केली असून जॉन कार्क्रेन यास उपाध्यक्षाचे जागेसाठीं पसंत केला होता; परंतु पुढें याचे संबंधांत कांहीं एक झालें नसून त्याचा कोठें अस्त झाला हेंही समजलें नाहीं.

जनरल ग्रांट याची संयुक्त संस्थानाच्या फौजेवर उत्तम

देखरेख असल्या कारणानें संयुक्त संस्थानाचें बळ व पराक्रम या दोहोंची दिवसानुदिवस शुक्लपक्षांतल्या चंद्राप्रमाणें वृद्धि होत चालली होती, बंडखोरांचें एक जूट मोडून त्यास उतरती कळा लागली होती, आणि ते अगदीं हताश होत चालले होते. अट्लांटिक महासागराच्या किनाऱ्यावरील बराच मुलूख जनरल ग्रांट यानें आपल्या बलाढ्य आरमाराच्या सहाय्यानें हस्तगत करून विजय संपादन केल्यामुळें, आणि जमिनीवरही त्याच्या शक्ती-प्रभावाचें तेज सर्वत्र फांकून त्यास विजयश्री मिळत गेल्या कारणानें, बंडखोरलोकांस त्यानें अगदीं त्रासून सोडिलें होतें, व अशा रितीनें त्यांच्या सभोंवतीं चहूंकडून संकटाचें वातावारण अधिकाधिक पसरत चालल्यानें ते अगदीं पायमाल होऊन गेले होते. आपसांत निकाल होऊन सर्वत्र शांतता होईल, अशी दाटबातमी उत्तर प्रांतांतल्या लोकांत चालू होती; तेथें जे बंडखोरांचे हितचिंतक होते त्यांचा हेतू, सदरहु बातमी लोकांस चांगल्या रितीनें कळवून जेणेंकरून त्यांचें मन आपसांत समजूत होण्याकडे वळेल, असा दिसत होता. चालू असलेल्या बंडाचा बीमोड झालाच पाहिजे, असें जसजसें जास्त महत्वाचें व अवश्यक दिसूं लागलें, तसतसें युद्धास अधिक भयंकर स्वरूप प्राप्त होऊं लागलें होतें.

अखेर बंडखोरांकडून अल्बामा येथील क्लेमंट सी. क्ले आणि मिसिसिपी येथील जेकब टॉमसन् (मध्य भागचा अध्यक्ष बुशनन्चा सेक्रेटरी) असे उभयता वकील नायगारा नजीक

कानडा देशाच्या सरहद्दीवर आले आणि तेथून होरसेग्रीली (वर्तमानपत्राचा लेखक व मोठा देशभक्त) यांच्याशीं त्यांनीं पत्रव्यवहार चालविला. इ. स. १८६४ च्या जुलई मासच्या ७ व्या तारिखेस ह्या लेखकानें लिंकन यास लिहून कळविलें कीं, सदरहु उभयतां वकील आपसांत समजुती करण्याच्या बाबतींत बोलणें लावण्याच्या हेतूनें वॉशिंगटन येथें येऊं इच्छितात, तर त्यांना अभयपत्र मिळावें. ग्रीले याच्या पत्रांतील मजकूर येणें प्रमाणें: —

आपल्या देशभूमीवर रक्तप्रवाह चालू असून आपले देशबांधवही अगदीं दीन झाले आहेत, अशा स्थितींत आपसांत समजूत झाली तर लोकांस अत्यंत सुखावह होणार आहे. लष्करांत नवीन भरती करून पुनःदेश उध्वस्त होऊन रक्ताच्या नद्या वहाव्या, व तसेंच सरकार आणि त्यांचे सल्लागार हे तह करण्यासहि राजी नाहींत, अशा गोष्टी ऐकतांच अंगावर शहारे उभे राहतात. योग्य संधि आली असून तिचा उपयोग न करून घेणें म्हणजे नुकसान करून घेणें होय, व हें नीतिदृष्टयाही सर्वथैव खरें होय. आपसांत समजूत न होणें आणि युद्ध अव्याहत चालणें, हे प्रकार जर लौकर न मिटविले तर येत्या निवडणूकींत याही पेक्षां पुष्कळ मोठी हानि होण्याचा खास संभव आहे.' ग्रीले यांनें आपल्या पत्रांत तहासंबंधीं बोलणें चालू करण्याचा पाया घातला होता. त्याच्या पत्रांतील पहिल्या दोन्ही बाबती अशा होत्या

कीं, संयुक्त संस्थानाचें रक्षण होऊन तिला पूर्वस्वरूप प्राप्त व्हावें आणि गुलामगिरीची पद्धत नाहींशी व्हावी ह्यास लिंकन यानें जें प्रयोजक उत्तर दिलें, त्यांतील आशय असा होता कीं, गुलामगिरीची पद्धत बंद होण्याविषयीं आणि संयुक्त संस्थानाचें पुनरुज्जीवन होण्याबद्दल, जो पत्रांत उल्लेख होता त्या संबंधांत जेफरसन् डेव्हिड याजकडून योग्य अधिकार ज्यास मिळाला असेल अशा कोणत्याही इसमास बरोबर घेऊन ग्रीले यानें लिंकन यास समक्ष भेटावें आणि काय तो उलगडा करावा. यावरून ग्रीले हा नायगाराच्या धबधब्याकडे जाऊन त्या दोघा वकिलांस भेटला आणि त्यांस सर्व हकिकत कळविली. इकडे अध्यक्षानें कर्नल जॉन याच्या हस्तें आपल्या एका खास सेक्रेटरीस पत्र लिहिलें, त्यांत जी हकीकत होती ती येणेंप्रमाणें:--

मुकाम:—**वॉशिंगटन्** राजवाडा
सरकारी काम करण्याचा दिवाणखाना
ता. १८ जुलई सन १८६४.

' चालू युद्धाचें सर्व काम बंद करून सर्वत्र पूर्वीप्रमाणें शांतता करणें, संयुक्त संस्थानांतील सर्व लोकांची सचोटी राखणें आणि गुलामगिरीचा निषेध करणें, हे सर्व सिद्धांत मंजूर ठेवून आणि संयुक्त संस्थानाची विरुद्ध बाजू स्विकारून जे लोक हल्लीं युद्ध करीत आहेत, त्या सर्वांस आपल्या मुठींत ठेवूं शकेल

अशा कोणाही मनुष्यास राष्ट्रीय सरकारातर्फे भेटण्यास मी खुशी आहे आणि त्याजकडून जी हकिगत मला कळेल त्या संबंधी मी अवश्य विचार करीन; करितां ते उभयतां वकील वर लिहिलेल्या बाबतीस अनुसरून जर येण्यास कबूल असले तर मजकडून मुळींच हरकत नाहीं, त्यांना येण्यास मोकळीक आहे.'

ज्या दोघा वकिलांस वॉशिंगटन् येथें पाठविलें होते, त्यांना तहाचें बोलणें लावण्यास अधिकार दिलेला नव्हता, हें लौकरच उघडकीस आलें. रिचमंड् येथील बंडखोरांचे ते सरकारी नोकर असून कांहीं गुप्त कामगिरी त्यांना सोंपली आहे असें त्यांचें ह्मणणें होतें. परंतु कोणती गुप्त कामगिरी सोंपली होती, याचा मात्र कांहीं एक पत्ता त्यांनीं लागूं दिला नव्हता. ' आह्मीं अतिशय अगत्यानें तहाचें बोलणें लावीत असून हे लोक मुळींच तें पत्करीत नाहींत' असे उद्गार काढून आपल्या मनाचा अगदीं विरस झाला असें त्यांनीं दाखविलें व ते आपल्या मुक्कामीं चालते झाले. बंडखोरांच्या पुढाऱ्यांच्या मनांत काय काय विचार घोळत आहेत व त्यांचा कल कोणीकडे आहे, हें जाणण्याची इतरांपेक्षां लिंकन यास चांगली विद्या साधली होती आणि रिचमंडहून आलेल्या सदरहु उभयतां वकिलांची ' शुद्धबुद्धि ' नसावी असें लिंकन यानें प्रथम पासूनच भाविष्य करून ठेविलें होतें; त्यांतून बंडखोर लोक आपलें जूट मोडून तह करण्यास कबूल अस-

ण्याचा फारसा संभवही नव्हता. प्रजापक्षी लोकांस सर्वत्र शांतता असावी असें वाटत होतें, ह्मणून त्यांनीं ह्या बाबतीसंबंधी मोठा गवगवा केला असून लोकसत्ताक स्वतंत्र पक्षाची कांहीं मंडळी त्यांस अनुकूल होती. लिंकन याची पुनः निवडणूक होण्याबद्दल जे लोक त्याच्या विरुद्ध होते त्यांनीं नायगारा येथें घडलेल्या हकिगती-विषयीं मोठ्या जोराचा वादविवाद केला; व त्याचा परिणाम असा झाला कीं लोकसत्ताक पक्षाच्या सभेच्या व्यवस्थापकांनीं बंडखोरांशीं आपसांत निकाल करून तह करावा असें ठरविलें. कारण त्यांची अशी समजूत होती कीं, बंडखोर लोक तह करण्यास खुशी आहेत. सदरहु उभयता वकील येऊन गेले, त्या संबंधांत लिंकन आपल्या एका मित्रास म्हणालाः—"ह्याचा परिणाम कांहीं होणार नाहीं असें म्हणणें व्यर्थ आहे, ग्रीले याचें तोंड मात्र बंद होईल आणि जे लोक तह व्हावा म्हणून ओरडत आहेत त्यांची खातरी होईल; कांहींही असो; त्यांत कांहीं तरी तथ्यांश आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं."

लोकमत अनुकूल पडल्यानें मेरिलँड प्रांतांतील लोकांनीं गुलामगिरी नाहींशी केल्याबद्दल जाहीर केलें आणि त्याप्रमाणें राज्यकारभाराच्या चालू नियमांत सुधारणा केली. स्वातंत्र्यप्रिय लोकांना ह्यापासून मोठा संतोष झाला, त्यांत मुख्यत्वें करून अध्यक्ष लिंकन यास तर अत्यानंद झाला. तो आपल्या एका स्नेह्यास

म्हणाला कीं 'मेरिलँडचें हें कृत्य रणभूमी वर हजारों वेळां जय प्राप्ति मिळविल्याप्रमाणेंच आहे. मी जी ही धडपड करीत आहे, ती राज्याची उलथापालथ होण्यासाठीं करीत नसून तें सदैव कायम राहण्यासाठींच करीत आहे आणि त्यांत राज्य उलथून पाहण्यास जे प्रवृत्त होत असतील त्यांस प्रतिबंध करण्याचा माझा निश्चय आहे. परमेश्वर कृपेनें जर मी जिवंत राहिलो तर येत्या मार्चच्यां चवथ्या तारिखे पावेतों मीच अध्यक्ष होईन अथवा नोवेंबर महिन्यांत राज्य पद्धतीस अनुसरून ज्याची निवडणूक होईल त्यास मार्च महिन्यांत रितीप्रमाणें आधिकार मिळतील.

युद्धांत पुष्कळ हानि झाल्यां कारणानें सैन्यांत भरती करण्याची बरीच अवश्यकता होती. लिंकन याची पुनः निवडणूक होण्याबद्दल कित्येक मित्रे लोक फार अधीर झाले होते, त्यांनीं अशी सल्ला दिली कीं, लष्करांत भरती वगैरे करण्याचें काम, निवडणुकीचें काम आटोपेपावेतों, लांबणीवर टाकावें. अशा मसलती ऐकण्या इतका लिंकन हा खुळा नव्हता. त्याचें मत असें होतें कीं ' लढाई करून अखेर जय मिळवावयाचा हा जर कृतनिश्चय आहे, तर लष्करांत सैन्याची भरती केलीच पाहिजे; देशाच्या कल्याणासाठीं काय केलें पाहिजे, याचा विचार केला तर देशकल्याणापेक्षां स्वतःची अगर आपली निवडणूक करणाऱ्या मंडळीची विशेष किंमत नाहीं असें कळून येईल. '. ठरल्याप्रमाणें त्यानें पांच लक्ष

लोकांची मागणी केली. इ. स. १८६४ ता. ९ सप्टेंबर पावेतों तितकी संख्या न भरली तर मात्र मसुद्याचा अंमल करावयाचा त्याचा बेत होता. ही हकीकत ऐकून लिंकनच्या कांहीं भित्र्या स्नेही मंडळीच्या अंगावर कांटा उभा राहिला.

लोकांची आपणावर अशा प्रकारची श्रद्धा आणि भक्ति असलेली पाहून लिंकन यास समाधान वाटणें साहजिक होतें. पेनसिल्वॅनिआ येथून प्रथम जी मंडळी त्याची पुनःनिवडणूक झाल्याबद्दल अभिनंदन करण्यास आली होती तसि तो म्हणाला 'मी जर माझें अंतःकरण ओळखून आहे तर माझी पुनःनिवडणूक झाली म्हणून माझ्या कृतज्ञतेला कोणत्याही प्रकारें डाग लागणार नाहीं, मजविरुद्ध जे लोक आहेत त्यांचे कसेही विचार असले तरी, त्यांना कांहीं बोलण्याचें मला कारण नाहीं; दुसऱ्याची नाककट्टी होऊन आपण यशानें फुगावें यांत मला मोठें भूषण वाटत नाहीं. मनुष्यजातीचे स्वाभाविक हक्क आणि स्वतंत्र राज्यव्यवस्था या संबंधांत लोकांचा जो निश्चय आहे त्यांचें सर्व श्रेय जगन्नियंत्या परमेश्वरासच आहे, आणि म्हणून मी त्याचा सदैव ऋणी आहे.'

तारायंत्रद्वारें डॉ. हेनरी याजकडे निवडणूक झाल्याबद्दल जी बातमी पाठवावयाची त्यावर लिंकन याची खरेपणाची सही असणें हें डॉक्टर हेनरी याजला विशेष पसंत पडेल, अशाबद्दल जेव्हां

स एक पत्र जेफरसन् डेविस्च्या नांवें लिहून देऊन त्यांत असें दर्शविलें होतें कीं, मिस्तर ब्लॅअर याजबरोबर पाठविलेलें पत्र आपण साग्र वाचलें असून बंडखोरांच्यातर्फे कोणीही मोठ्या पदवीचा वकील आपसांत समाधानीचें बोलणें लावण्यास आला असतां त्याचा अनादर होणार नाहीं; मात्र हा देश ह्मणजे आपल्या सर्वांची मातृभूमी आहे, हें लक्षांत ठेवून तेथें सर्वत्र शांतता असावी, हें तत्व मनांत चांगलें बिंबवून त्यानें तहाचें बोलणें लावावें.

लिंकन याच्या सदर पत्राअन्वयें डेविस् यानें तहाचें बोलणें लावण्यासाठीं तिघे वकील तयार करून अध्यक्षाकडे पाठविले. जनरल **ग्रांट** याच्या छावणींत ( १ ) **आलेक्झांडर एच्. स्टिफन्स्** ( २ ) **आर. एम. टी. हंटर** आणि ( ३ ) **जॉन ए. कँबेल**, असे त्रिवर्ग वकील जाऊन पोंहचतांच आपसांत समाधान करण्याविषयीं लिंकन याच्या शर्तींचें धोरण काय होतें तें त्यांना तेथें कळविलें. ह्या धोरणाचें तीन प्रकार होते, ते खालीं लिहिल्याप्रमाणें:—( १ ) सर्व संस्थानांत राष्ट्रीय सत्तेचें पुनरुज्जीवन झालें पाहिजे, ( २ ) काँग्रेसकडे जी वार्षिक हकिगत आली आहे, त्या हकीगतींत आणि त्यापूर्वींच्या सर्व लेखांत गुलामगिरीच्या प्रश्नाबद्दल जें जें प्रतिपादन केलें आहे, त्यासंबंधांत संयुक्त संस्थानाचे सत्ताधीश कधींही माघार घेणार नाहीं-

तें, व ( ३ ) सैन्यांतील जे लोक सरकाराविरुद्ध उठले असतील, त्यांस नोकरींतून एकदम कमी केले पाहिजे ह्मणजे अन्योन्य वैरभाव अगदीं नाहींसा होईल हें उघड आहे.

वर ज्या तीन मुख्य शर्ती दिल्या आहेत, त्यापैकीं एका शर्तीसही, बंडखोरांच्या चालू क्रमांत मोठें स्थित्यंतर झाल्याशिवाय, त्यांच्याकडून मान्यता मिळणें संभवनीय नव्हतें. त्यांचे मनांत या गुलामगिरीच्या पद्धतीसंबंधांत बरेच दिवस घोळत असलेले कृष्णकारस्थानाचे विचार अगदीं सोडून देण्याबद्दल लिंकन याजकडून त्यांस सूचना झाली; शिवाय त्यानें असेंही कळविलें कीं, कोणत्याही प्रकारचें तहाचें बोलणें चालत असलें तरी बंडखोरांची कोंडमाऱ्याची स्थिति आहे तशीच राहील. राष्ट्रीय सत्तेसंबंधीं सर्व हकीगत त्या त्रिवर्गास सांगण्याबद्दल सेक्रेटरी सिवर्ड यास लिंकन यानें स्पष्ट कळविलें. मनरो किल्ल्यांत त्रिवर्ग वकिलांची भेट घेण्यास सेक्रेटरी सिवर्ड हा गेला व त्याचे मागून लिंकनही जाणार, अशी बातमी पसरतांच सर्व वॉशिंग्टन् शहरांत मोठी चळवळ चालू झाली; कारण कित्येक लोकांची अशी समजूत झाली होती कीं, लिंकन याची अधीरवृत्ती असल्यामुळें तो त्या त्रिवर्ग वकिलांच्या सर्व गोष्टी एकदम कबूल करील.

कॉंग्रेसच्या बैठकीचें काम चालू होतें, आणि राजनीति जाणणारी कांहीं विद्वान् मंडळी वरील कारणामुळें फार संतापली होती. ज्या भव्य इमारतींत कॉंग्रेस भरली होती, त्या इमारतीसभोंवतीं, लिंकन आणि त्रिवर्ग वकिलांच्या भेटीसंबंधांत जी थोडीबहुत माहिती मिळाली त्यासंबंधी विवेचन करीत इकडून तिकडे, ही मंडळी फिरत होती. हा समय खरोखरच सर्वत्रांस मोठी काळजी उत्पन्न करण्यासारखा होता. मनरो किल्ल्याजवळ जी आगबोट थांबली होती, तेथें अध्यक्ष व संस्थानाचा सेक्रेटरी असे उभयतां, त्रिवर्ग वकिलांस भेटले. त्या सर्वांचें बराच वेळपावेतों संभाषण चाललें होतें. त्यांत, ' गुलामगिरीच्या प्रश्नासंबंधांत संयुक्तसंस्थानांतील सत्ताधीशांचा जो निश्चय आहे, तो यत्किंचित्‌ही ढळणार नसून बंडखोर लोकांनींही त्याला अनुसरूनच वर्तन ठेविलें पाहिजे; दास्यविमोचनाचे संबंधांत अध्यक्षानें जो जाहिरनामा प्रसिद्ध केला आहे, त्यांत तिळमात्रही फिरवाफिरव आतां व्हावयाची नाहीं; गुलामगिरीचा उच्छेद केल्याबद्दल कॉंग्रेसने जो कायदा मंजूर केला आहे, तो एकंदर संस्थानांपैकीं तीनचतुर्थांश संस्थानिक मंजूर करतील यांत तिळमात्र संशय नाहीं आणि त्यांत आतां कोणत्याही रितीनें फेरफार व्हावयाचा नाहीं; ' याप्रमाणें सर्व हकिगत त्रिवर्ग वकिलांस त्या उभयतांनीं स्पष्ट कळविली.

तहासंबंधी बोलणें चालूच आहे, तर आतां परस्पर वैरभाव नाहींसा होऊन युद्धाचें कामही बंद राहावें, अशाबद्दल त्रिवर्ग वकिलांनीं आग्रह धरून बराच उहापोह केला; परंतु त्यांतून कांहीं एक निष्पन्न झालें नाहीं; त्यांनीं लिंकन याचे धोरणाप्रमाणें पत्रव्यवहार करण्याबद्दल मात्र आपली खुशी दर्शविली; परंतु लिंकन हा मनांत खास समजूत होता कीं, वादविवादाचा बाहाणा काढून कोणत्याही रितीनें लढाई तहकूब करावी आणि तहाचें बोलणें लावावें; व दरम्यान जो वेळ सांपडेल त्या मुदतींत बहुतेक पराजित झालेल्या बंडखोरांनीं मुकाट्यानें पुनः युद्धाची तयारी करावी, असा बंडखोरांचा अंतस्थ हेतु आहे. अशा कारणामुळें त्यास जरी त्रिवर्ग वकिलांनीं तहासंबंधी सूचना केल्या, तरी पण लिंकननें कानावर हात ठेविले होते; इतकेंच नव्हे तर अशा स्थितींत युद्धाचें काम जारीनें चालविण्याबद्दल त्यानें जनरल ग्रांट यांस लिहिण्यास कमी केलें नाहीं.

लिंकन यानें प्रथमपासूनच भविष्य केलें होतें कीं, या त्रिवर्ग वकिलांस भेटून कांहीं एक निष्पन्न व्हावयाचें नाहीं. मनरो किल्ल्यावरून अध्यक्ष आणि सेक्रेटरी हे जेव्हां हात हालवीत परत आले, तेव्हां वॉशिंग्टन् येथील लोकांस पुष्कळ बरें वाटलें आणि त्यांच्यांत झालेली वाटाघाट लोकांच्या कानीं येतांच. सर्वत्रांस मोठेंच आश्चर्य वाटलें; प्रतिनिधी मंडळींनीं

एक ठराव केला कीं, अध्यक्षानें काय काय काम केलें व त्याचा लोककल्याणाशीं कितपत् संबंध होता, याबद्दल त्यानें कैफियत रुजूं करावी; यासंबंधांत अध्यक्षानें कागदोपत्रीं जीं उत्तरें पाठविलीं, ते सर्व कागद प्रतिनिधि मंडळीस वाचून दाखविले.

सदरहु कागदपत्र वाचून दाखविल्यामुळें राजनिष्ट लोकांच्या मस्तकावरील ओझें कमी होऊन त्यांना मोठा संतोष झाला. त्यांना वाटलें कीं वरील हकिगतीमुळें अध्यक्षाच्या पदवीस अगर अब्रूस धक्का लागला नसून त्याचे शहाणपणाची व दूरदर्शीपणाची या कामीं लोकांनीं पुष्कळ स्तुति केली. मोठ्या पूज्य बुद्धीनें व शहाणपणानें जो आपसांत निकाल व्हावयाचा होता त्या प्रश्नाचा कायमचा निर्णय आतां झाला होता. तह व्हावा अशी ओरड ज्या लोकांची होती त्यांचीं तोंडें वरील प्रकारामुळें अगदीं बंद झालीं. प्रतिनिधिमंडळीस जसजसें वरील कागद समजाविण्यांत येत होते, तसतसें त्यांचे संशय दूर झाले. अध्यक्षाचे जे स्नेही होते त्यांच्या मुखावर टवटवी दिसूं लागून त्यांचीं अंतःकरणें आनंदानें प्रसन्न झालीं आणि कागद समजविण्याचें काम संपताच लोक लिंकनच्या नांवानें जयजयकार करूं लागले. एकंदरींत आपसांत निकाल करण्याचे कामीं अध्यक्षानें भगीरथ प्रयत्न केलें, परंतु ते सफळ झाले नाहींत तरी पण लोकांनीं त्याच्या शहाणपणाचें चांगलें गौरव केलें.

मि. स्टिफन्स् हा त्रिवर्ग वकिलांपैकीं एक असून बंड-खोरांच्या एक जुटांत उपाध्यक्ष होता; त्यानें अब्राहाम याच्या स्वभावाचें फारच वर्णन केलें व त्याचे सद्गुण पाहून तो अतिशयच चकित झाला. तो आपल्या मुक्कामास परत आल्यानंतर त्यानें ही गोष्ट जाहीरपणें सर्वत्रांस बोलून दाखविली. लिंकन याच्या अनेक सद्गुणाबद्दल उत्तर प्रातांत प्रसिद्ध होणाऱ्या वर्तमानपत्रांतूनही हकिगती येऊं लागल्या आणि त्यामुळें त्याच्या विषयीं लोकप्रीति उत्तरोत्तर वृद्धिंगत होत चालली.

त्या सालच्या डिसेंबर महिन्यांत भरणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या सभासदांकडे लिंकन हा कांहीं हकिगत लिहून पाठविण्याचा विचार करीत होता, त्या सुमारास शर्मन्‌हा अटलांटाच्या मार्गानें समुद्राकडे जात होता. तिकडे जाण्याचा हेतू आद्याप त्यानें कळविला नव्हता, परंतु लोकांचा असा कांहीं भरंवसा ह्या बड्या जनरलावर बसला कीं, त्याला अपयश येईल असें कोणास वाटलें नव्हतें. कित्येकांस वाटत होतें कीं, मेक्सिकोच्या आखात नजीक बंडखोरांच्या हद्दींत कोठें तरी तो कांहीं दिवसांनंतर आहे असें समजेल आणि कित्येकांचें म्हणणें होतें कीं, तो अटलांटिक् महासागरावरूनच कोठें तरी बंदरावर प्रगट होईल. ह्या संबंधांत लिंकन यानें अगदीं मौन्यव्रत धारण केलं होतें. शर्मन् हा हल्लीं सर्व बाबतींतून मोकळा झाला होता आणि

बंडखोर लोकांच्या एक जुटाच्या मुळांत काय आहे, हें तो बारीक रितीनें शोधून पाहत होता. लिंकन यास राष्ट्रीयसभेकडे जी वार्षिक कैफियत पाठवावयाची होती, ती त्यानें मुद्दाम लांबणीवर टाकिली, कारण, शर्मन् यानें समुद्रांत सफर करून जय मिळविल्याबद्दलची हकिगत त्यांत लिहून नंतर ती वार्षिक कैफियत पाठवावयाची होती. नंतर लिंकन यानें जी कैफियत पाठविली त्यांत शर्मन्च्या संबंधांत मोघम मजकूर लिहिला होता, त्यामुळें त्याला समाधान वाटलें, कारण, अशानें परिणाम चांगला निष्पन्न होईल असें त्यानें ठरवून ठेविलें होतें.

अब्राहामलिंकन ज्यावेळीं सदरहु कैफियत कॉंग्रेसकडे पाठविण्यासाठीं तयार करीत होता, त्यासंबींत बंडखोर लोकांच्या दोघा अंमलदारांच्या दोघी बायका त्याच्या भेटीस्तव आल्या व त्यांनीं त्यास आपली हाकिगत कळविली. उत्तर प्रांतांतील संयुक्त संस्थानाच्या एका किल्ल्यांत सदरहु दोघा अंमलदारांस युद्धांत सांपडलेले कैदी म्हणून अडकवून ठेविलें होतें, व त्यांची सुटका करण्याविषयीं त्या स्त्रियांनीं विनंती केल्या वरून त्यांना त्यानें मोकळे केले. ज्या कागदावर कैफियतीचा मसुदा त्यानें केला होता, तो कागद त्यानें आपल्या एका खासस्नेह्यास दिला आणि त्यांत सदरहु दोघी बायकांच्या भेटींत जें संभाषण झालें होतें त्याचीही हकिगत लिहिली होती.

इ. स. १८६५ मार्च ता. ४ रोजीं लिंकन याच्या दुसऱ्या निवडणूकीचा समारंभ झाला. त्या दिवशीं आकाश ढगांनीं व्याप्त होऊन जिकडे तिकडे काळोख झाला असून अगदीं शून्य दिसत होतें. अशा रितीचा तो मोठा वाईट दिवस उगवला असून पाऊसही सकाळीं बराच पडत होता. कांहीं वेळानें पाऊस पडणें बंद झाल्यावर व्हाइट हौस राजवाड्यांतून ज्या भव्य इमारतींत समारंभ व्हावयाचा होता, तिकडे जाण्यास मोठ्या थाटाची मिरवणूक निघाली. अशा थाटाच्या समारंभांत जेव्हां लिंकन भाषण करण्यास उभा राहिला, त्यावेळीं आकाशांतलीं अभ्रें एकाएकीं वितळून जाऊन स्वच्छ सूर्य प्रकाश पडला आणि त्यामुळें सर्व समारंभास अपूर्व शोभा आली होती. ढगांनीं व्याप्त झालेलें आकाश एकाएकीं निर्मळ होऊन सूर्य प्रकाश पडणें, हा एक मोठा शुभ शकूनच समजून लिंकन यानें उद्गार काढिले; त्यावेळीं त्याचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले होते; तो म्हणाला 'माझ्या मित्रांनो! हा शुभ शकून म्हणजे आपली कार्यसिद्धि होण्याचें एक सुचिन्हच म्हटलें पाहिजे.' लिंकन हा अतिशय भाविक असून शकुनादि प्रकारावर त्याची श्रद्धा होती. सरकारी भव्य इमारतीच्या पायऱ्या चढून जेव्हां त्यानें अध्यक्षाच्या जागेची सर्व जवाबदारी दुसऱ्या खेपेस माथ्यावर घेऊन तो वचनबद्ध झाला, त्यावेळीं सदरील शुभ शकूनाचा त्यानें पुनः पुनः ऊल्लेख केला, आणि अशा वचनबद्ध

स्थितींतच तो मृत्युमुखीं पडून इहलोकच्या सर्व जबाबदारीं-तून कायमचा मोकळा व्हावयाचा होता. हा दुसरा समारंभ अतिशयच प्रेक्षणीय असून पहिल्या समारंभापेक्षां या खेपेस हजारों लोक विशेष आनंदांत निमग्न झाले होते. मार्च महिन्यांत बहुधा सूर्याचीं किरणें फारशीं प्रखर नसतात अशा वेळीं एका विस्तीर्ण व मोकळ्या जागेंत लिंकन यानें जें उत्तम व चटक-दार भाषण केलें, त्याचें तात्पर्य येणें प्रमाणें:—

" प्रिय देशबांधवहो!

प्रथम ज्यावेळीं मी अध्यक्षस्थान स्विकारिलें, त्यावेळीं मला लोकांस पुष्कळ सूचना करण्याची फार अवश्यकता दिसली होती; परंतु तशी हल्लीं दिसत नसून पुन: मी अध्यक्ष-स्थान स्विकारून वचनबद्ध होत आहे. पहिल्या खेपेस काय काय करावयाचें त्याची एक सविस्तर कैफियत तयार करणें मला उचित दिसलें होतें; परंतु या चार वर्षांत सर्व लोकांस युद्ध प्रसंगाचे व हरएक प्रकारचे अनुभव येऊन ते चांगले माहि-तगार झाल्यानें तशी कैफियत हल्लीं तयार करण्याचें मला प्रयो-जन दिसत नाहीं. आपलें सर्व बळ, युद्धकला व शस्त्रकला, या दोहोंवर मुख्यत्वेंकरून अवलंबून आहे; आणि त्या संबंधीं आतां माझे सर्व देशबांधव ज्या अर्थीं चांगले माहितगार झाले आहेत, त्या अर्थीं मला व माझ्या सर्व मंडळीस मोठा संतोष होत

असून चांगली उमेद येत आहे. या सर्व हकिकतीवरून माझी अशी खातरी आहे कीं, आपले सर्व मनोरथ परमेश्वर कृपेनें पार पडतील.

' चार वर्षांपूर्वीं असाच प्रसंग होता; त्या वेळीं आपसांतल्या युद्धाचें उग्ररूप पाहून सर्वत्रांस मोठी भीति पडत असे व त्यामुळें जो तो तसा प्रसंग टाळण्याचा प्रयत्न करीत असे. त्यावेळींही माझ्या संभाषणाचा हेतू असाच होता कीं, युद्धाचा प्रसंग न येतां संयुक्त संस्थानाचें संरक्षण व्हावें. एकंदर लोकसंख्येंत १/८ भाग काळे सिद्दी होते आणि त्यांचा विस्तार केवळ संयुक्त संस्थानांतच नसून त्याचे दक्षिण भागांतही ते वसाहत करून राहिले होते. देशांत या काळ्या सिद्दी लोकांसंबंधीं पुष्कळांना अतिशय कळकळ उत्पन्न झाली आणि त्यामुळेंच युद्धाचा प्रसंग आला. या युद्धांत उभय पक्षांचा धर्म एकच असून त्यांचें आराध्य दैवतही एकच आहे. ईश्वराची आपणांस मदत असावी, अशी प्रार्थना ईश्वराजवळ दोघांचीही असावयाची. दुसऱ्याच्या निढळीच्या घामाच्या पैशावर आपण दृष्टी ठेवून त्याचा अभिलाष करणें व अशा कामीं परमेश्वराचें साह्य मागणें, हें केवढें धाडसाचें कृत्य आहे, याचा विचार करा. परमेश्वर न्यायी आहे, आणि त्याची सर्वत्र समदृष्टि आहे. दोघांनीं एकाच विषयाबद्दल प्रार्थना केली तर त्याची फलश्रुति दोघांसही सारखी कधीं होणार नाहीं.

परमेश्वराची करणी अगाध असून तिचा कोणालाच अंत लागणार नाहीं. ह्या भूतलावर नाना प्रकारचे आधि, व्याधि, शोक, वगैरे उत्पन्न होतात, याचें कारण पातकच होय आणि पातकी मनुष्यावरच असे प्रसंग निःसंशय गुदरतात. अमेरिकेंत चालू असणारी गुलामगिरीची पद्धत हें पातकच आहे, असें आपण गृहीत धरिलें तरी पण ही पद्धत कांहीं दिवस चालू राहावी अशी ईश्वरीइच्छा होती. ही पद्धत चालू राहण्याची ठरीव मुदत संपली तेव्हां आतां परमेश्वरास ती नाहिंशी करणें आहे आणि ह्यासाठींच त्यानें दक्षिण आणि उत्तर या दोन्हीं प्रांतांतील लोकांत भयंकर युद्ध उपस्थित केलें आहे. या युद्धांत जे दुष्ट, घातकी आणि वितंडवादी आहेत, त्यांचा संव्हार होत आहे. जे लोक ईश्वराचे अस्तित्व मानितात त्यांची अशी समजूत असते कीं, सर्व कृत्यांस कारणीभूत ईश्वरच आहे. या चालू असलेल्या युद्धाचा भयंकर कोरडा आतां नाहींसा व्हावा, अशी आह्मी ईश्वराजवळ भक्तिपूर्वक प्रार्थना करीत आहोंत, आणि त्याचा न्याय सर्वस्वी खरा असावयाचाच, यांत तिळमात्र संशय नाहीं. कोणी कोणाचा द्वेष करूं नये; प्रत्येकाची धर्माकडे प्रवृत्ति असली पाहिजे आणि कसाही प्रसंग गुदरला तरी खरा मार्ग सोडूं नये, कारण, परमेश्वर खऱ्याचाच वाली आहे; ह्या सर्व गोष्टी हृत्पटावर चांगल्या खोदून ठेवून जें सत्कार्य आपण आरंभिलें आहे, तें पूर्ण केलें पाहिजे; आपण आरंभिलेलें सत्कार्य,

कोणतें ह्मणाल तर (१) सर्व राष्ट्रास जे घाव बसले आहेत, ते रुजून भरून आणणें, (२) जे लढाईत गत झाले असतील त्यांस सद्गति मिळेल असे उपाय करणें, इतकेंच नव्हे तर त्यांच्या अनाथ विधवा व लहान लहान मुलें बाळें यांचें संगोपन करणें, आणि (३) जेणें करून सर्व राष्ट्रांत शांततेचें चिरकाल वास्तव्य राहील, असे सतत स्तुत्य उद्योग करीत असणें; ह्या सर्व गोष्टी आपल्या हातून घडल्या ह्मणजे आरंभिलेलें सत्कार्य तडीस नेलें असे होईल आणि जन्मास येऊन आपण आपलें कर्तव्य कर्म आणि देहाचें सार्थक केल्या सारखें होईल यांत संशय नाहीं."

ज्यांनीं ज्यांनीं सदरहु व्याख्यान ऐकिलें व ज्यांनीं तें वाचलें, त्यांच्या मनाच्या झालेल्या स्थितीविषयीं वर्णन करणें खरोखरच अशक्य होय. लिंकन याचा उंचस्वर आणि गंभीर मुद्रा पाहून सर्वांस असें वाटलें कीं, हा कोणी मोठा भविष्य वादीच आहे कीं काय? सदरहु व्याख्यानांत संयुक्त संस्थानाचें रक्षण होण्यासाठीं चालू असलेल्या युद्धाचे भयंकर परिणाम आणि गुलामगिरीच्या पद्धतीचें राक्षसी स्वरूप इतक्या उत्तम रितीनें व्यक्त केलें होतें कीं, लोकांस मोठी भीति पडून त्यांचे पोटांत एके प्रकारची धडकीच बसली. या व्याख्यानांत लिंकननें आपल्या शहाणपणाचा आणि कुशाग्रबुद्धीचा अगदीं

फळस करून सोडिला होता, आणि तो अखेरचाच होता. त्यानंतर जे जे मोठमोठे विद्वान् व्याख्याते आणि राज्यकारभारांत मोठे मुत्सद्दी होऊन गेले, त्या सर्वांत अब्राहामलिंकन यानेंच खरा पुरुषार्थ साधला होता. अमेरिकेंत गुणवान्, बुद्धिवान्, कुलिन, सुशील आणि राजकार्यधुरंधर असा सत्पुरुष कोण होऊन गेला, असा जर कोणास प्रश्न विचारला तर त्याचें उत्तर ' अब्राहमलिंकन ' असेंच सर्वांकडून अद्याप पावेतों मिळत आहे.



# प्रकरण २५ वें.

## व्हाइट हौस राजवाड्यांत अध्यक्ष आणि त्याच्या घरमंडळीचे नित्य व्यवसाय.

॥विपदि धैर्यमथाभ्युदयेक्षमा। सदसि वाक्पटुता युधिविक्रमः॥ ॥
॥यशसिचाभिरुचिर्व्यसनंश्रुतौ।प्रकृतिसिद्धमिदंहिमहात्मनाम्॥



क सेंही ऐश्वर्य प्राप्त झालें, तरी जो उन्मत्त होत नाहीं व आपली जुनी रीत व साधी राहणी सोडित नाहीं तोच खरा व धन्य सत्पुरुष समजावा, आणि अशीच साधी राहणी लिंकन घराण्यांतील प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या अगदीं अंगवळणींच पडली होती. लिंकन यास थाट माट करून विनाकारण आपलें प्रस्थ माजविण्याची संवय अगदीं नव्हती आणि त्यामुळें तो विशेष लोकप्रिय होऊन प्रसिद्धीस आला. पोकळ शिष्टाचार करणारांचा तो अतिशय धिःकार करित असे. खऱ्या मार्गानें चालणें, हेंच त्याचें शील अखेर पावेतों कायम राहिलें; व त्यामुळें त्याला सर्व लोक मान देत असत. एके दिवशीं कांहीं नागरिक मंडळी एका संस्थानांत कित्येक नेमणूकी करण्याचे संबंधांत एक अर्ज घेऊन लिंकन याजकडे आली. सदरहु अर्जीत सिनेटर बेकर ( लिंकनचा जुना मित्र ) याची बरीच निंदा केलेली असून कांहीं जागा नेमणुकी करण्या साठीं रिकाम्या आहेत, असेंही लिहिलें होतें. त्यावेळीं सिनेटर बेकर हा पाहुणा यानात्यानें व्हाइटहौऊस राजवाड्यांत अध्य-

क्षाकडे राहिला होता. सदरहु अर्जांत आपल्या जुन्या स्नेह्याची व्यर्थ निंदा केलेली पाहुन लिंकन यास मोठा राग आला व त्या रागाचे आवेशांत त्यानें तो अर्ज जाळून टाकिला.

अब्राहामलिंकन यानें व्हाइटहौस राजवाड्यांत कांहीं कांहीं करमणूकीचे प्रकार चालू ठेविले होते. वास्तविक ती वेळ गमतीची नव्हती, कारण, युद्धांत जे वीर तन पावले, त्यांच्या अनाथ गतभर्तृका स्त्रियांचे आक्रोश सर्वत्र ऐकूं येत होते, परंतु लिंकन यानें सर्वांचें समाधान करून व त्यांच्या अन्नवस्त्राची व्यवस्था करून त्यांचें दुःख निवारण केलें होतें. लिंकन यास बहुमान देण्याच्या हेतूनें कोठें कोठें थाटाच्या जेवणावळी त्यावेळीं होत होत्या, परंतु तो प्रथम अध्यक्ष झाला त्यावेळीं जो, एकदां सायंकाळीं मोठ्या थाटाचा भोजनसमारंभ झाला, तसा कधींच झाला नव्हता. लिंकन हा गाण्याचा मोठा शोकी होता ह्मणून नाटक गृहांत एक स्नेही बरोबर घेऊन तो हमेश जात असे व कोणी ओळखणार नाहीं अशाच जागीं बसण्याची त्यानें पद्धत ठेविली होती. आज पावेतों त्यानें जे श्रम घेतले त्यांच्या परिहारार्थ केवळ करमणूकीस्तवच तो नाटक गृहांत जात असे. आधींच गाण्याचा शोकी आणि त्यांत रंगभूमीवर एखादे पात्र येऊन उत्तम रितीचे हाव भाव व अंगविक्षेप करूं लागलें ह्मणजे त्यास अतिशय आनंद वाटे. सायंकाळच्यावेळीं आपली पत्नी

विश्रांति घेण्याच्या खोलींत सुखदुःखाच्या गोष्टी बोलण्यासाठीं त्याची वाट पाहत बसत असे, तेथें त्याचा जाण्याचा क्रम होता.

लिंकन याचें जेवणखाण अगदीं साधें असें; जडान्न तो बहुधा सेवन करीत नव्हता. जेवण्याचे वेळीं रितीप्रमाणें मद्य हें यावयाचेंच, परंतु त्यांतील एक थेंब म्हणजे केवळ काळ-कूट विषच, असें तो समजत होता; मात्र त्याची स्नेही मंडळी तें मद्य प्राशन करीत असत. पंक्तीप्रपंच न व्हावा म्हणून तो फक्त मद्याचे भांड्यास स्पर्श करी. तो सरकारी कामाकाजांत नेहमीं अगदीं गढून जाई, त्यावेळीं त्याची चर्या नेहमीं चिंता-ग्रस्त दिसत असून खाण्यापिण्याचेंहि त्याला मुळींच स्मरण-राहत नसे; जशी सवड मिळेल तसें यावें व वाटेल तेव्हां जेवावें असा त्याचा क्रम चालू होता. एखादेवेळीं त्याच्या बायकोनें वेळ झाली म्हणजे जेवणाचें ताट वाढून त्याचे जवळ न्यावें, परंतु त्यावेळीं तो जर कामांत निमग्न असला तर त्या अन्नाला, शिवतही नसे. आपला नवरा कामांत गर्क आहे असें पाहून वाढलेलें ताट तेथें झांकून ठेवून तिला परत जावें लागे; नंतर त्याला भूक लागली म्हणजे तें गार झालेलें अन्न तसेंच त्यानें खावें; कधीं कधीं लिंकन आपल्या खोलींत चिंताग्रस्त व कोण-त्या तरी एखाद्या विषयाचा विचार करीत बसे, अशा वेळीं टॉड (त्याचा मुलगा) यानें धांवत धांवत, ' बाबा ! बाबा ' ! म्हणून

ओरडत त्याचे जवळ यावें ह्मणजे मात्र त्याची ती चिंता व चाललेले विचार पार नाहींसें होऊन त्याची मुद्रा तात्काल प्रसन्न-होई ; ।अमृतं बालभाषणं। या उक्ति प्रमाणें आधींच लहान मुलाचें भाषण गोड, त्यांत हा तर प्रत्यक्ष मुलगा, मग काय विचारता, **लिंकन** याचा हर्ष गगनांत मावेनासा होई. इ० स० १८६१ सालीं ज्यावेळीं **लिंकन** यानें सहकुटुंब सहपरिवार **व्हाइट** हौस राजवाड्यांत पाय ठेविला, त्यावेळीं त्याला फक्त तिघे मुलगे होतें. वडील मुलाचें नांव **रॉबर्ट** असून त्याचें वय १८ वर्षांचें होतें. **वुइलि** यास १० वें वर्ष नुकतेंच उलटलें होतें आणि **टॉमस्** उर्फ **टॉड** फक्त ८ वर्षांचा होता. इ० स० १८६३ ता. ४ एप्रील रोजीं या मुलास अकरावें वर्ष लागलें आणि **व्हाइट** हौस राजवाड्यांत त्याचा अकरावा वाढदिवस साजरा केला. **फिलिप्स्** याचे **एक्झेटर् एन्. एच्.** नांवाच्या विद्यालयांत **रॉबर्ट** हा शि-कत होता आणि त्याच वेळीं त्याचा बाप अध्यक्ष झाला. नंतर थोड्या दिवसांनीं तो **हार्वर्ड** नांवाच्या विश्वविद्यालयांत जाऊं लागला. पुढें विश्वविद्यालयांतील पदवी मिळवून त्यानें कायद्याचा अभ्यास केला आणि लौकरच त्यास फौजखात्याच्या सेक्रेटरीची जागा मिळाली. त्याचा बाप मृत्यु पावल्यानंतर **गारफिल्ड** आणि **आरथर** हे अध्यक्ष झाले आणि त्यांचे हाताखालीं त्यानें एक निष्ठेनें नोकरी केली.

इ० स० १८६२ च्या फेब्रुवारी महिन्यांत मधला मुलगा वुइली हा मरण पावला. त्यासालीं युद्धाचा ऐनभर असल्यामुळें दिवस मोठे कठीण गेले. पुत्रशोकासारखें दुःख नाहीं, असें जें ह्मणतात तें अक्षरशः खरें आहे. या जगांत हानि, मृत्यु, आणि लाभ या तिन्ही गोष्टी परमेश्वरानें आपल्या हातांत ठेविल्या आहेत, हें तत्व लिंकन हा पूर्णपणें जाणून होता. वुइलि याच्या वियोगदुःखामुळें लिंकन हा टॉड याचे विशेष लाड करूं लागला व असें होणें अगदीं स्वाभाविक आहे. टॉड यानें कोणतीही जिन्नस मागितली, तरी ती त्यास तो मोठ्या खुशीनें देत असें; कोणत्याही गोष्टीबद्दल टॉड यास ना ह्मणणें ह्मणजे त्याचे मोठे जिवावर येई, परंतु लहान वय असून हा मुलगा मोठ्या टेकीचा आनंदी आणि सर्वांस प्रिय असे. बापानें जें लागेल तें द्यावें, परंतु हा त्याचा दुरूउपयोग करीत नसें. बाल्यावस्थेची मौज खरोखरच वर्णन करावी तेवढी थोडीच तो काळ मोठ्या सुखाचा असून मोठेपणीं त्याचें वारंवार प्रत्येकास स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. टॉड यानें व्हाइट हौस राजवाड्याच्या सभोंवतीं इकडून तिकडे यथेच्छ हिंडावें आणि खोड्या कराव्यात; सकाळीं उठल्यापासून तों रात्रीं निजेपावेतों या मुलाचे जिवास घटकाभर विश्रांति कशी ती माहितच नव्हती टॉडची बाळपणची ही स्थिति पाहून प्रत्येकास जर इतकें मोठें कौतुक वाटत होतें, तर मग त्याचे बापास किती वाटत असेल याची कल्पना वाचकांनींच

करावी. लहान मुलाचे गूण पाळण्यांत दिसत असतात,अशी म्हण आहे, त्याप्रमाणें शहाणपण, धैर्य, अचाट बुद्धि आणि पितृभक्ति हे गुण त्याच्यांत संपूर्ण व्यक्त होत होते. लिंकन आपल्या मंत्रिमंडळींत कामकाज पाहण्यासाठीं बसला कीं, टॅाड यानें येऊन त्याच्या मांडीवर बसावें व हें उचल तें उचल अशा खोड्या कराव्यात. टॅाड याजवर अध्यक्षाचें अर्णनीय प्रेम होतें व आपल्या मुलाचे हे गुण पाहून त्याला अत्यंत समाधान वाटत असून सर्व दुःखाचा अगदीं विसर पडत असें. व्हाइट हौस राजवाड्यांत खोड्या करणारा मुलगा ह्मटला ह्मणजे एक टॅाडच होता. तो इतका चपळ होता कीं, खोड्या करितांना त्याला कितीही आवरिलें तरी तो कोणास आवरला जात नसे आणि त्यामुळें आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस तो फारच आवडत होता. अब्राहाम मृत्यु पावल्यानंतर जेव्हां त्याच्या घरच्या माणसांनीं वॅाशिंग्टन् सोडिलें, त्या नंतर थोड्या दिवसांनीं टॅाड हा आपल्या वयाच्या १८ व्या वर्षीं मरण पावला.

अध्यक्ष आणि त्याचे कुटुंब त्या उभयतांची राहणी अगदीं बाळबोध व जुन्या चालीची होती. लिंकन याची बायको त्यास अध्यक्ष या नांवानें कधींच हांक मारीत नसे आणि लिंकन यानें सुद्धां स्वतःस अध्यक्ष असें कधींच म्हटलें नाहीं. व्यवहारांत केव्हांही अध्यक्षाची जागा असें ह्मणण्याचा प्रसंग येई, तेव्हां तो 'ही जागा'

असें मोघम म्हणत असे. या साध्य गहणीमुळें त्याचे चार चौघांत चांगलेंच वजन राहत असे. त्याचा स्वभाव जरी मोकळा, आनंदी आणि मन मिळाऊ होता, तरीपण त्याची अशी एक अलौकिक ढब होती कीं, त्यामुळें कोणासही त्याच्याशीं अतिपरिचय करावा असें वाटत नव्हतें. अशा सभ्य वागणुकीमुळें सर्वांची त्याच्यावर श्रद्धा चांगलीच बसली होती.

राजद्रोहाचा जेव्हां अतिशय सुळसुळाट चालू होता, त्या संधीस लिंकन याची बायको वाशिंग्टन् येथें आली. नवीन कोणीही आलें कीं, त्या शहरांतलि पुष्कळ स्त्रिया त्याचा तिरस्कार करीत असत. शिवाय लिंकन याच्या घरच्या माणसांच्या वागणुकीसंबंधी अनेक प्रकारच्या असंभवनीय व खोट्या नाट्या कंड्या उठवून तेथील स्त्रियांनीं शहरांत बराच बोभाटा केला होता; परंतु अध्यक्षाची ख्याति जसजशी वॉशिंग्टन् शहरांत पसरत चालली, तसतशा सदर कंड्या अगदीं निराधार व खोट्या आहेत, असें वाटूं लागून शेवटीं सर्वांची खातरी झाली; मात्र लिंकन याच्या बायकोच्या वागणुकीसंबंधांत जो लोकांचा गैरसमज झाला होता, तो दोष तिला आपल्या प्रौढ व सात्विक वर्तनक्रमानें उडवितां आला नाहीं. ' स्वतःच्या नवऱ्यावर मोठमोठीं संकटें गुदरलेलीं पाहून लिंकनच्या बायकोचें अंतःकरण मुळींच द्रवत नव्हतें, इतकेंच नव्हे, परंतु अंतस्थ रितीनें

ती बंडखोरांस सामील आहे आणि अशा रितीनें बंडखोरांचा जय झाला म्हणजे लिंकन हा जीव घेऊन वॉशिंग्टन् शहरांतून पळून जाईल,' असेंही ठोकून देण्यास कित्येक हरीचे लाल कमी करीत नव्हते. लिंकन घराण्यांतील सर्वत्रांचें वर्तन बाळबोध असून प्रत्येकास कित्ता घालून देण्याजोगें होतें, म्हणून लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील सर्व लोक तोच कित्ता वळवीत असत.

वॉशिंग्टन् शहरापासून थोड्याअंतरावर 'सोल्जर्सहोम' नांवाचें एक हवा खाण्याचें ठिकाण होतें; तेथील सरकारी बंगल्यांत उन्हाळ्याचे दिवसांत लिंकन हा आपल्या घरच्या माणसांसहित कांहीं दिवस राहण्यास गेला. व्हाइटहौस राजवाड्यांत कांहीं सरकारी नोकर, रात्रीच्यावेळीं कांहीं महत्वाचें काम उपस्थित झाल्यास ती बातमी अध्यक्षास कळून त्यास तात्काळ जातां यावें, अशा हेतूनें, ठेविले होते; परंतु तसा प्रसंग बहुधा येतच नव्हता. अस्तमानाबरोबर सरकारी कामांतून मोकळा झाल्यानंतर हवाखाण्याच्या आपल्या ठिकाणीं जाऊन अध्यक्ष आपल्या घरच्या माणसांसहित आनंदानें वेळ घालवूं लागला. शहरापासून हवा खाण्याचें ठिकाण बऱ्याच अंतरावर असल्यानें अर्जदार लोकांच्या आणि नोकरीसाठीं धडपडणाऱ्या मंडळीच्या त्याठिकाणीं खेपा अगदीं बंद झाल्या होत्या. फक्त अध्यक्षाची स्नेही मंडळी मात्र सुखदुःखाच्या गोष्टी बोलून करमणुकींत वेळ जावा, या हेतूनें तेथें जात

येत असत आणि कधीं कधीं तर कांहीं मंडळी सर्व रात्र सुद्धां तेथेंच काढीत. अध्यक्षाच्या कारकिर्दींत जसें लिंकन यानें आपले दिवस या बंगल्यांत सुखानें काढले, तसे कोणत्याही अध्यक्षानें क्वचितच काढिले असतील.

‘ सोल्जर्सहोम ’ आणि ‘ व्हाइटहौस राजवाडा ’ यांत जरी अंतर थोडें होतें, तरी पण रात्रींच्या प्रसंगीं नेहमीं अध्यक्षास गाडींतून जावें यावें लागत असे. अध्यक्षास गुप्त शत्रू होतेच आणि ते कदाचित काळोख्या रात्रीस संधि साधून त्याजवर कोणता भयंकर प्रसंग आणतील याचा नेम नव्हता, ह्मणून रात्रीं जाते येते वेळीं त्यानें आपल्या जवळ शरीरसंरक्षणार्थ थोडे तुरुक् स्वार ठेविलेच पाहिजेत असा त्याच्या स्नेही मंडळीनें आग्रह धरिला. लिंकन यास अशी व्यवस्था करणें आवडलें नाहीं, परंतु स्नेही मंडळीचा अति आग्रह झाल्यामुळें त्याला तें मोठ्या कष्टानें कबूल करावें लागलें. आपल्या बरोबर जातांना व येतांना असलेल्या घोडे स्वारांची एक प्रकारची त्याला कटकट वाटू लागली व त्याबद्दल त्याला वारंवार तिट्कारा येऊन फार दुःख होत असे. व्हाइटहौस राजवाड्यांत प्रवेश करण्याच्या राजद्वारावर संत्र्यांचा पाहरा बसविलेला होता. अध्यक्षाची स्वारी राजवाड्यांत येतांना व वाड्यांतून बाहेर निघतेवेळीं सदरहु संत्र्यांनीं अध्यक्षास बहुमान देऊन मुजरा करावा, असें ठरलें

होतें; परंतु अध्यक्षास हें सुद्धां पसंत नसून त्याला ही व्यवस्था पाहून मोठा कंटाळा येत असे. स्टॅंटन् सेक्रेटरी यानें एकेदिवशीं गमतीस्तव टॅाड् यास असा हुकूम केला कीं, तुह्मी संयुक्त संस्थानाच्या पलटणींत जाऊन लष्करी लोकांस कवाईत शिकवावी. तो हुकूम टॅाड् यानें अगदीं उत्तम रितीनें अमलांत आणिला परंतु ही गोष्ट त्यानें अध्यक्षास कळविली नव्हती. एकदां तर रात्रींच्या वेळीं टॅाड यानें सर्व लष्करी लोकांस कामावर रुजूं करून नेहमीच्या संत्रीलोकांस मोकळे केले व आपआपल्या घरीं जाण्यास हुकूम केला; या मुलाचा रितीप्रमाणें एक सारखा लष्करी पोशाख पाहून आणि या त्याच्या गुणांबद्दल मोठें कौतुक मानून त्याचा हुकुम होतांच ते संत्री आपआपल्या मुक्कामीं गेले. हा विलक्षण प्रकार पाहून रॉबर्ट लिंकन याचें पित्त खवळलें आणि तो अतिशय रागावला. त्यानें आपल्या बापास जाऊन तात्काळ कळविलें कीं, लष्करी लोकांनीं दररोजची ठरीव कामगिरी बजाविली असून त्यांस टॅाड् यानें संत्र्यांचें काम रात्रींच्या वेळीं करण्यास सांगून सर्व संत्र्यांस घरीं पाठविलें. टॅाड् ह्मणाला कीं ' मी एक लष्करी अंमलदार असून मला तसें करण्याचा अधिकार आहे व सदरहु हुकूम मी आपल्या अधिकारांत दिला असून त्यांत कोणाची मंजूरी घेण्याची मला मुळींच अवश्यकता नाहीं. ' मुलाचे हे विनोदाचे प्रकार पाहून अध्यक्षास अतिशय हसूं आलें आणि तुमच्या असल्या तंट्यांत मी पडण्याचें कारण

नाहीं, असें त्या उभयतांस कळविलें. रात्रींच्या वेळीं टॉड् यास झोंप लागल्यावर लष्करांतल्या मुख्य अंमलदारानें जाऊन मुलानें ज्यांना काम सांगितलें होतें त्या सर्वांस मोकळे केले.

लिंकन यास ठार मारण्यासंबंधी कृष्णकारस्थानें गुप्त रितीनें चालू असल्याबद्दल लोकांस मोठा संशय होता आणि ही बातमी लिंकन याचे कानावर गेली तरी पण त्यानें ती जुमानिली नाहीं. आपल्या भेकड बायकोच्या दुराग्रहास्तव व्हाइटहौस राजवाड्यासभोंवतीं झाडींतून अपरात्रीचे वेळीं फिरतांना तो हातांत वेताचा भला जंगी सोटा बाळगीत असे. अशा अपरात्रीच्या वेळीं फिरतांना तो फौजखात्यांतील रात्रीच्या वेळीं फिरणाऱ्या हेरांशीं मसलत करीत असे व कधीं कधीं जनरल हॅलेक् याचे मुक्कामींही जात असे. बायकोच्या दुराग्रहास्त व शरीर संरक्षणार्थ घेतलेलें आपल्या हातांतलें चिमुकलें शस्त्र पाहून त्याला कधीं कधीं गालांत हसूं येई. एके दिवशीं तो रागावून ह्मणाला कीं:—' ज्याची इच्छा मला मारण्याची असेल, तो तें सहज करूं शकेल. माझ्या अंगांत चिलखत आहे व शरीररक्षणार्थ संत्री जरी आहेत, तरी ते मला असून नसून सारखेच मी समजतों; कारण, चोराला बारा डोळे असतात, अशी जी ह्मण आहे ती खरी आहे; त्याप्रमाणें ज्यास मला मारण्याची इच्छाच असेल त्याला हजार वाटा मोकळ्या आहेत.'

लिंकन याचे मनांत स्वतःचे संबंधांत कोणाचा द्वेष असला, तरी तो सरकारी कामाकाजांत कधींही उघड रितीनें दिसत नसे. लिंकनच्या पश्चात् मी. चेस् हाच अध्यक्षाच्या जागेस हक्कदार आहे, असें वॉशिंग्टन् येथील एका सरकारी नोकरानें प्रतिपादन केलें होतें. याच इसमानें स्वतःस बढती मिळण्याबद्दल एकादां लिंकन याजकडे अर्ज रुजूं केला. अर्जदारास न्यायदृष्टीनें जी बढती मिळावयाची ती अध्यक्षाकडून मिळालीच, परंतु अध्यक्षाच्या एका स्नेह्यानें मात्र त्याची चांगली कानउघडणी करून त्याबद्दल त्याला दोष दिला. दररोज सरकारी कामाचा अतिशय बोजा अध्यक्षावर पडत असल्यानें त्यास संयुक्त संस्थानाच्या बचावाचीं साधनें शोधण्यासाठीं विचार करण्यास सवड मिळत नसे. या बाबतीस उद्देशून तो एकदां ह्मणाला—' माझ्या माथ्यावर सरकारी कामाचा बोजा जर असाच सतत चालू राहून संयुक्त संस्थानाच्या बचावाविषयीं मजकडून कांहींच न घडलें, तर मात्र, एखाद्या चाळीच्या उत्तरेकडील खोल्या लोकांस भाड्यानें देऊन भाडें उत्पन्न करण्याचा प्रयत्न एखाद्यानें चालू ठेवावा आणि दक्षिणेकडोन त्या चाळीस आग लागली असून ती विझविण्याचा प्रयत्न न करितां त्यानें स्वस्थ बसावें, असा प्रकार होणार आहे यांत संशय नाहीं. '

मान पान, हुद्दा, वगैरे संबंधांत लिंकन फारसें लक्ष

घालीत नव्हता आणि त्यामुळें कोणाही सरकारी अंमलदाराचा रितीप्रमाणें सन्मान न झाल्यास तें तो फारसें मनावरही घेत नसे. सर्व गुणांत भूतदया हा गुण लिंकन याच्या अंगीं अवर्णनीय होता व त्याबद्दल अनेक उदाहरणेंही आहेत; त्या-वेळीं लष्करी खात्यांत कोणी नियमाविरुद्ध वर्तन केल्यास त्यास देहांत शासन होत असे आणि अशा बाबतीची जेवढीं अपिलें (विवाद) लिंकन याजकडेस आलीं, तीं सर्व नामंजूर कधींच त्यानें केलीं नव्हतीं. मोठा पदवीधर, लहानसा कारकून, श्रीमंत अगर गरीब कोणीही असो, तो अर्ज घेऊन आला असतां त्याला तो भेटल्याशिवाय राहत नव्हता. ज्यावेळीं ज्याची भेट घेण्याचें ठरलें असेल, त्याची तो प्रथम भेट घेत होता; तसेंच सरकारी नात्यानें कोणी भेटीस आला तर त्यालाही भेटण्याचा त्याचा क्रम होता. लिंकन यास एखादे वेळीं विरक्ति आली ह्मणजे त्याचें सर्व लक्ष त्या विषयाकडे इतकें लागलेलें असें कीं, कोणी हांक मारली तर त्याला ती ऐकूं येत नव्हती.

सर्वांनीं सदाचरणानें वागावें, असें लिंकन यास सदैव वाटत असें. तो लोकांस खालीं लिहिलेल्या विषयांस उद्देशून उपदेश करीत असे:—"दारू न पिणें, गांजा व तमाखू न ओढणें, शपथ न वाहणें, जुगार न खेळणें, खोटें न बोलणें, कोणास कधींही न फसविणें, ईश्वरभक्ति करणें, सर्वांशीं प्रेमानें वागणें आणि स-

त्याचीच कांस बळकट धरणें." या उपदेशा प्रमाणें जो वर्तन ठेवील तो इहलोकीं आणि परलोकीं अक्षय सुख भोगील यांत संशय नाहीं.

---



# प्रकरण २६ वें.

## अध्यक्ष आणि त्याची मंत्रिसभा.




त्रिसभेंतील सभासदांशीं स्नेहबुद्धीनें वागून त्यांची अगत्यही अध्यक्ष अतिशय ठेवीत होता; प्रत्येक सभासद आणि अध्यक्ष या उभयतांमध्यें जर एखादा प्रश्न उपस्थित झाला तर त्याचा निर्णय करण्याचे कामीं अध्यक्ष हा प्रत्येक सभासदाशीं मोकळ्या अंतःकरणानें आणि प्रामाणिकपणानें वागत असे. एखादी सामाजिक अगर गैरकायदेशीर हकिगत कळविणें असल्याशिवाय ( फक्त सेक्रेटरी सिवर्ड याचेवांचून) कोणीही सभासद व्हाइटहौस राजवाड्यांत जात नव्हता. सरकारी कामकाज करण्याच्या जागेपासून सिवर्ड हा फारसा लांब राहत नव्हता, कारण, अध्यक्षाची आणि त्याच्या घरच्या माणसांची त्याला वेळोवेळीं भेट घ्यावी लागत असे. अध्यक्षाच्या मंत्रिसभेच्या बैठकींत विवेचन चालू असतांना सेक्रेटरी सिवर्ड याचें वर्तन हट्टवाद्याप्रमाणें दिसत असे. इ. स. १८६० सालीं मि. सिवर्ड हा इलाख्याच्या नेमणुकीच्या वेळीं लिंकन याचा मोठा प्रतिस्पर्धी होता. सिवर्ड आणि लिंकन या उभतांत लिंकन याची योग्यता विशेष होती, ह्मणून लिंकन ची योग्यता विशेष होती म्हणून लिंकन याची नेमणूक झाली असावी, असा सिवर्ड याचा समज नसून केवळ योगायोगानेंच

झाली, असेंही त्याला वाटलें असेल. इलाख्याचे नेमणुकीसाठीं सिवर्ड हा किती योग्य होता, या संबंधांत लिंकनचे मत काय होतें, हें सागूं शकवत नाहीं; परंतु लिंकनपेक्षां माझ्याच अंगीं विशेष योग्यता आहे, असें एकदां सिवर्ड यांस वाटलें असून कांहीं इतर मंडळीसही तसेंच खास वाटलें होतें, हें मात्र निर्विवाद होय. राज्यकारभाराच्या कामीं मी. सिवर्ड यास राजकार्यधुरंधर म्हणण्यास कांहीं एक प्रत्यवाय नाहीं, असें बऱ्याच लोकांस वाटत असून मी. सिवर्ड याचें स्वतःच मतही तसेंच होतें.

लिंकन याच्या कारकिर्दीत वरील प्रश्नांचा लौकरच निकाल लागावयाचा होता. इ. स. १८६१ च्या मार्च महिन्याच्या ४ थ्या तारिखेस लिंकन यानें समारंभाचे वेळीं जें भाषण केलें, तें प्रथम एका कागदावर लिहून मि. सिवर्ड वगैरे मंडळीचा अभिप्राय घेण्यासाठीं त्यांना दाखविलें. तो कागद सिवर्ड यानें चांगला मनन करून अध्यक्षास परत देतेवेळीं त्यांत कांहीं फेरफार करण्यास सुचविलें; परंतु लिंकन यानें त्यापैकीं कांहीं फेरफार मंजूर करून बाकीचे नामंजूर केले. या उभयतांच्या श्रमानें जो कागद तयार झाला होता, तो अत्यंत महत्वाचा असून त्याकामीं सिवर्ड यानेंच पुष्कळ श्रम घेतले असावे, असें बऱ्याच लोकांस वाटलें; आणि हा नवीन अध्यक्ष ज्ञानशून्य असून राजकीय कारभारांतही त्यास कांहीं समजत नाहीं, अशीही

बऱ्याच लोकांची समजूत होती; त्यामुळें स्विवर्ड याच्या ज्या ज्या सुचना होत्या त्या सर्व नवीन अध्यक्षानें मान्य कराव्यात, असें कित्येकांचें म्हणणें होतें व त्या कारणानें स्विवर्ड हा गर्वानें फुगून आपण स्वतःच प्रिमियर ( मुख्य प्रधान ) आहोंत, असा सर्वत्र तोरा मिरवीत होता. इ. स. १८६१ च्या प्रािल महिन्याचे पहिले तारिखेस म्हणजे नवीन राज्यकारभारास ज्या महिन्यांत प्रारंभ झाला, त्या महिन्याचे अखेर स्वतःच्या जागेचें महत्व आणि वैभव जास्त वाढविण्याच्या उत्कटेच्छेनें मि. स्विवर्ड यानें पुष्कळ प्रयत्न केला. एकामागून एक अशा प्रत्येक संस्थानांत, संयुक्त संस्थानापासून विभक्त होण्यासंबंधी ठराव जरी मंजूर होत गेले, तरीपण उत्तर प्रांतांत लोकमताच्या स्थितींत अतिशय गाधळ उडाला होता. अशा रितीनें विभक्त होण्यापासून काय परिणाम होईल, याची कोणासही कल्पना करितां येईना; कित्येक म्हणत कीं, यामुळें लढाई उपस्थित होईल, अगर स्वस्थतेनें संयुक्त संस्थानाची विभागणी होईल, अथवा दक्षिणेकडील स्वतंत्र होऊं इच्छिणाऱ्या लोकांचे म्हणण्याविषयीं आपसांत समजूत होऊन संयुक्त संस्थानास एक नवेंच स्वरूप प्राप्त होईल. स्वदेशाभिमानी मंडळींपैकीं बऱ्याच लोकांस सर्वत्र शांतता असावी, असें वाटत असून ते आपसांत समजूत करण्यास अगदीं एका पायावर सिद्ध होते आणि त्याचप्रमाणें इतर देभभक्तांचेंही असें म्हणणें होतें कीं, या नवीन राज्यव्यवस्थेंत द्वैत मोडून सर्वत्र स्वास्थ

झालें पाहिजे, मग तें कशाही रितीनें झालें, तरी आम्हांस मोठा संतोष होईल.

अब्राहाम लिंकन याचे अंगीं असलेल्या शहाणपणाबद्दलचीं उदाहरणें एडविन् स्टॅंटन् यानें त्यावेळीं लिहिलेल्या पत्रांत पुष्कळ सांपडतील व तीं सर्व वाचलीं असतां लिंकन याचे विषयीं लोकमत कसें होतें, याचीही खातरी होईल. मि. स्टांटन् हा राजनिष्ठ व प्रामाणिक मनुष्य असून संयुक्त संस्थानांतील संघशक्तीचे संरक्षणार्थ तो अहोरात्र झटत होता व लिंकन अध्यक्ष असतांना फौजखात्याच्या सेक्रेटरीच्या जागीं त्याचीच नेमणूक झाली असून संयुक्त संस्थानाचें ब्रीद कायम राहण्यासाठीं कळकळ बाळगून त्यानें पुष्कळ श्रम केले. इ. स. १८६१ च्या जून महिन्यांत त्यानें असें प्रसिद्ध केलें कीं, तीस दिवसांचे आंत वॉशिंग्टन् शहर बंडखोर लोकांच्या ताब्यांत जाईल आणि त्यामुळें लिंकनच्या व्यवस्थेला उतरती कळा लागेल. ही नवीन व्यवस्था कशी चालेल व कोणत्या थराला जाईल, ह्या बद्दल लोकांस मोठें गूढ व आश्चर्य वाटत होतें. सेक्रेटरी सिवर्ड यानें लोकांत वाढत असलेला निरुत्साह आणि अनिश्चितपणा यासंबंधांत एक टिपण तयार करून तें लिंकन याजकडे रुजूं केलें. त्या टिपणांत नवीन राज्यव्यवस्था कोणत्या धोरणावर असावी हें चांगल्या रितीनें दाख-

विलें होतें; आणि स्पष्ट कळविलें होतें कीं, गुलामगिरीचा प्रसार न व्हावा, हा राजकीय प्रश्न असल्यानें तो बाजूवर ठेऊन प्रथम द्वैत अगर अद्वैत याच मुद्यासंबंधी विचार झाला पाहिजे, स्पेन, फ्रॉन्स, ग्रेटब्रिटन् आणि रशिया हीं राष्ट्रें विरुद्ध झाल्यामुळें त्यांचे खुलासे घेतले पाहिजेत, हें भांडण उकरून काढण्यासाठीं वकील पाठविले पाहिजेत आणि त्यांत जर फ्रान्स व स्पेन येथील सरकारांनीं संतोषकारक खुलासे नचा दिले, तर प्रत्येकाशीं युद्ध चालू करावें असें ठरविलें पाहिजे. यांतील इत्यर्थ असा होता कीं, ज्या लोकांनीं नवीन अध्यक्षाच्या निवडणुकीचे कामीं त्याचे तर्फे मतें दिलीं, त्यांच्याशीं अध्यक्षानें विरुद्ध व्हावें आणि दक्षिणेकडील बंडखोरांचे चालू बंडाकडे दुर्लक्ष होऊन त्यांनीं परकीय राष्ट्रांशीं युद्ध करण्याचे कामीं सामील व्हावें.

मी एक मोठा अंमलदार होईन आणि माझ्या वरील योजनेंत जी व्यवस्थेशीर पद्धत मी कळविली आहे, तीच सर्वोत्तम असल्यामुळें अमलांत येईल, असा तोरा सदरहु सेक्रेटरी जेथें तेथें मिरवीत होता. शिवाय त्याचें म्हणणें असेंही होतें कीं,' जर अध्यक्षाकडून वरील योजनेप्रमाणें अंमल होत नसेल तर त्यानें हें काम सोडून देऊन सभेंतल्या एखाद्या सभासदाच्या गळ्यांत बेलाशक घालावें. एकदां जी मी योजना ठरविली ती मान्य झाली, तर सर्व सभासदांचा वादविवाद

बंद होईल, परंतु तें केवळ माझ्या एकट्याच्या हातांत नाहीं; मला जबाबदारी टाळितां येत नाहीं व अंगावरही घेतां येत नाहीं अशी माझी स्थिति आहे.' सेक्रेटरीच्या या सर्व विलक्षण पत्रव्यवहारास अध्यक्षानें अगदीं सरळ व थोडक्यांत प्रत्युत्तर दिलें कीं, 'जर या योजनेचा अंमल झालाच पाहिजे असें असेल तर मग मला तो करणें भाग आहे.' मंत्रिसभेंत वर्चस्व कोणाचें राहील याबद्दल जें गूढ सेक्रेटरीला पडलें होतें, तें सदरील प्रत्युत्तर ऐकून पार नाहींसें झालें. मुख्य सत्तेच्या खालोखाल सर्व सत्ता माझी आहे, असें सेक्रेटरी याचें म्हणणें जसें मनांतल्या मनांत राहिलें, तद्वत् वरील योजनेचा कागद ( लिंकनच्या मरणानंतर ) सुद्धां गुप्त रितीनें बंदोबस्तांतच राहिला, याचे सर्व श्रेय लिंकन यासच होतें. लिंकन याची, सेक्रेटरी सिवर्ड याचे ठायीं, श्रद्धा आजन्म कायम राहिली आणि त्याचप्रमाणें सिवर्ड याची, आपले देशाचे ठायीं आणि आपला उपरी लिंकन याचे विषयीं असलेली दृढभक्ति आणि एकनिष्ठा हीं अखेरपावेतों ढळलीं नाहींत.

संयुक्त संस्थानाचा मुख्य प्रधान चार्लस फ्रान्सिस् ॲडम्स हा ग्रेटब्रिटन् येथें असून त्याचेकडे संयुक्त संस्थानाकडून जो खलिता ब्रिटिश् सरकारास उद्देशून रवाना झाला होता, तो लिंकन आणि सिवर्ड या उभयतांच्या एकविचारा-

नेंच तयार झाला; होता यावरून उभयतां (लिंकन आणि सिवर्ड) मध्यें सौजन्य किती होतें, हें स्पष्ट दिसत होतें. इ. स. १८६१ च्या मे महिन्यांत सदरहु खलिता लिहिला असून त्यावेळीं संयुक्त संस्थानें आणि युरोपीय मोठीं राष्ट्रें, यांच्या अन्योन्य संबंधाची स्थिति मोठी नाजुक होती; कारण कीं संयुक्त संस्थानास अशी धास्ती होती कीं, बलाढ्य युरोपीय राष्ट्रें बंडखोरांस सामील होऊन केव्हां व कोणता भयंकर प्रसंग आणतील याचा नेम नाहीं. सदरहु खलित्याचा मूळ मसुदा सेक्रेटरी यानें तयार केला असुन त्याचें अध्यक्षाकडून चांगलें संशोधन झालें होतें व तो मसुदा अद्याप तसाच कायम आहे. या मसुद्यांत कित्येक मुद्दे सेक्रेटरी यानें स्पष्ट केले होते आणि अध्यक्षानें आपल्या थोरपणास बट्टा न यावा अशा रितीनें, सेक्रेटरी यानें केलेल्या कठोर भाषाशैलीस सौम्य स्वरूप कसें व कितपत् आणिलें, हें ज्याला बारीक रितीनें पाहणें असेल त्यानें संस्थानांत प्रसिद्ध होणारीं त्यावेळचीं वर्तमानपत्रें वाचावींत. या कामीं अध्यक्षानें आपल्या शहाणपणाचा कळस केला होता आणि या संबंधांत अमेरिकेंतले मोठमोठे विद्वान्मुत्सद्दी, लिंकन याचे अद्याप गुण गात आहेत.

मि. कॅमेरॉन हा लिंकन याचा फौजखात्याचा पहिला सेक्रेटरी असून तो हल्लीं मंत्रिसभेचा एक सभासदही होता.

गुलामांच्या सद्यस्थितींत बेदिली उत्पन्न करून आणि त्यांच्या हातांत शस्त्रें देऊन त्यांना युद्धास तयार करण्याचे कामीं उत्तरेकडील लोक प्रवृत्त झाले आहेत, अशी ओरड दक्षिणेकडील बंडखोरांच्या एकजुटांतून स्पष्ट ऐकूं येत होती. उत्तरेकडील सरकारी पक्षाचे कांहीं लोक वरील ओरड ऐकून घाबरले आणि त्यापैकीं कित्येकांस तें रास्त दिसल्यामुळें ते स्वस्थ बसले होते. इकडे लोकसत्ताक स्वतंत्र पक्षांतील लोक अध्यक्षाच्या सभोंवतीं गोळा झाले आणि मोकळे झालेल्या इसमांना फौजखात्याच्या नोकरींत रुजू करण्यासंबंधी लौकर प्रयत्न करा, अशी त्यांनीं इच्छा दर्शविली. हें राजकीय धोरण अत्यावश्य असून न्यायाचें आहे, असें ज्या लोकांस वाटत होतें, त्यापैकींच सेक्रेटरी कॅमेरॉन हा एक होता. इ. स. १८६१ च्या दिसेंबर महिन्यांत जी वार्षिक कैफियत पाठविण्याचें ठरलें होतें, त्या कैफियतींत त्यानें असें स्पष्ट प्रतिपादन केलें होतें कीं, परागंदा झालेले आणि मोकळे झालेले जे गुलाम असतील त्यांस बंडखोरांवर चाल करून जाणाऱ्या पलटणींत दाखल करावें. सदरील सुचना अकालीं झालेली दिसत असून घाईनें केलेली होती, कारण, जर ती प्रसिद्ध होऊन लोकांच्या निदर्शनास आली असती, तर भयंकर ओरड होण्याचा प्रसंग आलाच असता; तरीपण भयंकर ओरड जी व्हावयाची ती झालीच पण ती पुष्कळ दिवसांनीं झाली आणि मग संयुक्त संस्थानाच्या पलटणींत काळे सिद्दी लोक रुजू झाले, इतकेंच

नव्हे तर बंडखोर लोकपुद्धां त्याप्रमाणेंच करूं लागले. सेक्रेटरी कॅमेरॉन यास जणूं काय माहितच होतें कीं, काळे लोक पलटणींत रुजूं करण्याची पद्धत अध्यक्षास आवडणार नाहीं, म्हणून त्यानें कैफियतीच्या छापील प्रती प्रथम अध्यक्षाकडे रितीप्रमाणें न पाठवितां कॉंग्रेसकडेसच पाठविल्या; अध्यक्षानें आपल्याकडे कैफियतीची प्रत कां आली नाहीं, त्याची चौकशी केली तेव्हां त्याला एक प्रत मिळाली आणि ती त्याला कॉंग्रेसकडे वार्षिक हकीगती बरोबर पाठवावयाची होती. सुदैवानें वर्तमानपत्रांच्या लेखकांकडे पोष्टानें ज्या छापील प्रती पाठविल्या होत्या, त्या पोष्टांतून रवाना होण्या पूर्वी तारायंत्रद्वारें बातमी पाठवून पोष्टांतून परत मागविल्या आणि त्यांतील जो भाग हरकती सारखा दिसला तो काढून टाकिला.

ह्या वरील हकिगतीमुळें सेक्रेटरी कॅमेरॉन हा कांहींसा संतापला कारण, ज्या प्रमाणें सेक्रेटरी सिवर्ड हा आपलें म्हणणें नामंजुर झालें तरी तें मुकाट्यानें सहन करीत होता, तशी कॅमेरॉन याची स्थिति नव्हती. त्यामुळें कोणत्याही रितीनें त्यानें स्वतःचा असंतोष प्रदर्शित करून व सरकारी कामाला तो फार कंटाळला आहे असेंही दाखवून आतां येथें बरें वाटत नसल्यानें कोठें तरी आपणास दूर देशीं पाठवावे असें त्यानें अध्यक्षास कळविलें. जानेवारी महिन्यांत अध्यक्षानें त्याला उत्तर पाठविलें

कीं,' ज्या अर्थी आतां तुम्हांस येथें बरें वाटत नाहीं, त्या अर्थी आतां तुम्हीं येथें रहावें असा माझाही आग्रह नाहीं; म्हणून रशियासरकाराकडे आमचेतर्फे मुख्य प्रधानाची जागा मी तुम्हास देतों.' जनरल कॅमेरॉन यानें ती जागा कबूल केली आणि तो चालू नोकरींतून मुक्त झाला. त्याचे जागीं मिस्तर स्टॅंटन् याची नेमणूक झाली; बुशनन्च्या कारकिर्दीत कांहीं दिवस हा मुख्य वकील होता. एकदां ज्याला आपलें म्हटलें त्याला लिंकन कधींहीं विसरत नसे, हा एक अवर्णनीय गुण त्याचे अंगीं होता. कॅमेरॉन जरी कोणत्याही कारणानें नोकरींतून मुक्त होऊन दूर गेला, तरी लिंकन यानें त्याच्याशीं असलेला स्नेहसंबंध सोडला नव्हता. कॅमेरॉन गेल्या नंतर कांहीं दिवसांनीं कॉंग्रेसमध्यें जे त्याचें शत्रू होते त्यांनीं त्यास बरेच दोष दिलें; परंतु अध्यक्षानें प्रयोजक उत्तरें देऊन त्याची बाजू संभाळली आणि त्यास दोषांतून मुक्त केलें. अशा रितीनें अध्यक्षानें कॅमेरॉन याच्याशीं सोज्वळ वर्तन ठेविल्यामुळें उभयतांचे जिवलग मित्रत्वाचें नातें कायमचें झालें. मि. चेस् हा तिजोरीकडील सेक्रेटरी असून सरकारी कामकाज त्याचे कडून संतोषकारक होणें कठीण आहे, असें लिंकन यास उघड दिसत होतें. मि. चेस यानें मोठमोठीं महत्वाचीं कामें केलीं असल्यामुळें चालू राज्यकारभारांत मोठेपणा मिळविण्याची त्याला हौस असणें हें अगदीं स्वाभाविक होतें; आणि तो जेव्हां मंत्रिसभेचा सभासद झाला

तेव्हांही त्याची हौस कमी न होतां उलट ती वाढत चालली. अनुयायी वर्गांतली बरीच मंडळी त्याच्या कह्यपी असून ते सर्व त्याची स्तुति सदैव करीत असत; आणि लिंकन याची राज्यपद्धति ज्यांना आवडत नव्हती, त्या सर्वांस असें वाटत होतें कीं, लिंकनची कारकिर्द संपल्या नंतर चेस् हा त्याच्या जागीं आला, म्हणजे चार चौघांत चांगलें नांव मिळवील. ह्या वाटाघाटीमुळें चेस् ह्याचें अंतःकरण स्वस्थ नसणें हें अगदीं स्वाभाविक होतें व त्यामुळें त्याचा स्वभावहि चिरचिरा झाला असून कांहींना कांहीं तरी त्याचें रडगाणें चालू राहत असे. त्याचे पश्चात् त्याची रोजनिशी जेव्हां पाहिली, तेव्हां असें आढळून आलें कीं, त्याला लिंकन याची राज्यपद्धति संतोषकारक वाटत नसून लिंकनचे मागें राज्याची लगाम केव्हां माझ्या हातांत येईल व देशस्थिति मी केव्हां सुधारीन, असें त्याला झालें होतें. राज्यकारभारांत सरकारी काम काज चालू असतांना लिंकन व चेस् यांचा नेहमीं बारावा बृहस्पति असावयाचाच, आणि अशा स्थितींत तो कधीं कधीं "हा मी राजीनामा देतों, नाहीं तर माझ्या कामाकाजांत व व्यवस्थेंत दुसऱ्याची ढवळाढवळ कामाची नाहीं," अशी लिंकन यास धमकी देत असे. इ. स. १८६४ सालीं इलाख्याचे नेमणूकींत त्यास यश मिळावें म्हणून त्याची चांगली चांगली स्नेही मंडळी प्रयत्न करीत होती. तो असा सिद्धांत प्रतिपादन करीत होता कीं, एकदां ज्याची इला-

ण्यासाठीं अध्यक्षाचे जागीं नेमणूक होऊन गेली असेल त्याची पुनः होऊ शकणार नाहीं. शेवटीं इ स. १८६४ च्या जून महिन्यांत त्यानें राजीनामा दिलाच व तो मंजूरही झाला. ह्या रिकाम्या झालेल्या जागेवर ओहिओ येथील डेव्हिड् टॉड् याची अध्यक्षानें प्रथम नेमणूक केली होती, परंतु ती त्यानें नाकारल्यामुळें विल्यमपिट् फ्रिसेंडन् याची नेमणूक झाली व ती त्यानें मोठ्या खुषीनें स्वीकारली. त्यावेळीं सदरहु विल्यमपिट् हा मेनहून आलेला संयुक्त संस्थानाचा सिनेटर होता.

मंत्रिसभेंतून चेस् याची सुटका झाली त्यावेळीं त्याचें मन जरी अध्यक्षाविषयीं कलुषित झालें असलें तरी अध्यक्षानें त्याचेविषयीं पोटांत द्वेषभाव ठेविला नव्हता. ज्यावेळीं टॉजरटॅनी संयुक्त संस्थानाचा सरन्यायाधीश इ. स. १८६४ सालीं मरण पावला, त्यावेळीं चेस् याच्या मित्रमंडळींनीं अशी ओरड केली कीं, तिजोरीकडील माजी सेक्रेटरीस सरन्यायाधीशाच्या रिकाम्या झालेल्या ह्या जागेवर नेमावें. बहुतेक लोकांचें ह्मणणें असें होतें कीं, हीच नेमणूक झाली पाहिजे ह्मणजे बरें होईल; परंतु लिंकन याच्या स्नेही मंडळीकडून येवढ्या मोठ्या पदवीची जागा चेस् यास देणें रास्त नाहीं, अशी कानउघडणी झाली; कारण, मंत्रिसभेंत चेस् याचें वर्तन कसें होतें हें ते चांगलेच जाणून होते. हें विवेचन चालू असतांना अध्यक्षाचें चरित्र

इंग्रजी भाषेंत ज्या एका लेखकानें लिहिलेलें आहे त्यानें, अध्यक्षाची भेट घेतली; त्यावेळीं त्याची स्वारी मोठ्या आनंदांत होती व त्यानें थट्टेनें विचारिलें कीं ' हल्लीं लोक काय बोलतात ' तेव्हां उत्तर मिळालें कीं " चेस् यास सरन्यायाधीशाची जागा मिळ-ण्याचा संभव असल्या बद्दल लोकांत दाट चर्चा चालू आहे. सर्व ठिकाणची माझी स्नेही मंडळी आम्हां उभयतांत ( चेस व अध्यक्ष ) वाकडें आणण्याचा प्रयत्न करीत आहेत; मजकडे माझ्या मित्रांची व इतर लोकांचीं पुष्कळपत्रें आलेलीं असून त्यांत चेस् ह्यास सदरहू जागा देऊं नये, अशा सुचना त्यांनीं मला केल्या आहेत,' इतकें बोलून तो कांहीं वेळ थांबला व ह्मणाला ' गव्हर्नर चेस् याचे संबंधी हल्लीं मजकडे अतिनीच-पणाच्या हाकिकती आल्या आहेत तरी पण मी त्याची नेमणूक करीन.' तीन दिवसानंतर त्याचीच नेमणूक झाल्याबद्दल जाहीर करण्यांत आलें.

मि. मॉंटगॉमरी ब्लेअर हा मंत्रिसभेंतील एक सभासद असून त्याचे संबंधांत पुष्कळ गोष्टी लिंकन यानें सहन केल्या आणि शेवटीं त्याचें मन काडीइतकेंही न दुखवितां त्याला सभेच्या सभासदांतून कमी केलें; मंत्रिसभेच्या सभासदांतून मि. ब्लेअर यानें आपलें अंग काढून घेण्यापूर्वी त्याच्या अनुयायी मंडळींत एक प्रकारचा असंतोष उत्पन्न झाला होता. सेक्रेटरी चेस् याचे विषयीं मि. ब्लेअर याचें अंतःकरण मुळपासूनच शुद्ध नव्हतें.

अध्यक्षाच्या कानावर ही हकिगत जातांच या बाबतीची वाटाघाट करण्यासाठीं सर्व मंत्रीमंडळाची एक सभा भरविली. पोष्टमास्तर जनरल ( ब्लॅर ) यास अडचणींत आणिलें ह्मणजे तूर्त आपली हरकत दूर होईल असें मंत्रिसभेतील कित्येक सभासद धरीत होते, हें अध्यक्ष संपूर्णपणें जाणून होता, आणि त्यानें एक कागद सभासदांस वाचून दाखविला त्यांतील आशय येणें प्रमाणें:— 'प्रत्येकास किती मुदतीपर्यंत आपआपल्या जागेवर ठेवावें आणि किती मुदतीनंतर कमी करावें, याचा निवाडा माझा मलाच केला पाहिजे. आपल्यापैकीं एकानें दुसऱ्यास घालविण्यासाठीं त्याची तळी भरीत असावी अथवा लोकांचें मन त्याचेविषयीं दूषित करीत असावें, हें चांगलें नव्हें. यापासून मला फार त्रास होत आहे, इतकेंच नव्हें तर असें केल्यानें आपल्या देशाची सर्वस्वी हानि होण्याचा पाया तुह्मी घालीत आहांत असें ह्मणावें लागेल; कोणीही, येथें अगर अन्यत्र, हल्लीं अथवा यापुढें, या संबंधांत टीका करूं नये व प्रश्नही उपस्थित करूं नये अशी माझी बळकट इच्छा आहे.' अब्राहामलिंकन हा संयुक्त संस्थानाचा अध्यक्ष होताच, परंतु राज्यकारभारांत त्यास पाहिजे तसा अधिकार चालवितां येत नसून त्याचे काहींच तिष्ठत नाहीं, अशी ज्यांची समजूत होती, त्यांनीं वरील पत्राचें फारच सूक्ष्मरितीनें मनन केलें आणि त्यामुळें लिंकन याचें सौजन्य आणि शहाणपण याबद्दल त्यांची संपूर्ण खातरी झाली.

लिंकन कांहींसा धिमा होता खरा, परंतु कोणतेंही व कसेंही काम असो त्यांत त्याचें पाऊल मागें पडलें, असें कधींच झालें नाहीं. 'दृष्टिपूतं न्यसेत्पादं' या म्हणी प्रमाणें जें पाऊल टाकावयाचें तें तो फार सावधगिरीनें आणि पुरता विचार करूनच टाकीत असे. आणि एकदां कां पाऊल टाकिलें म्हणजे मग कसाही प्रसंग आला तरी तें माघारें घेत नसे. इतकेंही असून एकादेवेळीं पाऊल मागें घेण्याची वेळ आलीच तर तो प्रथम आपल्या मंत्रिसभेच्या प्रत्येक सभासदाची चांगली सल्ला घेत असे. बंडखोरलोकांशीं जरी तो इतका विरुद्ध होता, तरीपण त्यानें, सरहद्दीवरील संस्थानांतून गुलामगिरीची पद्धत अगदीं बंद करण्याबद्दल बंडखोर लोकांस पैशाची मोठी रकम देण्याचें योजिलें होतें. यावरून लिंकन अतिशय मोकळ्या मनाचा व निस्पृही होता, हें उघड दिसून येत आहे. इ. स. १८६५ च्या फेब्रुवारी महिन्यांत बंडखोर लोकांच्या वकिलांची व त्याची भेट झाल्यानंतर त्यानें त्यासंबधांत आपल्या मंत्रिसभेंत एक टिप्पण रुजू केलें; मंत्रिसभेंतील सभासदांनीं टिपणांत लिंकन यानें जी योजना केली होती ती नामंजूर केली व त्यामुळें लिंकन यास अतिशय आश्चर्य वाटलें. कॉंग्रेसमधील सभासद वरील योजनेस अनुमोदन देतील असें मंत्रिसभेच्या सभासदांस वाटलें नव्हतें; शिवाय ही योजना जर एकदां प्रसिद्ध झाली आणि नंतर ती

जर साधली नाहीं, तर मात्र मोठ्या अनर्थास कारण खास होईल, असेंही त्यांचे हृदयांत चांगलें बिंबलें होतें. सभासदांपैकीं जी मंडळी हाजर होती, त्यांस लिंकन दुःखानें ह्मणाला कीं, ' जर तुह्मी सर्व विरुद्ध आहांत, तर मला या योजनेबद्दल पुढें कांहीं कर्तव्य नाहीं;' नंतर सदरहु योजनेच्या कागदाखालीं ' मंत्रि-सभेच्या सभासदांनीं एकमत होऊन ही योजना नामंजूर केली आहे ' असा शेरा लिंकन यानें करून ठेविला. आपल्या सल्लागार मंडळीच्या अनुमोदना शिवाय राज्यकारभाराच्या प्रत्येक महत्वाच्या बाबतींत पाऊल पुढें टाकावयाचें नाहीं, असा लिंकन याचा निश्चय होता आणि त्यामुळें त्याला पावलों पावलीं यश येत गेलें.

---



# प्रकरण २७ वें.

## नाटकगृहांत खून.

## विलक्षण घडामोडीच्या वृत्तांताचा शेवट.

॥ देह त्यागितां कीर्ति मागें उरावी ।
॥ मना सज्जना हीच क्रीया करावी ॥
॥ मना चंदनाचे परी त्वां झिजावें ॥
॥ परी अंतरीं सज्जना नीववावें ॥

**रामदास.**



स. १८६५ सालीं वसंतऋतूस प्रारंभ झाला आणि बंडाचा आतां लौकरच संपूर्ण रितीनें अंत होणार असें प्रत्येकास वाटूं लागलें होतें. शर्मन् यानें आणखी एकदां बंडखोरांच्या बलाढ्य आरमाराची दाणादाण करून सोडली. या खेपेस बंडखोर लोकांचा इतका मोड झाला कीं, त्यांच्या सर्व लष्करांत फांटाफूट होऊन कोणाचा कोणाला पत्ता नाहीं, अशी स्थिति झाली होती. जमीन आणि पाणी या सर्व ठिकाणीं **संयुक्त संस्थानाचा** विजय झाल्यामुळें मंगलवाद्यें वाजूं लागलीं होतीं. कॅरोलिनामध्यें शर्मन् याचा प्रवेश होतांच **चार्लस्टौन्** हस्तगत झालें. जनरल टेरी

यानें फिशर किल्ला घेतल्यामुळें बंडखोर लोकांची अटलांटिक् बंदरांतून सामुग्री येण्याची बंद झाली. बंडखोरांच्या लष्करी तुकड्या सैरावैरा धावपळ करीत होत्या त्या, ली यानें आपल्या राजधानीच्या बचावार्थ एकत्र करून आणि लिंकन याच्या दुसऱ्या निवडणूकीच्या सभारंभाच्या पूर्वदिवशीं ह्मणजे ता. ३ मार्च रोजीं जनरल ग्रांट् याची भेट घेऊन आपसांत समजूत होण्यासंबंधी इच्छा दर्शविली. बंडखोर लोकांस कोणत्याही रितीनें आपला हेतू तडीस न्यावयाचा होताच, परंतु तहनामा करून आणखी जास्त काय काय मिळतें, हें त्यांना पहावयाचें होतें. लिंकन यानें फौजखात्याच्या सेक्रेटरी मार्फत जेनरल ग्रांट् यास स्पष्ट कळविलें कीं, ' जर लि. हा त्याचें सर्व सैन्य आपल्या ताब्यांत सोंपून देईल तरच त्याची भेट घ्यावी, नाहीं पेक्षां त्याची भेट घेऊं नये व त्याच्याशीं विशेष बोलणें लावण्याचें हि कारण नाहीं; त्याच प्रमाणें राजकीय बाबतीबद्दलही त्याच्याशीं वाटाघाट करूं नये आणि युद्धाचे काम चालूंच ठेवावें. ' अशा महत्वाच्या बाबती अध्यक्षानें आपल्या अधिकारांतच ठेविल्या होत्या. मार्च ता. २७ रोजीं, लिंकन, ग्रांट आणि शर्मन् हे त्रिवर्ग जेम्स नदीमधील एका आगबोटींत ( ज. ग्रांट याच्या मुक्कामाजवळ ) एकत्र झाले आणि तेथें ह्या त्रिवर्गांत युद्धाच्या चालू कामासंबंधी बरीच वाटाघाट झाली. आणखी एक भयंकर लढाई होणें अवश्य

आहे, असे जेव्हां लिंकन यास कळलें तेव्हां तो अतिशयच चकित होऊन ह्मणालाः— 'काय, रक्तपात झालाच पाहिजे ? आणि हा भयंकर प्रसंग टाळतां येणार नाहीं काय ?' शेवटीं त्याच्या ह्या ह्मणण्याप्रमाणें युद्धाचा भयंकर प्रसंग टळलाच, कारण, ली. यास निराश होऊन आणि कांहीं एक करार, न कारितां मुकाट्यानें शरण यावें लागलें. इकडे शेरिडन् यानेंही जारीनें युद्ध चालू ठेविलें असून शेवटीं व्हर्जिनिया आपल्या हस्तगत करून घेतलें. ज. ग्रांट् हा शेरिडन् याच्या मदतीस लागलीच गेला आणि त्यांनीं ली. याच्या सर्व लष्करासभोंवतीं एक जागा योजून तेथें तळ दिला. इकडे ली याचे सैन्यांतील लोक पोटावर घड्या बांधून मोठ्या कष्टानें काळ कंठीत होते. ह्या उपासमारामुळें त्यांची ती तळमळ ली याला पाहवेना; शेवटीं त्यानें अन्नसामुग्री आणविण्याबद्दल रिचमंड येथें निरोप पाठविला. ह्या निरोपाची चिठ्ठी शेरिडन् याच्या पहाण्यांत आली आणि त्यानें ती पुढें तशीच जाऊं दिली, कारण, अन्नसामुग्री कोणत्या वाटेनें येते, याचा सुगावा काढून ती मध्येंच गिळंकृत करण्याचा त्याचा हेतू होता. वेळ अनुकूळ येत चालली म्हणजे प्रतिकूळ गोष्टी सुद्धां ईशकृपेनें अनुकूळच होत जातात असा साधारण नियम आहे; त्याप्रमाणें शेरिडन् यानें बंडखोरांची सर्व सामुग्री हस्तगत करून घेतली आणि त्यामुळें ते सर्व अगदीं मरणोन्मुख झाले होते. त्यानंतर लौकरच पिटस्बर्ग हें संयुक्त-

संस्थानाच्या हस्तगत झालें. एप्रिल ता. २ रोजीं सकाळीं रिचमंड येथं बंड उपस्थित झाल्याबद्दल भयंकर ओरड ऐकू आली. ह्या बंडाचा पुढारी जेफरसन् डेविस् होता, पण त्यालाही शेवटीं पलायन करावें लागलें. आपलें सर्वस्व गेलें व आतां कांहीं एक राहिलें नाहीं, अशी त्याची खातरी होतांच एखादा चोर तावडींत सांपडला म्हणजे पळून जाण्यासाठीं जशी त्याची धडपड चालू असते तद्वत् तो पळून जाण्याचा यत्न करूं लागला; त्याचे पळून जाण्याचे सर्व उपाय खुंटले तेव्हां वेषांतर करून तो पळून जात असतानां दुर्दैवानें शत्रूच्या हातीं सांपडला व नंतर त्यास कैद करून मनरोकिल्ल्यावर ताबडतोब रवाना केलें.

एप्रिल महिन्याच्या ३ ऱ्या तारिखेस संयुक्तसंस्थानाच्या लष्कराचा पुढारी जनरल विझल् यानें बंडखोर लोकांच्या रिचमंड येथील कांग्रेसच्या मुख्य इमारतीवर संयुक्तसंस्थानास जयप्राप्ती झाल्याबद्दल निशाण उभारिलें. अशा रितीनें बंडखोरांची सर्वस्वी हानी होऊन शेवटीं त्यांचा अस्त झाला. जनरल ग्रांट् याच्या जुन्या मुक्कामानजीक सिटिपॉइंट् येथें, लिंकन हा युद्धाचा परिणाम समजण्यासाठीं वाट पहात बसलाच होता. रिचमंड् हस्तगत झालें, येवढीं अक्षरें कानीं पडतांच तो आपला मुलगा टॉड् यास घेऊन रिचमंड् येथें गेला. शहरांत प्रवेश होतांच त्याचा अति उत्तम सत्कार झाला. आपल्या मुलासह

सर्व शहरांत फिरत असतांना त्यानें सर्व ठिकाणीं संयुक्तसंस्थानाचा विजय झाल्या बद्दलचीं निशाणें फडकत असलेलीं पाहिलीं आणि त्याला मोठा संतोष झाला. हा देखावा पाहत असतांना त्याला असें वाटलें कीं 'मी हें स्वप्नांत तर पाहत नाहींना' कारण कीं, रिचमंड् हातीं लागणें हें मोठें कठीण होतें, परंतु तें शेवटीं हस्तगत झालेलें पाहून त्याची सर्व काळजी निवारण झाली.

हजारों काळे सिद्दीलोक बंधनांतून सुटका करणाऱ्याच्या सभोंवतीं जमले आणि शहरांत जे लोक राहिले त्यांनाही लौकिकाचाराप्रमाणें अध्यक्षाच्या सभोंवतीं उभें राहावें लागले. ज्यांची सुटका झाली ते हर्षानें नाचूं लागले. अध्यक्षाच्या मस्तकावर पुष्पांची मंगलवृष्टि झाली. सर्व लोक 'अध्यक्षास चिरायू कर' असें ह्मणून परमेश्वराची आराधना करूं लागले. आबालवृद्ध नरनारी त्यास आशिर्वाद देऊन परमेश्वरासान्निध त्याचे अभिष्टचिंतन करूं लागले. ह्यावेळीं लिंकन याची अशी स्थिति झाली होती कीं, त्याच्या मुखावाटे एक शब्दही निघेना. शत्रूचा पराजय झाला व आपल्यास यश मिळालें ह्मणून तो गर्वानें कधींच फुगला नाहीं व कोणाची त्यानें निंदाही केली नाहीं. याप्रमाणें लोकांचे आशिर्वाद घेऊन त्यांना आश्वासन देत देत लिंकन हा शहराच्या मध्यभागांत येऊन पोंहचला. लिंकन याची पूर्व स्थिति व हल्लींची स्थिति, या दोहोंची तुलना केली तर खरोखर वरचेवर

आश्चर्य वाटतें. ' धर्म कोणता ' असा जर अब्राहाम यास कोणीही व केव्हांही प्रश्न केला तर ' भूतदया ' हें त्याचें ठरीव उत्तर होतें. ॥ चिंता यशसि न वपुषि ॥ हेंही तत्व लिंकन याचें अंतःकरणांत चांगलें बिंबलें होतें. ॥ भूजलतेजसमीरखरवि-शशिकाष्टादिकीं असे भरला । स्थिरचर व्यापुनि अवघा तो जगदात्मा दशांगुलीं उरला ॥ असा जो सर्वव्यापी परमेश्वर त्याची कृपादृष्टि असल्यावर मनुष्य काय करूं शकणार नाहीं ? लिंकन ह्मणाला ' मी आज कृतकृत्य झालों, जन्मास येऊन जें मला करणें होतें तें केलें. माझा पण होता तो परमेश्वरानेंच सिद्धीस नेला. तो सत्यसंकल्पाचा दाता आहे. मनुष्यावर कसेही प्रसंग येवोत, परंतु त्यानें सत्य सोडूं नये; कारण, परिणामीं सत्याचाच विजय व्हावयाचा, हा जगाचा ठरीव सिद्धांत होय.'

शिकार करणारानें एखाद्या कोल्ह्यास अडकवून ठेविलें ह्मणजे तो जसा निसटून जाण्यासाठीं धडपडत असतो, त्याप्रमाणें जनरल ग्रांट् आणि शेरिडन् यानें ली यास त्याच्या लष्करासहीत अगदीं घेरून टाकिलें असून ली यानें निसटण्यासाठीं भगीरथ प्रयत्न केले, परंतु ते सर्व फुकट गेले. अध्यक्षास कांहींवेळ भेटण्याची विशेष अवश्यकता दिसल्यावरून जनरल **ग्रांट** हा पिटर्सबर्ग येथें थांबला होता. लौकरच उभयतांची भेट झाली; लिंकन यानें जनरल **ग्रांट** याचे पुष्कळ आभार मानिले व

उभयतांचीही मुखें आनंदानें प्रफुल्लित दिसूं लागलीं. युद्धाचा भयंकर भावी प्रसंग टाळतां येऊन शेवट इतक्या लौकर होईल असें लिंकन यास वाटलें नव्हतें.

त्यानंतर अब्राहाम लिंकन हा वॉशिंगटन् येथें परत गेला आणि जनरल ग्रांट यानें तावडतोब पश्चिम प्रांतांत जाऊन व्हर्जिनिया पैकीं फार्मविली गावीं मुकाम केला; आणि उत्तर-व्हर्जिनियापैकीं ॲपोमॅटॉक्स् कोर्टहौस येथें तारिख ९ एप्रिल रोजीं ली याचे सर्व लष्करी लोक हस्तगत करून घेतले. दोघेही जनरल एकमेकास समोरा समोर भेटले. ली हा स्वाधीन झाला त्यावेळीं कोणतेही करार अगर अटी झाल्या नव्हत्या. जनरल ग्रांट् यानें २८००० लोक ताब्यांत घेऊन ते भुकेनें व्याकूळ झाले असल्या कारणानें संयुक्त संस्थानाच्या सरकारातर्फे त्यांची अन्नपाण्याची सर्व व्यवस्था उत्तम प्रकारची लाऊन दिली. पेरण्या नुकत्याच चालू झाल्या होत्या, त्यामुळें बंडखोर लोकांपैकीं पुष्कळ लष्करी लोकांनीं जनरल ग्रांट् यास विनंति केल्यावरून त्यानें त्या सर्व लष्करी लोकांस आपआपल्या घरीं जाऊन जमिनीची व्यवस्था करण्यास परवानगी दिली. ह्या प्रमाणें बंडाचा शेवट होऊन सर्वत्र शांतता झाली.

उत्तरेकडील लोक हर्षानें जणूंकाय निवळ वेडेच झाले

होते. अध्यक्षानें प्रथम पिटर्सबर्ग हस्तगत झाल्याबद्दलची बातमी फौजखात्यांत पाठविली व ती वॉशिंग्टन् येथें ता. ३ एप्रिल रोजीं सकाळीं दहा वाजतां पोंहचली; आणि लागलींच पाऊण तासानें जनरल विझल् यांजकडून रिचमंड् हस्तगत करून घेतल्याबद्दल आनंदाचें वर्तमान येऊन पोंहचलें. बंडाचें काहूर नाहींसें झाल्यामुळें डेविस् हा परागंदा झाला आणि जनरल ली जरी बंडाचा अग्रणी होता, तरीपण त्याला कांहींएक विचारण्याची अवश्यकता न ठेवितां बाकी राहिलेले सर्व लोक मुकाट्यानें शरण आले. सर्व राष्ट्रीय राजधानी अध्यक्ष **अब्राहाम-लिंकन** याच्या नांवाच्या जयघोषानें अगदीं दणाणून गेली होती. हळूं हळूं ही आनंदाची बातमी खेड्यापाड्यांतून पसरत पसरत सर्व देशभर तिचा प्रसार लौकर झाला. आनंद प्रदर्शनार्थ जयध्वज जिकडे तिकडे फडकूं लागले. अध्यक्षाच्या सन्मानार्थ तोफा सुटल्या, मंगल वाद्यें वाजलीं आणि मोठमोठाल्या मिरवणूकीही निघाल्या. ज्याला जसजसें योग्य दिसलें तसतसा तो अनेक रितीनें आनंद प्रदर्शित करूं लागला. लोकांस केवळ जयप्राप्ति झाल्यामुळें आनंद झाला होता, असें कांहीं नाहीं, परंतु लढाईचा त्रास मिटल्यामुळेंही त्यांना अत्यानंद झाला आणि समाधान वाटलें. आतां लढण्याची काळजी निवारण झाली, रणांत देहं बळी पडण्याचें संपलें आणि संयुक्तसंस्थानाच्या बचावाविषयीं आतां मुळींच चिंता उरली नाहीं, असें सर्व लोक आपआपसांत बोलूं लागले: कोणीं म्हणत

कीं, अध्यक्षास धैर्य किती आहे याबद्दल परमेश्वरानें त्याचें सत्व पाहिलें, तरीपण यत्किंचित्ही धैर्य न सोडितां परिणामीं अध्यक्ष लिंकन हा विजयी झाला.

वॉशिंग्टन् शहरांत आनंद प्रदर्शनार्थ जे महोत्सव चालू झाले, त्या सर्वांस राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें होतें. हे सणाचे दिवस समजून त्यावेळीं सर्व सरकारी कचेऱ्या बंद ठेविल्या होत्या आणि प्रत्येक सरकारी इमारतीच्या कळसावर जयध्वज उभारिले असून सर्व ठिकाणीं मंगल तोरणें बांधिलीं होतीं. रिचमंड् हस्तगत झाल्याबद्दल ५०० आणि पिटर्सबर्ग हस्तगत झाल्याद्दल ३००, याप्रमाणें एकंदर ८०० तोफा सन्मानार्थ सुटल्या. शहरांतील प्रत्येक गल्लींतून मंगलवाद्यें वाजत होतींच; आणि सर्व जनसमूहांत व्याख्यान देण्याचें काम, अध्यक्षाचे गैरहाजरींत, मंत्रिसभेच्या सभासदांस सोपिलें होतें. कॉंग्रेस जरी त्यावेळीं भरावयाची नव्हती, तरीपण कॉंग्रेसला येणारी सर्व मंडळी वॉशिंग्टन् येथें एकत्र जमलेली होती. दुसऱ्या दिवशीं हे विजयोत्सव अधिक प्रमाणावर चालू झाले; आणि तारीख ४ एप्रिल रोजीं सर्व शहरांत रोषणाई होऊन लोकांनीं आपआपलीं घरेंदारेंही अनेक प्रकारांनीं श्रृंगारलीं होतीं. व्यापारी वर्गांतील लोकांनीं आपआपलीं दुकानें तोरणांनीं सुशोभित करून पुष्कळ थाटमाट केला होता. रोषणाइचा सर्व प्रकाश गल्ल्यांतून इतका पडला होता

कीं, सुई जरी रस्त्यांत पडली तरी ती सर्वांस स्पष्ट दिसत होती. जें दारूकाम सुटलें तें तर अत्यंत प्रेक्षणीय असून त्यावेळीं खेड्यापड्यांतील जे शेतकरी जमले होते, त्यांस वॉशिंगटन् शहर जणूंकाय खरोखरच पेटलें आहे असें दिसत होतें.

एप्रिल महिन्याच्या ८ व्या तारिखेस रविवारीं रात्र बरीच उलटल्यावर ली हा स्वाधीन झाल्याची वॉशिंगटन् येथें बातमी येऊन पोंहचली आणि तीलागलीच लिंकन यास कळविली; त्यावेळीं लिंकन हा वॉशिंगटन् येथें परत आला होता. व्हाइटहौस राजवाड्याच्या एका मोठ्या खिडकींत अब्राहाम लिंकन हा बसून खालील जनसमूहाकडे प्रसन्न चित्तानें पाहत होता. आपण कांहीं तरी संभाषण करावें, अशी लोकांची फार इच्छा आहे, असें त्यानें ताडलें. लोकांनीं खालीं इतका कांहीं गलका केला होता कीं, कोणाचें बोलणें कोणास ऐकूं येईनासें झालें होतें. इतक्यांत लिंकन यानें ' ऐका ' असें म्हणून हातानें खूण करितांच गलका बंद होऊन जिकडे तिकडे स्वस्थता झाली. त्याचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले होते व तो सौम्य रितीनें सर्वांस म्हणाला ' लौकरच पुनः आणखी एक मोठा समारंभ होणार आहे, त्यावेळीं मला जें कांहीं बोलावयाचें आहे तें मी बोलेन; तुमच्या सर्वांच्या आग्रहास्तव आतांच मी सर्व बोललों म्हणजे मग त्यावेळीं कांहीं बोलावयाचें मला राहणार नाहीं, याचा विचार करा. ' हें विनो-

दाचें भाषण ऐकून लोक हसूं लागले व त्यांना मोठें समाधान वाटलें. जनरल ग्रांट् आणि आपल्या हाताखालचे आणखी कांहीं आरमारावरील अंमलदार वगैरे मंडळींचे अध्यक्षानें सर्वांसमक्ष मोठें अभिनंदन केलें आणि नंतर सर्व लोक आपआपल्या घरीं गेले.

एप्रिल महिन्याच्या ११ व्या तारिखेस सायंकाळच्या वेळीं वॉशिंगूटन् शहरांत सरकारतर्फे पुनः रोषणाई झाली होती. हा समारंभ हमेशाच्या तेथील रितीप्रमाणें व्हावयाचा होता, असें लिंकन यास समजलें. कांहीं वेळानें अध्यक्ष, त्याच्या कुटुंबांतली मंडळी आणि कांहीं स्नेही मंडळी, ह्या सर्वांचे मोठ्या सभारंभानें भोजन झालें. त्यावेळीं लिंकन हा एका मित्रास म्हणाला ‘ तुमच्या मनांत कसले विचार घोळत आहेत तें मी समजलों, तुम्हांस वाटत असेल कीं, मी जंगलांत एखाद्या लांकडाच्या खोडावर उभा राहून संभाषण करणारा असल्यामुळें भाषणांचा मसूदा तैयार केल्याशिवाय मोठ्या जनसमूहांत बोलूं शकणार नाहीं, परंतु मला जें बोलावयाचें आहे, तें देशासंबंधी असल्यानें तें काम मी फार काळजीपूर्वक करीन. गेल्या खेपेस मी जें भाषण केलें, त्यांत शत्रूला उद्देशून मी म्हणालों कीं,‘ शेपूट घालून ते पळाले’ हे शब्द बोस्टन् शहरांतील लोकांस आवडले नाहींत, ह्याचा मला खेद वाटतो. ते शब्द ज्याअर्थी त्यांना अप्रयोजक वाटले, त्याअर्थी त्यासंबंधांत या पुढें मी जास्त काळजी ठेवीन. ’

सरते शेवटीं लढाईचें काम आटोपलें हा प्रसंग खरोखरच लक्षांत ठेवावया जोगा असून इतिहासांतही लिहून ठेवावयासारखा होता. राजवाड्याच्या बाहेर लोकांचा बराच जमाव होता व त्यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला. तोफांची सरबत्ती होत असून वाद्येंही वाजत होतीं आणि तशांत दारूकाम सुटत असल्यानें राजवाड्यासमोर एकच धांदल उडाली होती. लिंकन आणि त्याचे कांहीं मित्र सर्वत्र शांतता झाल्यानंतर भाषण करण्याची वाट पाहत होते; नंतर लिंकन यानें भाषण करण्यास जेव्हां प्रारंभ केला तेव्हां गलका बंद झाला. राष्ट्रीय विजयोत्सवा संबंधीं मोठें भाषण होईल असें लोकांस वाटलें होतें, पण तसें कांहीं झालें नाहीं. अध्यक्षाचें सर्व भाषण राजकीय विषयासंबंधीं होतें, लुइझिआना संस्थानांतील कायदे करणाऱ्या सभेनें, 'गुलामगिरी नाहींशी केली असून काळ्या सिद्दी लोकांस मत देण्यास कायदेशीर हक्क आहे,' या प्रमाणें ठराव केल्याबद्दल सदरहु भाषणाचा मुख्य विषय होता, शेवटीं तो असें ह्मणाला कीं, लुइझिआना संस्थानास खऱ्या मार्गाचें वळण लागत आहे व तें लौकरच आपणास पूर्णपणें अनुकूल होईल.'

लिंकन याचें हें शेवटचें भाषण संपलें. बंडखोरांचा अगदीं पराजय होऊन त्यांची मोठी हानी झाली. ता. १४ एप्रिल इ. स. १८६५ रोजीं दोन प्रहरीं मंत्रिसभेच्या सभासदांची अखे-

रची बैठक झाली, त्यांत ग्रांट् हा हाजर होता. लिंकन हा प्रधान मंडळी लौकर येण्याची वाट पाहत असून त्याचे मुखावर औदासिन्याची छाया दिसत होती. त्याला एक विलक्षण स्वप्न पडलें; पण हें स्वप्न नसून त्याला एक प्रकारचा भास झाला होता व भावी व ईट प्रसंगाची पूर्व कल्पना होती. स्वप्न कोणतें अगर भास कसला, हें त्यानें कांहीं एक न कळवितां तो आपल्या नित्य व्यवसायास लागला. मंत्रिसभेचें काम आटोपल्यावर तो आपल्या पत्नीसह कांहीं वेळ गाडींत बसून फिरावयास गेला. अध्यक्षाच्या कामा संबंधांत आपली मुदत संपत आली असून व्हाइटहौस राजवाडा सोडल्यावर आपण पुढें काय करावें आणि मुलांचें कल्याण होण्यासाठीं काय केलें पाहिजे, ह्याबद्दल त्या उभयतांचे आनंदांत बोलणें झालें होतें.

सदरहु तारखेस पूर्वी ठरल्या प्रमाणें लिंकन, त्याची पत्नी, जनरल ग्रांट् आणि कांहीं खास स्नेही, असे सर्व रात्रीं नाटकगृहांत मिस् एल्. कीनी कृत " आपला अमेरिकन बंधु " या नांवाचा खेळ पहावयास जावयाचे होते. ही बातमी वर्तमान पत्रांत प्रसिद्ध झाल्याकारणानें प्रेक्षक लोकांची गर्दी अतिशय झाली होती. जनरल ग्रांट् हा कांहीं खास काम असल्यामुळें येऊं शकला नाहीं; लिंकन, त्याची पत्नी, मिस् क्लेराहॅरिस ( न्यूयार्क येथील सिनेटर इरॉहारिस याची मुलगी ) आणि मेजर रॉथबान् वगैरे मंडळी

रंगभूमीच्या समोरील वरील बाजूस बसली होती. जॉन्विल्कीस् बूथ् हा नाटकांतील एक पात्र असून त्यानें कांहीं मारेकरी अनुकूल करून घेतले होते आणि योग्य संधी साधून अध्यक्ष अब्राहाम लिंकन याचा जीव घेण्याचा बेत केला होता. जॉन्बूथ् यानें मुद्दाम द्वेषबुद्धीनें हा विचार केला नसून त्याच्या मनांत एक खुळी कल्पना आली होती कीं, लिंकन हा निर्दय आणि क्रूर राक्षस असून त्याला जगांतून नाहींसा केलाच पाहिजे तो व त्याची साथीदार मंडळी यांनीं मोठ्या काळजीनें दूरवर विचार करून हा दुष्ट बेत तडीस नेण्याचे योजिलें. त्या रात्रीं त्यांनीं एक अतिचपळ घोडा नाटकगृहाचे मागचे बाजूस तयार ठेवला होता व हें दुष्ट कृत्य संपतांच त्या घोड्यावर बसून तो पळून जाणार होता.

रात्रीं साडेदहा वाजण्याचे सुमारास जेव्हां सर्व प्रेक्षकगण रंगभूमीवर चाललेला प्रयोग पाहण्यांत गर्क झाला होता, तेव्हां मारेकरी जॉनबूथ् हा कोणाच्या दृष्टीस न पडतां अध्यक्ष लिंकन आणि त्याची मित्र मंडळी ज्या ठिकाणीं बसली होती, तेथें मागील बाजूनें मुकाट्यानें येऊन लपून बसला. योग्य संधी मिळतांच त्यानें लिंकन याचे मस्तकावर पिस्तुलाचा रोख धरून तें त्यांजवर सोडतांच लिंकन हा बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला; त्यामुळें एकाएकीं बरीच गडबड उडाली; पण ज्या जागीं हा भयंकर प्रसंग घडला, त्या ठिकाणीं अतीशय गर्दी असल्यामुळें लोकांच्या

पाहण्यांत सर्व प्रकार आला नाहीं. मेजर राथ्बोन् हा एकदम उभा राहिला व त्यानें खून करणाऱ्यास धरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्या दुष्टानें त्याच्या हातावर एक वार करून लागलींच तेथून रंगभूमीवर त्यानें उडी मारली आणि आपल्या हातांत जंब्या धरून तो फिरवित फिरवित म्हणाला ' जुलमी राजास असेंच पाहिजे. दक्षिणेकडील लोकांचा सूड उगविला,' असें म्हणून तो तेथून जो निसटला तो पुनः दिसला नाहीं.

त्यावेळीं चहूंकडे धांदल उडाली असून पुष्कळांना अतीशय दुःख झालें. अध्यक्ष लिंकन हा बेशुद्ध झाला असून त्यास एका राहत्या घरांत नेलें; रॉबर्ट लिंकन, त्याची आई, अध्यक्षाचे सेक्रेटरी, मंत्रिसभेंतील सभासद व कांहीं खास स्नेही मंडळी रात्रभर त्याच्या जवळ बसून होती. त्याच्या अमोल जिवाचा बचाव करण्याचे संबंधांत मानवी उपाय सर्व व्यर्थ होते, मात्र औषधोपचारानें त्याच्या अंगांत स्वाभाविक शक्ति राहून जिवाची जी तळमळ होत होती, ती मात्र थोडी बंद झाली. लिंकन यास एक शब्दही बोलण्याची शक्ति राहिली नव्हती. काय घडलें अगर आपणा जवळ कोण होतें, हें सांगण्या इतकी त्याला शुद्धिही नव्हती. औषधोपचार करणाऱ्या नोकर लोकांची आपसांत कुजबूज, मोठमोठ्या लोकांचे दुःखाचे हुंदके आणि मरणोन्मुख झालेल्या लिंकनचें कण्हणें, या शिवाय त्या खोलींत सर्वत्र शांतता होती. ता. १५

एप्रिल सन १८६५ शनिवारीं सकाळीं सात वाजून बावीस मिनिटांनीं या थोर सत्पुरुषानें आपला जड देह सोडिला आणि त्याची सत्कीर्ति या भुमंडळावर अजरामर राहिली.

हा शोचनीय व हृदयास विदारण करणारा प्रकार नाटकगृहांत चालू असतांना त्या दुष्टांच्या टोळीपैकीं कित्येकांनीं तेथें असलेल्या कांहीं सरकारी अमलदारांसही ठार मारण्याचा प्रयत्न केला. उपाध्यक्ष **जॉनसन** व फौजखात्याचा सेक्रेटरी **स्टॉटन्** या उभयतांचयाही जिवावर येऊन बेतली होती; परंतु ईशकृपेनें त्यांच्यावरील गंडांतर टळलें. सेक्रेटरी **सिवर्ड** यास एकाएकीं कांहीं इजा झाल्यामुळें तो अगदीं निजून होता, परंतु या वज्रदेही मारकऱ्यांपैकीं एकानें त्याच्या निजण्याच्या खोलींत प्रवेश करून त्याच्या मस्तकावर आणि तोंडावर जंब्याचे कांहीं वार केले. **सिवर्ड** याच्या घरच्या मंडळीनीं व इतर पुष्कळ लोकांनीं त्यास वाचविण्यासाठीं पुष्कळ उपाय केले आणि त्यांना परमेश्वर कृपेनें चांगलें यश मिळालें. तो मारेकरी शेवटीं सांपडला आणि ज्याप्रमाणें इतर मारेकऱ्यांवर खटले होऊन ते प्राणास मुकले, त्याप्रमाणें तोही प्राणास मुकला. **लिंकन** याचा ज्या दुष्टानें प्राण घेतला त्यास धरून **मेरिलँड्** येथें पिंजऱ्यांत कोंडलें होतें; आणि ज्याप्रमाणें एखाद्या कुऱ्यावर गोळी घालून त्यास मारतात, त्याप्रमाणें त्या मांगहृदयी मनुष्यास गोळी घालून ठार मारिलें. मरतेसमयीं त्यास अतिशय यातना सोसाव्या लागल्या (॥ अत्युत्कटैः पुण्य पापै रिहैव फलमश्नुते. ॥)

वॉशिंगटन् शहरांत ता. १५ एप्रिल रोजीं अरुणोदय होतांच लिंकन याच्या प्रेतास व्हाइटहौस राजवाड्यांत नेलें. प्रेताच्या मागून जी मंडळी चालली होती, त्या सर्वांचीं मुखें म्लान झालेलीं असून त्यांच्या नेत्रांतून सारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. सर्व देशांतील लोकांस मस्तकावर आकाश कोसळल्या प्रमाणें वाटत होतें. आबालवृद्ध स्त्रीपुरूष हा शोचनीय प्रकार पाहून अतिशयच हळहळले. विजयध्वज फडकत होते ते दुःख प्रदर्शनार्थ काढून ठेविले. 'आपला पुरस्कर्ता गेला! आपला पुरस्कर्ता गेला!' असें लोकसत्ताक स्वतंत्रपक्षांतील सर्व लोक म्हणूं लागले व ते फार दुःखी झाले. या दुःखामुळें सर्व सरकारी कचेऱ्याही पुष्कळ दिवस पावेतों बंद राहिल्या होत्या.

ता. १९ एप्रिल बुधवारीं अध्यक्षाच्या प्रेताचा उत्तरविधि करण्यासाठीं पुष्कळ राष्ट्रभक्त व्हाइटहौस राजवाड्यांत एकत्र जमले होते. ज्या राजवाड्यांत बसून लोककल्याणाचीं कामें लिंकन यानें अतिशय संकटें सहन करून केलीं आणि त्यामुळेंच तो इतका लोकप्रिय झाला, त्या राजवाड्यांतून आज त्याचें प्रेत राष्ट्रीयभक्तांनीं उभारलेल्या एका भव्य इमारतींत उत्तरविधी-स्तव जात असलेलें पाहून कोणाचें अंतःकरण कळवळणार नाहीं? लिंकन याच्या स्मशानयात्रेस बरीच अंमलदार मंडळी व वडे वडे सभ्य गृहस्थ एकत्र जमून आले होते. हजारों पुरुष,

हजारों स्त्रिया, आणि हजारों मुलेंबाळें आपल्या लोकप्रिय "अध्यक्षाचें मुख अखेरचें एकदां तरी डोळ्यांनीं पाहावें, या हेतूनें ज्याला जेथें सवड मिळेल तेथें तो उभा राहून पाहून घेऊं लागला. लिंकन याचे घरची मंडळी या असह्य दुःखानें इतकीं होरपळून गेली होती कीं, त्याचें वर्णन करण्यास कोणत्याही लेखकाची लेखणी चालेल असें वाटत नाहीं. " ज्यानें संयुक्त संस्थानाचें रक्षण केलें, ज्याला अमेरिकेंत ' स्वातंत्र्याचा प्रत्यक्ष भानूच उदयास आला आहे कीं काय ' असें म्हणत होते, ज्यानें उग्र तपश्चर्या करून स्वातंत्र्यसौख्यदेवीस प्रसन्न करून घेतलें, ज्यानें काळ्या सिद्दि गुलामांचे—त्यांच्या अनाथ स्त्रियांचे आणि पोराबाळांचे तळतळाट नाहींसे करून—सहस्त्रावधी आशिर्वाद घेतले, ज्या बंडखोरांनीं सिद्दि गुलामांच्या स्वातंत्र्यसुखावर आग पाखडली, त्या दुष्टांचा जो प्रत्यक्ष महाकाळ असून त्यांची ज्यानें राळ उडविली, ज्यानें गुलामागिरीचीं खोल गेलेलीं पाळेंमुळें खणून काढण्यासाठीं अहोरात्र हातांत कुऱ्हाड वाळगली होती, तो सत्पुरुष आज या जगांतून नाहींसा झाला ! परमेश्वरा ! कोण हा आमच्यावर भयंकर प्रसंग आणलास ! देवा ! दहा मनुष्यें गेलीं तर त्याचें इतकें दुःख वाटत नाहीं, परंतु दहांचा पालनकर्ता गेला म्हणजे मात्र अतिशय दुःख होतें, या म्हणप्रमाणें अध्यक्षाच्या ऐवजीं दुसरीं हजारों माणसें गेलीं असतीं, तर त्याचें दुःख वाटलें नसतें, परंतु आज लिंकनासारखा थोर मनाचा अध्यक्ष नाहींसा झाल्यानें

आम्ही सर्व राष्ट्रभक्त दुःखसागरांत पडलों आहोंत, तर आतां तूंच आमचें रक्षण कर " असें म्हणून कित्येक राष्ट्रभक्त दुःखाचा वेग अनावर झाल्यामुळें एकसारखे अश्रू ढाळीत होते.

इलिनॉइसपैकीं स्प्रिंगफिल्ड जवळील स्मशानांत संयुक्त-संस्थानाचा अध्यक्ष अब्राहाम लिंकन यास मूठमाती दिली; आणि त्याठिकाणीं त्याच्या पुष्कळ स्नेही मंडळींनीं त्याचें योग्य स्मारक केलें. राजेरजवाडे, आप्तस्वकीय, इष्टमित्र वगैरे पुष्कळ लोकांनीं लिंकनच्या घरच्या मंडळीशीं समदुःखी होऊन त्यांस दुःखवटे केले. अशारितीनें या महात्म्यानें ॥ स्वार्थो यस्य परार्थ एव स पुमानेकः सतामग्रणीः ॥ या उक्तीप्रमाणें स्वार्थावर तिलांजली सोडून अगदीं निस्पृहरितीनें आणि एकनिष्ठेनें देशसेवा केली.

---



# उपसंहार.

॥ संहतिःश्रेयसी पुंसां । संहतिः कार्यसाधिका ॥ ( हितो. )

वाचकहो ! या दुःखपरिणामी ऐतिहासिक कथानकाचा भाग संपला. ग्रंथविस्तार बराच झाला आहे, शिवाय, ग्रंथांत बऱ्याच ठिकाणीं या चरित्रासंबंधांत यथायोग्य अनुसंधानें देऊन विवेचन केलेंच आहे, करितां आतां त्याविषयीं विशेष कांहीं न लिहितां चालू पद्धतीस अनुसरून या चरित्रांतून ज्या कांहीं घेण्यासारख्या व इतर मुद्याच्या गोष्टी आहेत, त्यांचा थोडक्यांत विचार करूं.

ज्याप्रमाणें उज्जयिनी, दिल्ली, बनारस वगैरे इतिहासप्रसिद्ध नांवें ऐकिलीं असतां हिंदुस्थानवासीयांच्या मनांत अनिर्वचनीय सानंदाभिमान थरारून उभा राहतो, त्याप्रमाणें युनाइटेड् स्टेट्स्चें ( संयुक्त संस्थानाचें ) नांव घेतांच अमेरिकन् लोकांचे मनांत सर्व प्रकारच्या ऐहिक ऐश्वर्याचें किंबहुना चतुर्विध पुरुषार्थाचें माहेरघरच, अशा प्रकारची भावना उत्पन्न होते. अध्यक्ष लिंकन हा अमेरिकन् असून सामाजिक, धार्मिक, औद्योगिक वगैरे विषयांकडे दुर्लक्ष करून तो केवळ राजकीय विषयाचाच विचार करीत नव्हता; शौर्य, उद्योगप्रियता, धंदेवाईक लोकांची उत्कृष्ट अथवा निकृष्ट स्थिति, सांपत्तिक स्थितींत वेळोवेळीं होत जाणारा फरक, राष्ट्राच्या कल्याणाचे अनेक उपाय, ज्ञाना-

चा प्रसार, लोकांची नैतिक स्थिति, या सर्व गोष्टीबद्दल त्यानें चांगलाच विचार केला होता. ॥ यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ॥ ( गीता ); या कृष्णार्जुनाच्या जोडींत कृष्णाच्या ठिकाणीं युक्ति व अर्जुनाच्याठायीं शक्ति होती; त्याच प्रमाणें या शक्तियुक्तिची रामदास व त्यांचे शिष्य शिवाजी महाराज यांची जोडी जमलेली होती; परंतु लिंकनच्या एकट्याच्याच अंगीं या शक्तियुक्तिचा संयोग झाला होता, आणि म्हणुनच तो राष्ट्रोन्नतीच्या कामीं यशस्वी होत गेला. तात्पर्य, शक्ति व युक्ति या दोहोंचा संयोग झाल्यावांचून राष्ट्रवर येत नाहीं हें कोणीही विसरतां कामा नये. या हकिगतीवरून राष्ट्राचें भाग्य उदयास येण्यास अनेक कारणें लागतात, एकच कारण पुरें होत नाहीं हें त्यास चांगलें समजलें होतें.

लिंकनच्या चारित्रांत अनुकरणीय गोष्टी इतक्या आहेत कीं, प्रत्येक गोष्टींतलि विषयावर स्वतंत्र पुस्तक लिहितां येईल. परंतु या चारित्राचें थोडक्यांत जर सार ह्मणून सांगणें असेल तर तें चारच शब्दांत सांगतां येईल. ( १ ) स्वार्थत्याग; ( २ ) साहसप्रियता; ( ३ ) दृढनिश्चय; आणि ( ४ ) खऱ्यामार्गाचें अवलंबन ( १ ) उत्तम हेतु आणि सदिच्छा या दोन गोष्टींत स्वार्थत्यागाची भर पडल्याशिवाय मनुष्य संपूर्ण लोकश्रद्धेस पात्र होत नाहीं. लिंकन अध्यक्ष असतांना त्याच्या जवळ प्रचंड सैन्य संपत्ति, अधिकार वगैरे सर्व प्रकारची सिद्धता होती, तरी पण सार्वजानिक कल्याणाशिवाय दुसरा कांही अंतिम हेतु त्याचे ठायीं

वास करीत आहे, अशी कल्पनाही लोकांच्या मनाला शिवली नाहीं; त्यानें ब्लॅकहॉकच्या युद्धांत प्रथम रणदीक्षा घेऊन आपल्या स्वार्थसाधनाची समीध् राष्ट्रीय होमकुंडांतील पवित्र अग्निनारायणास अर्पण केली. ऐन तारुण्याची कळी उमलण्याच्या वेळीं देशस्थिति अतीशय निकृष्टावस्थेंत असतांना तशा स्थितींत त्याच्या बरोबरीच्या शेंकडों तरुणपुरुषांनीं जे स्वार्थ साधनाचे मार्ग पत्करिले, अथवा कोणत्याही राष्ट्रांत कोणत्याही काळीं पुष्कळ पुरुष जे तसे मार्ग पत्करितात, त्यांचा वीट आमच्या चरित्रनायकास, जंगलांत भटकून दिवस काढलेले असुन व विशेष शिक्षण नसतांनाही केवळ स्वयंस्फूर्तीनें आला व तो अखेरपावेतों स्वकर्तव्यपरामुङ्ख झाला नाहीं. तात्पर्य, राष्ट्रभक्तांचा स्वार्थत्याग कोठवर जाउं शकतो त्याचें 'लिंकनचें चरित्र' हें एक उत्तम उदाहरण होय. ( २ ) अध्यक्ष लिंकन हा जर साहसाला कचरता किंवा साहसकर्म करून मिळणाऱ्या स्वार्थाची हाव धरता, तर त्याचे हातून देशकार्य झालें नसतें. त्यावेळीं भेकड व मूर्ख मंडळी कांहीं कमी होती असें नाहीं आणि अशा भेकड व मूर्खशिरोमणींनीं आपल्या मालिकेंत त्यास ओढण्याचा प्रयत्नही पुष्कळ केला; परंतु ॥ न प्राणांते प्रकृतिविकृतिर्जायते चोत्तमानां ॥ या उक्तीप्रमाणें लिंकनच्या वृत्तींत मुळींच फरक पडला नाहीं व त्यांच्या मोहजालांत न सांपडतां राष्ट्रहिताप्रीत्यर्थ मोठमोठीं साहसाचीं कामें त्यानें केलीं. वीरमता जिजाबाईनें व

जगदंबेनें शिवाजी महाराजास ॥ वीरांना उचिता अशी करि कृती जा धर्म ये मागुनी ॥ हा जो आशिर्वाद दिला होता तसाच परमेश्वरानें लिंकन यास दिला होता, असें स्पष्ट दिसून येतें. साहसकर्म केल्यानें त्याला खानगी फायदा होण्याचा पुष्कळ संभव होता, परंतु त्यावर त्यानें राष्ट्रदेवतेच्या नांवानें उदक सोडलें होतें. ( ३ ) ॥ अन्तस्तिमिरनाशाय शाब्दबोधो निरर्थकः ॥ न नश्यति तमो नाम कृतया दीपवार्तया ॥ १॥ अशा प्रकारचें कोरडें ब्रम्हज्ञान लोकांस सांगून अथवा ॥ एतान् प्रपश्यासि घटान् जलयंत्रचक्रे । रिक्ता भवंति भरि । भरिताश्च रिक्ताः ॥ १ ॥ या ह्मणीप्रमाणें स्वदेशाच्या भावी उत्कर्षाचें चित्र नुसत्या कल्पनाशलाकेनें हृत्पटावर रेखाटून राष्ट्राचा उदय केव्हांना केव्हां तरी होईलच, असें ह्मणून लिंकन स्वस्थ कधींही बसला नाहीं; तर एखाद्या विजेच्या किंवा वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या चाकाला झालें तरी प्रथम कोणी तरी एकदां गति द्यावीच लागते, त्याप्रमाणें नियतिचक्रालाहि गति देण्यास आपण अंशतः तरी कारणभूत व्हावें, ही महत्वाकांक्षा त्याचे हृदयांत खिळलीच होती, आणि अशा निश्चयी स्वभावामुळेंच त्याच्या स्वराष्ट्रप्रीतीला कर्तृत्वाचें स्वरूप आलें. ॥ बोलण्यासारखें चालणें ॥ स्वयें करून बोलणें ॥ तयांचीं वचनें प्रमाणें ॥ मानिती जनीं ॥ १ ॥ समजले आणि वर्तले, तेच भाग्य पुरुष झाले ॥ २ ॥ वेडे करावे शहाणे ॥ तरीच जिणें श्लाघ्य वाणें ॥ उगेंच वाद्वांग वाढविणें, हें मूर्खपण ॥ ३ ॥ समर्थ रामदास स्वामींच्या या

उपदेशांतील तत्वाप्रमाणें सर्व गोष्टी दृढनिश्चयानें त्यानें लोकांच्या निदर्शनास आणून दाखविल्या. बाल्टिमोरहून वॉशिंग्टन् पावेतों सुरक्षित पोंहचेपर्यंत लिंकनच्या डोक्यावर त्याला ठार मारण्याच्या कृष्ण कारस्थानाचें सुदर्शनचक्र एकसारखें फिरत होतें, तरी तो मुळींच डगमगला नाहीं आणि निश्चय कायम ठेविल्यामुळेंच त्याचें तें विघ्न टळलें. ( ४ ) इंग्रजांचे दोघे वकील आपल्या तावडींत सांपडले असून त्यानें त्यांस सोडून देण्याचा हुकूम केला; त्या संबंधांत लोकांनीं अतीशय ओरड केली, परंतु तिकडे त्यानें मुळींच लक्ष दिलें नाहीं, व दुकानावर बसून विक्री करतांना गिऱ्हाइकाकडून चुकून आलेले जास्त पैसे अगर त्यास दिला पाहिजे त्यापेक्षां चुकून कमी दिला गेलेला माल, त्याला तो परत पोंहचवीत असे. अशाच अनेक गोष्टीवरून न्यायदेवतेला स्मरून त्यानें सत्याचाच मार्ग धरला होता हें उघड दिसतें.

मनुष्यजातीच्या स्वतंत्र हक्काबद्दल लिंकनचें म्हणणें होतें कीं, परमेश्वरानें जे हक्क मनुष्यमात्रास दिले आहेत, त्याचें संरक्षण करणें हें आपलें प्रथम कर्तव्यकर्म होय. जो आपली अथवा आपल्या राष्ट्राच्या उन्नतीची इच्छा बाळगीत नाहीं असा पृथ्वीच्या पाठीवर कोण मनुष्य असेल ? गोऱ्या लोकांनीं सदैव काळ्या ( सिद्दी ) लोकांस अधम पशु समजून व त्यांना गुलाम धरून त्यांच्या डोक्यावर खुशाल नाचावें, एवढ्यासाठीं कांहीं

काळ्या ( सिद्दी ) लोकांस परमेश्वरानें निर्माण केलें नाहीं. आह्मीं माणसें आहोंत असें आपल्या कृतीनें जगास दाखविण्यास काळ्या (सिद्दी) लोकांस हक्क आहेच; या मनुष्यजातीच्या स्वतंत्र हक्कासंबंधांत त्यानें केलेले नियमाचे मसुदे जरी राष्ट्रीयसभेच्या प्रचंड सत्तेच्या अ:वापुढें वाळूच्या घरकुलाप्रमाणें अनेकवेळां वाहून गेले, तरीपण तो हताश झाला नाहीं, अगर विरुद्धपक्षाची कधीं कधीं सरशी झाल्यामुळें तत्प्रीत्यर्थ त्यांचें चालू असलेले जयघोष ऐकूंही येऊं नयेत ह्मणून कानांत बोटें घालून दिवाभिता-प्रमाणें तो कधीं बसला नाहीं.

यावरून असा एक बोध घेतां येईल कीं, कोणतेंही राष्ट्र कालगतीनें कितीही जरी खालावलें तरी त्यानें निराश होतां कामा नये; राष्ट्रांत कोठें तरी महत्वाकांक्षेची अगर राष्ट्राभिमानाची ठिणगी जर शिल्लक उरली असली तर ती अनुकूळ स्थिति येतांच पेट घेतल्याशिवाय राहणार नाहीं काळ्या सिद्दी लोकांचा अतीशय छळ होऊन त्यांना भयंकर यातना सहन कराव्या लागल्या, कारण, काळ प्रतिकूळ होता; परंतु अनुकूळ काळ येतांच काळ्या सिद्दी लोकांच्या तळतळाटापासून उत्पन्न झालेल्या संतापाग्नीनें शत्रूची सर्वस्वी राखरांगोळी करून टाकली, व परिणामीं ते बंदिवासांतून मुक्त झाले. गुलामगिरीच्या प्रखर जाचा-मुळें निराशासमुद्रांत गटांगळ्या खाऊन अर्धमेलीं झालेलीं संस्थानें

फिरून स्वतंत्र कशीं झालीं व लिंकन सारख्या दरिद्री, अविद्वान आणि जंगलांत भटकून दिवस काढलेल्या एकट्या व्यक्तीला स्वातंत्र्य मिळवून देण्याचे कामीं यशस्वी कसें होतां आलें, हें सर्वज्ञांनीं लक्षांत ठेविण्याजोगें आहे.

लिंकन यास जर कोणी असे प्रश्न केलें कीं, ( १ ) को नरकः ? ( २ ) किं सत्यं ? ( ३ ) को धर्मः ? आणि ( ४ ) कःस्नेहः ? तर त्यांचीं ( १ ) परवशता; ( २ ) भूतहितं; ( ३ ) भूतदया आणि ( ४ ) सद्भावः, अशींच त्याचेकडून अनुक्रमें उत्तरें मिळत असत. शेवटीं इतकेंच सांगणें आहे कीं, ॥ बहूनामप्यसाराणां समवायोहि दुर्जयः ॥ संहतिः श्रेयसी पुंसां ॥ संहतिः कार्यसाधिका ॥ १ ॥ यांतील तत्वाला अनुसरून संघशक्तीचें रक्षण करून ती सदैव जागृत ठेविली पाहिजे व ॥ चिंता यशासि न वपुषि ॥ हें जसें लिंकननें चांगलें जाणलें होतें, तद्वत् सर्व राष्ट्रभक्तांनींही जाणलें पाहिजे, म्हणजे राष्ट्रोन्नति झाल्याशिवाय कधींही राहणार नाहीं.



# शुद्धिपत्र.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५ | १५ | सुस्वभचा | सुस्वभावाचा |
| ९ | १२ | रहितोतत्रैव | रहितस्तत्रैव |
| २० | १८ | किंकन | लिंकन |
| २२ | १० | आधिस्थान | आदिस्थान |
| २८ | १० | स्वत:च | स्वत:चा |
| ३१ | टीप | स्ववव | स्वभाव |
| ३५ | ८ | त्याच | त्याचा |
| ३७ | ८ | पडणार | पडणारा |
| ,, | १२ | राहराऱ्या | राहणाऱ्या |
| ३८ | १४ | जबब | जबाब |
| ४२ | ४ | कारस्थनाबद्दल | कारस्थानाबद्दल |
| ४९ | ६ | झाल्य | झाल्या |
| ६२ | १५ | अव्यइत | अव्याहत |
| ६३ | ४ | करीस | करीत |
| ६६ | २० | तपिण | तरीपण |
| ६९ | १० | समर | समटर |
| ७२ | २० | जॉन | जॉर्ज |
| ८० | ७ | दुर्वतनामुळें | दुर्वर्तनामुळें |

| | | | |
|---|---|---|---|
| १०२ | १ | स्वीड | स्पीड |
| १२० | २ | योद्धास | योद्धयास |
| १२९ | १५ | हेनराक्क | हेनरीक्के |
| १३१ | २० | मंते | मतें |
| १४४ | २ | काम पत्करलें | काम त्यानें पत्करलें |
| १९६ | ४ | लाके व्यवहारांत | लोक व्यवहारांत |
| १७२ | ७ | अहोत्रात | अहोरात्र |
| २०७ | १३ | वेन्सिलवॅनिया | पेन्सिल्वेनिया |
| २१६ | १५ | याना त्यानें | या नात्यानें |
| २२२ | २० | ये | येथील |
| २२९ | २१ | आल | आला |
| २३२ | १६ | निकाला | निकाल |
| २४४ | १४ | त्रिकोनांतहे | त्रिकोनांतले |
| २६२ | २१ | ०तें | होतें |
| २७३ | १९ | गुख्य | मुख्य |
| २७४ | ३ | भरभारटी | भरभराटी |
| २७५ | १७ | डोग्डलस | डोग्लस |
| २७९ | ५ | दान | दोन |
| २८२ | १७ | सुख | सुखं |
| २८३ | २० | उदासानिमध्यस्थ | उदासीनमध्यस्थ |
| २९४ | १८ | टेक्सच्या | टेक्सस्च्या |

| | | | |
|---|---|---|---|
| २९६ | १७ | अडरसनाने | अंडरसनानें |
| ३०२ | १७ | दक्षिणेंत लि | दक्षिणेंतील |
| ३१६ | ९ | योगता | योग्यता |
| ३१८ | २० | विस्मकृत | विम्सकृत |
| ३२३ | १९ | पाहून पाहून | पाहून |
| ३२३ | १८ | शिरखा | शिखरा |
| ३२४ | १ | फलनि | फलानि |
| ३२७ | १८ | एक्य | ऐक्य |
| ३३३ | १३ | स्यांच्या | त्यांच्या |
| ३३४ | १७ | यद्दल | बद्दल |
| ३४६ | १२ | यर्यंत | पर्यंत |
| ३४७ | १६ | खंडण | खंडन |
| ३५१ | ९ | यरिच्च्या | वीरांच्या |
| ३६५ | २० | आमच्य | आमच्या |
| ३७४ | २० | माडून | मोडून |
| ३९० | १ | फायदा | कायदा |
| ४११ | ४ | मॅकमिलन् | मॅक्क्लेलन् |
| ४१४ | १५ | माठी | साठीं |
| ,, | २० | जाहिनाम्या | जाहिरनाम्या |
| ४२२ | २० | सभत | सभेनें |
| ४२७ | ८ | मॅकक्लेन् | मॅकक्लेलन् |

| | | | |
|---|---|---|---|
| ४२८ | २० | स्या | त्या |
| ४३० | १८ | हे तुला | हेतूला |
| ४३१ | १६ | एकनिष्ठणें | एकनिष्ठपणें |
| ४४४ | १४ | माहीं | नाहीं |
| ४६२ | १४ | अगुभवाच्या | अनुभवाच्या |
| ४५६ | २ | इलमांचे | इसमांचे |
| ४५८ | १४ | एकांदां | एकदां |
| ४७१ | ६ | फिरावणें | फिरविणें |
| ५०२ | १३ | ऐन्टीएम | ऍंटीएटम् |
| ५१० | २० | प्यास | त्यास |
| ५१८ | १३ | मसुध्याच्सा | मनुष्याच्या |
| ५२५ | [illegible] | चांगका | चांगला |
| ५२७ | ४ | लढाईच्याच | लढाई त्याच |
| ६३१ | १४ | सेन्य | सैन्य |
| ५५७ | ७ | मारिते | मारितो |
| ५६३ | १ | जा | जी |
| ५७४ | ४ | पाहण्यास | पाडण्यास |
| ५८३ | १९ | कल | केलें |
| ६०९ | ७ | नचा | नच |
| ६३३ | २० | रॉथबाने | रॉथबोन |
| ६३५ | २० | लिंकनचें | लिंकनचें कऱ्हणें |
| ६३६ | १० | मारकऱ्या | मारेकऱ्या |

# या पुस्तकाच्या कर्त्यानें केलेलीं पुस्तकें.



**पंडित जगन्नाथराय व संगीत गंगालहरीः**—( रा. बा. देवल व कै. रानडे यांच्या अभिप्रायासहित; आवृत्ति २ री). श्री गंगेची मूर्ति, पंडितराय, यवनी, आणि गंगाघाट यांच्या देखाव्याचा चित्ताकर्षक फोटो, कवीचें चरित्र, मंगलाचरण, मूळ-श्लोक, वामनी श्लोक, प्रत्येक पद्याची चाल वेगळी अशीं साधीं संगीत पद्यें आणि भावार्थ, या प्रमाणें या पुस्तकांत क्रम ठेवला आहे. यांतील पद्यें नेहमीं झटल्यानें मनरंजन व श्रीगंगेची प्रेमळ स्तुति होऊन स्वार्थ व परमार्थ दोन्हीं साधतील. पुस्तक तयार होत आहे व तें लौकरच प्रसिद्ध होईल. श्रावण अखेर अगाऊ किं. ट. ह. स. ·॥· व त्या नंतर ·।॥·

**दीर्घायु कसें व्हावें ?**–( रा. बा. भांडारकर व कै. रानडे यांच्या अभिप्रायासहित ). हें पुस्तक श्री. सरकार सयाजीराव महाराजा गायकवाड यांहीं पसंत केलें असून तें शाळाखात्यांतही मंजूर झालें आहे. लंदन येथील प्रसिद्ध डा. हॉल याच्या इंग्रजी ग्रंथाचें हें रूपांतर असून त्यांत शारीरिक, मानसिक आणि नीतिसंबंधीं ११३७ आरोग्यसूत्रें दिलीं आहेत. सहज प्रकृति बिघडली असतां डाक्टराचें अगर वैद्याचें औषध हमेश घेतल्यानें प्रकृतिमान

केवळ औषधावर अवलंबून राहतें त्यामुळें आणि आहार, विहार, व्यायाम व वर्तनक्रम यांत अनियमितपणा होत गेल्यानें अकालीं मृत्युमुखीं पडण्याची वेळ येते; ह्मणून योग्य कारणाशिवाय कोणीही हरहमेश औषध घेण्याची संवय लावून न घेतां या पुस्तकांतील सूत्रांचें चांगलें मनन करून त्या प्रमाणें प्रत्येकानें वर्तनक्रम ठेवला असतां त्यास खातरीनें कळेल कीं—दीर्घायु कसें व्हावें ? किं. १॥ ट. ह. ८-

पत्ता:—राजमहाल रस्त्यावर नव्या मार्किटानजिक, बडोदें. मी. जेष्ठ शु. १२ गुरुवार शके १८३० ता. ११ जून १९०८ इ.

**रामराव मार्तंड भांबुरकर.**

---